# संधिकाल





लेखक
नारायण हरी आपटे.

मुद्रक-विठ्ठल विनायक लेले,
मकरंद प्रेस दादर.

प्रकाशक—महादेव गणेश गोरे.
मधुकर ऑफिस दादर—मुंबई.

———o———

सन १९२२

किं० ३ रुपये.

# प्रस्तावना.



परमेशाच्या कृपेनें 'संधिकाल' पूर्ण रूपांत वाचकांपुढें येत आहे.

स्वराज्य असतांनाही त्यावेळच्या लहानमोठ्या ऐतिहासिक व्यक्तींनीं स्वार्थाकरितां अगर देशहितार्थ कसें आचरण केलें आणि त्याचा परिणाम राष्ट्रावर कसा घडून आला, इत्यादि गोष्टींचें हें एक ऐतिहासिक शब्दचित्र रेखाटण्यांत आलें आहे.

आपल्या चालू संक्रमणावस्थेंत वाचकांना कुटिल राजनीतीचें रहस्य समजण्यांस याचा कांहीं उपयोग होईल काय ? झाल्यास लेखकास समाधान वाटेल.

चालू कादंबरी लिहिण्याचें कार्य चालू असतांनाच लेखकास कांहीं कामानिमित्त हिंदु धर्माचें प्रमुख तीर्थ श्रीकाशीक्षेत्र येथें जाऊन कांहीं काळ तेथेंच राहण्याचा सुप्रसंग प्राप्त झाला. प्रस्तुत कादंबरीचा निम्याहून अधिक भाग काशी मुक्कामींच लिहिला गेला. स्वच्छ, शीतळ गंगेचें स्नान व विश्वेश्वर दर्शनामध्यें आमचा काशीवास मोठ्या सुखाचा झाला ! असो.

श्रीविश्वेश्वर प्रसादानें संधिकाल वाचकांना प्रिय होईल, अशी आशा आहे.

कोरेगांव
जि.—सातारा.
वैशाख शु. ७।१८४४
४-५-२२

नारायण हरि आपटे.



# अनुक्रमणिका.



# संधिकाल

## अथवा

# मेवाड विरुद्ध दिल्ली

## निर्वाण-संदेश !

मेघव्याप्त आकाश रडत होतें ! अरवलीच्या पाषाण हृदयालाही दुःखानें विलक्षण पाझर फुटले होते ! मंद वाऱ्याचे सुस्कारे टाकून खिन्न झालेली वनश्रीही टप टप अश्रु गाळीत होती ! आणि मेवाडची स्वातंत्र्य-लक्ष्मीही दीन वदनानें आक्रोश करीत होती !! कारण, त्यांचा एकनिष्ठ भक्त महाराणा पुत्तोसिसोदिया वंशास ललामभूत झालेला वीराग्रणी प्रतापसिंग-कालाच्या दाढेखालीं चालला होता !

वृष्टि झिम् झिम् सुरूं होती ! क्वचित वेळीं ती थांबतही होती. परंतु त्यामुळें अश्रांचा पडदा थोडासाही विरविरीत झाला नव्हता ! राखी-रंगाच्या एकजात मेघांनीं अंतराल इतकें गडद झालें होतें कीं, भर दिवसा संध्याकाल अतीत झाल्याचा भास होत होता ! या अंधारीमुळें वनचर पशु-पक्षी आपआपल्या निवासस्थानीं अगदीं स्तब्ध बसले होते ! त्याचप्रमाणें मेघमंडळांतून मोठ्या दिमाखानें फिरणारी चंचल चपला मुळीसुद्धां उमगून

येत नव्हती आणि मऊताला तर जणूं नाकीं सूत लाविलं होतें ! नाहीं म्हणायला, दुःखानें धुंद झालेल्या दशदिशांची समजूत घालण्याकरितां भीतिप्रद शांतता, चिंताजनक गंभीरता व करुणास्पद उदासीनता एकत्र झालेल्या दिसत होत्या !

दुर्दिनाची ही अशुभ छाया आज प्रतापाच्या झोंपडींतही पडली होती ! महाराणा प्रतापसिंगाचे झोंपडींत ? मेवाडचा सम्राट झोंपडींत राहात होता काय ?–होय. सिसोदिया वंशाचें ब्रीद कायम राखणारा, यवनांनीं आर्य-संस्कृतीच्या पायाकरितां तयार केलेली दास्यत्वाची बेडी निखळून टाकणारा आणि आपल्या देश–धर्म बांधवांना स्वातंत्र्यलक्ष्मीच्या मंदिराचें द्वार उघडून देणारा महाराणा प्रतापसिंग राज्यारूढ झाल्यापासून मृत्यूचे द्वारीं पोंहोंचे-पर्यंत, झोंपडींत राहिला, पत्रावळीवर जेवला तृणासनावर झोंपला आणि वनांत भटकला ! वीराचें व्रतपालन असेंच खडतर आहे ! या व्रताचा प्रारंभच मुळीं ऐहिक सुखाच्या होमानें होत असतो आणि त्याचें उद्यापन आत्मसंतर्पणानें करावें लागतें ! प्रतापसिंगानें तें यथासांग पार पाडिलं ! पण त्या महापुरुषाला तें आचरावें कां लागलें ? त्याचें कारण इतिहास असें सांगतोः—

“ चितोडच्या राज्यासनावरून उदेपुरचे राणे पदभ्रष्ट झाल्यापासून चितोड नगरीला वैधव्य आलें होतें, असें त्या वेळच्या भाटांनीं म्हटलें आहे. हें वैधव्य घालवून त्या नगरीचें स्वामित्व आपले वंशाकडे आणण्याचा प्रतापसिंगानें निश्चय केला होता व तो निश्चय शेवटास जाईपर्यंत कोणत्याही प्रकाराचें विलाससुख भोगावयाचें नाहीं, असा त्यानें पण केला होता ! त्यानें सोन्यारुप्याचीं पात्रें वर्ज्य केलीं होतीं; सुखशय्येचा त्याग करून तृणासनाचा अंगिकार केला होता आणि एखाद्या तपस्व्याप्रमाणें दाढी वाढविली होती ! ”

प्रतापसिंगाचा हा इतिहास चित्तवृत्ति आश्चर्यानें थरारून सोडणारा व करुणरसानें उचंबळून आणणारा आहे ! प्रतापसिंगानें आपला पण आमरणान्त पाळला ! मेवाडच्या बऱ्याच मोठ्या भागास त्यानें स्वतंत्र केलें ! पण

एका गोष्टीनें त्याच्या व्रताची सांगता पूर्ण झाली नाहीं. मेवाडचा मुकुट चितोरगड परतंत्रच राहिला ! त्याचेवर बसलेली मोंगलाची मूठ ढिली झाली नाहीं ! प्रतापसिंगासारख्या मानी पुरुषास तें विषारी शल्य सहन झालें नाहीं ! त्यांत मोंगलाचें वाढतें प्राबल्य, नालायख रजपुतांचा प्रभुद्रोह, शूर बंधूचा भयंकर विरोध आणि स्वजनांची फितुरी, यांची भर पडली ! अशा या आपदांनीं त्या धैर्यमेरूचेंही धैर्य खचत चाललें; आणि त्या संकटाशीं झगडतां झगडतांच बिचारा एकाएकीं वीर मृत्यूचे द्वारीं येऊन उभा राहिला ! ही त्याची स्थिति पाहून, त्याच्या संकटकालीं त्यास साथ दिलेले त्याचे विश्वासू सरदार आणि त्याची सेना दुःखानें अगदीं थिजल्यासारखी झाली ! मेवाडचा स्वातंत्र्यसूर्य यवनांच्या ग्रहणांतून मुक्त होतो न होतो तोंच त्याचा प्रतापरवि अस्तंगत होण्याचा प्रसंग प्राप्त व्हावा, हें पाहून मोठमोठ्या वीरांचाही धीर खचत चालला !

दिवसानुदिवस प्रतापाची प्रकृति जास्तच बिघडत चालली! त्यास व त्याच्या आप्तेष्टांस एका अत्यंत सूक्ष्म आशातंतूवर लटकत राहिलेलें पुढचें कटु भविष्य कळून चुकलें! पिशाची क्षुधेपुढेंही ताठ राहिलेलें, अरण्यांतील कठोर हवापाणी पिऊन पत्थर बनलेलें आणि समरांगणावरील शस्त्राघातानें विशेषच कणखर झालेलें आपलें शरीर यापुढें मृत्यूला टक्कर मारून, त्यास कांही वेळ तरी दूर थोपवून धरण्यास सर्वस्वी असमर्थ आहे, हें पाहतांच प्रतापानें जगण्याचे सर्व आशाबंध तोडून टाकिले; आणि आपल्या निर्वाणाची अत्यंत शांतपणें तयारी केली! आपले पुत्र, भ्राते, सरदार, आप्तेष्ट व इतर निकटसंबंधीं या सर्वांना त्यानें आपल्याजवळ बोलावून, त्यांना शेवटचा निरोप सांगितला! तो श्रवण करीत असतां लहानापासून थोरापर्यंत, शहाण्यापासून अज्ञान्यापर्यंत आणि पुरुषापासून स्त्रियांपर्यंत सर्वांचे नेत्र अश्रुपात करीत होते ! फक्त प्रतापच काय तो धीरगंभीर स्वरांत बोलत होता; आणि अश्रुशिवाय सर्वांकडे पाहात होता! अगदीं भीष्म-निर्वाणाप्रमाणेंच तो देखावा पहाणारास दिसत होता !

शेवटीं त्यानें दोघां व्यक्तीखेरीज सर्वांस जाण्यास सांगितलें. त्या व्यक्ति म्हणजे त्याचा लाडका पुतण्या जयचंद व त्याची (जयचंदाची) पत्नी जयश्री ह्या होत! बाकीची सर्व मंडळी निघून गेल्यावर प्रतापानें त्या दोघां नाही आपल्या दोहीं बाजूस बसविलें; आणि आपली प्रेमळ स्निग्ध दृष्टि त्या दोघांवरही स्थिराविली! आतां जयश्रीला आपला शोकावेग आंत दाबून ठेवतां येईना. ती हुंदका देऊन ढसढसा रडत म्हणाली, "काकाजी—काकाजी, माझी माहेरची माया आटणारच का? सासरच्या शीतल छायेचें एवढेंसेंच सौख्य देवानं माझ्या नशीबीं घातलं होतं का?"

जयश्रीचे हे कळवळ्याचे बोल ऐकतांच इतका वेळ खंबीर राहिलेलें प्रतापाचें मनही डळमळूं लागलें. त्यानें तिच्या पाठीवर हात ठेवून कंपित स्वरांत म्हटलें, "बाळे–जयमती–हें काय हें?" पण इतका वेळ थबकून राहिलेल्या शोकानें त्याच्या जिभेला बांध घातला; आणि नेत्राच्या पापण्यावर असलेला निश्चयाचा बांध फोडून टाकिला! त्यामुळें त्यास पुढें बोलतां येईना व त्याच्या क्षीण गालावर धावून जाणाऱ्या अश्रूंना आवरतां येईना! जयश्रीला पोटाशी धरून प्रताप एखाद्या अर्भकाप्रमाणें रडूं लागला! तो प्रकार पाहून जात्या किंचित् निष्ठुर असलेला जयचंदही अगदीं भांबाऊन स्तब्ध बसता राहिला थोडावेळ तरी प्रतापाचें मन अत्यंत दुर्बल झालें!

महाराणा प्रतापसिंगाला उभ्या जन्मांत कधीं आपल्या मनावर हुकमत चालविण्यास आजच्या इतका त्रास पडला नाहीं. मोठ्या कष्टानें त्यानें आपल्या व्याकुल मनास व जयचंदानें शोकग्रस्त जयश्रीस आवरलें.

चित्त स्थीर झाल्यावर प्रतापानें जयश्रीचे अश्रु पुसले व ह्मटलें, "पूस–बेटा, डोळे पूस आणि मी काय ह्मणतों त्याचेकडे लक्ष दे! जयश्री, मी आपल्या निर्वाणाची तयारी किती खंबीर मनानें केली होती; पण शेवटी जगण्याचा मोह अनावर झालाच! नको बाळ, नको ते डोळे भरून आणूंस! माझ्या सगळ्या मुलींत मी तुझी धैर्याचे बाबतींत निवड केली आहे तव्हां असा शोक करून कसें बरें चालेल? अस्सं—पूस ते डोळे! जयश्री

मृत्युलोकापासून अनंत अंतरावर आकाशांत फिरणारे तेजोगोलही देखता-देखत निखळून पडतात ! मग आपण तर बोलून चालून मृत्युलोकीं जन्म घेतला आहे. अर्थात् मृत्यूचें ऋण हें फेडलेंच पाहिजे !"

"पण मृत्यूचा हा घाला अकालींच नाहीं का ?" जयश्रीनें ह्मटलें, "अद्याप चितोडची शुद्धि व्हावयाची आहे-"

प्रतापसिंगानें किंचित् हंसून मध्येंच ह्मटलें, "प्रत्यकाची सोय गैरसोय पाहून अगर इच्छे-अनिच्छेचा पडताळा घेऊन जर मृत्यूचें आगमन झालें असतें, तर त्याचें एवढें भय कोणासच वाटलें नसतें; आणि संसाराची क्षणभंगुरता हास्यास्पद ठरली असती ! मनुष्याची बुद्धिमत्ता मर्यादित असल्यामुळें मृत्यूच्या अमर्याद सत्तेचें रहस्य त्यास आकलन करतां येत नाहीं; आणि त्यामुळेंच तो दुःखाकुल होऊन, नानाप्रकारच्या शारीरिक व मानसिक आपदांनीं जड झालेलें जीवनही पाहण्यास राजी असतो ! जयश्री, न जाणों माझ्या हातून जें कार्य घडलें नाहीं, तें दुसऱ्या कोणा वीराचे हातून सहजीं घडवून आणण्याचा कैलासनाथाचा विचार असेल, आणि तेवढ्याकरितां माझी येथून उठावणी होत असेल. कोणी सांगावें ?"

"मेवाडचें अदृष्ट काय असेल तें खरें !" जयचंदानें गंभीरपणें ह्मटलें.

"मेवाडचें अदृष्ट !—शिवशंकर ! शिवशंकर ! ! कैलासनाथ, आपली इच्छा आहे ?—जयचंद," प्रतापसिंगानें खिन्नतेनें ह्मटलें, "अदृष्ट असं कांहींसा अशुभ शब्द तूं कां वापरलास बाबा ? मेवाडच्या वीरा, आपल्या जन्मभूमीचें भाग्य आपल्या इच्छेप्रमाणें घडवून आणण्याचें महत्कार्य आपल्याच हातीं नाहीं का ?—जयश्री, मृत्यूच्या स्वाधीन होतांना मी मोहानें मागें मुरडून पाहीन तर तो केवळ याचमुळें!-मेवाडचें अदृष्ट ! मेवाडचें अदृष्ट !!" प्रतापसिंग अस्पष्ट पुटपुटला, "या शब्दांत कसलें भविष्य सांठविलें आहे, कोणास माहीत ?" असें पुटपुटत तो दीर्घ उसासा टाकीत स्वस्थ पडला !

जयश्रीनें साशंक होऊन विचारिलें, "काकाजी, आपण असे खिन्न कां झालां ? बोला हो !---शेवटच्या वेळीं आमच्यापासून तुह्माला दुःख झाल्यास, आमचा दोघांचा सबंध जन्म दुःखांत जाईल, अशी मला भीति वाटते-"

प्रतापसिंगानें तिचा हात धरून म्हटलें, " नको बाळ, भीति वाटूं देऊं नकोस ! सुखांत असा ! वत्साची दांडगाई गाईस दुःख देत नाहीं; आणि तिच्या शिंगाचा धक्का चुकून सुद्धां तिच्या वासराला लागत नाहीं ! माझा आत्मा तुझाला शाप देणार नाहीं बरें; पण माझी एवढीच इच्छा आहे कीं, तुम्हीं दोघेही मेवाडशीं एकनिष्ठ राहा !"

प्रतापसिंगाचे ते शब्द ऐकतांच जयचंद दचकला व तें पाहून जयश्री भयचकित झाली. तिनें एक वार आपल्या पतीकडे व एकवार प्रतापसिंगाकडे पाहून आश्चर्यानें म्हटलें, " म्हणजे ? याचा काय अर्थ समजूं मी ? "

" जयचंद, तूं दचकलास ? " प्रतापानें निराशेनें म्हटलें, " असो. प्रभूची मर्जी जशी असेल, तसेंच होणार. मानवाची इच्छा केव्हांही कोतीच पडणार ! " असें म्हणत त्यानें एक सुस्कारा टाकला. अंतरंगांत त्यास फार यातना होत असाव्या, असें स्पष्ट दिसून आलें. बिचाऱ्या जयश्रीला त्याचा कांहींच उलगडा होईना. तेव्हां तिनें पुनः काकुळतीनें विचारिलें, " हें काय गौड बंगाल आहे ?—( जयचंदाकडे वळून ) आपण तरी याचा उलगडा करायचा. "

जयचंद कांहींच बोलला नाही. कांहीं तरी उत्तर तो आठवीत असावा, असें दिसलें. तेव्हां त्याच्याकडे पाहात प्रतापसिंग म्हणाला, " बाळा जयचंदा, मेवाडच्या गादीवर तुझ्या पित्याचा हक्क होता; परंतु कांहीं विशेष योगानें तें मजकडे आलें. हा मागचा इतिहास मनांत आणून राज्यपदाच्या लालसेनें तूं मोंगलाच्या सहाय्याची अपेक्षा करणार नाहींस ना ? केवळ व्यक्तीच्या सुखाकरितां मेवाडच्या सुखाचा व स्वातंत्र्याचा होम होऊं नये, अशी माझी अंतकालाची इच्छा आहे; आणि त्याविषयीं माझी जर कोणी खात्री करील, तर माझा प्राण सुखानें जाईल. "

जयश्रीनें खेदाश्चर्यानें प्रश्न केला, " आम्ही फितूर होऊन नरकाचें साधन करूं, असें आपल्यास वाटतें का ? ही शंका आमच्या विषयींच का आली ? "

" बाळे जयश्री, हा माझा कडु अनुभव आहे. " प्रतापसिंग उद्वेगानें म्हणाला, " माझें चरित्र पाहा. सक्तसिंग व संगराजित हे माझे बंधु; पण

माझ्याशीं वैर साधण्याकरितां ते मोंगलाच्या दारीं जाऊन पडले आहेत. त्यांच्या या विरोधानें माझें व्रतपालन शतपटीनें कष्टाचें झालें ! तोच शिरस्ता पुढें चालू राहील काय ? अशी मला भीति वाटते ! जयश्री, राजनीतीमुळें तुझ्या पित्याला मला देहदंड देणें भाग पडलें, तेव्हां पुढें मागें तुझ्या मनांत त्याविषयीं विकल्प येऊन, जर बापाचा सूड मुलावर घेण्याची तुला इच्छा झाली; आणि जयचंदाला राज्य लालसा उत्पन्न झाली, तर तुमचा दोघांचा विरोध मेवाडच्या स्वातंत्र्यास बाधक होईल, अशी माझ्या मनाला हुर हुर लागला आहे ! माझें स्वतंत्र बाण्याचें व्रत वाटेल तें दुःख सोसून पुढें चालविण्याचा वकूब माझ्या पुत्रांत–अमरसिंगामध्यें–आहे, असें मला वाटत नाही. म्हणून तुम्हाला शेवटचे चार शब्द सांगून, तुमची क्षमा मागावी, असा माझा विचार आहे." असें बोलून त्यानें जयचंदास जवळ बोलाविलें; आणि त्याचा हात आपल्या हातांत घेऊन म्हटलें, "जयचंद, आजच्या परिस्थितीप्रमाणें अमरसिंगाला गादी मिळणार असली तरी त्याच्या बरोबरीनें तुझाही हात तेवाडच्या राज्यकारभारांत असावा, अशी माझी इच्छा आहे; आणि म्हणून तुला त्याच्या मुख्य मंत्र्याचें कार्य देण्याची व्यवस्था मीं केली आहे. तेव्हां मेवाडचें राज्य अमरसिंगाचें न समजतां आपलें समजून मोंगलाशीं बांकून राहा; आणि चितोडच्या उद्धाराचा प्रयत्न करा ! त्यांतूनही तुला मेवाडचें राज्य आपल्याकडे असावें, असें वाटलेंच तर मेवाडच्या भूमींत राहूनच अमरसिंगाशीं द्रोह कर. पण त्याचे प्राप्तीकरितां आपल्या बरोबर मेवाडचें स्वातंत्र्यही मोंगलाच्या फासांत अडकविण्याचा पापी प्रयत्न करूं नकोस. तुझ्या हातून राजद्रोह झालेलाही मला पहावेल, पण मेवाडाशीं द्रोह नको ! ती कल्पना तुझ्या स्वप्नांतही न येऊं दे ! समजलें जयचंद, राज्य लोभ मोठा कठिण आहे ! व्यक्ति सुखाचा त्याग करणेंही सोपें नाहीं; आणि विलासाची हांवही मनांतून सर्वस्वी जाणें महा प्रयासाचें आहे; तरी पण माझ्या बाळा, मेवाडच्या सुखाकरितां आणि स्वातंत्र्याकरितां आपण सर्वांनीं आपल्या सर्वस्वाचा होम करण्यास तयार झालें पाहिजे ! मेवाड ही आपली जननी आहे, परमपूज्य अशी स्वातंत्र्य मूर्ति आहे ! तिच्या पूजनांत, तिच्या सेवनांत,

तिच्या भजनांत आणि तिच्या चिंतनांत आपल्या चित्ताचा आणि वित्ताचा, शरीराचा व बळाचा, बुद्धीचा व धर्माचा लय झाला पाहिजे ! तिच्या सुखाकरितां झटाल, तर सर्व सौख्य पावाल; स्वतःच्या सुखाकडे पाहून तिच्या सौख्याला टाळा देऊं पाहाल, तर सर्व मराल! म्हणून पुनः पुनः सांगतों कीं, मेवाडाशीं द्रोह नको ! " पुढें बोलण्याची शक्ति प्रतापसिंगांत राहिली नाहीं म्हणून तो स्वस्थ पडला. मात्र त्याचा तो निर्वाण संदेश ऐकून जयचंदाचें मन द्रवलें. त्यानें त्याच्या पायांवर हात ठेवून म्हटलें, " आपल्या पायाला स्मरून सांगतों कीं, आपला हा उपदेश केव्हांही नजरेआड करणार नाहीं; आणि त्याप्रमाणें यथाशक्ति आचरण करीन !"

प्रतापसिंगाच्या मुद्रेवर प्रसन्नता दिसली. त्यानें जयचंदाचे मस्तकावर हात ठेऊन त्यास आशीर्वाद दिला; आणि जयश्रीस उद्देशून म्हटलें, " बाळे, आपल्या पतीची प्रतिज्ञा ऐकलीस ना ? त्याच्या मागोमाग जाण्याचा प्रयत्न कर आणि प्रसंगीं तो कोठें चुकल्यास त्यास त्या पुण्यमार्गावरून ढळूं देऊं नकोस! पुरुषाच्या बेफाम मनोवृत्ति ताळ्यावर आणण्याचें नाजुक परंतु कठिण कार्य सुलभतेनें घडवून आणण्याचें त्याच्या पत्नीसच साधतें. जीं कार्यें देवांना साधलीं नाहींत, तीं त्यांच्या देवतांनीं पार पाडलीं आहेत, असें पुराणांतरीं वर्णन आहे ! तेव्हां त्याची आठवण ठेवा ! आणि ज्यावेळीं तुमचे शूरपुरुष चुकत आहेत, असें तुम्हांस आढळून येईल, त्यावेळीं मर्यादेचें महत्त्वही थोडावेळ बाजूला ठेऊन, त्यांचा उद्धार करा ! यापेक्षां जास्त काय सांगूं ?"

जयश्रीनें म्हटलें, " काकाजी, मी प्रतिज्ञेनें सांगतें कीं, मेवाडच्या भवितव्यतेविषयीं आतां आपण निश्चिंत असा. आपला हेतु आम्हाला कळून चुकला आहे. त्याचें पालन करण्यास आम्ही अणुमात्रही चुकणार नाहीं. त्यांतूनही तुमची आमच्याविषयींची शंका सार्थ आहे, असें मला समजलें तर त्यावेळीं माझ्या सौभाग्याचा मुलाहिजाही मी धरणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर आपल्या स्वातंत्र्य मूर्तीचा–मेवाडचा–कुंकुमतिलक कायम राखण्याकरितां, मला माझा मळवट पुसण्याची वेळ आली तर तेंही करण्यास मी मागें घेणार नाहीं –(जयचंदाकडे वळून) प्राणनाथ, मी पायरी सोडून बोलत नाहीं ना ?

क्षमा करा, पण या परमेश्वरस्वरूप पिताजींचें ऋण फेडण्याकरितां, मला हे शब्द उच्चारावे लागत आहेत. त्याला आपण प्रसन्न वदनानें अनुमति द्या!"

जयचंदानें एकदम म्हटलें, " अलबत्! जयश्री, धर्मरक्षणार्थ कोणतेंही आचरण करावें लागलें तरी तें पुण्यकारक असतें. मेवाडचें स्वातंत्र्यरक्षण हाच आजच्या रजपुतांचा परमधर्म आहे; आणि त्याचेकरितां आपण वाटेल तो त्याग केलाच पाहिजे! माझ्या गृहाचीं तूं देवता आहेस तुला योग्य तें बोलण्याचा अधिकार आहे! माझ्या मागोमाग तूं आलीस म्हणजे मी तुझ्या मागोमाग आहेच. संकोच वाटूं देऊं नकोस. काकाजींचें समाधान कर."

प्रतापसिंगानें दोघांनाही जवळ घेतलें व म्हटलें, " शाबास बाळांनो. आतां माझा निर्वाण सुखानें होईल!"

* * * *

त्या वेळच्या प्रतापाच्या मनःस्थितीचें व त्याच्या अंतकालाचें वर्णन भाटांनीं फारच हृदयद्रावक केलें आहे. तें असें:—

प्रतापाला मरतेवेळीं अशी एक काळजी होती कीं, मी आजपर्यंत ज्या अभिमानानें डौलानें व ऐटीनें वागून दिवस काढिले व शत्रूशीं वांकून राहून आपल्या कुल-नामाचें रक्षण करण्यांतच जन्म घालविलें; त्याप्रमाणें माझे मुलगे हें कुलव्रत चालवितील कीं नाहीं. व त्यांजकडून ज्या कित्येक माझ्या आशा आणि महत्वाकांक्षा अद्यापवि अतृप्त राहिल्या आहेत, त्या शेवटास जातील कीं तशाच पडून राहतील? अशा विवंचना त्याचे मनांत घोळून त्याचें दुखणें विकोपास गेलें. त्यांतून तो वांचेल, अशी कोणास आशा राहिली नाहीं. त्या शूर-धीर-गंभीर पुरुषाच्या या प्रायोपविष्ट स्थितीचें चित्र फारच हृदयद्रावक होतें. हा अद्वितीय नायक प्रायोपवेशनीं पडला असून, त्याचे भोंवतीं त्याचे परम विश्वासू, जिवास जीव देणारे आणि आशा व वैभव यांचे मुख्य आधारस्तंभ, असे त्याचे पुष्कळ सरदार मित्र जमले होते. त्यांना प्रतापाच्या या स्थितीकडे पाहून फारच शोक उत्पन्न झाला. परंतु तो सर्वांनी दाबून राहण्याला क्लेश व यातना उत्पन्न होऊं नयेत म्हणून मोठ्या गंभीरतेनें सर्वजण राजाकडे पाहात स्वस्थ बसले होते. तरी राणाच्या जिवास

स्वास्थ आणि शांति नसून, त्याच्या मनोवृत्ति जणूं काय उचंबळून येऊन त्यानें पुनः दीनासारखें स्वस्थ पडावें; असा प्रकार कांहीं वेळ चालला. तेव्हां साळुंब्याचा ठाकूर ( ईसरसिंग ) पुढें होऊन ह्मणाला, "महाराजांचे जीवास कोणते क्लेश होतात ? शांततेनें प्राण कां जात नाहींत ? " त्यावर प्रतापसिंगानें ओढत ओढत अशा शब्दांनीं आपला हेतु त्यास जाणविला. तो ह्मणाला, ' माझा हेतु इतकाच आहे कीं, माझा देश माझे पश्चात् परकीयांचे हातांत जाऊं नये. व याविषयींची माझी कोणी खात्री केली तर माझा जीव सुखानें जाईल.यावर तो कांहीं वेळ स्तब्ध होऊन पुनः अंमळसा सावध झाला; आणि मरणोन्मुख वृत्तीच्या शब्दांनीं त्यानें आपल्या सरदारास आणखीं ह्मटलें, या उदेपुरांत आपल्या ज्या झोंपड्या आहेत त्याचे मोठ मोठे वाडे करून, त्यांत विलाससुखें भोगीत तुह्मी स्वस्थ चैनीनें पडाल ! दिल्लीपती बादशहाचे चरणकमळीं आपलीं मस्तकें घासून, त्याचा प्रसाद ह्मणून, मोठमोठ्या संपत्ति व अधिकार मिळवून निरभिमानपणानें राहाल; आणि अशा प्रकारच्या ऐशआरामांतच मेवाडचें फार दिवसांचें स्वातंत्र्य घालवून, ज्या आपल्या पूर्वजांनीं आपलीं आयुष्यें त्याच्या अभिमानांत घालविलीं; त्यांच्या नांवास काळीमा आणाल तर असें करूं नका. त्यांचा अभिमान धरून त्यांचें नांव चिरकाल टिकेल, असें करा." यावर सर्वांनीं मोठ्या लीनतेनें व निश्चयपूर्वक सांगितलें कीं, जर आम्ही बाप्पारावळचे खरे वंशज असूं, तर आपल्या इच्छेप्रमाणें चितोडगड घेतल्याशिवाय उदेपुरची झोंपडी मोडून तेथें राजवाडे बांधणार नाहीं व आपल्या हेतूप्रमाणें युवराजासह मेवाडचे वैभव व स्वातंत्र्य जें आपल्या हातें पुनः लाभलें आहे तें रक्षण करण्यास कदापि आळस करणार नाहीं. " त्यांच्या तोंडून हें वचन ऐकल्याबरोबर त्या वीरशिरोमणीला समाधान वाटून त्यानें शांततेची व आनंदाची मुद्रा दाखविली; आणि सर्वांकडे एकवळ बघून डोळे मिटले व प्राणत्याग केला. याप्रमाणानें या प्रतापशाली प्रतापसिंगाचा वि. सं. १६५३ मध्यें काळ झाला ! "

लोकहित वादीकृत–राजस्थान.

---



# परिच्छेद १ ला.

~~~~ oo ~~~~

## सत्ता कीं स्वातंत्र्य ?

पराक्रमी प्रतापसिंगाबरोबरच मेवाडचा प्रताप जरी अस्तंगत झाला नाहीं आणि प्रतिज्ञेनें पित्याचें व्रत पुढें चालवून आपल्या स्वातंत्र्यास अमरत्व देऊं इच्छिणारा अमरसिंग उर्फ उमराव हा जरी राज्यारूढ झाला, तरी त्यामुळें मेवाडकरांपुढील पुरातन प्रश्न कांहीं मागें पडला नाहीं.

प्रिय काय ? मोंगलांची सत्ता कीं मेवाडचें स्वातंत्र्य ?

हाच तो प्रश्न होय ! फक्त मेवाडकरांनाच तो अपशकुन करता झाला अगर करीत होता अशांतला भाग नाहीं. राजस्थानांतील इतर मोठमोठ्या राजकुलांनाही त्यानें अडविलें होतें. एकेकाळीं मारवाडचे राठोड, बिकानेरचे भाटी, बुंदीचे हाडा, जयपुरचे कच्छवाह इत्यादि सूर्य सोम वंशजांनाही त्याचा पेंच पडला होता; परंतु विचारांतीं त्यांना त्याचें महत्त्व वाटलें नाही. मोंगलांच्या वाढत्या सत्तेच्या समुद्रांत आपल्या स्वतंत्र बाण्यास प्राण देण्याचा प्रसंग ओढवला तरी पुरवला; पण त्यांच्या कडवेपणाच्या खडकावर आपल्या राजविलास सुखाचीं जहाजें फुटावयास नकोत; असा त्यांनीं पोक्त विचार केला; आणि आपल्या सौख्यरूपी तारवांच्या सुरक्षतेकरितां आपल्या बेटी-बहिणींच्या सौंदर्याचे मनोरे उभारुन त्याचेवर बादशाही कृपेचे दीप पाजळून ठेविले !

मेवाडच्या रजपुतांना ही गोष्ट अत्यंत अप्रतिष्ठेची वाटली ! तेजस्वी सिसोदिया-कुलोत्पन्नांना तर ती इतकी असह्य झाली कीं, महाराणा प्रतापसिंगानें या सर्व राजकुलांना जाति बहिष्कृत केलें ! या शीलभ्रष्ट व आत्म-
~~~~

वंचक लोकांशीं कोणीही व्यवहार ठेवूं नये, असें त्यानें जाहीर केलें! या कृत्यामुळें आपले अपमानानें ओशाळलेले भाईबंद आपल्यावर खवळून उठतील व घरभेद करून शत्रूस प्रबल करतील. ही गोष्ट प्रत्येक मेवाडकर ओळखून होता; परंतु त्यांनीं त्याची क्षिति बाळगिली नाहीं! मोंगलांच्या सत्तेपेक्षां व कृपेपेक्षां त्यांना स्वातंत्र्य जास्त प्रिय होतें; आणि म्हणून त्यांनीं आपल्या घरबुडव्या भाईबंधांचें अनुकरण न करितां आत्मयज्ञाचें कंकण करीं बांधलें! अल्लाउद्दीन खिलजीच्या धाव्या पासून तों प्रतापसिंगाच्या प्रायोपवेशनापर्यंत त्यांनीं अनेकानेक वीरांगनांच्या रक्तोदकानें मेवाडची भूमि पुनित केली; आणि असंख्य वीरामहावीरांच्या कबंधाचा बांध घालून मोंगली सत्तेस तिला विटाळूं दिलें नाहीं; परंतु इतकी किंमत देऊनही त्यांची रणदेवता त्यांस प्रसन्न झाली नाहीं! वास्तविक घर-भेदपणाच्या झंझावातानें भडकलेल्या मोंगलांच्या कोपाच्या खाईत मेवाडचें स्वातंत्र्य भस्मीभूत व व्हावयाचें, परंतु प्रतापसिंगाच्या कणखर कर्तबगारीनें त्याचें रक्षण केलें! शेवटीं सत्तेवर स्वातंत्र्याचीच छाप बसली! अकबरानें मेवाड हाताखालीं घालण्याचा प्रयत्न सोडून दिला व कांहीं काळानें दिल्लीचीं राज्यसूत्रें जहानगिराचे स्वाधीन करून परलोकीं गमन केलें!

स्वातंत्र्य विरुद्ध सत्ता, मेवाड विरुद्ध दिल्ली, अमरसिंग विरुद्ध जहांगीर अशा जोडया काळाच्या आखाडयांत येऊन एकमेकांस चीत करण्याचे हेतूनें उभ्या ठाकल्या!

स्वातंत्र्यानें मेवाडास सांगितलें, "रजपुतांनों! तुह्मी खडकाप्रमाणें अचल, वज्राप्रमाणें अभेद्य, स्तंभाप्रमाणें ताठ, सूर्याप्रमाणें कर्तव्यदक्ष आणि ऋतुमानाप्रमाणें नियमबद्ध राहा; ह्मणजे तुह्मांस कालाचीही भीति राहणार नाहीं; आणि माझ्या रक्षणाबरोबर तुमचेंही रक्षण सहजीं होईल!

स्वातंत्र्यांची ही सांगी मेवाडच्या राण्यानेंही ऐकली; आणि प्रजेनेंही ऐकली. महाराणा अमरसिंगानें " आपले राज्याचा बंदोबस्त करण्याचा क्रम चालवून. जमिनीचा वसल वगैरे करण्याचेसंबंधानें निरनिराळीं ग्वातीं काढलीं. त्याच

प्रमाणें आपल्या पदरच्या सरदारांस व वीरांस जहागिरी व इनामें देऊन त्यांनीं गादीची कोणकोणती चाकरी करावी या विषयीं ठराव केले; व त्यांचे मान, पान, मरातब व पदव्या यांच्या पायऱ्या लावून त्या संबंधानें कांहीं नियम केले. इतकेंच नव्हे तर, आपल्या दरबारी मंडळीनें पागोटीं कोणत्या प्रकारचीं घालावीं, याविषयींही त्यानें नियम करून ते सर्व नियम ठिकठिकाणीं मोटमोठ्या खांबांवर खोदवून सर्व लोकांस कळण्याकरितां प्रसिद्ध केले ! *

मेवाडची ही तयारी पाहून दिल्लीची सत्ता फुत्कार टाकूं लागली; परंतु यावेळीं तिला मेवाडच्या स्वातंत्र्यावर शस्त्र उगारून धाववेना! कारण, या वेळीं बादशाही तख्तावर, पद्मिनीचा पापी अभिलाष धरणारा क्रौर्यमूर्ति अल्लाउद्दीन नव्हता किंवा आपल्या मायावी आचरणानें हिंदूंना भुरळ पाडून त्यांना आपल्या अंकीत ठेवणारा मिठास अकबरही नव्हता! तर एका हातांत शराबचा प्याला व दुसऱ्या हातांत मेहरुन्निसेची[१] मोहक तसबीर घेऊन विलासांत दंग झालेला जहांगीर होता. या नामार्थी जगज्जेत्या बादशहास शौर्यापेक्षां इष्क जास्त पसंद असल्यामुळें व मेवाडच्या तरवारीचें पाणी किती जड आहे, हेंही त्यास हळदीघांटच्या घनघोर युद्धांत माहित झालें असल्यामुळें आपल्या पित्याचें व्रत त्यास पुढें चालववेना! मेवाडचा स्वतंत्र कांटा त्याच्या सार्वभौमपदास सारखा रुतत होता तरी तो एकदम उपटून काढण्याचें सामर्थ्य—घरभेद्यांच्या चिमट्यानें सहाय्य असूनही—त्यास होईना! शेवटीं त्यानें एक गमतीदार तोड काढली! मेवाडच्या बोकांडीं बसविलेल्या, इतिहासप्रसिद्ध खानखानाच्या भावास—अब्दुलखानास त्यानें आपल्याकडे बोलावून

* अमरसिंगानें काढिलेली पगडी घालण्याची चाल मेवाड दरबारांत आजही चालत असून तिला ' उमरावशाही पगडी ' असें म्हणतात. मोंगलांशीं आपलें शत्रुत्व दर्शविण्याकरितां त्यानें हें चिन्ह प्रचारांत आणिलें असें म्हणतात. अमरसिंगाच्या नियमांचे शिलास्तंभ त्या प्रांतांत अद्यापिही सांपडतात.

१ भविष्यत्कालचीं इतिहास प्रसिद्ध नूरजहान !

घेतलें; आणि म्हटलें, ' खान, मला वाटतें, आतां यापुढें मेवाडकराशीं तलवारीचे हात बंद करावे आणि माझ्या मनांत आलेला डाव खेळून पहावा. मेवाडकरांचें सर्व प्रेम चितोडगडावर आहे. तो हस्तगत करण्याकरितांच प्रतापसिंगजी झगडले आणि आज राणा उमरावही ह्याचकरितां कंबर कसून तयार आहे! काय, माझें हें म्हणणें बरोबर आहेना? "

" जी हां! खाविंद! "

" मग तो गड आपण रजपुतांच्या ताब्यांत दिला तर? सर्वच भानगडी नाहीं का मिटणार? " जहांगिरानें प्रश्न केला.

" खाविंदाचें म्हणणें मला उमजून येईना—" अब्दुलखानानें म्हटलें.

त्याची कुशंका घालविण्याकरितां जहांगिरानें एकदम म्हटलें, " अब्दुल, भलतीच शंका मनांत आणूं नकोस—" त्यानें मिशी पिळत पुढें म्हटलें, " इतर सर्व रजपूत राजाप्रमाणें मेवाडचा शिरताजही माझ्या सलतनतीपुढें नमलाच पाहिजे ! माझी इच्छा एवढीच आहे कीं, यापुढें आतां लढाईचा आटापिटा नको. कांहीं दुसरा इलाज करून पाहावा. जमलें तर बरेंच झालें, नाहीं तर माझी तलवार आहेच परजलेली. आज ना उद्यां केव्हांतरी ती मेवाडचें स्वातंत्र्य खाऊन टाकणार खास ! परंतु त्या पूर्वी एक युक्ति करून पाहायची. प्रतापसिंगाचे बरेच भाईबंद आपल्या आश्रयास येऊन राहिले आहेत. मी म्हणतों, त्यांचेपैकीं कोणा एकास तरी महाराणा करून आपल्या वतीनें त्यांस चितोडच्या गादीवर बसवावें; आणि खरा. महाराणा हा ठरवून अमरसिंगास तोतया ठरवावें. "

जहांगिराची ही सल्ला ऐकून अब्दुलखान निहायत खुष झाला. तो अत्यंत आनंदानें आपल्या दाढीवरून हात फिरवीत म्हणाला, "जहांपनाहाची खुबी खूपच उमदी आहे ! अहा !"—

जहांगिरानें पुढें म्हटलें, " आणि मेवाडांत द्वाही फिरवावी कीं, बादशाहांनीं खुष होऊन ही योजना केली आहे तरी चितोडची गादी खरी मानून, तिला एकनिष्ठ असावें. आणि दिल्लीच्या सलतनतीस दुवा द्यावा !

मला वाटतें, वनवासाच्या दगदगीला कंटाळलेले सर्व रजपूत ही वार्ता ऐकून आनंदित होतील; आणि आपल्या खऱ्या महाराण्यास येऊन मिळतील व पर्यायानें आपली सत्ता मान्य करतील. तरी कोणत्या राजपुतास या पदावर चढवावें तें ठरवा. मात्र तो होतां होई तों सिसोदियाच्या वंशांतील असावा!"

यानंतर दिल्लीदरबारानें दिवाण-इ-खास मध्यें बसून मोठीच मसलत केली व सर्वानुमतें प्रतापसिंग महाराण्याचा अकबरास फितुर झालेला व एका विशेष कारणानें त्याचा प्रेमपात्र बनलेला भाऊ संगराजात उर्फ सुग्राजी यास चितोडचे सम्राट् बनविलें! स्वतः जहांगिरानें महाराणा पदाचीं वस्त्रें त्याचे अंगावर घातलीं व पूर्वसंकेताप्रमाणें त्याच्या नांवाची द्वाही चितोडप्रांतांत फिरविली! असो.

कालचक्र अव्याहत सुरू होतें! सुग्राजीला महाराणापद मिळून वर्षे होऊन गेलें. जहांगिराचा राज्यारोहणाचा तिसरा वाढदिवसही थाटानें पार पडला; आणि तिकडे महाराणा अमरसिंगाच्या कारकीर्दीसही दहा वर्षे होऊन गेलीं; तरी पण मेवाडकरांनीं चितोड घेण्याचा जोराचा प्रयत्न केला नाहीं कीं, दिल्लीच्या सत्तेसही त्यांच्या स्वातंत्र्यावर छाप मारितां आला नाहीं. दोन्ही पक्षापुढें पूर्वीचाच प्रश्न कायम राहिला! मेवाडचे रजपूत भराभर सुग्राजीकडे येतील, महाराणा उमराव एकटा पडेल व मग आपण त्यास सहज झोडून काढूं ही जहांगिरची कल्पना सपशेल ढासळली! तेव्हां पुनः तलवार हातीं घ्यावी, असें त्यास वाटूं लागलें. परंतु अलीकडे त्याचें सर्व लक्ष्य मेहरुन्निसेच्या मनधरणीकडे लागल्यामुळें, तो त्यांतच दंग झाला! अब्दुलखान मात्र मेवाडास विसरला नव्हता. इतर अनेक सरदारांप्रमाणें दरबारांत आपली प्रतिष्ठा वाढावी म्हणून तो धडपडत होता व आपण मेवाड खालसा करण्यांत फत्ते मिळविल्यास, आपल्या भावानें ज्याप्रमाणें अकबरशहाजवळ मान्यता संपादिली; त्याप्रमाणें आपलाही मान जहांगिरजवळ वाढेल, अशी त्यास उमेद होती, म्हणून त्यानें आपल्या अधिकारांतच आणखी एक करामत करून मेवाडचा कष्टसाध्य परंतु गोड घास मटकावण्याचें योजिलें!

आज बरींच वर्षें मेवाडच्या स्वारीकडे त्याची नेमणूक होती. या संधींत त्यानें महाराणा अमरसिंग व त्याचें मंत्रिमंडळ यांचेवर अंतस्थ नजर ठेऊन, प्रत्येकाच्या स्वभावाचें त्यानें चांगलें निदान ठरवून ठेविलें होतें. मोडक्या सुग्राजीस कोणी मानीत नाहीं व ती युक्ति सफळ होणें शक्य नाहीं, असें त्यास दिसून येतांच, महाराणा अमरसिंग व त्याचा मुख्य मंत्री जयचंद यांचेवरच त्यानें एक मोहक प्रयोग करून पाहण्याचें धाडस केलें ! आपल्या अखत्यारीनें त्यानें उदेपुरास महाराण्याकडे मोठयाशा नजराण्यासह एक हुशार वकील गुप्तपणें पाठविला; आणि त्याचेबरोबर दिल्लीच्या बादशहाच्या शरणागतीचें एक पत्रही दिलें. "मेवाडच्या स्वतंत्र बाण्यापुढें शहानशहा अकबराचें कांहीं चाललें नाहीं मग आपला पाड कोठून लागणार. असें हल्लींचे बादशहा जहांगीर यांना मनापासून वाटत आहे. तरी यापुढें या दोनी सल्तनतीमध्यें वैरभाव असण्यापेक्षां स्नेह असणें उभयपक्षांस हितकर आहे; असें आह्मी दरबाराच्या संमतीनें ठरविलें आहे. तरी आपल्या तर्फे कोणी सुयोग्य मंत्रि तहाचें बोलणें करण्यास पाठवावा. मात्र ही गोष्ट बाहेर इतक्यांतच फोडूं नये. प्रत्यक्ष भेटींत सर्व गोष्टींचा खुलासा होइल." असा मजकूर त्या पत्रांत लिहिला होता !

अबदुलखानाचें हें मायावी पत्र ह्मणजे मेवाडच्या स्वातंत्र्यावर एक अचूक मर्माघात होता ! मेवाडचा राणा व लोक शूर होते, धीर होते, स्वतंत्र बाण्याचे होते; थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे वीरत्वाला उचित असे सर्व गुण त्यांचे ठायीं होते; पण त्यांच्याच जोडीला राजनीति निपुणता नव्हती ! शौर्यवीर्य तेज खरें; पण तें सतत कायम ठेवण्यास व त्याचा योग्यकालीं योग्यतितकाच उपयोग करण्यास बुद्धिमत्तेचें सहाय्य पाहिजेच पाहिजे ! शौर्याला शौर्याशींच प्रसंग पडला तर कांहीं नुकसान होत नाहीं; परंतु तीच कपटाशीं गांठ त्याची पडल्यास पुष्कळ वेळां शौर्यालाच कच खावी लागते ! रजपुतांना मोंगलापुढें हार खावी लागली, त्याचें कारण ते मोंगलापेक्षां दुर्बल होते म्हणून नव्हे ! तसें असतें तर महुमंदास पृथ्वीराज चव्हाणानें सतरा

वेळीं पराजित केलेंच नसतें ! परंतु शौर्यविरुद्ध कपट असा डाव पडल्यामुळें रजपूत तोंडघशीं पडले व मोंगलांची जोखीम त्यांना वहावी लागली*!

मेवाडचे शूर पण भोळे रजपूत आपल्या पत्रानें फसणार, अशी अटकळ अबदुलखानानें केली होती; आणि मेवाडच्या दुर्दैवानें ती सर्वस्वी खरी ठरली! दिल्लीपति जहांगीर आपल्याला शरण आला, आपल्या शौर्यानें त्यास जेरीस आणिलें; ही कल्पनाच मुळीं इतकी मोहक होती कीं, अमरसिंगाला व त्याच्या जवळ असलेल्या इतर तरुण मंडळीला त्या शरणपत्राच्या सत्यासत्यतेचा विचार करण्याकरितांही होश राहिला नाहीं! आपल्यापेक्षां वयानें पोक्त, अनुभवी व प्रतापसिंगाचे शिकवणींत वाढलेले व मेवाडचे अभिमानी असे सरदार उदेपुराचे रजपूत आहेत; तेव्हां त्यांना विचारून, त्यांच्या सल्ल्यानें पुढें काय करावयाचें तें ठरवावें, एवढा साधा विचारही त्या तरुण सरदारास सुचला नाहीं व रुचलाही नाहीं; आणि त्यांनीं पोकळ अभिमानांत मुख्य मंत्रि जयचंद काणावत यांस अबदुलखानाकडे पाठविण्याचें योजिलें.

एका मोठ्या सुमुहूर्तावर चांगला शकुन बघून जयचंद काणावत यांची स्वारी आपल्या इतमामाप्रमाणें अबदुलखानाकडे जावयास निघाली.

आपल्या अटकळीप्रमाणें आपले अपेक्षित सावज आपल्याकडे येतें आहे, ही बातमी अबदुलखानास समजतांच त्यानें जयचंदाच्या स्वागताची तयारीही फार चांगल्या तऱ्हेची केली. मुसलमानी सत्तेच्या या प्रदेशांत तो येतांच, त्याच्या पाहुणचारास सुरुवात व्हावी, असा बंदोबस्त त्यानें ठेविला होता; आणि कमीत कमी पांच कोस तरी त्यास सामोरें जावयाचें, असें ठरविलें होतें.

अभिमानानें फुगलेला, भावी दैवाचे वाडे उठवणारा व आपल्या शौर्यावरच विसंबून राहणारा जयचद काणावत कूच दरकूच करीत अबदुल-

*रा. गोविंद सखाराम सरदेसाईकृत 'मुसलमानी रियासत' या ग्रंथांतील 'गतकालाचें पर्यालोचन' हे १९ वें प्रकरण ( पृष्ठें ३६४ ते ४०९ पर्यंत ) वाचकांनीं जरूर वाचून पाहावें. निदान त्यांतील 'रजपुतांच्या पाडावाची मीमांसा' एवढा भाग तरी अवश्य पाहावा.

खानाच्या आसमंतात येऊन पोंचला. पूर्वविचारानुसार अबदुलखान त्यास सामोरा गेला ! नम्रतेचें सोंग घेऊन त्यानें जयचंदास चांगलेंच चकविलें. त्यास घेऊन तो बहिरामगडावर येऊन दाखल झाला !

एका मोठ्या शामियान्यांत जयचंदाचा डेरा देण्यांत आला. तेथील प्रत्येक गोष्ट इतकी व्यवस्थेनें योजिली होती कीं, जयचंदास तो थाट पाहून स्वतःचें भान राहिलें नाहीं. राजामहाराजाला शोभेल असा रहाणीचा थाट, कोणतेंही न्यून नसलेला स्वागताचा समारंभ आणि कोणासही भुरळ पाडणारी अबदुलखानाची मिठास वाणी, यामुळें एखाद्या चिकित्सक व अत्यंत दूरदर्शी अशा मुत्सद्यांसही क्षणभर बुद्धिमांद्य आलें असतें; मग जयचंदासारखा हुरळलेला तरुण सर्वस्वी फसला यांत नवल तें काय ? आपणच आज अलमदुनियेचे बादशाहा आहोंत, असें त्यास वाटूं लागलें !

अबदुलखानानें पहिले चार दिवस तर निव्वळ पाहुणचाराच्या गडबडींत घालविले. नंतर एकेदिवशीं नाचरंगांनीं खुशतब्येत झालेल्या जयचंदाशीं तहाचें बोलणें सुरू केलें !

" दिल्लीचें व मेवाडचें वैर कां असावें; हेंच मला समजत नाहीं. दिल्लीची सलतनत मोंगलाची नसून हिंदूचीच आहे. महाराणा प्रतापसिंगांनीं निष्कारण गैरसमज करून घेऊन वनवास भोगला. राजा मानसिंग, तोडरमल्ल, बीरबल यासारख्या हिंदु लोकांनीं चालविलेला दिल्लीचा राज्यशकट मोंगलाच्या मालकीचा म्हणणेंच हास्यास्पद आहे ! सर्व राजेरजवाडे आमचे अंकित नसून आमच्या बरोबरीचे आहेत. त्यांच्या मानमरातबांत कांहींही कमतरता नाहीं. तरी सर्व गोष्टींचा सांगोपांग विचार न करितां भलत्या इरीला पडून आपल्या प्रजेचें रक्त सांडण्यापेक्षां उभयतांनीं सलोख्यानें राहावें, हें उचित आहे. मेवाडच्या सर्व वीरांमहावीरांविषयीं आम्हांला आदर वाटत असून त्यांना मोठमोठ्या जहागिरी, इनामें, पदव्या इत्यादि देण्याची आमची इच्छा आहे! चितोडगड आम्ही आपण होऊन रजपुतांच्या ताब्यांत देऊन टाकला आहे. त्यांत तरी आमचा थोर हेतूच आहे. " इत्यादि गोड गोष्टी बोलून अबदुलखानानें जयचंदास गुंगवून सोडलें ! त्याचें सर्व बोलणें त्यास सर्वांशीं खरें

वाटलें व त्या भरांत त्यानें अबदुलखानानें लांचेच्या रूपानें दिलेला बहुमूल्य नजराणा मान्य केला ! या गोष्टीनें आपण दिल्लीपतीचे मिंधे होत आहोंत, हें कांहीं त्याच्या लक्षांत आलें नाहीं; आणि तहाचें कांहींच न करितां तो अबदुलखानानें महाराणा अमरसिंगास अर्पण केलेला नजराणा घेऊन परत फिरला !

अशाप्रकारें अबदुलखानानें जयचंदावर छाप ठेविली व त्याबरोबर अगदीं न कळत दिल्लीच्या सत्तेचा हात मेवाडच्या मानगुटीवर आला !

——:o:——

# परिच्छेद २ रा.

## बादशाही सोन्याचा गुलाम !

नवप्राप्त वैभवानें, अबदुलखानानें अर्पण केलेल्या नजराण्यानें जयचंद इतका दिपून गेला, इतका मूर्ख बनला, कीं, हें वैभव आपल्या देश-धर्म शत्रूंपासून आलेलें आहे; अतएव तें त्याज्य आहे, हें कांहीं त्याच्या लक्षांत आलें नाहीं ! मोंगलांनी आपला सत्कार केला; अबदुलखानासारख्या दिल्ली दरबारांतील एका बड्या सरदारानें आपल्याशीं स्नेह केला, एवढीच गोष्ट त्याच्या मनांत उतरली व त्याचें भान नाहींसें झालें ! त्या धांदलींत त्यास प्रतापसिंगाच्या पवित्र व्रताची, मेवाडच्या स्वातंत्र्याची, मोंगलांच्या अन्यायांची अगर आपल्या स्वतंत्रबाण्याची कशा-कशाचीही म्हणून स्मृति राहिली नाहीं ! बाळपणापासून त्या प्रतापी राण्याच्या निकट सहवासांत वाढलेल्या त्या तरुण रजपूत वीरास अशी भुरळ पडावी; शत्रूनें रचलेल्या मायावी वर्तनाचा त्यास उमग पडूं नये हें आश्चर्य होय ! परंतु असें झालें खरें ! आज तरी जयचंद स्वतःला न कळत बादशाही सोन्याचा गुलाम झाला !

मोठ्या तांतडीनें तो आपल्या राण्याकडे आला. अबदुलखानानें अर्पिलेला सर्व बादशाही नजराणा त्यानें आपल्या स्वामीस अर्पण केला आणि त्या

मोंगल सरदाराच्या सौजन्याची बेहाय स्तुति केली ! जयचंदाप्रमाणेंच त्याच्या बरोबर गेलेला इतमामही खानाच्या मायेस भुलल्यामुळें, कोणाचेंही डोक्यांत खऱ्या स्थितीचा प्रकाश पडला नाहीं व निदान उदेपुरांत तरी ' दिल्लीच्या बादशाहानें शरण येऊन आपल्या महाराण्याचा मोठा सत्कार केला. ' असा पुकारा झाला; आणि जिकडे तिकडे एकच आनंदी आनंद उसळला ! सामान्य जन अनुकरणप्रिय असल्यामुळें कोणालाही कसलीच शंका आली नाहीं. आणि जो तो त्या आनंदाच्या उत्साहाला भागीदार झाला !

उदेपुरच्या दरबारांतही ह्या गोष्टीचा विशेष खल झाला नाहीं. जयचंदाला अबदुलखानाकडे पाठवितांना जशी कोणास कांहींच शंका आली नाहीं, त्याचप्रमाणें तो नजराणा घेऊन परत आल्यावरही मुत्सद्देगिरीच्या दृष्टीनें कोणास कांहीं विशेष वाटलें नाहीं. सुशतव्येत जयचंदाची फुगवून सांगितलेली हकीगत ऐकून महाराणा अमरसिंग खुश झाला, त्याची खुशी पाहून दरबार खुश झाला; आणि दरबारचा आनंद पाहून लोकही आनंद पावते झाले ! मग शंका घेणार कोण ? शत्रूच्या वर्तनाची चिकित्सा करणार कोण ? आणि सावधगिरीनें वागणार कोण ? आतां दरबारांत पोक्त वयाचे व अनुभवी असे मंत्रि असते तर या गोष्टीची थोडीतरी वाटाघाट झाली असती, परंतु मेवाडच्या दुर्दैवानें तशी स्थिति राहिली नव्हती. प्रतापसिंगाच्या मागोमाग त्याच्या बरोबरीचे मुत्सद्दी सरदार व वृद्ध रणपंडित काळाच्या भक्ष्य स्थानीं पडल्यामुळें दरबारांत तरुण पिढीचाच भरणा झाला होता. बरें, जे कांहीं चारदोन लोक होते, ते आपआपल्या जहागिरीच्या गांवीं होते. राण्यानें अगर दरबारानें त्यांची सल्ला घेण्याइतकी उठाठेव केली नाहीं; त्यामुळें अबदुलखानाची माया यशस्वी होण्यास चांगलीच मदत झाली !

मोंगलाच्या कारस्थानानें स्वातंत्र्यभिलाषी मेवाडकर हुरळून जाण्याचें आणखी एक कारण होतें. मनुष्य हा स्वभावतःच सुखलोलुप आहे. तो दगदगींत असे तोंपर्यंत हिंमतीनें संकटें सहन करिता हें खरें; परंतु सुखाची थोडीशी विश्रांति त्यास मिळतांच तो आपल्या ध्येयापासून ढेंलावूं लागतो. मग त्यास दगदग नको असते आणि तिला टाळण्याकरितां कित्येकवेळां तो

आपल्या शाश्वत सुखालाही टाळण्यास तयार होतो. प्रतापसिंग वारल्या नंतर मेवाडनें जें ' हुस् ' म्हटलें तें कायमचें ह्मणण्याची वेळ आली ! अमर-सिंगाची शांततेची कारकीर्द सुरूं झाली. तिकडे मोंगलांनींही कांहीं विशेष हालचाल केली नाहीं. हा असा काळ दहावर्षें लोटला ! अर्थात् यापुढें आतां मागची वणवण पुरे असें महाराण्यापासून तों खालच्या शिपायापर्यंत सर्वांनाच वाटूं लागलें. प्रतापाच्या प्रतिज्ञेकरितां म्हणा किंवा स्वातंत्र्याकरितां म्हणा, दहावर्षांच्या शांततेच्या काळानें सुखावलेला मेवाड पुनः पहिल्या दमानें उठण्यास सर्वस्वीं नाखुश होता. अशा स्थितींतच मोंगलाचा मायावी ' क्षमस्व ' संदेश वातावरणांत दुमदुमला ! त्याबरोबर सर्वांनीं आपल्या मनाची फसवणूक केली ! जयचंद बादशाही सोन्याचा गुलाम झाला ! महाराणा अमरसिंग नजराण्यानें दिपून गेला आणि प्रजा राण्याच्या सुराला सूर देऊन आनंदांत मग्न झाली !

केवळ अपवादादाखल प्रतापसिंगाच्या प्रतिज्ञेची जागतीज्योत आपल्या अंतःकरणांत ठेवून, ती शेवटास कशी जाईल याची चिंता वाहणाऱ्या फक्त दोनच व्यक्ति आज मेवाडांत होत्या. त्या म्हणजे साळुंब्र्याचा ठाकुर ईसर-सिंग आणि जयचंदाची पत्नी जयश्री या होत. त्यापैकीं ठाकुर ईसरसिंग महाराणा अमरसिंग याच्या इच्छेनुसार कालगत प्रतापसिंगाच्या अस्थि घेऊन उत्तरक्रियेची सांगता करण्यास वाराणसीक्षेत्रीं गेला होता. यावेळीं जर तो हजर असता, तर त्यानें जयचंदास अबदुलखानाकडे एकाएकीं सहसा जाऊं दिलें नसतें; परंतु तो दूरदेशीं गेल्यामुळें व जयश्री अबला असल्यामुळें मोंगलाच्या डावाला ताबडतोब तरी कसलीच हरकत झाली नाहीं. असो.

मोंगलांशीं सलोखा घडवून आणण्यांत जयचंदानें फारच चातुर्य दाखविलें. असा जिकडे तिकडे बोभाटा झाल्यामुळें खुद्द दरबारांत आणि बाहेर जगांत जिकडे तिकडे त्याची स्तुति होऊं लागली. ती श्रवण करून जयश्रीसारख्या प्रेमळ पत्नीस अत्यंत धन्यता वाटली, यांत नवल नाहीं. तिनें प्रत्यक्ष भेटींत मधुर शब्दांनीं आपल्या पतीचें अभिनंदन केलें आणि दिवसानुदिवस त्याचा असाच उत्कर्ष होत जावो म्हणून एकलिंगजीजवळ आशोर्वाद मागितले !

सकृद्दर्शनीं हें सर्व ठीक झालें; परंतु पुढें जयचंदालाच आपल्या वर्तनाची शंका आली. अबदुलखानाचें पत्र आपण खरें मानिलें आणि त्यानें केलेला मानमरातब मुकाटयानें मान्य केला हें कांहीं बरें झालें नाहीं. या व्यवहारानें आपल्या बाणेदारपणाच्या पायांत मिंधेपणाची बेडी पडली आहे आणि वेळींच आपण ती न तोडल्यास मेवाडच्या स्वातंत्र्यास तिची बाधा झाल्या-वांचून राहणार नाहीं, असे चिंताजनक विचार त्याचे मनांत आले व तो अस्वस्थ झाला ! आपल्या फुशारकीच्या बकवादानें त्यानें यावेळीं आपल्या भोंवतीं अशी एक चमत्कारिक सृष्टि निर्माण केली होती, कीं, आपल्या शंकेचा एक शब्दही बाहेर टाकणें त्यास सर्वस्वीं अशक्य होऊन बसलें होतें. आपल्या जिवाभावाच्या जयश्रीलासुद्धां त्यास ही शंका सांगतां येत नव्हती. मग इतराची गोष्ट कशाला पाहिजे ?

परंतु याचवेळीं एक चमत्कार घडला. अंतःकरणाच्या एकत्वानें जय-श्रीच्या मनांतही बरोबर अशाच शंका आल्या व तिनें त्या तात्काळ आपल्या पतीला बोलूनही दाखविल्या. नंतर ती म्हणाली, " मामंजीपुढें केलेल्या प्रतिज्ञेचं स्मरण आहेना ? तें आपण कधींही विसरतां उपयोगी नाहीं. यशाला अधिकारी कोणीही होईल, अपयशाला धनी मात्र कोणीच होणार नाहीं. म्हणून म्हणतें त्या मोंगलसरदाराशीं करायचं कारस्थान मोठ्या विचारानं करावं ! अति विचारानं तर मला असं वाटायला लागलं आहे कीं, ठाकुर ईसरसिंगजी परत येईपर्यंत आतां आपण कांहींच करूं नये—"

जयचंद एकदम म्हणाला, " छे छे, इतकं भिण्यासारखं खरं पाहिलं तर त्यांत कांहींच नाहीं. अबदुलखान फार सरळ मनुष्य आहे. तो मुळींच विश्वास-घात करायचा नाहीं—"

" याच आपल्या समजुतीची मला फार भीति वाटते. खान कितीही चांगला मनुष्य असला तरी तो मुसलमान आहे, हें आपल्यास विसरतां येईल का ? तो सुष्ट असेल, शूर असेल, बोलण्यांतही मोठा सरळ असेल मी नाहीं म्हणत नाहीं; पण मेवाडविषयीं त्यास प्रेम वाढत असेल, हिंदुधर्माचा तो पक्षपाती असेल आणि रजपुतांचें स्वातंत्र्य त्यास मनापासून आवडत

असेल, हें खरं समजायला मार्ग काय ? आपला त्यानें मोठा सत्कार केला; आपल्या महाराण्यांनाही त्यानें बहुमूल्य नजराणा अर्पण केला; पण तेवढया-वरून तो आपला मित्र आहे हें कसें मानतां येईल ? आपल्यास मिंधे कर-करितां प्रथमतः नजराण्याचें आमिष दाखवून महाराण्यांना विलासाची चटक लावण्याकरितां त्यानें हें कृत्य केलें नसेल कशावरून ? या माझ्या घर-बशा स्त्रीच्या शंका आहेत; पण त्या खोटया आहेत का ? "

जयचंदानें अभिमानाचा आविर्भाव आणीत म्हटलें, " पण या त्याच्या कल्पनेला फसण्याइतके आम्ही भोळे आहोंत, असें कां तुला वाटतें ? "

जयश्रीनें एकदम म्हटलें, " स्पष्ट बोलतें म्हणून राग मानूं नये; परंतु खरंच सांगायचं पुष्कळवेळां मनुष्य अहंकारानें फसत नाहीं का ? मोंगल आपल्यास शरण आले, अशा भुरळीनं आपल्या मनाची फसवणूक झाली नसेल कशा-वरून ? "

जयचंद यावर काय बोलणार ? त्याचा आत्मा हेंच बोलत होता. तो स्तब्ध राहिलेला पाहून जयश्री किंचित् हंसून म्हणाली, " पाहिलं, आपण गप्प बसायचं. अर्थात् आपल्या मनांत या शंका या पूर्वीच आल्या असल्या पाहिजेत—"

आपल्या हृदयस्वामिनीपुढें लपंडाव खेळणें जयचंदास केव्हांही अशक्यच होतें. तो तात्काळ तिला आपल्याजवळ ओढून म्हणाला, " जयचंदाच्या प्रतिबिंबा, तुझें म्हणणें अक्षरशः खरें आहे ! श्री, साऱ्या जगाला मला फसवितां येईल; पण माझ्या या आत्म्याला फसवितां येणार नाहीं ! "

" हें खरें ना—" जयश्रीनें म्हटलें, " मग माझी विनंति ऐकावी. अबदुलखानाविषयीं अगदीं सावध राहावं आणि या पुढं आपल्या मतानं त्याच्याशीं कसलंच खलबत करूं नये. ठाकुर ईसरसिंगजी परत येऊंदेत. ते आल्यानंतर त्यांच्या सल्ल्यानं पुढं काय करायचं तें ठरवावं. त्यांतच आपलं कल्याण आहे. "

" तुझी सल्ला कांहीं वाईट नाहीं; पण ठाकुरसाहेबांना यायला अद्याप कितीतरी अवधी आहे. त्यांना जाऊन कुठे महिना झाला आहे. त्यांना परत यायला जवळ जवळ वर्ष सव्वा वर्ष तरी पाहिजे. तोंपर्यंत—"

" तोंपर्यंत—काय ? बोलणं तहकूब ठेवावं म्हणजे झालं. आपल्या कृपेचे मोंगल भुकेले आहेत. मेवाडच्या तरवारीचें पाणी पुनः न चाखण्याची त्यांची इच्छा असेल तर ते चुंबित गप्प बसतील—आणि मी म्हणतें तोंपर्यंत आपण चितोडची मागणी कां करूं नये ? दिल्लीपतीनें सुम्राजीचें बुजगावणें उभारून मेवाडकरांना भारण्याचा जो उपद्व्याप केला आहे, तो नाहींसा करून मामाजींची प्रतिज्ञा पूर्णतेस पोंचविण्याचें कार्य आपण कां करूं नये ? खरं म्हटलं तर आपण सोन्यामोत्याचा नजराणा घ्यायचाच नव्हे. मोंगलांनीं मेवाडास जो ताप दिला, आणि मामाजींना जे कष्ट सोसावे लागले, त्याची भरपाई कुबेराच्या संपत्तीनंसुद्धां होणारी नसून चितोडच्या उद्धारानंच होणारी आहे. मामाजींना जाऊन दहावर्सं झालीं. वास्तविक यापूर्वींच चितोडचें स्वातंत्र्य मिळविण्याचा अट्टाहास व्हायला पाहिजे होता. आतांपर्यंत त्यांच्या अस्थी गंगेला न पाठविण्याचंही तेंच कारण होतं; परंतु स्वतंत्र झालेल्या मेवाडाची नीट व्यवस्था लावण्याचं महाराण्यांनीं योजिलं. तेंही कांहीं वाईट कार्य नाहीं झालं; पण त्याकरितां चितोडचा प्रश्न मागं पडायला नको होता. आतां जिकडची तिकडं सर्व व्यवस्था लागली, आतां महाराण्यांनीं किंवा त्यांच्या प्रजेनं आपल्या मुख्य हेतूची कां बरें हेळसांड करावी ? माझ्या मतानं ठाकुर साहेबांनीं तीर्थयात्रेला इतक्यातच जायला नको होतं. अगोदर चितोडगड घ्यायचा होता आणि नंतर मोठ्या समारंभानं महाराण्यांनीं स्वतः काशीस जाऊन कृतार्थ झालेल्या हातांनीं त्या पुण्यपुरुषाच्या त्या शांत झालेल्या अस्थि गंगेच्या उदरांत पोंचवावयास पाहिजे होत्या ! तसं कांहीं न होतां अबदुलखानाशीं जो प्रसंग पडला आहे, तो माझ्या मतानं कांहीं बरोबर नाहीं. "

" अरे वा ! " जयचंद विनोदानें म्हणाला, " तूं तर एखाद्या कसलेल्या कारस्थानी मंत्र्याप्रमाणं बोलते आहेस ! मग या पूर्वींच आपण आपला मंत्र आम्हास का कळविला नाहींत. आम्हला काय ? आम्ही त्याप्रमाणं वागलों असतों. आतां मी आमच्या महाराजांना सांगतोंच, कीं, आमचें मंत्रिपद एका सुयोग्य स्त्रीमंत्र्याला द्या म्हणून. "

अशाप्रकारें त्यांचें बोलणें विनोदांत रूपांतर पावल्यामुळें, त्यावेळीं तो विषय तितकाच राहिला. पण तेवढयानें जयचंदाच्या मनाचें कांहीं समाधान

झालें नाहीं. उलट जयश्रीच्या सूचित शंकांनीं त्याच्या शंका दृढावल्या व अबदुलखान आपणास कांहींतरी पेंचांत आणणार असें त्यास निश्चयानें वाटूं लागलें.

विचाराची धडपड चालू असतां एकवेळ त्यास असेंही वाटूं लागलें कीं, यापुढें खानाशीं मुळीं सलोख्याचा प्रसंग घालूंच नये. जयश्रीच्या सूचनेप्रमाणें चितोडची मागणी करावी, आणि ताबडतोब बरोबरीचा तह करून घ्यावा आणि पूर्वीप्रमाणेंच बांकून राहावें. नजराणे घेऊन मिंधे होण्यांत अर्थ नाहीं; पण या विचारांना निश्चयाचें स्वरूप येईना. मोंगलांशीं स्नेह ठेविल्यास आपलें आयुष्य कसें सुखासमाधानांत जाईल, याचें एक विलासी चित्र त्याच्यापुढें उभें राहिलें! मोंगलांचें वैभव त्यानें नुक्तेंच पाहिलें होतें; त्यांची मिजास त्यानें अनुभविली होती. राजवैभव कसें असतें याचाही त्यानें अदमास घेतला होता! हें सर्व त्यास आठवलें व त्याचे विचार डळमळूं लागले! दुसऱ्याच क्षणीं त्याच्या सुखलोलुप मनानें त्यास प्रतापसिंहाच्या वेळचें भोगलेल्या वनवासाचें चित्र दाखविलें; आणि तें पाहतांच त्यास अबदुलखानाशीं सलोखा करणेंच जास्त श्रेयस्कर आहे, असें वाटूं लागलें. राजवैभवाचा उपभोग घेत, विलासाचीं सर्व सुखें अनुभवीत मोंगलांना जर आपल्याशीं चार हात करतां येतात, तर तेंच राजवैभव भोगून व तशाच विलासांत राहून आपणास त्यांच्यावर शह कां ठेवितां येऊं नये? असें त्यानें आपल्या चुळबुळ करणाऱ्या विवेकबुद्धीस विचारिलें. मोंगलांशीं सलोखा ठेऊनही आपणास त्यांच्याशीं बांकून वागतां येईल ही शिकवणही त्यानें पटवून घेतली; आणि आपण कांहीं विशेष चुकलों नाहीं, असा शेवटचा निर्णय ठरवून आपल्या सर्व शंका जागचेजागीं दडपून टाकिल्या!

बादशाही सोनें हें असें विषपरिणामी होतें! सिसोदियावंशाखेरीज इतर रजपूतकुलें जीं त्यांत भराभर विरत गेलीं, त्याचें कारण वरच्या सारखी विचार परंपराच होय! आज प्रतापसिंगाचा पुतण्याही त्या विषानें पछाडला होता!

हा परिणाम पाहण्यास अबदुलखान टपून बसलाच होता ! त्यानें प्रसंग साधून बादशाही सोन्याचे आणखी फुंकरे मारिले; आणि जयचंदाच्या अंतः-करणांतील स्वाभिमानाचे कणान् कण उधळून लाविले ! त्यानंतर चारसहा महिन्यांतच चयचंद पुरता दिवाणा झाला ! जयश्रीनें वारंवार बजाविलें असतांही अबदुलखानाचा मिठास स्नेह त्यास सोडवेना ! आणि त्या धूर्तानें त्याच्या मरत्या अभिमानास यत्किंचितही धका न लागेल, अशा बेतानें मोंगलांच्या गुलामगिरीचें जाळें त्याच्या विलासोन्मुख मनाभोंवतीं आणि त्याच्या करावीं महाराणा अमरसिंग याच्या मनामोंवतीं विणण्यास प्रारंभ केला ! या जाळ्याचा प्रत्येक धागा निरनिराळ्या नजराण्यानेंच मजबूत केला जात होता. मोटमोठे बिलोरी आयने, रंगीं बेरंगीं झुंबरें व हंड्या, तऱ्हे-तऱ्हेचीं अत्तरें व सरबतें, उंचीं उंचीं किनखापाचीं, मलमलीचीं, जिगाचीं सणंगें, अनेक प्रकारचीं मद्यें, गमतीगमतीचे हस्तीदंती जिन्नस आणि नेत्रा-ल्हादक अशीं चित्रें इत्यादि जिनसा दिल्लीपतीच्या नांवानें व अबदुलखा-नाच्या हस्तें जयचंदाकडे व महाराण्याकरितां इतक्या आल्या कीं, त्या व्यव-स्थेनें मांडून ठेवण्यास प्रतापसिंगाची चालत आलेली पर्णकुटी पुरेना आणि शोभेनाही. त्या बरोबर बादशाही सोन्याच्या धुरानें धुरकटलेल्या मनोवृत्तींना प्रतापसिंगाच्या शिकवणीचें तेज——झोंपडीचा वाडा करूं नका आणि चितोड स्वतंत्र झाल्यावांचून राजविलास भोगूं नका. या निर्वाणीच्या संदेशाचें महत्व-—मुख्य मंत्री जयचंद व मेवाडचे मुख्य मालक महाराणा अमरसिंग यांना कमी प्रतीचें वाटूं लागलें; आणि त्यांनीं एक राजवाडा उठविण्याचें कायम केलें ! अबदुलखानाची या कृत्यास पूर्ण सहानुभूति होती. त्यानें आपल्या खर्चानें आग्र्याहून उत्तम कारागीर आणून महाराण्याचे सेवेंत हजर केले ! लौकरच '**उमराव महालाची**' नींव टाकण्यांत आली ! यथा राजा तथा प्रजा या न्यायानें हुरळलेली मेवाडची प्रजाही आपल्या राण्याचें हें कृत्य-पाहून आनंद करती झाली !

ठाकुर ईसरसिंग अद्यापीही परत फिरला नव्हता; आणि याचवेळीं जय-श्रीही आपल्या आजोळीं प्रसुतीकरितां गेल्यामुळें जयचंदाची हजेरी झाली नाहीं. मात्र तो अद्यापीही स्वतःच्या वर्तनानें स्वतःशीं खंत पावत होता !

आपली पत्नी आपल्याजवळ नाहीं, हें त्यास एकप्रकारें बरें वाटत होतें; परंतु अलीकडे त्यास तिला आपल्यासारखें कसें करून घ्यावें, याची विवंचना पडली होती. अबदुलखानाच्या कृपेनें त्याला दिल्लीपतीकडून बहिरामगडची सुभेदारी तेथील सर्व वैभवासह मिळाली होती. तिचा उपभोग उजळ माथ्यानें आणि जयश्रीच्या सहवासासह कसा घेतां येईल ? कोणत्या युक्तीनें तिचें मन इकडे वळवितां येइल ? कोणत्या मार्गानें गेलें असतां तिला, मेवाडला किंवा जगाला आपली निमकहरामी जाहीर न होतां आपला कार्यभाग साधेल ? इत्यादि अनेक प्रश्न त्यास सोडवावयाचे होते. अर्थात् त्या गडबडींत त्यास प्रतापसिंगाच्या निर्वाण संदेशाचा विसर पडत चालला यांत नवल तें काय आहे ? शत्रूचें सोनें घेऊन त्याची निमकहरामी पत्करल्यावर मेवाडशीं निमकहरामी करण्याचा प्रसंग आला तर त्यांत चुकलें कोठें ? तो हिशेबच तसा सरळ नाहीं का ?

---

# परिच्छेद ३ रा.

## विलास सुखांतील कांटा !

एके काळीं मेवाडचीं भाग्यसूत्रें हालविण्याचें महत्कार्य प्रतापसिंगासारख्या महापुरुषाकडे होतें. त्यानें आत्मसौख्याकडे न पाहतां वनवासाचीं, उपासमारीचीं, अपमानाचीं, बंधुद्रोहाचीं, आणि संकटांची करकरीत नाणीं मेवाडच्या दुर्दैवापुढें मोजून, त्याचें गेलेलें स्वातंत्र्य परत मिळविलें ! बेशक, हें दिव्य होतांना मेवाडला फार त्रास सोसावा लागला; परंतु स्वातंत्र्यप्राप्तीनें त्या सर्व हालअपेष्टांची भरपाई झाली ! प्रतापानें मातृभूमीचें ऋण बरोबर फेडलें ! आयुष्य असतें तर त्यानें चितोडगडचें व्याज देऊन तो सर्वस्वीं ऋणमुक्त झाला असता; परंतु परमेशाची इच्छा तशी नव्हती ! पुढील कार्य पुत्रावर व पुढील पिढीवर सोंपवून त्यास या जगाचा निरोप घ्यावा लागला.

महाराणा अमरसिंग व जयचंद यांचेकडे मेवाडचें धुरीणत्व आलें! पहिलीं दहावर्षें ठीक गेलीं; परंतु पुढें सर्व वातावरण बदलूं लागलें. मंत्र्या-प्रमाणें महाराणा, महाराण्याप्रमाणें दरबार व सरदार आणि त्यांचेप्रमाणें प्रजा तयार झाली! प्रतापाचे भोंवतीं वीरांच्या तरवारी खणखणत होत्या आणि युद्ध व स्वातंत्र्य याचीच वाटाघाट होत होती. आतां तो मनुसवंतोपरी पालटला! शांतता, विलास, राजवैभव आणि मोंगलांशीं सलोखा याचीच जिकडे तिकडे चर्चा होऊं लागली! त्यामुळें महाराण्याची व जयचंदाची विलास प्रियता त्यांच्या पचनीं सहजीं पडूं लागली! या विलास सौख्यांत दोघांना दोनच कांटे सलत होते! महाराण्यास ठाकुर ईसरसिंगाची चाहूल क्षणोक्षणीं लागत होती तर जयचंद जयश्रीच्या नुसत्या भासालाही बिचकत होता!

अशाच लपंडावांत **उमराव महाल** तयार झाला! याच सुमारास महाराण्याचा वाढदिवसही पातला. ठाकुर ईसरसिंगही आतां येण्यांत होता. तेव्हां प्रसंग साधून वर्षगांठीच्या दरबारांतच त्या मानी सरदारासमोर त्याच्याविषयीं वाटणाऱ्या आदरयुक्त भीतीचा शेवटचा घुटका गिळून आपण निश्चित व्हावयाचें, असें त्या दोघांही दिसोदियाकुलकलंकांनीं ठरविलें होतें! निर्वाण समयीं प्रतापसिंगाचा प्राण घोंटाळत होता, तो याच अशुभ विचारांनीं!

विक्रम संवत् १६६३ साल संपलें. नव्या वर्षाच्या वसंताने अरवलीवरील वनश्रीचें नुक्तेंच पाणीग्रहण केलें होतें! त्या उत्सवाप्रीत्यर्थ परभृतांची आलापदारी सुरू होती आणि त्या आनंदांत अरवली गर्क होता! त्याच्या आश्रयानें राहूत स्वातंत्र्य उपासना करणारे मेवाडचे रजपूतही आपल्या महा-राण्याच्या वर्षगांठीच्या उत्सवांत दंग होते. मंडपाची शोभा वाढविण्यास दिल्ली दरबाराच्या वकीलासह व नजरभेटीसह अबदुलखानही आला होता. समारंभ अगदीं धूम धडाक्यानें सुरू होता! आपल्या दरबारांत मुसलमान सरदार असणें ह्मणजे आपल्या स्वातंत्र्य बुरुजाखालीं सुरुंग केल्यासारखेंच आहे, हें कोणाच्याही लक्ष्यांत आलें नाहीं. महाराणा व जयचंद भीत होते फक्त

ठाकुरसिंगाच्या आगमनास ! तो साळुंब्रयास येऊन दाखल झाला होता व मुख्यदरबारास हजर राहणार होता ! त्यावेळीं सर्व समारंभ कसा पार पडतो याचीच त्या दोघांना काळजी पडली होती.

उमराव महालाच्या भव्य सभागृहांतच दरबार भरविण्यांत आला. सर्व सरदार दरकदार व मानकरीही आले. शिवाय देवगडचा ठाकुर सुरजमल्ल, झालावाडचा ठाकुर दुधो, केळवाड्याचा हरीदास, साद्रीचा भोपटसिंग इत्यादि वृद्ध ठाकुरही आले होते. उमराव महालाची योजना व कारागिरी पाहून सर्वांना मोठा संतोष झाला. आपल्या दहा वर्षांच्या कारकीर्दीत महाराणा अमरसिंगानें आपल्या चातुर्यानें राज्याचा जो बंदोबस्त केला होता आणि सर्वांवर जी एक विलक्षण छाप बसविली होती, तिच्यामुळें त्याच्या या आजच्या कृत्याचेंही सर्वांना कौतुकच वाटलें ! सर्वांनीं त्याच्या नवीन विचारांची वाहवा केली!तो जम पाहून आतां ठाकुर ईसरसिंग थोडासा रागावला तरी त्याचें सांत्वन त्याच्या बरोबरीचे सरदार व ठाकुर परस्पर करतील आणि आपला मार्ग सुखकर होईल असें महाराण्यास व जयचंदास वाटून त्यांचा जीवही थोडा खालीं पडला !

थोड्याच वेळांत ईसरसिंग त्याठायीं आला व दरबारास प्रारंभ झाला !

पण दरबाराचा हा नवीन थाट पाहतांच अगोदरपासून विस्मित झालेला तो कडवा म्हातारा कावराबावरा झाला. भाटांचें स्वस्तिवचन पूर्ण होतें न होतें तोंच तो ताडकन् उठला आणि आपल्या खणखणीत स्वरानें म्हणाला, " कांहीं गोष्टींचा उलगडा झाल्याखेरीज दरबाराचें काम पुढें चालविण्यास माझी हरकत आहे !"

ज्या पापाला अमरसिंग–जयचंद भीत होते, तेंच प्रारंभालाच उपस्थित झालें ! सर्व सरदार चकित होऊन परस्परांकडे पाहूं लागले ! क्षणमात्रांत दरबारांत विलक्षण शांतता पसरली ! वाढत्या आनंदांच्या उर्मी ठायींच्या-ठायीं विरून गेल्या !

ठाकुर ईश्वरसिंगानें महाराण्याकडे पाहात कठोर स्वरांत म्हटलें, " हें मी काय पाहतों ! मी स्वप्नांत तर नाहीं ना ? का मेवाड समजून मी कामरूप

देशासारख्या एखाद्या मंतरलेल्या प्रदेशांत येऊन पडलों आहें ! सांगा–कोणी-तरी याचा सरळ व स्पष्ट जबाब द्या ! सिसोदिया कुलाच्या अलंकारानें भूषित झालेल्या मेवाडच्या पवित्र भूमीवरच का हा मोंगली धर्तीचा राजवाडा आणि त्यांतील तसल्याच धर्तीचा दरबार मी पाहात आहें ? पुण्यप्रतापी प्रतापसिंगापुढें अनेकदां पराभव पावलेले हे मोंगळ सरदार अबदुलखान मोठ्या थाटानें येथें विराजमान झालेले दिसत आहेत, तेव्हां हा दरबार मी महाराणा अमरसिंगजींचा–प्रतापाच्या पुत्राचाच–समजूं काय ? " असें बोलून तो थोडावेळ थांबला ! त्याच्या त्या खडया प्रश्नांस कोण उत्तर देणार ? महा- राणा जयचंदाकडे पाहूं लागला. जयचंद सिंहासनाच्या पायथ्याशीं नजर लाऊन बसला. सर्व ठाकुर व सरदार कधीं राण्याकडे तर कधीं ईसरसिंगाकडे पाहूं लागले आणि दिल्लीचे वकील व सरदार अबदुलखान भयचकित होऊन पुढें कोणता प्रसंग ओढवतो, अशा विचारानें साशंक झाले ! दरबारची शांततां अखंड राहिली !

ठाकुर ईसरसिंग पुढें म्हणाला, " काय ? कोणालाच उत्तर देतां येत नाहीं ? मग या पापकर्माला जबाबदार कोण ? कोणाच्या कुजक्या डोक्यां-तून ही अमंगळ कल्पना प्रसवली ? प्रतापाच्या शेवटच्या इच्छेला बाधा आणणारा व मेवाडच्या निमकाला हराम होणारा आमच्या जातींत कोण निपजला ? सांगा–मुकेपणानें कोणाचाच निभाव लागणार नाहीं. "

बऱ्याच वळानें देवगडचा ठाकुर सुरजमल्ल उठला व शांतपणें ईसरसिंगास म्हणाला, " ठाकुरसाहेब, आपण शांतचित्तानें खरा विचार ऐकून घेणार असाल, तर आपलें तापलेलें चित्त शांत होण्यासारखें कांहीं आपणास सांगतां येईल—"

ठाकुर ईसरसिंग एकदम म्हणाला, " झोंपडीचे वाडे होऊं देऊं नका, अशी त्या महात्म्याची कडक आज्ञा असतां, हें राजमंदिर पाहून कोणास बरें वाटेल ? प्रतापाचा हा धडधडीत अपमान आहे आणि त्याच्या पुत्रानें तो करावा, याच्या इतकें लांच्छनास्पद मला तर दुसरें कोणतेंच कृत्य वाटत

नाहीं ! प्रतापाचा निर्वाण होऊन पुरतें तपही झालें नाहीं, तोंच त्याच्या पुत्राकडून त्याच्या अब्रूचे असे धिंडवडे निघावे, हें पाहून कोणत्या मानी मेवाडकरास बरें वाटेल ? ”

झालावाडच्या ठाकरानें मध्येंच म्हटलें, “ इसरजी, तुम्ही हें फारच कठोरतेनें बोलतां ! महाराणा अमरसिंगजीच्या दहा वर्षांच्या कारभाराकडे लक्ष्य देऊन पहा बरें तो प्रतापाला शोभण्यासारखा पुत्र आहे कीं नाहीं ! प्रतापजींच्या निर्वाण संदेशाचें ज्याप्रमाणें आपल्याला स्मरण आहे, त्याप्रमाणें आम्हां सर्वांनाही आहे आणि महाराणाजींनाही आहे—”

“ आणि म्हणूनच त्यांनीं पित्याचीं हाडें गंगेप्रत पोंचली नाहीं तोंच झोंपडीचा महाल बांधण्याची त्वरा केली वाटतें ? ” ईसरसिंगानें खोंचून विचारिलें.

सुरजमल्ल म्हणाला “ तारुण्यामध्यें मनुष्याच्या हातून एखादी चूक होतेच. उमरावजींनीं हें राजमंदीर बांधण्याचें कार्य करायला नको होतें हें मलाही मान्य आहे; पण तेवढ्याकरितां त्यांच्या इतर गुणांचें विस्मरण कां होऊं द्यावें ?—”

“ राण्याच्या या कृत्याची गणना पापांत होते म्हणून ! ” ईसरसिंगान म्हटलें.

“ पण आपण त्याची त्यांस क्षमा केली पाहिजे. पुन: ते असें अविचारी कृत्य न करण्याची खास खबरदारी घेतील. ” साद्रीचा ठाकूर बोलला.

सर्वांनीच महाराण्याची बाजू घेतलेली पाहून ठाकुर ईसरसिंगाला आपण पायरी सोडून तर चाललों नाहीं ना ? अशी शंका आली आणि तो थोडा नरमला. आणि तें पाहून अमरसिंग-जयचंदास ही थोडासा धीर आला.

नंतर धिटावलेला जयचंद म्हणाला, “ ठाकुरसाहेब, आपणाला मी वडिलाप्रमाणें मानतों महाराणाजीही त्याच भावनेनें आपल्याकडे पाहात आहेत. तेव्हां क्रोधाच्या भरांत आपण अधिकउणें बोलल्यास तें आम्हास

आशीर्वादाप्रमाणेंच आहेत. खऱ्या प्रेमाचे ठिकाणींच दटावणीचा उपदेश होत असतो. त्याप्रमाणें आपला उपदेश आम्हाला केव्हांही मान्यच आहे. आपल्या आगमनाची वाट न पाहतां आम्ही आमच्या मतानेंच राजमंदिर बांधण्याची जी त्वरा केली, ती थोडी अविचाराचीच झाली; हें मला मान्य आहे आणि राजमंदिर बांधण्याची कल्पना महाराणाजींची नसून माझी—या आपल्या चुकलेल्या मुलाची आहे—हेंही मी येथें साफ सांगतो. मात्र या कृत्याला आपण पापकर्म गणूं नका ! तितकें तें वाईट खास नाहीं. आपल्या पित्याबरोबर मेवाडच्या स्वातंत्र्याकरितां मोंगलाशीं झुंजणारे अमरसिंग आतांपर्यंत दुर्दैवी होते. वनवासाचीं दुःखें त्यांनीं बाळपणापासून भोगलीं. कैलासवासी महाराणाजींच्या आशीर्वादानें आजचे सुखाचे दिवस ते पाहात आहेत. अशावेळीं केवळ अल्पशा सुखाकरितां व मोठेपणाकरितां त्यांनीं राजमंदिराची हांव धरली तर त्यांत अक्षम्य असें काय घडलें ? महाराणाजींचें आजचें हें विश्रामसौख्य पाहून थोरल्या महाराणाजींच्या आत्म्याला बरें वाटणार नाहीं काय ? आपलें सबंध आयुष्य रानावनांत गेलें; एकलिंगजींच्या कृपेनें अमरसिंगास शांततेनें लाभलेलें सौख्य पाहून त्या स्वर्गस्थ पुरुषास खेद होईल कीं धन्यता वाटेल ? याचा आपणच विचार करा—''

"बस्स्—'' ईसरसिंग ओरडून म्हणाला. "जबान एकदम बंद कर ! बकवादी मूर्खा, प्रतापसिंगाचे हेतु अल्पकाळानेंही जरी तुला कळले तरी तुझी सुखलोलुप जीभ अशी निरर्थक बडबड करत नसती, समजलास—'' एवढें बोलून तो थोडावेळ गप्प बसला. नंतर अबदुलखानादी मंडळीकडे पाहात त्यानें जयचंदास मर्मभेदक स्वरानें प्रश्न केला "बरं, काय हो वाचस्पती, राजमहाल कां बांधला तें कळलें. आतां हे खानसाहेब येथें कां दिसतात बरें ? प्रतापसिंगजींच्या वेळीं तर यांचे आणि मेवाडकरांचें अगदीं कट्टें वैर होतें आणि आज पाहतों तों ते अगदीं सोयऱ्यासारखे येथें आले आहेत. तेव्हां या बद्दल काय म्हणणें आहे आपलें ?''

यापैकीं महाराणा अमरसींगानें तोंड उघडलें. तो चाचरत म्हणाला, "दिल्लीचे बादशाहा जहांगीर आमच्याशीं सलोख्याचा तह करूं इच्छित आहेत— ''

" असें ?–" ठाकुर ईसरसिंगानें मध्येंच विचारिलें, " मग त्या सुभ्राजीच्या बुजगावण्याची वाट काय ? मेवाडचे महाराणे ह्मणून तुम्ही जिवंत असतां, सुभ्राजीच्या महाराणापदाचा जन्म कां झाला मग ?–" एवढें बोलून तो आपला ओंठ चावीत पुढें ह्मणाला, " अमरसिंग, तूं ज्या सिंहासनावर बसला आहेस, त्या सिंहासनाची मुर्वत ठेवण्याकरितां मी बेमुर्वतपणें तुला ह्मणतों कीं, मेवाडचा अधिपति होण्यास तूं नालायख आहेस ! तसाच हा जयचंद, आपल्या नात्यानें त्यानें सिसोदियाकुलास लाज आणली आहे– ( दरबाराकडे वळून ) सरदारहो, नीट कान देऊन ऐका ! प्रतापाच्या निर्वाणसमयीं येथें जमलेल्या महाजनापैकीं बरीच मंडळी होती ! त्याचप्रमाणें प्रतापाचे संकटांत त्याच्या मागें सावलीप्रमाणें राहून त्याच्या व्रताचें यथायोग्य पालन करणारांपैकीं चार दोन महावीर तरी येथें आले आहेत; सांगा माझ्या मित्रांनों, प्रतापाच्या पायांला स्मरून सांगा, कीं, प्रतापानें वीराचें असिधारा व्रत खडतर तपस्येनें कां पाळलें ? त्याला राजवैभव मिळत नव्हतें, ह्मणून कां तो भिकाऱ्याप्रमाणें भटकला ? त्याला मिष्टान्न दुष्प्राप्य होतें ह्मणून कां त्यानें कदान्न सेवन केलें ? सांगा, मेवाडच्या सिंहांनों ! स्मरण करून सांगा, प्रतापाला सुखशय्या स्वप्नवत् होती ह्मणून कां त्यानें तृणासनाचा आश्रय केला ? उमरावानें बांधलेल्या महालाप्रमाणें महाल करण्यास त्यास सामर्थ्य नव्हतें ह्मणून का तो झोंपडींत राहिला ? नाहीं–वीरवरांनों, तसें कांहींच नव्हतें ! सर्व राजवैभव त्याच्या आटोक्यांत होतें, त्याचेपुढें हात जोडून उभें होतें ! सरदार हो, याची साक्ष हे आमचे शत्रु, हे मोंगलांच सरदार देतील ! प्रतापाला सौख्य व्हावें, त्याला शांती लाभावी म्हणून खुद्द अकबरशहा आपल्या अलोट वैभवासह एका पायावर तयार होता; परंतु त्या राजर्षीनें त्या सर्वांवर लाथ मारिली ! तो कां ? त्याला तें वैभव नको होतें कीं अकबरशहाचा स्नेह नको होता ? प्रताप रणधुरंधर होता. आपल्या शत्रूची योग्यताही ओळखून होता ! असें होतें तरी प्रतापाला मेवाडचें स्वातंत्र्य हवें होतें आणि त्याचे प्रीत्यर्थ त्यानें वैभवास, सुखास, विलाससौख्यास, आणि अकबरशहाच्या स्नेहास सर्वांस लाथ मारिली ! प्रताप मेवा-

ड्चा प्राण होता; प्रतिव्रतांचा पाठीराखा होता; दुर्बलांचा कैवारी होता; धर्माचा रक्षणकर्त्ता होता आणि दुष्टांचा काळ होता ! ज्यावेळीं तो राज्यः-सनीं बसला, त्यावेळीं त्यानें काय पाहिलें ? मेवाडची स्वतंत्रता भीकेला लागली होती ! रजपुत कन्यांचे व स्त्रियांचें पातिव्रत्य आग्र्याच्या मीना-बाजारांत किंवा दिल्लीच्या राजवाड्यांत खुशीनें अगर नाखुशीनें विकलें जात होतें; आणि राजस्थानचा स्वाभिमान मोंगलाच्या पायाशीं पुच्छ हालवीत बसला होता ! बाप्पारावळच्या बीजास ही विटंबना कशी सहन होईल ? सर्वस्वाचा होम करूनही जर आमचें तेज आम्हास मिळत असेल तर तें आम्हास हवें आहे, अशा विचाराचा प्रताप होता आणि ह्मणूनच त्यानें आपल्या वनवासानें मेवाडकरांस हे दिवस दाखविले ! अशा त्या देवतुल्य पुरुषाची आज्ञा त्याच्या पुत्रानें मोडली असतां, या त्याच्या अश्लाघ्य कृत्या-कडे तुम्ही क्षमेच्या दृष्टीनें पाहणार काय ? प्रतापाच्या मरणप्रसंगींचें स्मरण मी तुम्हाला काय द्यावें ? स्वर्गाच्या मार्गास लागलेला त्याचा आत्मा भावी आशंकनें वरचेवर मागें मुरडून पाहात असतां, तुह्मीच ना त्याच्या पायांशीं शपथा घेतल्या ? त्या शपथा तुह्मी मोडणार ? प्रतापाची शेवटची आज्ञा भंग करणार आणि आपल्या कीर्तीला धुळीला मिळविणार ? बोला, सांगा एका स्वरांत ओरडून सांगा कीं, तुह्मी काय करणार ?" बोलतां बोलतां अति उत्तेजकतेनें त्याचा स्वर भंग पावला व त्याला गप्प बसणें भाग पडलें !

त्याच्या तेजस्वी बोलण्यानें सारा दरबार तटस्थ झाला ! तेथें बसलेले मोंगलही क्षणभर बेभान झाले ! प्रत्येक रजपुताचें अंतःकरण थरारून गेलें ! विलासोन्मुख अमरसिंग–जयचंदाससुद्धां स्वातंत्र्यापुढें सर्व तुच्छ आहे, असें वाटूं लागलें !

थोडावेळ सर्व सभा तटस्थ होती. नंतर सुरजमल म्हणाला, " ठाकुर-साहेब, आपल्या या निस्पृह बोलण्याबद्दल मी आपणास मनापासून बधाई देतों ! आपल्या अमृतमयवाणीनें तुम्ही आम्हां सर्वांस प्रतापसिंगजींच्या वेळची आठवण करून दिलीत ! माझी योग्यता नसली तरी आनंदातिशयानें राहवत नाहीं, म्हणून म्हणतों कीं, शाबास ! शाबास !! ईसरसिंगजी ! झोंप-

डीचा महाल करण्यांत अमरसिंगजींनीं अपराध नव्हे तर पापच केलें आहे, यांत काडीमात्र शंका नाहीं. सर्वांना तुमचें हें म्हणणें पटेल व खुद्द राणाजीही तें मान्य करतील. तेव्हां आतां असें करा, त्याचें काय प्रायश्चित्त असेल तें सांगा. म्हणजे तें त्यांचेकरवीं करूनघेऊन त्यांना दोषमुक्त करूं. मात्र प्रायःश्चित्त कठोर नसावें."

अमरसिंग–जयचंद आश्चर्यानें सर्वांकडे पाहात राहिले. प्रायश्चित्ताची कल्पना सर्वांस पटली. तेव्हां इसरसिंग शांत स्वरांत म्हणाला, "प्रायश्चित्त अगदींच सौम्य आहे. या राजमंदिरांत आपल्या प्रतापी प्रतापांची पुण्यमूर्ति स्थापावी आणि मेवाडमध्यें नवीन प्रकारचें एक नवीन पुण्यक्षेत्र स्थापण्याचें श्रेय अमरसिंगजींनीं घ्यावें! या प्रतापमंदिरांत मेवाडच्या सर्व वीरामहावीरांना व रजपुतस्त्रियांना प्रतापाच्या दर्शनास येण्याची मुभा असावी आणि त्या महात्म्याच्या पुण्यतिथी दिवशीं एक जंगी मेळा भरवून मोटा उत्सव करण्याचा प्रघात सुरू करावा. अमरसिंगजींनीं चितोडचा उद्धार होईपर्यंत पुनः झोंपडींत राहण्यास यावें, हें निराळें सांगावयास नकोच."

ईसरसिंगाची ही कल्पना ऐकताच सर्व दरबार अगदीं चकित झाला! मोंगलसरदार अबदुलखान याचे मुद्रेवरही कौतुकाची छाया पसरलेली दिसली! अमरसिंग–जयचंदास मात्र ही कल्पना मनापासून रुचली नाहीं. मात्र त्यांच्या मुद्रेवर कसलेच भाव दिसले नाहींत.

थोडावेळ थांबून ईसरसिंग पुढें म्हणाला, "आतां मोंगलांशीं सलोखा करण्याची गोष्ट! त्यांच्याशीं स्नेह ठेवण्यास प्रतापसिंगजीसुद्धां कबूल होते; पण तें आपलें स्वातंत्र्य कायम ठेऊन! त्यांचे अंकित होऊन नव्हे. दिल्लीपतींना आमचें शत्रुत्व असह्य झालें असेल तर तें त्यांनीं उघडपणें मान्य करावें. मेवाडचें स्वातंत्र्य मान्य करून, चितोडगड आमचा आम्हास द्यावा आणि तेथेंच बरोबरीचा तह करून आमचा स्नेह संपादावा. तशी त्यांची इच्छा नसली, केवळ पोकळ मित्रत्व दाखवून, नजर नजराण्यानें आम्हांस मिंधेकरून आमच्यावर शह ठेवण्याची त्यांची मनीषा असली तर तें आम्हाला बिलकुल

रूपावयाचें नाहीं. आमचें स्वातंत्र्य मान्य करविण्यास भाग पाडण्याचें सामर्थ्य मेवाडचे मनगटांत अद्यापिही आहे, हें आपण त्यांना दाखविलें पाहिजे." इतकें बोलून तो सर्वांकडे चौकसदृष्टीनें पाहूं लागला! पुष्कळ सरदारांना त्यांचें तें भाषण पटलें. कांहीं जणांना तें थोडें कडक वाटलें आणि महाराणा उमराव, प्रधानमंत्रि जयचंद आणि मोंगलाची मंडळी यांना तें अगदीं तुसडेपणाचें वाटलें. कांहींवेळ त्याचेवर कोणीच कांहीं बोललें नाहीं. तेव्हां आपल्या मतास सर्वांची अनुमति आहे, असें पाहून निदान समजून ठाकुरइसरसिंग पुढें म्हणाला, "मग आतां झालेल्या चुकीचें प्रायश्चित्त घेण्यास महाराणा अमरसिंगजी ह्यांनीं दिरंगाई करण्यांत हंशील नाहीं–"

तेव्हां महाराणा मध्येंच म्हणतो, "होय, परंतु त्यालाही थोडा विचार केला पाहिजे. ईसरसिंगजीची सल्ला कांहीं वाईट नाहीं; पण ती अगदीं अक्षरशः आणि तडकाफडकी अमलांत आणणें इष्ट होणार नाहीं. काळ पालटला आहे. मेवाडचें शौर्य थोडें तरी क्लांत झालें आहे. त्याला विश्रांति मिळणें आवश्यक आहे. तेव्हां तोंपर्यंत आपण दिल्लीपतीच्या सदिच्छेचा सहानुभूतीनें विचार केला पाहिजे."

ठाकुर ईसरसिंग त्वेषानें उठला व कर्कशस्वरांत ओरडला, "प्रत्यक्ष शत्रूचे लोक समोर असतां, प्रतापाच्या मुलाचे–आजच्या महाराण्याचे हे असले नेभळट उद्गार! धीरवीराला आपला निश्चित अर्थ प्राप्त होईपर्यंत विराम आठवतो तर? प्रतापाचे पोटीं येऊन हेंच धन्यत्व मिळविलेंस? बाळपणापासून त्या महात्म्याबरोबर राहून हेंच शिकलास? धिःक्कार असो तुझ्या शौर्यास; आणि बहकलेल्या बुद्धीस! मेवाडचें दुर्दैव ओढवलें असल्यास ही तुझी सल्ला सर्वांस पटेल आणि याहीपेक्षां तिरस्कारणीय असे तुझ्या अकलेला फांटे फुटतील, कोणी सांगावें? प्रतापाचा पवित्र काळ राहिला नाहीं, मोंगल कृपेचा अभिलाषी महाराणा अमरसिंग मेवाडच्या गादीवर बसला आहे, हे मला कळून चुकलें. अर्थात् आतां माझ्यासारख्यानें येथें राहण्यांत मौ[illegible] नाहीं हेंच खरें! मेवाडच्या ब्रीदाला बोल लावणाऱ्या सुखलोलुप अमरसिंगा, तुझ्या विलाससौख्यांत कांट्या प्रमाणें सलत राहण्याची माझी इच्छा नाहीं!

नेव्हां हा माझा शेवटचा मुजरा घे ! मेवाडच्या स्वातंत्र्याकरितां झगडण्यास माझी तरवार केव्हांही तयार आहे. तसा प्रसंग पडल्यास न बोलावतां मी तुझ्याकडे धांवून येईन तोंपर्यंत धिःक्कारपूर्वक तुला हा माझा मुजरा असो !- येतो-सर्व सरदारमंडळी माझा हा रामराम घ्या ! माझें वर्तन सर्वांच्या दृष्टीनें अविचाराचें, कठोरतेचें आणि टाकाऊ असेल; पण त्याला माझा इलाज नाहीं. प्रतापाचा निर्वाण संदेश मला विसरतां येत नाहीं आणि त्याचा अपमान मला सहन होणार नाहीं. याबद्दल मला माफ करा ! " एवढें कसेंतरी बोलून भाल्याच्या फेंकी प्रमाणें तो तेथून त्वरेनें निघून गेला.

सर्व दरबार सुन्न झाला ! महाराणा व जयचंद दोघेही मनांत ओशाळले व जळफळलेही ! शेंवटीं ठाकुर ईसरसिंग त्यांच्या विलाससौख्यांतील कांटा ठरला !

पुढें दरबार लौकरच आटपला. महाराणा, जयचंद व अबदुलखान यांचा एकांत झाला त्यावेळीं सचिंत मुद्रेनें उमराव म्हणाला, " ईसरसिंगजीचा कांटा सारखा सलणार ! "

अबदुलखान मध्येंच म्हणाला, " महाराण्याच्या या दोस्ताला आज्ञा होत असेल तर तो महाराजांचा मार्ग निष्कंटक करील ! "

अमरसिंगानें जयचंदाकडे पाहिलें. जयचंदानें अबदुलखानाकडे पाहिलें सर्व नेत्रांनीं एकमेकाकडे पाहिलें; संकेत ठरला कीं, ठाकुर ईसरसिंगाचा कांटा बाजूला सारावयाचा !

——:०:——



# परिच्छेद ४ था.



## काट्याप्रमाणें खुपणारें सुमन !

राजस्थानची सरितासुंदरी बनास, वनराजीनें डवरलेल्या एका टेंकडीच्या पायथ्यानें संथपणें वाहात होती. टेंकडीवर चंबेली नांवाची एक लहानशी वाडी वसली होती. वाडींत उंबरा होता शंभर रावाशें परंतु मेवाडच्या मुक्ततेकरितां प्रतापसिंहानें जो स्वातंत्र्ययज्ञ केला; त्यामध्यें या वाडीनें घरटी एकेक वीर तरी रणदेवतेला बळी दिला ! त्यामुळें प्रतापाचें तें एक आवडतें वसतीस्थान होतें. कित्येक वेळांतरी तो तेथील लोकांच्या निमंत्रणावरून त्या वीरक्षेत्रीं आला होता आणि चारदोन दिवस राहून गेला होता. एका विशेष प्रसंगीं प्रतापसिंगानें प्रसन्न होऊन आपल्या धर्मदुहितेस-जयश्रीस ही वाडी बहाल केली होती. तेव्हांपासून जयचंद-जयश्री चंबेलीचे ठाकुर-ठाकुराणी झाली ! येथें त्यांनीं वीरव्रताला अनुसरून एक सुंदर आश्रम बांधला होता. आपल्या त्या साध्याभोळ्या संसारांत असतां जयश्री दोन पुत्र प्रसवली ! महाराणा अमरसिंगाची दहावर्षांची कारकीर्द मेवाडला जितकी सुखाची गेली, त्याच्या अनेकपटीनें त्या जोडप्यानें आपल्या दोन पुत्रासह त्या छोटया वाडीचें राज्य सौख्य मोठ्या आनंदांत उपभोगलें ! आपल्या ठाकुर-ठाकुराणीवर वाडीच्या लोकांचें फार प्रेम ! तें अनेक प्रसंगीं तर दिसून आलेंच; पण ज्या दिवशीं जयचंद अबदुलखानाकडून विजयी होऊन आला. त्यादिवशीं त्याचा पूर्ण उत्कर्ष दिसून आला ! त्या लोकांचें तें प्रेम पाहून जयश्रीच्या नेत्रांत अनेकदां आनंदाश्रु चमकले आणि तिनें भेटीला आलेल्या प्रत्येक व्यक्तीचे सप्रेम स्वागत करून मधुरशब्दांनीं त्यांनाही हर्षगद्गत करून

सोडिलें ! वडिलांच्या आशीर्वादानें आयुष्य सुखमय होतें ह्मणतात; तें जर खरें असेल तर आतांपर्यंत जयश्रीनें आपल्या सौजन्यानें अनेक जन्म सुखांत जातील इतके आशीर्वाद मिळविले होते.

ठाकुर–ठाकुराणीची कुटी टेंकडीच्या माथ्यावर होती. तेथून चितोड-गडचे पर्वत दिसत होते. एका बाजूला असलेली प्रतापी प्रतापाची भव्य छत्री ( समाधी ) आणि दूर अंतरावर झाडींत लपलेलें आणि डोंगरांनीं आखलेलें उदेपूरही ओळखूं येत होतें ! जयश्रीला हें स्थान त्यामुळें फार फार आवडत होतें. तें स्थान सोडून जाण्याचें तिला माहेर सोडून जाण्या-इतकेंच जीवावर येत होतें. कोणत्याही कारणामुळें आपल्या संसाराचा बस-लेला जम मोडूं नये, असें तिला वाटे. बनास नदी, आजूबाजूची वनराजी, चंबेलवाडी आणि आपला आश्रम या गोष्टी तिच्या परिचयाच्या होऊन हंसत. जवळ जवळ तपावर वर्षें झालीं होतीं तरी आपल्या प्रेमळ अपत्याकडे पाहून तिला जें सुख वाटत होतें, तसेंच सौख्य या सर्व देखाव्याकडे पाहून तिला रोजच्या रोज वाटत होतें भोंवतालची सर्व सृष्टि तिच्याकडे पाहून हंसत होती आणि त्या सृष्टीकडे पाहतांच तिलाही पण तसेंच हंसूं येत होतें.

जयश्री ज्यावेळीं चंबेलवाडीची ठाकुराणी झाली त्यावेळीं पंधरा सोळा वर्षांची अल्लड तरुणी होती. त्यावेळीं अनेक वृद्धबायांनीं आपल्या त्या सुंदर व चिमुकल्या राणीची दृष्ट काढली होती. आतां त्या गोष्टीला तप होऊन गेलें ! जयश्री माता झाली. तरीपण तिचें सौंदर्य जसें तेंच होतें; काळाचा परिणाम त्याच्यावर जसा बिलकुल उमगून येत नव्हता, तसेंच तिचें पर्वीचें सरळ बाळ हृदयही पहिल्या इतकें मनोहर होतें. तात्पर्य, जयश्री सर्वतोपरी सुखांत होती.

परंतु हेंच सौख्य सतत टिकावें, अशी प्रभूची इच्छा नव्हती ! तिच्या न कळत तिच्या पश्चात् जयचंदाचें मन पुरतें चळलें ! बादशाही सोनें ग्रहण करून तो आतां दिल्लीच्या सलतवतीचा पुरता गुलाम झाला होता आणि साध्या माणुसकीलाही विसरून त्यानें ठाकुर इसरसिंगास विश्वासघातानें संधि साधून मोंगलांचे हवालीं केलें होतें !

जयचंदानें तो प्रकार कसा घडवून आणिला,म्हातारा रणधुरंधर ईसरसिंग कसा फसला, मोंगलांनीं मेवाडच्या पटावर मांडलेला हा डाव इतरांना न समजतां कसा फतेह झाला हें विस्तारानें सांगण्याची जरूरी नाहीं. प्रत्यक्ष महाराण्यानें या नीच कृत्यास अनुमति दिली, जयचंदानें त्याचा घाट जुळवून आणिला आणि अबदुलखानानें फांस टाकून मोंगल आणि मेवाडचें स्वातंत्र्य यांच्या दरम्यान नागव्या तरवारीसह उभा असलेला हा वीर बंदीवान केला ! त्याच रात्रीं ठाकुर ईसरसिंगाची आग्र्याकडे रवानगी झाली !

मेवाडभूमीचें केवढें हें दुर्दैव ! ज्या ईसरसिंगाच्या सहाय्यानें प्रतापानें अनेक वेळां मोंगलांना परास्त करून मेवाडचा थोडा थोडा टापू स्वतंत्र करीत सर्वांशीं मेवाड मुक्त केला होता; त्याच वीरभूमीवर त्या पुण्य पुरुषाच्या नराधम पुत्रांनीं शत्रूची कृपा भाकण्याकरितां ईसरसिंगासारख्या मेवाडाभिमानी वीरास मोंगलांच्या स्वाधीन करण्यास तयार व्हावें अं ! किती विचित्र ही दैवगती ? पण ती घडली खरी ! रात्रीच्या कृष्ण काळोखांत हें कृष्णकृत्य करून त्या नराधमांनीं आपल्या कुळाला कलंक लावला खरा ! मात्र हें पाप अगदीं बेमालूम उरकण्यांत आलें ! कोणालाही त्याचा वर्तमानकाळीं सुगावा लागूं दिला नाहीं आणि भविष्यकाळींही त्याचा परिस्फोट होऊं नये म्हणून कडेकोट बंदोबस्त केला ! त्यांतूनही ती वार्ता बाहेर फुटलीच तर त्यांतील मुख्य सूत्रधार अमरसिंग व जयचंद हे होते: हें तर मुळींच कळूं नये म्हणून अत्यंत दक्षता ठेवण्यांत आली होती ! त्यामुळें सांपळ्यांत सांपडलेल्या त्या नरवीरासही आपला विश्वासघातक कोण ? हें उमगून येणें अशक्य होतें.

राजा आणि मंत्री या दोघाही नीचांनीं ईसरसिंगाचे बाबतींत जगाला फसविण्याचा त्यास वस्तु स्थितीचा थांग न लागूं देण्याचा--घाट सुबक तऱ्हेनें जुळविला होता खरा; आणि त्यामुळें जग चुकलें हें खरें परंतु त्यांची विवेकबुद्धि मात्र त्या चलाखीनें फसणें सर्वस्वीं अशक्य होतें तिच्या गुराकावणीनेंते दोघेही घाबरले आणि स्वतःशींच लाजले.ते इतके कीं, जयचंदानें आपल्या नव्या मिळकतीकडे--बहिरामगडाकडे--जाऊन दडी दिली आणि

अमरसिंगानें आजाऱ्याचें सोंग घेऊन कांहीं दिवस रणवासांत वास केला; परस्परांना तोंड दाखविण्याची सुद्धां लाज !

या नंतर लौकरच साळुंब्राहून मेवाडचे दरबारी खेदजनक वार्ता आली ! वर्षगांठीच्या दरबारांत झालेल्या प्रकारानें चिडून ठाकुर ईसरसिंग कोठें निघून गेले, त्यांचा पत्ता नाहीं. हेंच तें वर्तमान होय ! अज्ञान जग त्या वार्तेनें ईसरसिंगालाच दोषी समजूं लागलें ! असो.

जगाला चमत्कारिक वाटणारी ही वार्ता कांहींशा मंदगतीनेंच षहिराम-गडावर जयचंदाला जाऊन पोंचली ! त्यावेळीं तो आपल्या नव्या दरबारांत बसला होता. ही वार्ता ऐकतांच त्याला मोठें नवल वाटलें ! मागून त्यानें विषादही प्रगट केला ! आणि थोड्यावेळानें तो संचितही झाला ! या नाट्याभिनयाला भोंवतालच्या जगानें काय परितोषक दिलें असेल, तें असो; विवेकबुद्धीनें मात्र त्याच्या मनाचा कान चांगला करकचून पिरगळला ! त्या बरोबर त्याचें मन तर कळवळलेंच पण मुद्राही पालटली आणि त्या फरकानें जग बिचकूं नये म्हणूनच कीं काय कोण जाणे तो एकदम उठून एकांतांत गेला! जयचंदाचे मागचे एकांत प्रसंग कसे जात असत कांहीं सांगतां येणार नाहीं; पण अलीकडचे एकांत मात्र फारसे सुखाचे नसावेत. कारण ते त्यास रुचत नसत. कोंडलेल्या जागेंत मनुष्य जसा गुदमरून घाबरा होतो, तशीच जय-चंदाची स्थिति एकांत वासानें होऊं लागली. आजच्या रात्रीं तर त्यास निद्राही आली नाहीं !

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं तो उठतो न उठतो तोंच त्यास दोन निरोप कळले ! पहिला, जयश्री सुखरूपतेनें आपल्या नवा पत्त्यासह चंबेलवाडीस परत आल्याचा आणि दुसरा अबदुलखानाकडून एक खासा पेशकार कांहीं इतमामासह दाखल झाल्याचा.

या दोन्ही निरोपानें त्याचें अस्वस्थ चित्त विशेष अस्थिर झालें. परंतु त्यांतले त्यांत पहिल्या निरोपानें त्याच्या मनांत विचाराची फार गडबड उठवून दिली. जयश्रीचें आगमन ऐकतांच त्यास आनंद खास झाला आणि आतां आपण तावडतोब चंबेलवाडीस गेलें पाहिजे, अशीही उत्कंठा त्यास

वाटूं लागली. परंतु त्या बरोबरच जयश्रीच्या शुद्ध संगतीची त्यास भीति वाटूं लागली. पूर्वीप्रमाणें आतां आपणास तिच्याशीं मन मोकळें करून वागतां येणार नाहीं आणि तसें झाल्यास तो फरक तिच्या लक्ष्यांत येण्यास फारसा वेळ लागणार नाहीं, अशी त्याचे मनास हुरहूर लागली. समजा, तो फरक तिला कळला, आपल्या विमनस्कतेचें कारण ओळखण्यांचा तिनें प्रयत्न केला आणि त्यांत तिला आपण तिच्याशीं कांहीं लपंडाव करितों आहों, असें तिला कळून आलें तर तिच्या मनास काय वाटेल बरें? सहा महिन्या-पूर्वी आपला पति आपला होता. आज तो आपला नाहीं, असें तिला दिसून आलें तर त्यायोगें ती किती अस्थिर होईल बरें? इत्यादि विचारांनीं त्याच्या डोक्यांत इतका गोंधळ केला कीं, नित्यांतील मुखमार्जनादि विधीही त्यास सरळपणें उरकतां येईनात.

ठाकुर ईसरसिंगाप्रमाणेंच जयश्रीही जयचंदास कंटकतुल्य होती! सध्यां त्यानें जो मार्ग स्वीकारला होता, त्या मार्गानें जातांना हे दोन्ही कांटे त्यास सारखेच सलणारे होते. हरामगिरी करून त्यानें बाहेरचा कांटा–ठाकुर ईसरसिंग–बाजूला सारिला; पण या हृदयांतील प्रेमळ कांट्याची तो कशी वासलात लावणार? त्याचें मन जसें त्यास खात होतें, त्याचप्राणें जयश्री हें कांट्याप्रमाणें खुपणारें त्याचें दुसरें सुमन होतें! त्यावेळच्या रीतीप्रमाणें व इतर अनेक पुरुषांप्रमाणें तो बहुपत्नीक असता; त्याचें पत्नीविषयक प्रेम बारावाटा पळणारें असतें तर गोष्ट वेगळी होती; परंतु जयचंद तशा पैकीं नव्हता. जयश्रीखेरीज त्यास दुसरी पत्नी नव्हती. उपपत्नी बाळगण्याचीही त्यानें अनेकांचा अनेक तऱ्हेनें आग्रह असतांही, खटपट केली नाहीं आणि जयश्रींखेरीज इतर कोणत्याही रूपसंपन्न आणि गुणवती अशा तरुणीवर त्याचें मन बसणें शक्य नव्हतें! जयचंद खरोखरीच एक पत्नी आणि जयश्रीचा अत्यंत प्रेमळ पति होता! त्याला पहिल्यापासून जयश्रीच्या मनांत जशी अन्यपुरुषाची भावना स्वप्नांतसुद्धां आली नव्हती, त्याचप्रमाणें जयचंदाचे मनांतही जयश्री पत्नीरूपानें अढळ झाल्यावर दुसऱ्या स्त्रीविषयीं त्यास भलती कल्पना शिवली नाहीं! जयश्री-जयचंदाचें हें प्रेम त्यावेळच्या मेवाडांत अपवादादाखल आणि कौतुकास्पद असेंच होतें! अर्थात् अशा

स्थितींत जयचंदाचें चित्त अत्यंत द्विधा झालें असेल, यांत नवल तें काय? जयश्रीला आपल्यासारखी करून घेणें अगर तिच्या प्रेमाला सर्वस्वी आंचवून सुख संपत्तींत असतां भणंग भिकारी होणें या दोन उपायाखेरीज जयचंदास तिसरी तोड नव्हती! पहिला उपाय सिद्धीस जाणें सर्वस्वीं अशक्य होतें आणि दुसरा उपाय तर काय अमलांत आणणेंच मुष्कील होतें! राजविलास भोगण्याची जयचंदास अनिवार इच्छा झाली होती आणि त्याप्रीत्यर्थ त्यानें कुलकलंकी मार्ग पत्करला होता हें ही खरें; पण त्या मार्गानें जयश्रीखेरीज जाण्याची त्याची तयारी नव्हती आणि ती त्याचेबरोबर मुकाट्यानें येणें सहजीं नव्हतें. असो.

असे चमत्कारिक विचार करीतच त्यानें प्रातर्विधि आटोपला, आणि त्यानें अबदुलखानाच्या पेशकारास भेटीस बोलाविलें.

त्यानें येऊन अत्यंत आदबीनें जयचंदास सलाम केला आणि आपल्या मालकानें दिलेलें एक भलें मोठें पत्र त्याचे समोर ठेविलें! जयचंदानें तें तात्काळ वाचलें व त्यास तो पेशकार कां आला व कोणत्या इतमामासह आला, याचा उलगडा पडला.

अबदुलखानाचें तें पत्र अत्यंत गौरवानें लिहिलेलें होतें. तें वाचून कोणाचीही तब्येत खुश झाली असती परंतु जयचंदाला त्याची तितकी खुशी वाटली नाहीं. त्याची मुद्रा प्रसन्न झाली हें खरें; पण त्यानंतर त्याला जें हंसूं आलें, तें केवळ गमतीचें होतें. जयचंदाच्या मनास न पटणारें असें हंसूं येण्याजोगें त्यांत काय होतें बरें? वाचकांनो, वरचा अगडबंब मायना सोडून पुढील मजकुरावर नजर टाका म्हणजे जयचंदाच्या विनोदचा कांहीं उलगडा पडेल!

“ ... .........

आपल्या खिदमत–गुजारीनें आणि दिल्लीच्या सल्तनतीविषयींची आपली नेकदिली पाहून, आमचे थोर अंतःकरणाचे बादशाहा शहा–तू–शहा नूर महंमद सलीम उर्फ जहांगीर हे आपल्यावर निहायत खुश झाले असून, त्यांनीं आपणास ‘**उमदत्–उल–आषवाह बल आयान**’ नांवाचा मर्तबा सर्व सरंजामासह देण्याचें ठरविलें आहे. बादशाहांच्या या मेहर

नजरेबद्दल मी दोस्त या नात्यानें आपली मुबारिक बादी करितों; बादशाहांच्या या कृपेबद्दल आपण त्यांचे उतराई व्हाल आणि तमाम जिंदगी त्यांची नौकरी कराल, अशी उमेद बाळगतों ! बेशक, आपली तारीफ करण्यालायक अक्ल, सख्त बहादुरी और वफादारी पाहून आमच्या दरबारच्या मोठमोठ्या सरदारांना आपल्याशीं दोस्ती करण्याची इच्छा झाली आहे. आपण आग्र्याला केव्हां याल, असें सर्वांचें विचारणें आहे. आपल्या मैत्रीमुळें माझा मान विलक्षण वाढला आहे; याचें उतराई कसें व्हावें, हेंच मला समजेनासें झालें आहे. आपल्यासारख्या थोर शरीफाशीं खैरख्वाही करण्याचा मोका अल्लाहनें आम्हांस दिला, ही त्याची आम्हावर मोठीच मिहरबानी झाली. असो. आतां जादा खबर अशी आहे कीं, खास आपल्याकरितां व आमच्या सरकारचे दिल्ली दोस्त महाराणा अमरसिंग यांचेकरितां आमच बादशाहांनीं स्वतःच्या पसंदीनें दोन **इस्तंबुली गुलाब** यानी ( म्हणजे ) खुबसूरत व नमकीन अशा दोन तुर्की लवंडया ( नाटक शाळा ) पाठविल्या आहेत. त्यांची उमर बिल्कुल जवान आहे. गाणें बजावणें, नाचणें, हावभाव करणें, वगैरे कलांमध्यें त्या पूर्ण वाक्बगार आहेत. त्या बाबतची विशेष बात त्यांच्याबरोबर असलेल्या बिबी हमीदाबानू आपणास सांगतील. बिबी साहिबा फारच लायक आहेत. तें आपणास भेटींतच कळेल. त्यांच्या संगतीनें आपला दिल हमेश खुश राहील, यांत शंका नाहीं. आमचे खास पेशकार हा बादशाही नजराणा घेऊन आपल्याकडे येत आहेत. मीही चार दोन दिवसांत **तेवढें काम** उरकलें कीं, आपल्या खिदमतींत हजर होतोंच............"

वरील पत्रांतील गौरवानें जयचंदास समाधान वाटलें असलें तरी नाटक शाळेची हकीगत त्यास हंसू आणणारी होती. एक वेळ त्यास तो नजराणा न पाहतांच अमरसिंग महाराण्याकडे रवाना करावा, असें वाटलें; परंतु तसें केल्यास त्या पेशकारास व बिबी हमीदा दिला बरें वाटणार नाहीं शिवाय अबदुलखानाचाही अपमान केल्यासारखा होईल. तेव्हां आपल्यासंबंधीं कोणाचे मनांत कसलाच गैरसमज येऊं नये आणि सकृद्दर्शनीं तरी सर्वांना बरें वाटण्यासारखें कांहीं वागावें म्हणून त्यानें त्या पेशकाराशीं कुशलप्रश्नादि

भाषण केलें आणि सायंकाळीं हमीदाबानू वगैरे मंडळीसह हजर राहण्याविषयीं सांगून त्यास निरोप दिला आणि त्याची बरदास्त ठेवण्याचें काम आपल्या एका खिदमतगारास सांगितलें ! असो.

संध्याकाळीं जयचंदाचें भोजन उरकून तो तांबूल चर्वण करीत शतपावली टाकीत असतां पेशकारानें येऊन हजेरी दिली. त्याचेबरोबर पोक्त वयाची हमीदा व तिच्यापाठीं शुभ्रवस्त्रावगुंठित असे ते तुर्कीगुलाब आले होते. हमीदेची सलामी उरकल्यावर पेशकारानें निरोप घेतला. उत्सुकतावश जयचंद हमीदेकडे व तिच्यामागें उभ्या असलेल्या व्यक्तींकडे पाहूं लागला.

हमीदेनें मुसलमानी पद्धतीनें मस्तक लववून व पसरलेल्या हातांची अंजली जोडून सौम्यस्वरांत म्हटलें, " मुआझिझ साहेब, अलमदुनियेचे बादशाहा सलीम यांनीं कृपावंत होऊन आपणापुढें हा दिलखुष करणारा नजराणा आणण्याचा मान, या ताबीदार दासीला दिला आहे ! मिहरबान साहिब, फारसीबोलींतील नामवर नझीमांनीं व शाहीरांनीं जवानी, शराब व हसीन औरत यांची खूबच तारीफ केल्याचें हुजुरांस माहीत असेलच ! त्या शाहिरांची अक्कलही गुंग होण्यासारखा हा तुर्कीमेवा बादशाहांनीं आपणास बहाल केला आहे, ही किती खुशीची गोष्ट आहे ? पहा साहिब, आपल्या नयनांचें सार्थक करा ! " असें म्हणून ती बाजूला झाली व तिनें आपल्या साथ आणिलेल्या त्या वस्त्रावगुंठित व्यक्तींना पुढें केलें आणि त्यांना आपलें अवगुंठन दूर करण्यास सांगितलें. अल्पावकाशांतच दोन सुंदर रमणी रत्नें जयचंदाच्या नजरेस पडलीं !

आतापर्यंत जयचंदानें रमणीसौंदर्याचे फारसे नमुने पाहिले नव्हते व जे पाहिले होते ते त्यास जयश्रीच्या स्वरूपापेक्षां कमी दर्जाचे वाटले होते. आतांचीं हीं दोन तुर्कीरत्नें मात्र त्यास अपूर्व वाटलीं. मात्र त्यांचीं मुखें निहाळून त्याच्या मनांत कसलीही विलास भावना निर्माण झाली नाहीं. केवळ कौतुकानें त्यानें त्यांचेकडे पाहण्यास प्रारंभ केला.

त्या दोन्ही रमणींनीं तुर्कीधर्तीचा पेहराव केला होता. अस्मानी रंगाचे त्यांनीं झगे घातले होते. त्याच रंगाचे परंतु सुक्ष्म सूताचे व कांहींसे सैल

असे सदरे त्यांनीं धारण केले असून उन्नत उरोभाग वगळून, बाकीच्या भागास अगदीं तंग बसतील, अशीं जिगाचीं कामें केलेलीं कुरतीं ( मुसलमानी कांचळीला एक प्रकार ) त्यांच्या आंगावर शोभत होतीं. रजपुत स्त्रियांपेक्षां त्यांचा वर्ण पुष्कळच गोर होता. मात्र इकडील रमणोप्रेक्षां त्या थोड्या सडपातळ होत्या. त्यांच्या शुभ्र केतकीवत् वर्णावर तारुण्याची उमटलेली गुलाबी छटा कपोलभागीं इतक्या रमणीयतेनें केंद्रीभूत झाली होती कीं, गुलाब फुलांनीं लाजावेंच लाजावें ! याच शोभेंत त्याचे काळे कुळकुळीत केश, रेखलेल्या भुवयां, तरतरीत नाकाची कळी, आणि अत्यंत कोवळे भासणारे लाल ओंठ यांची भर पडली होती ! पहिल्या दृष्ट भेटीला संकोचलेले व सुरम्यानें शृंगारलेले त्यांचे मदभरीत व किंचित लंबट नेत्र इकडून तिकडे फिरतांना जो लक्ष्यवेध करीत असत, त्यानें विद्ध न होणारा व "अहाहा !" असा हर्षोद्गार काढून आपली जखम न दर्शविणारा असा पुरुष क्वचितच आढळला असता; अशी बिबी हमेदेची पक्की खात्री होती आणि ती अन्यथाही नव्हती; परंतु अरेरे ! जयचंदानें त्या दोघींकडे सारखे पाहूनही कसलीच विमनस्कता दर्शविली नाहीं ! आपल्या एकपत्नीव्रतानें तो खरोखरीच असल्या बाबतींत अगदीं अरसिक होता आणि त्याच त्याच्या स्वभावाचा अनुभव हमीदेला आला ! स्त्रीपुरुष शास्त्रांत हमीदा ही मोठी ताणावलेली अशी धूर्त बिबी होती. आपण आणिलेल्या सोनेरी पिंजऱ्यांत जयचंदाचें मनरूपी पांखरूं सहजीं येणारें नव्हे, असें तिला वाटलें ! आणि तिची थोडी निराशाही झाली. अबदुलखानानें त्या तुर्की दासींबरोबर हमीदेला निष्कारण पाठविली नव्हती. कांचनानें गुलाम बनलेल्या जयचंदास कामीनीच्या मोहाननें पुरतें नादान करावयाचें असा त्याचा अंतस्थ हेतु व तो बरोबर साधण्याकरितां त्यानें हमीदेस रवाना केलें होतें. परंतु येथें अबदुलखान चकला व हमीदेलाही सिद्धी मिळणें कठिण वाटूं लागलें.

कदाचित् आपल्यासमोर जयचंद संकोचत असेल, अशी कल्पना करून तिनें आपलें मन मोकळें करण्याचा प्रयत्न केला. आपलें वय लक्ष्यांत न घेतां काव्यमय भाषेंत त्या तुर्कीरत्नांचें सौंदर्य वर्णन करून, जयचंदाचें मनांत शृंगारिक भाव निर्माण करण्याचा तिनें घाट घातला; पण त्यानें तो ओळ-

खून तिला गप्प बसविण्याकरितां म्हटलें, " तुमच्या या मुली निस्संशय सुंदर आहेत आणि त्यांचें रूप पाहून मला मोठें समाधान वाटलें यांत मुळींच शंका नाहीं. परंतु हा नजराणा सर्वतोपरी महाराण्यांच्या सेवेंत हजर करणेंच जास्त श्रेयस्कर होईल. कारण माझ्यापेक्षां त्यांनाच तो विशेष शोभेल. मी असल्या कामांत मुळींच मूर्ख आहे.तेव्हां तुह्मी विशेष तसदी घेऊं नका ! ह्या दोघांनाही मी आपल्या बहिणी समजून, उद्यां उदेपुराकडे त्यांची रवानगी करीन. समजलांत–जा आतां. यांना प्रवासाचा बराचसा शीण असेल. तेव्हां त्यांना आतां विश्रांतीकरितां जाऊंदे." एवढें गंभीरपणें बोलून त्यानें त्यांना निरोप दिला. आंबटलेल्या तोंडानें हमीदा त्या तरुणींसह आपल्या घिऱ्हाडीं गेली ! त्या तरुणींना जयचंदाविषयीं काय वाटलें असेलें तें असो; हमीदेलामात्र त्याचा घुस्सा आला !

त्या बाया गेल्यावर जयचंद शयनस्थ झाला ! त्याच्या मनांत घडलेल्या प्रकारचें पुसटसें प्रतिबिंबही राहिलें नाहीं. आज प्रातःकाळीं त्याला जो पहिला निरोप कळला होता, त्याच्याच विचारांत तो आज संबंध दिवस होता. तोच विषय आतां पुनः त्याचे मनांत आला ! पत्नीला भेटण्याविषयीं त्याचें मन अत्यंत उत्कंठित होतें; परंतु पूर्वी इतकें आतां तें निर्भय नव्हतें. जणू काय, जयश्री त्याची जबानी घेण्यास व त्याच्या पापाचें माप त्याच्या पदरांत घालण्यास अगदीं टपून बसली आहे.अशा शंकेनें तें भ्याड बनलें होतें.

परंतु कांहीं झालें तरी त्यास जयश्रीकडे येणें भागच होतें. त्याप्रमाणें त्यानें अबदुलखानाच्या पेशकाराची उदेपुरीं रवानगी करण्याचें ठरविलें; पण हमीदा बिबी त्या विचारास कबूल होईना. " एक नाटकशाळा आपल्याकरितां आहे, ती ठेऊन घेण्याचें आपण मान्य करा म्हणजे दुसरीला घेऊन मी उदेपुरास महाराणाजीकडे जातें." असा तिचा आग्रह पडला तें जयचंदास नाकबूल झालें; हमीदा म्हणाली, " मग मी त्या दोघींना अगर एकटीला उदेपुरास ठेवणार नाहीं " तेव्हां उभयतांच्या मतें पेशकारसाहेब आणिलेला नजराणा परत घेऊन निघाले.

दुसऱ्या दिवशीं जयचंदही सायंकाळीं ... चंबेलीस पत्नीदर्शनार्थ आला.

———:o:———



# परिच्छेद ५ वा.

——:०:——

## हा कोमल कांटा कसा काढावयाचा?

"मला वाटतं, आमच्या मेवाडला निर्माण करून देवानं भूलोकाला शोभा आणिली आहे आणि स्वर्गाचा गर्व ठगणा केला आहे!— आपल्याला नाहीं असं वाटत? आपल्या या गोजिरवाण्या चंबेली ( जयश्रीचें नवें मूल ) प्रमाणंच, आमची ही चंबेलवाडीही मोठी रमणीय आहे! तिच्या भोंवतालचं हें ऐश्वर्य पाहून मला तर नेहमीं असं वाटतं कीं, वरचेवर जन्म घ्यावा तर मेवाडांत आणि राहावं चंबेलीस! खरंच, आपला मेवाड दुसरा स्वर्गच आहे! ठिकठिकाणीं पसरलेले हे अरवलीचे शुंडादंड ऐरावतास खात्रीनं हिणवीत असतील! त्याचप्रमाणें सगळीकडे सारखी पसरलेली ही वनराजी पाहून नंदन वनाला पृथ्वीच्या आरशांत आपण स्वतःचें रूप न्याहाळीत आहों. असाच भास होत असेल! आणि आमच्या पवित्र बनासचं मधुर जल स्वर्गीच्या अमृत निर्झरांना तर सारखं हंसतं आहे."

पतिसान्निध्यानें प्रफुल्लीत झालेल्या जयश्रीचे तोंडून वरील हर्षोद्गार सहजीं निघाले.

दोघेंही पत्नीपति आपल्या आश्रमाच्या एकांतस्थलीं बसून वातायनांतून आजुबाजूचें सृष्टिसौंदर्य पाहात होतीं. त्याचें स्थान उंच जागीं असून तेथून फारच मोठा प्रदेश त्यांच्या दृष्टिक्षेपांत येत होता. दूर अस्ताचलीं दिवस–रात्रीचा जो संधि सुरू होता, त्याचें प्रतिबिंब या दोघां पतिपत्नीमध्यें पूर्णत्वानें उठलें होतें.

दोघेंही आज अत्यंत आनंदांत होती! दिवा–रात्रीमध्यें अस्ताचलाचें पांघरूण घेऊन आरक्त सूर्यबिंब जसें शोभत होतें; त्याचप्रमाणें त्या दोघांचे-

मध्यें अर्ध्या वर्षात आलेली चंबेली मुठी चोखीत पडली होती! जवळ जवळ आठ महिन्यांनीं त्यांचा पुनर्योग घडून आला होता. परस्परांच्या अकृत्रिम प्रेमामुळें उभयतांनाही आजचा संधि प्रथम समागमाइतकाच उत्कंठेचा वाटला! प्रेमाच्या मुक्या बोलोंत, लाजऱ्या नकारा–रुकारांत आणि निर्भर आलिंगन सौख्यांत जयश्री जशी आपला प्रौढभाव विसरून गेली; त्याचप्रमाणे त्या आनंदांत जयचंदही आपलें सर्व पाप विसरून गेला! दोघांच्याही दृष्टीनें जगाचें एकांतिक पुण्योद्यान झालें होतें; चंद्र नसतां चांदणें पडलें होतें आणि स्वर्ग दूर असतांही तेथील नंदन वनांत बहरलेल्या पारिजातकाचा सुगंध त्यांच्या भोंवतीं दरवळला होता!

पतिपत्नीच्या शुद्ध व सात्विक प्रेमामुळें व्यक्तिशः तरी भूलोक स्वर्लोकावर ताण करितो! मात्र अशा स्थितींत पत्नीची समाधि एकाग्र, स्वभावने रहित आणि तेजोमय असते तर पुरुष पुष्कळवेळां वैषयिक लालसेच्या छटेनें देहप्रीतीच्या उंबरठयाशींच अडकून राहतात! यावेळीं जयश्री आपल्या हृदय राजाजवळ बसून निसर्गाची शोभा पाहात कामुकतेला विसरली होती; परंतु जयचंदमात्र तिच्या उलट स्थितींत होता. त्याची दृष्टि तिच्या जादुभरी नजरेनें भारली गेल्यामुळें, ती चिमकुल्या चंबेलीच्या चुंबन चित्कारानें चिक्कण बनलेल्या जयश्रीच्या ओष्ठांवर स्थिरावली होती; आणि त्यामुळें चंचल झालेलें त्याचें चित्र त्या विद्रुम रत्नांना काय किंमत यावी याच विचारांत गुंतलें होते! एवढयाच व्यवसायानें त्याचें कार्यक्षेत्र मर्यादित झालें नव्हतें! मधून मधून तें चंबेलीकरितां अमृत स्रवणाऱ्या पुष्टोत्तुंग क्षीरशैलावर विसंबत होतें आणि प्रश्न सोडवीत होतें कीं, त्या क्षीरशैलाच्या पायथ्याशीं बसणाऱ्या हृदयाची प्रेमळ कानगोष्ट कान लावून ऐकावी कीं, आपल्या विशाल वक्षःस्थलानें त्यांच्या उन्नतीस नमवावें? मुळांतच सुंदर असलेली जयश्री जयचंदास प्रेमांजनानें विशेषच सुंदर व मोहक वाटे; मग होऊन गेलेल्या प्रसुति प्रसंगानें तिच्या सौंदर्यास जी गोलाई आली होती, ती पाहून जयचंद पागल बनल्यास नवल तें काय?

अशा स्थितींत सहवासाच्या उष्णतेनें वाढविलेली आणि अत्यंत निर्मल

प्रेम जलानें बहरास आणिलेली आपल्या दारची सद्गुणालंकृत कांचनलता टाकून, जयचंदासारखा रसिकवर कुशलतेनें निरडलेल्या परंतु बेगडी बनावटीच्या बाजारी वेलीस कशी कवटाळेल बरें ? अबदुलखानाचा कामिनीचा कोमल पाश चुकला तो यामुळें ! असो.

दोघांचा संवाद सुरू झाला.

जयचंदानें विनोदानें म्हटलें, " मेवाड स्वर्गभूमि आहे, हें तुझं म्हणणं मला पटलं ! आपल्या या मर्यादित महालांत तरी स्वर्गलोक खास खालीं उतरला आहे !–"

" कां बरं ? सबंध मेवाड स्वर्गाची पडछाया कां समजूं नये ? " जयश्री अभिमानानें म्हणाली, " मेवाडचें ऐश्वर्य खरोखरीच दृष्ट लागण्यासारखें आहे ! "

" होय—आणि म्हणूनच त्याला इहलोकच्या मृत्युभयाची दृष्ट लागली आहे; आणि त्या बाहेरवाशानें तो काळवंडल्यामुळं, तो स्वर्गाची पडछाया खास असेल, यांतही शंका नाहीं. फक्त मृत्युलोकचा मेवाड एवढाच काय तो त्यांत उणेपणा. "

" मामाजींच्या पुण्यात्म्यानें स्वर्गातून जी खालीं उडी टाकली, ती कांहीं त्या उणेपणाकडे पाहून नव्हे. "

" स्वर्गातील सततच्या सौख्याला कंटाळून देवांनासुद्धां चव बदलण्याकरितां मत्युलोकची वाट धरावीशी वाटत असेल. कोणी सांगावें ? " जयचंदानें स्मित करीत म्हटलें, " अप्सरांच्या सौंदर्य सहवासास विटलेल्या त्यांच्या दृष्टीस, इहलोकीं घडणाऱ्या मृत्युलीला पाहून हायसें वाटत असेल आणि अमृताच्या चवीनें गढुळलेल्या त्यांच्या बुद्धीस, येथील कडवट दुःखांनीं चांगलीच चेतना मिळत असेल यांत शंका नाहीं ! बिचारे काकाजी, तुझ्या कल्पनेप्रमाणें स्थलांतराकरितां ते मेवाडांत अवतरले खरे; पण हा सहवास कांहीं त्यांना सुखासमाधानाचा झाला नाहीं—"

जयश्री मध्येंच म्हणाली, " त्याला त्यांचा काय उपाय ? मेवाडच्या

सुखाचा होम करणारे नराधम येथं सराटयाप्रमाणं पसरले होते ना ! त्यांना वेंचून काढण्यांतच त्यांचा जन्म गेला—" बोलतां बोलतां जयश्रीचा शृंगारिक भाव पालटला व ती खेदानें पुढें म्हणाली, " मामाजींच्या चरित्राची आठवण झाली म्हणजे मात्र मेवाडच्या दुर्दैवाची मोठी कींव येते ! आमच्या मातृभूमीच्या नशीबांत पुढं काय आहे कोणास माहीत ? मोंगलाचं बळ तर वाढतं आहे, आणि मेवाड तर दिवसेंदिवस अगदीं सुस्त होत चालला आहे. खरंच, चितोडच्या उद्धाराचं आपण कोणीच कसं मनावर घ्यायचं नाहीं तें ? "

झालें ! सुरावर लागलेल्या तंबोऱ्याची तार तुटली ! विमल चंद्रप्रकाशांत अभ्रांचें अवंडबर जमूं लागलें ! वायुबरोबर हलणारी डुलणारी पुष्पलता उन्मळून पडली ! जयश्रीच्या त्या भाषणानें जयचंदाच्या आनंदाचा विरस झाला ! तिला मातृभूमीच्या दुःखाची स्मृति झाली ! त्याच्या अंतःचक्षूपुढें त्याचें पाप नाचूं लागलें ! थोड्या वेळापूर्वीं दोघांचीं हृदयें आलींगन सौख्यानें जवळ जवळ आलीं होतीं; पण दोघांनाही परस्परांच्या खऱ्या विचाराचा थांग लागला नव्हता ! दोघांनाही क्षणापूर्वीं वाटत होतें कीं, आपण शरीरानें भिन्न पण मनानें एकच आहों ! पण यावेळीं जयचंदास तरी आपलें भिन्नत्व ओळखून आलें ! आपल्या पत्नीच्या हृदयसागरावर इतर विचारांच्या अनेक लहरी उठत असल्या तरी त्यांचेखालीं देशभक्तीचा वडवानळ जागृत आहे आणि त्यास आपल्या हृदयांतील काळकूट कळून आल्यास, तो पेट घेतल्याखेरीज राहणार नाहीं, हें त्यांस कळून चुकलें व तो विमनस्क झाला ?

जयश्री आपल्याच विचारांत होती, ती म्हणाली, " बरी आठवण झाली. आपल्या महाराणाजींनीं म्हणे झोंपडीचा महाल केला ! हें योग्य झालं का ? मी गेल्यावर पुष्कळच भानगडी झाल्याचं ऐकल्यें. खरंच सांगायचं, उमरावजींनीं झोंपडी मोडून मामाजींच्या प्रतिज्ञेचा मोड कां केला बरं ? मुख्य मंत्री म्हणून आपण याला जबाबदार आहांत. आपल्या अनुमतीनंच हें सर्व झालं का ?—"

जयचंद अगदीं प्रथमतः आपल्या प्रेमदेवतेपुढें असत्य बोलला. तो विरक्त-भावानें म्हणाला, " जयश्री, विलसोन्मुख झालेल्या महाराणाजींच्या हट्टापुढें माझें कांहीं चालेना--"

" मग काय सर्व सरदारांनीं राणाजींचा हा अपराध मान्य केला ?--" जयश्रीनें विचारिलें, " ठाकुर ईसरसिंगजीही यात्रेहून परत आले; पण त्यांना कांहीं महालाची ही योजना रुचली नाहीं म्हणतात. त्यांच्याच मताचा अनुवाद इतरांनीं कां बरं नाहीं केला ? मामाजींच्या निर्वाण प्रसंगीं त्यांच्या पायाशीं राजविलास त्यागाची व चितोडच्या उद्धाराची प्रतिज्ञा बोलणारे बरेचसे सरदार त्यावेळीं दरबारांत होते म्हणे !-सर्वांनीं मिळून राणाजींचा धिःकार कां बरं नाहीं केला ? "

या संवादाला आतां कसें निराळें रूप द्यावें याची जयचंदास पंचाईत पडली ! आपल्या पत्नीला असत्य उत्तरें देऊन झुलविण्याचें कसब त्याला माहीत नव्हतें. त्यामुळें थापेची सरस्वती त्यास प्रसन्न झाली नाहीं. तो लाचारीनें म्हणाला, " जयश्री, तुझें समाधान करण्यासारखें मला या बाबतींत कांहींही सांगतां येणार नाहीं. "

जयश्री उद्वेगानें म्हणाली, " आपणही असं निराश असायचं ? ठाकुर ईसरसिंगजीही रागाऊन कुठं निघून गेले असं सांगतात; मग मेवाडनं आतां पाहवं तरी कुणाच्या तोंडाकडे ? झोंपडीचा महाल होण्यांतच मामाजींच्या प्रतिज्ञेचा भंग झाला; आतां यापुढं महाराणाजींचे हातून वीराचें व्रतपालन काय होणार तें दिसतंच आहे. उलट व्रताचेऐवजीं विलास येतील, कदान्नाचे जागीं मिष्टान्न येईल, आणि सुखासन तृणासनाला खो देईल ! अशा सुखासमाधानांत चितोडचा उद्धार तरी कसचा होतो, आणि मेवाडचा स्वतंत्र बाणा तरी कुठवर टिकतो ! जिवंत असतां मामाजी स्वजनद्रोहाची खंत खाऊन खाऊन झुरले, आतां त्यांच्या पश्चात् पुढील पिढीचा हा नादानपणा पाहूनही त्यांचा जीवात्मा असाच तळमळत राहणार !--आपल्याला या स्थितीचा कांहींच विषाद वाटत नाहीं का ?"

जयचंद या बाबतींत प्रथमपासूनच निरुत्तर होता. तो या प्रश्नाला तरी काय उत्तर देणार? मात्र चालू संकटांतून आपली लौकर मुक्तता व्हावी, अशी आतुरता त्यास लागली! थोड्यावेळापूर्वी जर त्यांच्या सुख संवादांत कांहीं व्यत्यय आला असता, तर तो त्यास मोठ्या संकटाचा वाटला असता; परंतु आतांच्या संवादांत कांहीं संकट आल्यास तें सौभाग्य मानण्यास तो सर्वस्वी कबूल होता! इतक्यांत त्याच्या इच्छेप्रमाणें एक संकट प्राप्त झालें. त्याच्याकडे कोणी भेटण्यास आलें म्हणून तो तेथून उठून बाहेर आला.

दिवस निघून गेला; रात्र एकटी पडली! सूर्यबिंब नाहिसें झालें व इकडे चंबेलीही झोंपी गेली! एकटीच राहिलेली जयश्री विचारांत मग्न झाली! बाहेरच्या रात्री प्रमाणेंच तिच्या मनांत निराशेचा अंधार पसरूं लागला!

जयचंदाचे दर्शनास अबदुलखानाचे दूत आले होते. चारसहा दिवसांकरितां त्यानें जयचंदास बहिरामगडीं भेटण्यास बोलाविलें होतें. वास्तविक हा एकप्रकारचा हुकूम होता; परंतु जयश्रीच्या चौकशींतून चुकण्याकरितां त्यानें तो ताबडतोब पाळला. दुसरेच दिवशीं तो जयश्रीचा निरोप घेऊन बहिरामगडीं निघाला. मार्गांत त्याचें डोकें जयश्रीचा कोमल कांटा कसा काढावयाचा, याच विचारांत भ्रमत होतें.

जयचंद बहिरामगडावर आला. लौकरच खानाचा व त्याचा एकांत प्रसंग घडला. जयचंदानें ओशाळत विचारिलें, "ठाकुरसाहेबांची बरदास्त नीट ठेविली आहे ना? त्यांचे बाबतींत आह्मी तुमच्यावर फार मोठ्या जबाबदारीचा विश्वास टाकला आहे—"

"आणि त्यास आह्मी नालायक नाहीं आहोंत, हेंहीपण तुम्ही ओळखून असालच." अबदुलखानानें मिशांना पीळ भरीत मिजाशीनें म्हटलें, "आम्ही जातीवंत तरवार बहादर आहोंत. शूरांचा सत्कार कसा ठेवावा, हें आम्हां मोंगलापासूनच शिकावें!"

"तें कसें काय?" जयचंदानें सहजीं हंसत विचारिलें.

"स्पष्ट बोललों तर तुम्हाला कदाचित् घुस्सा येईल व म्हणाल कीं, काय चमत्कारिक खानसाहेब बोलतात; पण मनांत आलें तें सांगतों—हो, मी

आंत एक बाहेर भलतें असा वागणारा मनुष्य नाहीं. दुनिया आमच्याशीं सरळ वागते आहे, तोंपर्यंत आपण मुळीसुद्धां वांकडं वागायचं नाहीं असा आमचा पिढीजाद शिरस्ता आहे. त्या प्रमाणं खरं बोलायचं म्हणजे, ठाकुर ईसरसिंगजींना आमच्या ताब्यांत देण्यांत तुम्ही मोठीच चूक केलीत, असं मला वाटतं—"

खानाचें हें बोलणें ऐकतांच जयचंद चपापला. तो आश्चर्यानें त्याच्या-तोंडाकडे पाहूं लागला. तेव्हां खानच पुढें म्हणतो, "तुम्हाला इतकं ताअज्जुब वाटूं देऊं नका. मी खरंच सांगतों; ठाकुरसाहेब असा नेक मनुष्य आहे कीं, मेवाडचें त्याच्या वांचून खास अडेल !"

" वाहा खानसाहेब, खूपच केलीत म्हणायची !—" जयचंदानें ओंठ चाऊन म्हटलें," आमचें चांगलेंच रंगविलेंत ! वाहवा ! फारच योग्य !!"

" अरे यार," खानसाहेब पूर्ण सलगी दाखवीत म्हणाले, "तूं तर खूपच पागल दिसतोस मला ! केवळ तुझी थट्टा करण्याकरितां म्हटलें तें ! एहेः ! जयचंद अभितक तुम्हें दिल्लगीभी नहीं समझती ? लाहोल बलाइ कुवत ! क्या खूब !!" असें म्हणून त्यांनीं दुसरा कांहीं गमतीचा विषय काढून आपल्या मिठास वाणीनें खिजलेल्या जयचंदास रिझविण्याचा प्रयत्न केला !

प्रत्येक भेटीचे वेळीं असेंच कांहीं होत गेलें आणि त्यामध्यें न कळत अब-दुलखान एकेक पायरी वर चढला आणि जयचंद एकेक पायरी खालीं उतरला! अगदीं प्रथम दर्शनाचे वेळीं स्वतंत्र बाण्याचा मानी रजपूत जयचंद, मानाच्या पहिल्या पायरीवर होता तर फसव्या अबदुलखान बादशाही सोनें घेऊन शेवटच्या पायरीवर उभा होता ! सोनें पाहतांच जयचंदाची दृष्टी चळली ! त्याबरोबर त्याचें स्थानही चळलें. तो दोन पायऱ्या खालीं उतरला आणि इकडे मीठा अबदुलखान यश घेणार या खात्रीनें आपल्या हातांतील सोन्या-च्या झळकीनें जयचंदाची नजर दिपावी म्हणून एकदम चार पायऱ्या वर चढला ! पुढें भेट जाहली ! मसलत जमली ! जयचंदाची बुद्धि चकली; अबदुलखानाची युक्ति साधली ! दोघांचेंही बरोबरीचें नातें झालें. ! कांहीं काळ लोटला ! मोंगलांचा नजराणा वाढला ! जयचंदाचा मिंधेपणा वाढला !

त्या देवघेवींत स्थलाच्या सोयीकरितां दोघांपैकीं कोणाला तरी खालीं वरहोणें भाग होतें ! जयचंदाच्या मिंधेपणानें त्यास खालीं ओढलें, आणि खानाच्या शिरजोरीनें त्यास वर चढविलें ! त्यांतच ठाकुर ईसरसिंगाच्या विश्वासघाताची भर पडली ! त्याबरोबर खान उत्साहानें चार पायऱ्या वर चढला तर ओशाळाला जयचंद अडखळल्यामुळें अनेक पायऱ्या गडगडत खालीं आला ! अर्थात् या हिशेबीं अबदुलखानाची आजची सलगी अगदीं वाजवी होती, हें सहज समजण्यासारखें आहे. परक्यालोकांचें सोनें स्वातंत्र्याच्या बाजारांत देवघेवीला येतें , त्यावेळीं अशीच उलटा पालट होतें ! असो.

" क्यों जयचंद ?" खानानें प्रश्न केला, "आमच्या खुदावंतांनीं मेहरबान होऊन पाठविलेला परवांचा नजराणा तुह्माला पसंत आला नाहीं, हें पाहून आह्माला मोठें नवल वाटलें."

' इतकें नवल वाटण्याचें कारण नाहीं. " जयचंदानें उत्तर दिलें. " मी त्या पंथांतला मनुष्य नसल्यामुळें अर्थातच मला त्याचा स्वीकार करतां येईना."

" तुमच्यासारख्या जवान व रसीले आदमीनें असें ह्मटल्यावर मग काय बोलावयाचें ?" अबदुलखानानें ह्मटलें, " मला वाटतें, त्या तुर्की गुलामांची खुबसुरती तुह्माला पसंत आली नाहीं."

" तसेंच कांहीं नाहीं अगदीं. पण मला असला नजराणा केव्हांही आवडणार नाहीं, हें मात्र खरें आहे."

" समजा, बादशाहांनीं तुह्माला दिल्लीला बोलावलें, आणि त्यांनीं स्वतः एकादी नाजूक कलाई ( मनगट ) तुमच्या हातांत दिली, तर काय तुह्मी तो नाकाराल ?" खानानें हंसत विचारिलें.

" तसा प्रसंग पडल्यावर पाहतां येईल. आतांच त्याची वाटाघाट कशाला ?

" मग यार,--" खानानें खुशींत येऊन एकदम ह्मटलें,, " तो मौका फार लांब आहे, असें कां तुला वाटतें ? नाहीं दोस्त --लौकरच ( फार तर चार महिन्यांत ) आमच्या शहानशहांचा वर्षगांठीचा दिवस येणार आहे,

आणि त्यावेळीं जयचंदजी, तुह्माला आग्र्याला नाहींतर दिल्लीला जेथें दरबार होणार असेल तेथें आलें पाहिजे."

हें आमिष पाहून जयचंद अगदीं हुरळून जाईल, अशी अबदुखानाची कल्पना होती; परंतु तसें त्यास त्याच्या मुद्रेवर दिसलें नाहीं. तेव्हां तो पुढें ह्मणाला, "त्या प्रसंगीं आमचे बादशाहा तुह्माला आणि महाराणाजींना खास बोलावणें करणार आहेत; तें आमंत्रण तुह्माला नाकारतां येणार नाहीं."

"आणि आह्मीही तें नाकारूं अशांतला भाग नाहीं. आह्माला बरोबरीच्या नात्यानें वागविण्याचें तुह्मी अभिवचन दिलें आहे; आणि तें जोंपर्यंत तुह्मी बरोबर पाळाल, तोंपर्यंत आह्मी आपला स्नेहभाव मुळींच कमी करणार नाहीं." जयचंदानें खानाचे चेहऱ्याकडे टक लावून पहात म्हटलें. पायरी पायरीनें आपण खानाच्या अंकित होत चाललों आहोंत; हें जयचंद पूर्ण जाणून होता; परंतु विवेकबुद्धीची ती जाणीव जागचे जागीं दडपण्याकरितां तो अबदुलखानास प्रत्येक वेळीं आपल्या नात्याची व बरोबरीच्या हक्काची ओळख देत होता! खानही मोठा धूर्त होता. मनांतले मनांत जयचंदाच्या खुळेपणाची कींव करीत, आणि केव्हांतरी पुढें मागें "आम्ही तुला दडपणार राया. तूं काय समाजलास?" असें म्हणत तो त्याला चुचकारीत होता.

यावेळींही त्यानें त्यास असेंच चुचकारिलें. तो गंभीरपणें म्हणाला, "जयचंदजी, आम्ही काय मेवाडकरांचें पाणी ओळखून नाहीं? महाराणा अमरसिंगासारखे शूर नृपति व आपल्यासारखे धूर्त मंत्रि मेवाडमध्यें असतां आम्ही त्यांना खिजवून त्यांचा राग आपल्यावर काय म्हणून ओढून घेऊं? तसें करायचें होतें तर तुमच्याशीं दोस्ती करण्याचा एवढा उपव्याप आम्ही कशाला केला असता? तेव्हां वरचेवर भलतीच शंका मनांत मुळींच आणूं नका! मग येणार ना तुम्ही आग्र्यास? महाराणाजी आले नाहींत तरी चालेल; परंतु तुम्ही तर अगदीं आलेंच पाहिजे. तुम्हाला पाहण्याविषयीं आमचे शहा न शहा इतके उत्सुक आहेत! तुह्मी आपल्या कारवाईनें त्यांच्या मनावर अशी कांहीं छाप बसविली आहेत, कीं, ती पाहून मला-

सुद्धां त्याचें नवल वाटतें ! कांहीं म्हणा जयचंदजी, तुम्ही मोठे भाग्यवान् बुवा ! आतांपर्यंत तरी कोणीही मनुष्यानें बादशहांचे मनाला इतका चटका लाविला नसेल. मला तर असें वाटूं लागलें आहे कीं, तुमची न् बादशाहाची भेट झाली कीं, त्यांचे कलिजे तुम्ही निःसंशय होणार ! आणि तुमच्याच तंत्रानें ते चालू लागणार ! तुम्ही आम्ही आपले जानीदोस्त म्हणून सोडून द्या; पण तुमचा आमचा जर तसा कांहीं संबंध नसता, तर खात्रीनें सांगतों कीं, मला तुमच्या उत्कर्षाचा हेवा वाटला असता ! "

जयचंदाच्या विवेक शक्तीचा पूर्ण पाडाव झाला ! अबदुलखानाची पोकळ स्तुति त्यास मनापासून आवडली, आणि त्या भुरळींत भविष्यत्काळाचें एक अत्यंत उज्ज्वल उत्कर्षचित्र त्यास दिसूं लागलें ! अबदुलखानाच्या वरच्या स्तुतीस त्यानें मायावी विनयाच्या भाषेनें जागचे जागीं थोपविण्याचा प्रयत्न केला खरा; परंतु वास्तविक त्यापूर्वींच त्याचें मन त्या लोंढयांत वाहात जाऊन आजुबाजूच्या परिस्थितीस सर्वस्वीं विसरलें होतें !

कोणाला माहीत, स्तुति हा कोणत्या वनस्पतीचा मोहक अर्क आहे ! या मद्याची चटक कोणालाही लागते, आणि एकदां त्यानें मनुष्य झिंगला म्हणजे अवास्तव स्तुति रूपी निंदाही त्याच्या पचनीं पडूं लागते आणि आपल्या योग्यायोग्यतेचें साधें ज्ञानही नष्ट होऊन जगाच्या बाजारांत तो एक हास्यास्पद विषय होऊन बसतो ! स्तुती प्रवाहांत वाहात जाणारा मनुष्य मग आपल्या बेअकलीपणाचें किती विचित्र प्रदर्शन दाखवील, तें काय वर्णन करावें ? असो.

खानाच्या स्तुतीनें झिंगलेला जयचंद बादशाही दरबारीं येण्यास आपणास मुख्य कोणती अडचण आहे, हें मोकळया मनानें त्याचेजवळ सांगूं लागला ! त्या सांगण्यांत त्यानें पत्नीची थोर योग्यता खास वर्णन केली; परंतु ती खानाजवळ नको होती. हा वेळपर्यंत खान जयचंदाच्या हृदयाच्या कोटाबाहेर उभा राहून त्याचा पाडाव करण्याची हिकमत लढवीत होता. आतां जयचंदानें आपण होऊन आपल्या मनोमंदिराचें द्वार त्यास उघडून दिलें ! तेथील जयश्रीची मूर्ति पाहून अबदुलखान खरोखरीच क्षणभर चकित झाला, आणि

असलें हें पवित्र रहस्य जयचंदानें बाहेर—आपल्यासारख्या तिऱ्हाईताजवळ—फोडावें, हें कांहीं त्यास बरें वाटलें नाहीं; इतकेंच नव्हे तर जयचंदाच्या मूर्खस्वभावाचा त्यास रागही आला. पण तो विकार क्षणाचाच. त्याला कारस्थान रचावयाचें होतें. त्यामध्यें ही नवीन मदत झाली ! तो गंभीरपणें म्हणाला, " जयचंदजी, तुम्ही मला आपल्या भावाप्रमाणें जें हें रहस्य सांगितलेंत तें एकून मला तुमच्या विश्वासु स्वभावाबद्दल मोटा आनंद वाटतो ! तुमच्या पत्नीचें संकट मोठें नाजुक आहे खरें; ठाकुर ईसरसिंगजी प्रमाणें कांहीं त्याचा निकाल लावितां येणार नाहीं. त्याला कांहींतरी निराळी युक्ति योजिली पाहिजे. पण ती योजण्यास तुम्हां दोघांही पतिपत्नीचें पूर्व चरित्र मला कळलें पाहिजे, म्हणजे त्या धोरणानें मला कांहीं धोरण बांधतां येईल. तेव्हां आतांची हकीगत जशी मनमोकळेपणानें सांगितलीत, त्याचप्रमाणें तुमचें सर्व चरित्रही सांगून टाका; म्हणजे पुढील बेत जुळवून टाकूं आणि हा घरांतलाच कोमल कांटा तुम्हास न बोंचेल, असा बंदोबस्त करूं."

जयचंदानें हें मान्य केलें आणि आपला पूर्वेतिहास सांगण्यास प्रारंभ केला.

## परिच्छेद ६ वा.

### खोड्याकारितां हात पुढे केले !

उदेपुराची प्राणप्रतिष्ठा करणारा महाराणा प्रतापसिंगाचा पिता उदेसिंग हा शूरवीर बापाचा भ्याड पुत्र होता ! त्याचा पिता संग्रामसिंग उर्फ राणासंग हा सिसोदिया वंशाला ललामभूत होणारा नामांकित योद्धा होता. ह्यानें मेवाडच्या स्वातंत्र्याकरितां मोंगलपातशाहीचा संस्थापक बाबर याच्याशीं अनेक युद्ध प्रसंग करून, आपल्या शत्रूसही आपले स्तुतिपाठक बनविले होतें ! असें असतां केवळ मेवाडच्या दुर्भाग्यानें उदेसिंगासारखा करंटापुत्र त्याचें पोटीं आला, आणि तोच पुढें मेवाडचा महाराणा झाला ! उदेसिंगानें मोंगलांशीं चार हात करण्यांत सामान्य धैर्यही दाखविलें नाहीं

आणि पहिल्याच युद्धप्रसंगाला भेदरून, त्यानें चितोडबरोबर आपल्या पूर्वजांचें उज्वल यशही घालविलें! राज्यभ्रष्ट झालेला उदेसिंग रानोमाळ भडकूं लागला! याच वनवासांत त्यानें केवळ आश्रमाच्या आशेनें झालावाडचा ठाकुर रघुवीरसिंग याच्या आग्रहानें त्याच्या बहिणीशीं विवाह केला! हीच प्रतापसिंग महाराण्याची वीरप्रसुमाता होय! विवाहाचे वेळींच झालावाडकरानें आपल्या बहिणीच्या पुत्रास भावीकालांत मेवाडचें महाराणापद मिळावें असें वचन घेतलें होतें! म्हणजे प्रतापसिंगाचा वास्तविक हक्क नसतां, त्याच्या जन्मापूर्वीच त्याच्या पित्यानें कांहींअंशीं संकटांत सांपडून त्याचें युवराजपद मान्य केलें होतें! नाहींतर त्याचा खरा ओढा त्याचा ज्येष्ठपुत्र जगमल्ल याजकडेच होता.

पुढें उदेसिंगाचा अंतकाळ जवळ आला! तेव्हां त्यानें झालावाडकरांस दिलेलें वचन कानामागें टाकून आपल्या पश्चात् जगमल्लासच गादीवर बसवावें अशी योजना केली;आणि परलोकीं गमन केलें! गतमहाराण्याच्या इच्छेप्रमाणें जगमल्लच प्रथम गादीवर बसला; परंतु हें राज्यसौख्य ओंट घटकाही टिकलें नाहीं! नागव्या तलवारीसह झालावाडकर धावून आले! दरबारांत दोन तट झाले!! बरीच भवति न भवति झाली. शेवटीं झालावाडकरांचें म्हणणें खरें ठरलें. त्यांची सरशी झाली व त्यांनीं प्रतापसिंगास राज्याभिषेक केला! काळवेळ ओळखून जगमल्लानें खऱ्या–वारसानें–आपला हक्क सोडून दिला, आणि कसलीही तेढ मनांत न बाळगतां प्रतापसिंगास सहाय्य करण्याचें मान्य केलें! याच जगमल्लाचा पुत्र जयचंद हा होय. प्रतापानंतरही जगमल्लाचा वंश महाराणापदावर आला नाहीं. मात्र पुढचें धोरण ओळखून प्रतापसिंगानें निर्वाणसमयीं जयचंदानें प्रधानपद स्वीकारावें असें ठरविलें होतें; आणि त्याप्रमाणें जयचंद काणावत * हा महाराणा होण्याऐवजी मेवाडराज्याचा प्रधान झाला होता! असो.

---

* मेवाडप्रांतांतील सर्वच रजपूत आपल्यास बाप्पारावळचे वंशज समजतात. प्रसंगानुसार चोंडाचे चोंडावत, मुक्ताचे मुक्तावत, काणाचे काणावत असे फरक झाले. आपल्याकडे घोरपडे, रास्ते या उपनाम प्रकरणांत जें कारण घडलें आहे, तसाच कांहींसा प्रकार वरील 'वता'मध्यें आहे.

हा इतिहास जयचंदानें कांहींसा विस्तार करून अबदुलखानास सांगितला. अर्थात् तो सांगतांना त्यानें आत्मस्तुतीवर जरी विशेष भर दिला नाहीं तरीपण त्यानें खानास एवढें भासविलें कीं, दैवयोग अनुकूल असता तर आज आपण मेवाडचे महाराणा असतों. याचा उपयोग कसा करून घ्यावयाचा हें अबदुलखानास शिकावयाचें नव्हतें! त्यानें ती हकीगत ऐकत असतांच पुढचा कयास बांधला आणि जयचंद आपल्या पुराणाची इतिश्री करतो न करतो तोंच खान त्यास म्हणतो, "वाह जयचंदजी, यह तो बडा ताज्जुबका किस्सा तुम्हने हमें सुनाया!" असें म्हणत अत्यंत आश्चर्य दर्शवीत तो पुढें ह्मणाला, "अस्सें! एकूण उदेपूरचा खरा वारसा तुमच्याकडे आणि तुम्ही राहिला बाजूला आणि हा प्रतापसिंग उपटसुंभ मध्येंच घुसला ह्मणायचा! बरें, त्यानंतर तरी तुह्माला न्याय मिळायचा होता; पण ही खऱ्याची दुनिया नाहीं ह्मणतात तेंच खरें बरें का? या अल्ला! तुह्माला राज्यपद मिळायचें असून, तुह्मी अशा अपमानांत दिवस काढावेत काय?— आपल्याला तर ही हकीगत ऐकल्यापासून चैन पडेना! जयचंदजी, तुम्ही कांहीं ह्मणा, आपण तर हा अन्याय एक क्षणभर सहन केला नसता! अरे यार, तुझें राज्य दुसऱ्यानें घेतलें तरी तूं चुप्पच बसलास अं? या तुझ्या उदारपणाला नांव तरी काय द्यावें, हेंच मला समजत नाहीं! वाहवा जयचंद, मी जों जों विचार करितों तों तों मला याचा शेवट कसा लावावा, हेंच कळेनासें झालें आहे! दोस्त, ही हकीगत जर दुसऱ्या एखाद्यानें सांगितली असती, तर मी ती बिलकुल खरी मानली नसती; इतकें आश्चर्य वाटतें आहे मला तिचें! आमचे बादशाहा तर थक्क होऊन जातील हा तुझा किस्सा ऐकून. आणि एकदम हुकूम देतील कीं, वाटेल तें करा पण जयचंदाचें राज्य जयचंदास मिळवून द्या! त्यांच्या थोर अंतःकरणास ही गोष्ट मुळींच रुचणार नाहीं!"

हें भाषण करितांना अबदुलखानानें आपल्या चेहऱ्याची ठेवण कितीदां आणि कसकशी बदलली असेल, हें वर्णन करून सांगण्याचें कारण नाहीं.

वाचकांना तें कल्पनेनें सहज ताडतां येईल. त्याच्या या कसरतीचा परिणाम जयचंदाचे मनावर जसा व्हावयास पाहिजे होता, तसाच झाला ! खानाच्या दोस्तीविषयीं आतां त्यास काडीमात्र संशय राहिला नाहीं; आणि मेवाडचें राज्य आपलें असतां तें अमरसिंगानें उपभोगणें ह्मणजे धडधडीत अन्याय आहे, असें त्याच्या मनानें घेतलें.

मनुष्य आत्मस्तुती करितांना जास्त बेवकूफ होतो कीं, ऐकतांना ? हें कांहीं नक्की सांगतां येणार नाहीं. जगामध्यें पुष्कळ वेळां असें दिसून येतें कीं, स्वस्तुति करण्याचे भरांत मनुष्य काय काय बहकेल याचा नेम नसतो; त्याचप्रमाणें स्वस्तुतीच्या श्रवणानेंही तो बेफाम होऊन आपल्या मूर्खत्वाचा तमाशा जगास दाखवीत असतो; असेंही आढळून येतें. तात्पर्य मनुष्याला आत्मस्तुति करणेंही प्रिय आहे, आणि ऐकणेंही प्रिय आहे आणि दोन्हीं वेळीं तो अकलेच्या आटोक्यांत नसतो, यांत मुळींच शंका नाहीं ! या नियमास अनुसरून जयचंद आत्मस्तुतीला भाळून वाटेल तसा बहकला, आणि ती तोंडानें वदतांना वाटेल तसें बरळला ! या त्याच्या मूर्खपणाचा फायदा खानानें घ्यावयाचा तितका घेतला आणि त्याच्या भोंवतीं कारस्थानाचें असें जाळें निर्माण केलें कीं, यापुढें त्यास त्यांतून निसटतां येऊं नये. असो.

अगडबंब स्तुतिप्रवाहांत वाहात चाललेल्या जयचंदाचे पाय सारासारविचार शक्तीच्या जमिनीस न लागतां त्यानें मूर्खपणाच्या आणखी एक दोन गटंकळ्या खाव्यात या हेतूनें खान पुढें म्हणाला, " तरी म्हटलें जयचंदजीमध्यें इतकें तेज, इतका बाणेदारपणा, ती कारस्थानी तडफ यावी कोठून ? बराबर ! हा सर्व राजबीजाचा प्रभाव आहे ! आणि अशा पुरुषाला बाजूला पडण्याचा प्रसंग यावा अं ! महाराणा प्रताप मला तर मोठाच कावेबाज दिसतो ! काय बेटयानें स्वार्थत्यागाचें सोंग आणिलें होतें हो ! तुमच्या वडिलांच्या तोंडास पानें पुसलीं तीं पुसलीं, आणि पुढेंही तुमचें राज्य तुम्हांस न देतां आपल्या नालायक अमरसिंगास देऊन तुमचा वारसा कायमचा नाहींसा केला ! वाहवा ! काय ही करामत ! !

आणि एवढा मोठा अन्याय करून पुनः स्वतः साव राहिलाच ! या सोंगानें त्यानें साऱ्या राजस्थानास चकविलें ! काय हा धूर्तपणा ?–जयचंदजी, आमच्यासारखे दोस्त हयात असतां, तुह्मी हा अन्याय मुकाट्यानें सहन करावा, हें आपल्याला मुळींच पसंत नाहीं ! कांहीं तरी याला तोड काढून माशानें गिळलेलें हें माणिक परत मिळविलेंच पाहिजे–" असें म्हणत त्यानें विचार करण्याचें सोंग केलें, आणि थोड्या वेळानें हळहळत ह्मटलें," अरे यार, थोडक्यांत चुकलें पहा. नाहींतर अमरसिंगाचा हा डाव मागेंच हाणून पाडिला असतां !

जयचंदानें अगदीं सहजीं विचारलें," तें कसें काय ?"

खानसाहेब निराशेनें ह्मणाले, " आतां ती गोष्ट सांगून तरी काय उपयोग ह्मणा पण सांगतों. मेवाडचा वारस महाराणा निराळाच आहे, हें आमच्या बादशाहांना कळलें असतें तर त्यांनीं सुप्राजीला चितोडच्या गादीवर केव्हांही बसविलें नसतें. वाटेल ती खटपट करून तुह्माला तेथें नेमलें असतें. असो. झालें तें होऊन चुकलें. बरें झालें, ही गोष्ट मला आतां तरी कळली. आतां मी ती बादशाहांच्या कानांवर घालणार; आणि तुमची गादी तुमच्याकडे येईल अशी खटपट करणार ! का, तुह्माला कसें काय वाटतें ?"

खानाचा शेवटचा प्रश्न अगदीं मुद्दाम होता. मेवाडच्या गादीचा अभिलाष जयचंदाचे मनांत उद्भुत झाला कीं नाहीं, हें त्यास पहावयाचें होतें. पण त्या प्रश्नाचें जयचंदास चटकन् उत्तर देतां येईना. बऱ्याच वेळानें तो ह्मणाला " खानसाहेब, त्या गोष्टीचा आतां विचार नकरणेंच बरें. कारण, मेवाडची गादी पुनः मजकडे येणें रास्त असलें तरी तें आमच्या लोकांना मुळींच पटणार नाहीं; आणि त्यामुळें निष्कारण बखेडा मात्र माजेल, तेव्हां तसली कांहीं भानगड नको चाललें आहे तें ठीकच आहे. आतां माझी योग्यता काय कमी आहे, ह्मणून मी राज्यपदाकरितां धडपडावें ?"

खान एकदम ह्मणतो, " या बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं जयचंदजी, तुह्मी गादीवर बसल्याखेरीज निदान यापुढें मला तरी बरें वाटणार नाहीं. मी शक्य तो प्रयत्न करणार. पण तें असो. तें मी माझें पाहून घेतों. तुह्माला

राज्य नको तर तुह्मी गप्प बसा कसे. आयत्या वेळीं राज्यावर बसायला या ह्मणजे झालें. बरें, आतां पुढें सांगा तुमची हकीगत. "

" माझी हकीगत एवढीच !"

"तुमच्या कुटुंबाची तुह्मी कांहींच माहिती दिली नाहींत. जयश्रीबाईसाहेबांचें चरित्रही असेंच कांहीं विलक्षण असावें, अशी मला शंका येत आहे—"

" होय, तसें तर खरेंच--" जयचंदानें ह्मटलें, " दिवेर येथील राव पूरनमल्ल हे माझे श्वसूर होत—"

" मेवाडचे लढवय्ये सरदार पूर्णमल्ल हे जयश्री बाईसाहेबांचे वडील म्हणतां ?--" खान आश्चर्य दाखवित ह्मणाला, " काय ह्मणतां तरी काय ? त्यांचा तर प्रतापसिंगजींनीं खून केला—"

" होय-- बरोबर ओळखलेंत. तेचपुरनमल्ल जयश्रीचे वडील. मोंगलांशीं फितुर झाल्याचा त्यांचेवर आरोप आला व त्यापायीं त्यांना प्राणदंड भोगावा लागला ! अशा अपराधास आमचे महाराणाजी फार कडक शिक्षा करीत. त्यांनीं पूर्णमल्लास देहांतशासन दिलें. आणि त्यांच्या पश्चात् त्यांच्या मुलांमाणसांचा आपल्या मुलांमाणसांप्रमाणें सांभाळ केला. जयश्रीवर त्यांचा फार लोभ होता. ती आमचेकडे आल्यावर लौकरच आमचा दोघांचा विवाह झाला !"

" जयचंदजी,—" खानसाहेब एकदम म्हणाले. " अरे, तुमच्यांत कांहीं माणुसकी आहे कीं नाहीं ? अरे यार, त्या तुझ्या शहाण्या प्रतापानें बापाचें राज्य हिसकलें, आणि तुझ्या सासऱ्याचा धडधडींत खून केला तरी तुम्ही त्याच्या वंशजाशीं नेक राहणार 'खुदा तेरा भला करे ! ! ! अफसोस ! तुमच्या पत्नीलासुद्धां याबद्दल कांहीं खेद होत नाहीं म्हणतां ? आपल्या बापाशीं झालेल्या भयंकर अन्यायाचें तिला कांहींच वाटत नाहीं ? आणि तुम्हीं तर म्हणतां माझी जोरू मोठी जलाल आहे म्हणून ! "

" यांत काय संशय ? " जयचंद बोलला, " मेवाडच्या विरुद्ध कांहीं कारस्थान मी करितों आहें; मी मोंगलांशीं फितुरी आरंभिली आहे, एवढें तिला कळूं दे तर खरें म्हणजे बघा तिचा अवतार ! त्यावेळीं मग ती माझीसुद्धां मुलाहिजा धरणार नाहीं—"

" ऐसा ? ये तो बडी ताजुबकी बात बोलते हो–"

" प्रतापसिंगजी विषयीं तिच्या मनांत पूर्ण श्रद्धा असल्यामुळें, पूर्णमल्लास झालेली शिक्षा अगदीं योग्य होती, असें तिचें मत होतें—"

" अरेरे ! भोळी बिचारी ! !—" खान म्हणाला, " बायका जितक्या जहाल असतात, तितक्याच भोळ्याही असतात ! नाइलाज आहे ! पण जयचंदजी, या खुळ्या विश्वासाला आतां फार वेळ राहूं देतां उपयोगी नाहीं."

या नंतर दोघेही कांहीं वेळ स्तब्ध बसले. जयचंद खानाकडे पहात होता, आणि खान कांहीं विचार करीत आपल्यासमोर असलेल्या आरशांत आपलें प्रतिबिंब पाहात बसला होता. थोडया वेळानें तो एकदम उठला ! आणि इकडे तिकडे फिरूं लागला. त्याच्या चालण्यावर त्याच्या चेहऱ्यावरील खुशीची झळक नाचूं लागली ! जयचंद सारखा त्याच्या हालचालीकडे पाहात होता. अशाही बराच वेळ गेला.

शेवटीं खानाचा कांहीं तरी विचार ठरला. नंतर तो जयचंदास म्हणाला, " जयचंदजी, तुमचा आमचा दोस्ताना जमला, ही फारच चांगली गोष्ट झाली. तुम्ही आपली सर्व हकीगत सांगितली, हेंही बरें झालें. आतां मी अशी युक्ती काढितों कीं, त्यामुळें जयश्रीबाई तुझ्या बेतास अनुकूल तर होतील-च, शिवाय तुमचें राज्यही तुह्मास मिळेल ! पण प्रथम हा घरांतला कांटा काढून टाकला पाहिजे. तुमच्या पत्नींची प्रतापसिंगाच्या लुच्चेगिरीविषयीं खात्री झाली पाहिजे. ह्मणजे त्या आपल्या बेतास कबूल होतील. त्याकरितां आतां असें करावयाचें कीं,—पण हा विषय आतां स्वस्थपणानें रात्रीं बोलूं " एवढें बोलून तो संवाद त्यानें तेथेंच थांबविला. असो.

ज्या अर्थी त्यांचें कारस्थान गुप्तरीतीनें होणार आहे, आणि तें गुप्त राहावें अशी त्यांची इच्छा आहे, त्या अर्थी आपण तें आतांच समजून घेण्याची घाई करण्यांत हंशील नाहीं. उलट त्यांना तेथेंच सोडून आपण कांहीं वेळ इतर पात्रांचेकडे वळूं.

मात्र जयचंदानें आपलें चरित्र सांगून, परवशतेचा खोडा अडकवून घेण्याकरितां हात पुढं केले; हें कोणीही कबूल करील !

———o———

# परिच्छेद ७ वा.

## हिऱ्याला कांच करण्याचा प्रयत्न !

मोंगली राजसत्तेचा जन्म दिल्लीस जाहला असला तरी तिचें पुढील संगोपन आग्र्यास झालें होतें. बहुतेक मोंगल पातशाहा दिल्लीस न राहतां आग्र्यास राहून राज्यकारभार चालवीत असल्याचें इतिहास सांगतो. दिल्ली ही राजधानी नांवाला होती. तिचा खराखुरा बहुमान आग्र्याला देण्यांत आला होता. मोंगली राज्यांतही स्त्रियांच्या जातीला फारसा मान देण्यांत येत नसे; असें यावरून म्हणतां येईल !

पातशहांचें राहणें आग्र्यास, व सर्व राज्यकारभाराचीं सूत्रेंही तेथूनच हालत होतीं. अर्थात् राजकारणांतील कित्येक महत्वाच्या गोष्टीही त्याच शहरांत घडून येत होत्या, हें निराळें सांगण्याची जरूरी नाहीं.

नूर महम्मद सलीम ऊर्फ जहांगीर याची कारकीर्द आग्र्यासच गुजरल्या-मुळें दिल्ली पाहण्याची संधि वाचकांना मिळण्याचा संभव कमी आहे; एवढें सुचवून आम्ही त्यांना आग्र्याच्या किल्ल्यांत येण्याची विनंति करितों !

\+ \+ \+ \+ \+

जामदार खान्याला लागून असलेल्या एका चार खणाच्या प्रशस्त खोलींत साठीच्या पुढें गेलेला एक वृद्ध पुरुष एका गवती चटईवर बसून, समोर ठेविलेल्या तलवारीकडे विमनस्क दृष्टीनें पाहात होता ! वृद्धाची शरीरयष्टी सडपातळ पण ताठ, साधारण गौरवर्णाची पण काटक आणि निर्व्यंग पण सशक्त होती ! त्याच्या मुद्रेकडे पाहतांच हा मेवाडचा रजपूत आहे, हें कोणलाही ओळखतां आलें असतें. कपाळ, नाक, दाढीमिशा, नजर सर्व कांहीं लढवय्या रजपुताला शोभणारें होतें ! त्याची राहणी साधी पण नेकीचीं वाटत होती, मिजास बीराबतंसाची होती !

स्वजातीयांनीं फसविलेला, अबदुलखानानें पकडून आणिलेला आणि मोठ्या बंदोबस्तानें आग्र्याच्या किल्ल्यांत नजरकैदेंत ठेविलेला हाच तो साळुंभ्याचा ठाकूर ईश्वरसिंग होय ! कैदेंत पडल्यापासून तो याचाच विचार करीत होता

" ऐसा ? ये तो बडो ताजुबकी बात बोलते हो–"

" प्रतापसिंगजी विषयीं तिच्या मनांत पूर्ण श्रद्धा असल्यामुळें, पूर्णमलास झालेली शिक्षा अगदीं योग्य होती, असें तिचें मत होतें—"

" अरेरे ! भोळी बिचारी ! !—" खान म्हणाला, "बायका जितक्या जहाल असतात, तितक्याच भोळ्याही असतात ! नाइलाज आहे ! पण जयचंदजी, या खुळ्या विश्वासाला आतां फार वेळ राहूं देतां उपयोगी नाहीं."

या नंतर दोघेही कांहीं वेळ स्तब्ध बसले. जयचंद खानाकडे पहात होता, आणि खान कांहीं विचार करीत आपल्यासमोर असलेल्या आरशांत आपलें प्रतिबिंब पाहात बसला होता. थोडया वेळानें तो एकदम उठला ! आणि इकडे तिकडे फिरूं लागला. त्याच्या चालण्यावर त्याच्या चेहऱ्यावरील खुशीची झळक नाचूं लागली ! जयचंद सारखा त्याच्या हालचालीकडे पाहात होता. असाही बराच वेळ गेला.

शेवटीं खानाचा कांही तरी विचार ठरला. नंतर तो जयचंदास म्हणाला, " जयचंदजी, तुमचा आमचा दोस्ताना जमला, ही फारच चांगली गोष्ट झाली. तुम्ही आपली सर्व हकीगत सांगितली, हेंही बरें झालें. आतां मी अशी युक्ती काढितों कीं, त्यामुळें जयश्रीबाई तुझ्या बेतास अनुकूल तर होती-लच, शिवाय तुमचे राज्यही तुह्मास मिळेल ! पण प्रथम हा घरांतला कांटा काढून टाकला पाहिजे. तुमच्या पत्नींची प्रतापसिंगाच्या लुच्चेगिरीविषयीं खात्री झाली पाहिजे. म्हणजे त्या आपल्या बेतास कबूल होतील. त्याकरितां आतां असें करावयाचें कीं,—पण हा विषय आतां स्वस्थपणानें रात्रीं बोलूं "

एवढें बोलून तो संवाद त्यानें तेथेंच थांबविला. असो.

ज्या अर्थीं त्यांचें कारस्थान गुप्तरीतीनें होणार आहे, आणि तें गुप्त राहावें अशी त्यांची इच्छा आहे, त्या अर्थीं आपण तें आतांच समजून घेण्याची घाई करण्यांत हंशील नाहीं. उलट त्यांना तेथेंच सोडून आपण कांहीं वेळ इतर पात्रांचेकडे वळूं.

मात्र जयचंदानें आपलें चरित्र सांगून, परवशतेचा खोडा अडकवून घेण्याकरितां हात पुढे केले; हें कोणीही कबूल करील !

# परिच्छेद ७ वा.

## हिऱ्याला कांच करण्याचा प्रयत्न!

मोंगली राजसत्तेचा जन्म दिल्लीस जाहला असला तरी तिचें पुढील संगोपन आग्र्यास झालें होतें. बहुतेक मोंगल पातशाहा दिल्लीस न राहतां आग्र्यास राहून राज्यकारभार चालवीत असल्याचें इतिहास सांगतो. दिल्ली ही राजधानी नांवाला होती. तिचा खराखुरा बहुमान आग्र्याला देण्यांत आला होता. मोंगली राज्यांतही स्त्रियांच्या जातीला फारसा मान देण्यांत येत नसे; असें यावरून म्हणतां येईल !

पातशहांचें राहणें आग्र्यास, व सर्व राज्यकारभाराचीं सूत्रेंही तेथूनच हालत होतीं. अर्थात् राजकारणांतील कित्येक महत्वाच्या गोष्टीही त्याच शहरांत घडून येत होत्या, हें निराळें सांगण्याची जरूरी नाहीं.

नूर महम्मद सलीम ऊर्फ जहांगीर याची कारकीर्द आग्र्यासच गुजरल्या-मुळें दिल्ली पाहण्याची संधि वाचकांना मिळण्याचा संभव कमी आहे; एवढें सुचवून आम्ही त्यांना आग्र्याच्या किल्ल्यांत येण्याची विनंति करितों !

\+ + + + +

जामदार खान्याला लागून असलेल्या एका चार खणाच्या प्रशस्त खोलींत साठीच्या पुढें गेलेला एक वृद्ध पुरुष एका गवती चटईवर बसून, समोर ठेविलेल्या तलवारीकडे विमनस्क दृष्टीनें पाहात होता ! वृद्धाची शरीरयष्टी सडपातळ पण ताठ, साधारण गौरवर्णाची पण काटक आणि निर्व्यंग पण सशक्त होती ! त्याच्या मुद्रेकडे पाहतांच हा मेवाडचा रजपूत आहे, हें कोणलाही ओळखतां आलें असतें. कपाळ, नाक, दाढीमिशा, नजर सर्व कांहीं लढवय्या रजपुताला शोभणारें होतें ! त्याची राहणी साधी पण नेकीचीं वाटत होती, मिजास वीरावतंसाची होती !

स्वजातीयांनीं फसविलेला, अबदुल्लखानानें पकडून आणिलेला आणि मोठ्या बंदोबस्तानें आग्र्याच्या किल्ल्यांत नजरकैदेंत ठेविलेला हाच तो साळुंभ्याचा ठाकूर ईश्वरसिंग होय ! कैदेंत पडल्यापासून तो याचाच विचार करीत होता

कीं, मोंगलांनीं कांहीं कपट लढवून आणि संधि साधून, आपण गैरसावध असतां आपल्यास पकडून आणिलें आहे, कीं, कोणी निमकहराम रजपुतानें आपल्या मातेच्या कुशीला कलंक लावण्याचा हा कृतघ्नपणा पत्करला आहे ? तो स्वतः निदान मेवाडांत तरी कोणाचाही शत्रु नव्हता ! दिवंगत महाराण्याच्या वीरव्रतामध्यें त्याचा प्रामुख्यानें भाग असल्यामुळें, आतांपर्यंत त्यास व्यक्तिविषयक सुखदुःखाची, मानापमानाची, लाभहानीची किंवा ईर्षाद्वेषाची उठाठेव करण्याची कधीं इच्छाही झाली नाहीं आणि संधीही सांपडली नाहीं! मेवाडचें सौख्य, मेवाडचें स्वातंत्र्य, मेवाडचा मान व मेवाडचें कल्याण या चिंतनांतच त्याचें आतांपर्यंतचें आयुष्य गेल्याकारणानें स्वतःच्या सुखाला कसें जपावयाचें हेंच त्यास माहीत नव्हतें. मग तो स्वजातियांमध्यें कोणाचा आणि कसा शत्रु होणार ? बरें, गतपिढींतील आपल्या मार्गांतील हा तीक्ष्ण कांटा नाहींसा करण्याकरितां मोंगलांनीं आपल्या अकलेनेंच ही तरतूद–त्यास पकडून आणण्याची–केली म्हणावें; तर त्यास धरून आणणें–फितुरीवांचून त्या वीरसिंहास पकडणें–जवळ जवळ अशक्य होतें. ठाकूर ईसरसिंगाला मुकाट्यानें पकडून आणणें हा कांहीं पोरखेळ नव्हता ! कोणीतरी आपल्या हालचालीची वार्ता मोंगलांना दिली असली पाहिजे, असें त्यास वाटलें, आणि तो मोंगलाच्या पकडींत पडलेल्या दिवसाचा विचार करूं लागला.

प्रथम त्यानें त्या दिवशींचा सर्व दिनक्रम लक्षांत घेतला. नंतर त्यानें आपल्या निकटच्या सेवकांची सर्व हालचाल, त्यांची त्यावेळची वागणूक व बोलाचाल यांचेंही स्मरण केलें; परंतु एवढ्यामध्यें कोठेंही त्याच्या शंकेला क्षणभर टिकाव धरण्यास स्थळ सांपडेना. प्रत्येक गोष्ट यथाक्रम व बेखटका घडली होती. त्या सबंध दिवसांत तरी कोणाविषयीं कसलीच शंका येण्यासारखें कांहीं घडलें नाहीं. दिवस मावळला. त्यादिवशीं पौर्णिमा होती. नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें तो शांत चंद्रप्रकाशांत आपल्या दोन नोकरांसह प्रतापसिंगाच्या समाधीच्या दर्शनाला गेला, आणि येथेंच त्याचा विश्वासघात करण्यांत आला ! समाधीसमोर बसून अनन्यभावानें तो प्रतापचरित्र आठवीत भूतकाळाशीं तादात्म्य झाला होता. अकस्मात्, मागून त्याच्या तोंडावर कसलें तरी जाड आच्छादन टाकण्यांत आलें, आणि आरडा ओरड

करण्यास किंवा दंगामस्ती करण्यास त्यास क्षणाचीही फुरसत न देतां, त्यास गिरफतार केलें! पुढें तोंडावरील पोकळ आच्छादनांतून त्यानें जो श्वासोच्छ्वास केला, त्यामुळें त्यास हळू हळू गुंगी येऊन, तो बेशुद्ध झाला! शुद्धीवर आल्यावर त्यानें आपल्यास आतांच्या स्थळीं नजरकैदेंत असल्याचें पाहिलें! हा त्या दिवशींचा इतिहास! अर्थात् अमक्या दिवशीं अमूक वेळीं संधि साधल्यास काम फतेह होईल, अशी सल्ला मोंगलांना खास कोणा मेवाडकर रजपुताकडूनच मिळाली असली पाहिजे, असें त्यास सारखें वाटूं लागलें! पण असा हा निमक हराम कोण? हें कांहीं त्याच्या लक्षांत येईना. विद्युल्लतेच्या चमकेप्रमाणें मधून मधून त्याचे अंतश्चक्षु महाराणा अमरसिंग व प्रधानमंत्रि जयचंद या जोडीवर स्थीरावत; पण जितक्या चपलतेनें ते तिकडे वळत, तितक्याच चपलतेनें तो त्यांना दूर करून, त्यांचा म्हणजे–स्वतःच्याच मनाचा तो एकदम निषेध करी. तो स्वतःशीं म्हणे, भरदरबारांत मी अत्यंत कडक शब्दांनीं त्यांची निर्भत्सना केली आहे. कदाचित् त्यामुळें मजवर त्यांची मर्जी रुष्टही झाली असेल; पण म्हणून ते असा दावा साधतील काय? अगदीं अशक्य! सर्वस्वीं अशक्य!! मोंगलांच्या डोळ्यांत मी खास खुपतों आहें. त्यांनींच सुवर्णाच्या लालुचीवर कोणा हलकट मनुष्याला वश करून घेतला असला पाहिजे. पण तो मनुष्य कोण बरें?

आज कित्येक दिवस ठाकूर ईसरसिंग हेंच कोडें सोडवीत आपला बंदिवास साजरा करीत होता. तेथें त्यास इतर कशाचाही त्रास नव्हता. त्याच्या योग्यतेप्रमाणें त्याची सर्व व्यवस्था ठेवण्यांत आली होती. त्यानें मेवाडचा अभिमान सोडून दिल्लीच्या सलतनतीची चाकरी पत्करावी; एवढीच अबदुलखानाची–पक्षीं नूर महम्मद सलीम ऊर्फ जहांगिराची इच्छा होती; आणि ही शिकवण त्याला पढविण्याचा प्रयत्न जारीनें सुरू होता बहुतेक चारदोन दिवसांनीं कोणीतरी मोठा सरदार–राजा मानसिंग वगैरे रजपूतच येऊन त्याचा कुशलसमाचार विचारण्याच्या ढोंगाखालीं 'पातशाहाची कृपा मान्य करा.' असें मोघम सुचवून जात होता! ठाकूर ईसरसिंग त्यांच्या बक-वादाकडे जन्मतः बहिरट असलेल्या मनुष्याप्रमाणें लक्ष देत असे. असो.

दैवगतीनें ठाकूर इश्वरसिंगजीला त्या बंदिवासांत जी स्थिति अवलोकन करण्यास मिळाली, ती म्हणजे त्यास नवीन होती, अशांतली गोष्ट मुळींच नाहीं. सनातन हिंदुधर्माला नामोहरम करण्याकरितां व त्याच्या अनुयायांना तुडविण्याकरितां मोंगलांनीं जुलमाचे किंवा मोहक कपटाचे कसकसे खेळ केले आणि त्यांच्या धाकानें किंवा मोहानें हिंदुलोक नादान होऊन त्यांच्या चरणीं कसे रत झाले इत्यादि सर्व गोष्टी त्यास पूर्णपणें माहीत होत्या. त्यामुळें त्यास मनुष्यस्वभावाचे विविध प्रकार पाहून कांहीं विशेष नवल वाटलें नाहीं. फक्त तो बंदिवान् असल्यानें निष्क्रीयतेमुळें अति विचाराचा किंवा दुसऱ्यांच्या काजील व अप्रिय बोलण्याचा त्यास वीट येत असे. त्या वेळीं त्याचें मन बरेंच चंचल होई.

आजही त्याचें मन असेंच उबगून गेलें. आपला विश्वासघात कोणी केला आणि आपली सुटका येथून कशी होणार या निरुत्तर विचारांनीं त्याचें मस्तक अगदीं भणभणून गेले ! तो आपल्या स्थानावरून उठून इकडे तिकडे फिरूं लागला ! एकवार त्यानें एका खिडकीशीं जाऊन बाहेरचा देखावा पाहून मन बहिलावण्याचा प्रयत्न गेला; पण बाहेर दृष्टि टाकतांच मोंगलाचें उत्तान वैभव छाती ठोकून उभें असलेलें त्यास दिसलें. त्याबरोबर त्याच्या तापलेल्या हृदयाला जास्तच चटका बसला ! त्यानें मुकाट्यानें आपली दृष्टि तिकडून काढून आपल्या खोलीपुरती मर्यादित केली ! इतक्यांत मानसिंग नांवाच्या एका तरुणानें—जयपूरचा राजा मानसिंग हा नव्हे.—तेथें पदार्पण केलें.

मानसिंगाचें वय पंचविसीच्या पुढें होतें, तरी त्याची मुद्रा इतकी जनानी, इतकी नाजूक आणि बोलणें चालणें इतकें मृदु होतें, कीं, त्याच्याकडे पाहतांक्षणीं ही कोणीतरी पुरुष वेषधारी असावी, असें वाटे. पुरुषत्वाचें मुख्य चिन्ह ज्या मिशा त्या त्याला अद्याप फुटल्या नव्हत्या; त्यामुळें त्याची वाटोळी मुद्रा मोठी मोहक दिसे. रजपुतांच्या पद्धतीप्रमाणें त्यानें डोक्यावर काकपक्ष ठेविण्याऐवजीं, मोंगली पद्धतीचे केंस ठेवून ते मानेजवळ कातरले होते व नाकासमोर भांगही काढिला होता; त्यांत सुरमा घातलेले हरिणाच्या डोळ्यांचे नेत्र, सरळ व किंचित् लांबट नाक, मृदु व लाल ओंठ यांच्या शोभेची जोड मिळाली होती. शिवाय बालपणापासून तो अत्यंत लडिवाळपणांत व विशेषें

करून मोंगलाच्या जनानखान्यांत वाढल्यामुळें पुरुषी आडदांडपणाची त्यास ओळख नव्हती. उलट अल्लड तरुणींना सहज शोभणारी नाक मुरडण्याची, मधून मधून उगीच दचकल्याप्रमाणें करून चंचलदृष्टि इकडे तिकडे फिरविण्याची आणि केव्हां केव्हां सरळ, स्वच्छ व बारीक दांतांनीं ओंठ चावण्याची त्याला लकब असल्यामुळें, त्याच्या जनानी खुबसुरतीचें पुष्कळांना नवल वाटे. कित्येकांना त्याचा मोह पडे, आणि कित्येक त्याची कुचेष्टाही करीत. पण त्याचा स्वभाव गोड असल्यामुळें तो सर्वांचा आवडता होता, हें मात्र खरें. वास्तविक अशास्वरूपाचीं मर्द माणसें कित्येकवेळां उगीच दिमाखखोर, दुष्ट आणि चिडखोर अशीं असतात. कित्येकांत तर बायकीरूपाबरोबर बायकी दुर्गुणाचीही भर पडलेली असते. मानसिंहाचें मात्र तसें नव्हतें. त्याच्या मोहक रूपाप्रमाणें त्याच्या मनाची घडणही रजपुताला शोभेल अशी होती. तो मनाचा कोंवळा, उदार, परदुःख जाणणारा आणि सत्वगुणी होता. ठाकूर ईसरसिंगासारख्या कडक स्वभावी मनुष्यावरही त्याच्या मृदुल वर्तनाचा प्रभाव पडला होता. स्वभावतः ठाकूरसाहेब अबोलके होते. त्यांतून ह्या बंदिवासानें तर त्यांच्यावर गंभीरतेची छाया विशेष पडली होती. पण असें असूनही या मानसिंगाचें आगमन त्यांना त्रासदायक वाटत नसे. त्यांची व्यवस्था ठेवण्याचें काम मानसिंगाकडे होतें, आणि तें कार्य तो इतक्या प्रेमादरानें करीत असे कीं, त्यामुळें ठाकुरसाहेबांची मर्जी प्रसन्नच व्हावी. असो.

मानसिंग आंत येतांच अदबीनें उभा राहिला. ठाकूर साहेबांनीं नजरेनेंच आगमनाचें कारण विचारीलें. केवळ भ्रुकुटी वर चढवून दुसऱ्याला प्रश्न करण्याची त्यांची नेहमींची टेव होती.

मानसिंगानें मंजुळ स्वरांत म्हटलें, " सरदार अबदुलखान आले असून ते आपली भेट घेऊं इच्छित आहेत. ते पुतळ्यांच्या कमऱ्यांत-महालांत-बसले आहेत. "

" पुतळ्यांच्या कमऱ्यांत म्हणजे ?"

" शहानशहा अकबरशहांनीं दोन शूर चितोडकरांचे पुतळे करून त्या

महालांत ठेविले आहेत; म्हणून त्याला पुतळ्यांचा महाल म्हणतात. त्या महालांत खानसाहेब आपणास बोलावीत आहेत. ”

“ ते पुतळे चितोडकरांचे आहेत कशावरून? त्यांचेवर कांहीं नांवें आहेत का ? ” “ खरें बोलावयाचें म्हणजे मला त्या पुतळ्यांविषयीं विशेष माहिती नाहीं. त्या पुतळ्यांना नांवें आहेत. एक पुतळा बसका आहे, त्याचें नांव ‘बहादूर पट्टा’ असें आहे. दुसरा उभा आहे, त्याचें नांव आहे ‘लढवय्या जयमल्ल. ”

नांवें ऐकतांच ठाकूरसाहेबांची मुद्रा प्रसन्न झाली. ते स्वगतच पण मोठयानें म्हणाले, “ बहादूर पट्टा आणि लढवय्या जयमल्ल होय, मेवाडच्या या वीर देवता आहेत. मला त्यांचें दर्शन घेतलेंच पाहिजे. चल मानसिंग, खानसाहेबाकरितां मी क्वचितच आलों असतों; पण त्या देवमूर्तींना पाहण्याकरितां म्हणून मी जरूर येईन—अगदीं बारा कोसावरून धांवत येईन. चल. अकबरशहानें अशा दोन मूर्ति करून ठेविल्या आहेत, असें मी नुसतें ऐकलें होतें; पण मला ती गोष्ट खरी वाटत नसे—चल, ”

“ हे दोन वीर कोण होते बरं ? ”

“ हे दोन वीर कोण होते ?–” ठाकूरसाहेब कठोरपणानें म्हणाले, “मोंगलाचे तुकडे खाऊन लाचार झालेल्या तुमच्यासारख्या लाचार निलाजऱ्यांनीं त्याची चौकशी कशाला करावी ?” एवढें बोलून ते पुढें झाले.

त्यांचें तें उत्तर मानसिंगाला चांगलें झोंबलें; पण त्यामुळें त्याला ठाकूरसाहेबांचा राग न येतां स्वतःच्या त्या पुळ्याच्या अज्ञानाविषयीं थोडीशी लाज वाटली. तो न बोलतां मुकाटयानें पुढें झाला व ठाकुरसाहेब त्याचे मागून जाऊं लागले.

थोडया वेळांत ते दोघेही अपेक्षित स्थानीं पोंचले. अबदुलखानानें पुढें होऊन ठाकुर साहेबांचें स्वागत केलें; पण प्रथमतः त्यांनीं त्याचेकडे लक्ष्य न देतां दर्शनीं असलेल्या पुतळ्यांचेंजवळ गमन केलें; दोन्ही मूर्ति त्यांनीं आपदमस्तक न्याहाळून पाहिल्या ! आणि अक्षरशः डोकें टेकून, त्यांना प्रणाम केला !

अबदुलखान व मानसिंग चकित नेत्रांनीं त्यांच्या हालचालीकडे पहात राहिले.

प्रणाम केल्यावरही कांहीं वेळ ठाकुरसाहेब त्या पुतळ्याकडे पाहात राहिले. मूर्तिचा आकार माणसाएवढाच धरला असून, त्यांची बनावट शाडूची होती. मूर्तिकारानें त्यांच्या रचनेंत आणि कोरींवपणांत चांगलें चातुर्य दाखविलें होतें. रंगरोगण तथातथ्य दिलें असल्यामुळें त्यांच्यामध्यें सजीवपणाचा भास होत होता. दोन्ही पुतळ्यांत वयाचा फरक दाखविला होता. जयमल्ल चांगला प्रौढ होता तर पत्ता अगदीं अल्पवयी अठरा वीस वर्षांचा पोर दिसत होता.

ठाकूर ईसरजीनें पावघटका तरी त्यांचेकडे पाहिलें आणि नंतर तो खाना-कडे वळला. त्यानें मघाचें अभिवादन आतां स्वीकारून आसनस्थ होत प्रश्न केला, " काय खानसाहेब, माझ्याकडे काय काम होतें आपलें ? "

कोणत्याही मनुष्याला आपल्या कबज्यांत आणण्याची हातोटी अबदुल-खानाला चांगली साधली असूनही ठाकुर ईसरजीपुढें त्याची लटपट उडत असे. त्या रजपुताला आपलेंसें करण्याकरितां आतांपर्यंत त्यानें अनेक युक्त्या योजिल्या होत्या; परंतु त्याचा थोडासाही उपयोग झाला नव्हता. तेव्हां आतां एकवार स्पष्ट विचारून त्या गोष्टीचा एक कांहींतरी निकाल लावावा ह्मणजे इतर गोष्टी निर्वेधपणें पाहतां येतील, अशी योजना करून तो आज आला होता व त्यानें ठाकुरसाहेबांना आपणाकडे बोलाविलें होतें; पण त्यांचें पूर्वीसार-खेंच बाणेदार वर्तन पाहून, त्यास या गृहस्थाला कसें वळवावें, हें समजेना. ह्मणून तो ठाकुरसाहेबांच्या प्रश्नाचें कांहीतरी उत्तर देण्याचे हेतूनें ह्मणाला, " कांहीं विशेष काम नाहीं. आपलें सहज तुमचें कुशल विचारावें, अशा हेतूनें आलों होतों."

" अगदीं खोटें बोलतां आहांत. " ठाकुरसाहेब मध्येंच ह्मणाले, " तुह्मी नुस्ते कुशल प्रश्न विचारण्यास आलां नसून, माझा शेवटचा निर्णय विचार-ण्यास आलां आहां. होय ह्मणा. खरी गोष्ट नाकारण्यांत विशेष शहाणपणा नाहीं."

या त्यांच्या स्पष्टोक्तीनें अबदुलखान मनांतले मनांत विरमला व त्यानें हळूंच एकवार मानसिंगाकडेही दृष्टीताद केला! पुढील बोलणें ऐकण्यास हा तरुण इथें उभें राहाणें इष्ट नाहीं; असें त्यास वाटलें; ह्मणून त्यानें त्यास बाहेर जाण्याविषयीं खुणविलें. त्याप्रमाणें मानसिंग मुकाटयानें बाहेर गेला खरा;

पण त्या दोघांचा संवाद ऐकण्याची त्यास इतकी कांहीं अनिवार उत्कंठा लागली होती, त्यानें दूर न जातां तेथेंच भिंतीला कान दिला.

अबदुलखान आपलें कांहीं नवीन उत्तर आठवीत आहे, असें पाहून ठाकुरईसरसिंगच गंभीरपणानें ह्मणाला, " खानसाहेब, मी मेल्यावर माझीं हाडेंसुद्धां तुह्मां मोंगलांना वश होणें शक्य नाहीं; मग उगीच कशाला या भानगडींत पडतां ?

" पण तुमचें आमचें इतकें हाडवैर असावें तरी कां, ह्मणतों ?"

" त्याचें उत्तर चितोडचे जोहार देतील !"

" पण मागील गोष्टी आतां कोणीच कोणाच्या न काढतां सलोख्यानें वागायला नको का ? कलहाची आग धुमसत ठेवण्यांत माणुसकी काय आहे ? अबदुलखानानें पोक्त विचाराचा आव आणून ह्मटलें.

पण ठाकुरसाहेबाला, तें उत्तर रुचलें नाहीं. ते एकदम निष्ठुरपणानें हंसून ह्मणाले, " खानसाहेब, हें तुमचें तत्वज्ञान ऐकून जयपुरचा राजा आपली मान तुकवील. नाहींतर आह्माला भिवविण्याकरितां सुभ्राजीचे उभारलेलें महाराण्याचें बुजगावणें तुमच्या या आनंदाला भाळून वाटेल तसें नाचेल आणि तुह्माला अल्लाचे अवतार मानून तुमची पूजा करील; पण या तुमच्या भुलवणीला, पुण्यप्रतापी प्रतापराण्याचें चरित्र पाहणारा ईसर भाळणार नाहीं, समजलांत ? तुह्माला आजचें उद्यांचें अगर शेवटचें माझें एकच उत्तर सांगतों कीं, मोंगल हे मेवाडचे व आमच्या धर्माचे शत्रु आहेत! त्यांचा आम्ही कसून प्रतिकार करणार ! जुलमानें अगर मोहानें आम्हाला तुडविण्याचा तुह्मी कसाही घाट घाला; बाप्पारावळच्या वंशांतील एक मनुष्य जोंपर्यंत जिवंत आहे, तोंपर्यंत तुमचा प्रतिरोध होणार, हें खूब लक्ष्यांत ठेवा."

" पण यापुढें आह्मीं सगळ्यांनाच मित्र करून घेणार आहोंत ! हिंदूशीं अविश्वासानें वागून काम भागत नाहीं. निष्कारण उभयपक्षांचेंही नुकसान होतें, आणि दोघांनाही त्रास होतो आहे हें कांहीं योग्य नाहीं; असें शहान-शहा अकबरशहांना वाटत होतें, आणि म्हणून त्यांनीं आपल्या दरबारांत हिंदूंनाही मोठमोठे अधिकार दिले. तीच वहिवाट पुढें चालू करण्याचा सध्यांच्या पातशाहाचा विचार आहे, आणि तो इतका प्रामाणिक आहे कीं,

आम्हाला त्यांत यश येणार अशी आम्हाला खात्री आहे. मोंगलांचा विजय त्यांच्या तलवारींत नसून धर्मनिष्ठेंत आहे. प्रजावत्सलतेंत आहे आणि न्यायप्रियतेंत आहे."

" तुमच्या दृष्टीनें हें बरोबर असेल; पण मला मात्र तसें नाहीं वाटत. आमच्या दुहीवर आणि मूर्खपणावर तुमच्या वैभवाचा विमला उठला आहे! असो. हा आमच्या कर्मदशेचा फेरा आहे. त्याबद्दल आम्ही तुम्हाला दोष देणें थोडें चुकीचेंच आहे."

" मग जय जर आम्हाला आहे तर आम्हाला अपशकून करून स्वतःचा नाश करून घेण्यांत फायदा तो काय पाहतां तुम्ही ? "

"त्याचें कारण आमच्यांत अद्याप थोडी माणुसकी शिल्लक आहे म्हणून!–" ठाकुरसाहेब म्हणाले, " आमची ही पिढी गेली कीं, कदाचित् तुमच्या लाथा खाऊन पुन: तुमच्या पायाला तूप चोळणारी हिंदु प्रजाही निर्माण होईल. आमच्याकडून मात्र प्रतिकाराखेरीज दुसऱ्या कशाचीही अपेक्षा करूं नका."

" पण या हटवादीपणाचा परिणाम––"

" चांगला होणार नाहीं, हें मी जाणून आहे.–" ठाकुरसाहेब मध्येंच म्हणाले, " जोंपर्यंत आमचे जातभाई तुम्हाला अनुकूल होऊन आम्हाला खोडयांत घालण्याचा प्रयत्न करीत आहेत, तोंपर्यंत आमची जिवंत राहण्याची चळवळ व्यर्थ आहे हें आम्ही जाणतों; पण खानसाहेब, तेवढया-वरून स्वधर्म सोडण्याची आमची तयारी नाहीं."

" मग नाइलाजानें तुम्हाला आजन्म आमच्या कैदेंत रहावें लागेल."

" तें प्रभु एकलिंगजीच्या इच्छेवर अवलंबून आहे. तुम्ही ठेवूं म्हटल्यानें तें घडणार नाहीं, आणि मी सुटूं म्हटल्यानें तेंही होणार नाहीं. खानसाहेब, देवाची इच्छाच झालीतर मी तुमच्या डोळ्यासमोर इथून नाहींसा होईन."

दोघांनींही एकमेकाची रजा घेतली. ठाकुर ईसरसिंग आपल्या स्थानीं परत आला. तेथें आल्यावर मानसिंग त्यास हळूंच म्हणाला, "ठाकुरसाहब, देव करील तर मी तुम्हास सहाय करीन. पण मला त्या पुतळ्यांचीं गोष्ट मात्र नक्की समजाऊन सांगा."

---

# परिच्छेद ८ वा.

## परिसाचा स्पर्श !

एक साठ वर्षाचा म्हातारा तर दुसरा ऐन पंचविशींतील जवान; पहिला वीरांच्या छातींतही धडकी भरण्यास लावणारा खंदा तलवार बहादूर तर दुसरा मृदुमृदुल शरिराचा व मनाचा जनानी तरुण; एकानें अरण्यवास, हाल अपेष्टा भोगून स्वातंत्र्याची सेवा केलेली तर दुसरा गाद्यागिरद्यावर लोळत केवळ विलासांत वाढलेला जीव ! पहिला मोंगलाचा कट्टाशत्रु तर दुसऱ्याचा पिंड मोंगलांच्या सेवेंत किंवा सेवेकरितां तयार झालेला !– तेव्हां साम्य व्हावें कसें आणि दोघांचें जुळावें कसें; पण कित्येकवेळां अशा भिन्न प्रकृतींचाच अगदीं क्षुल्लक कारणानें मिलाफ घडून येतो ! पुष्कळ वेळां फुलांच्या संगतीनें माती सुगंधित होते; चंद्रिकेच्या मिश्रणानें रात्रीला शोभा येते आणि दुःखाच्या मिश्रणानें सुखाला लज्जा चढते ! ठाकुरईसरजींच्या मनाशीं मानसिंगाच्या हृदयाची मिलावट अशा धर्तीची होती. आणि ती अगदीं सहज अगदीं आकस्मिक होती ! दोन हृदयांचा जोड किंवा विजोड करणाऱ्या एका अदृश्य शक्तीचा तो एक विलक्षण खेळ होता.

ठाकुरईसरसिंगाच्या चरित्राचें रहस्य समजण्यासारखी मानसिंगाचीं बुद्धिमत्ता वाढलेली नव्हती! उलट त्याचा व त्याच्या वर्तनाचा त्यास तिटकारा यावा, अशा शिक्षणांत तो वाढलेला होता. मेवाडचे रजपूत मूर्खपणानें मोंगलासारख्या थोर लोकांशीं निष्कारण द्रोह करून आपला नाश करून घेत आहेत; हें गोंडस तत्वज्ञान त्यानें लहानपणापासून ऐकलें होतें. मेवाड देश कुठें आहे? त्याचा अभिमान कां बाळगावयाचा, आणि मोंगल आपले शत्रु कां लेखावयाचे? याचें त्याला कांहीं एक ज्ञान नव्हतें, त्यानें त्याबद्दल कधीं विचार केला नव्हता आणि ठाकुरईसरसिंगाशीं प्रसंग पडेपर्यंत त्यानें असला बुद्धिवाद ऐकलाही नव्हता. त्यामुळें वास्तविक त्यानें त्याविषयीं उदासच असायला पाहिजे होतें; परंतु घटनाचक्र असें होतें. तें या अशाधर्तीनें फिरावें, अशीच लीलावधारी प्रभूची इच्छा होती!

ठाकुर ईसरसिंगालाही त्याच्या त्या उत्कंठित शब्दांचें मोठें नवल वाटलें. त्यानें एकवार त्याच्या मुद्रेकडे भेदकदृष्टीनें पाहिलें; पण मानसिंगाच्या त्या शब्दोच्चारांत ज्या प्रमाणें कांहीं कृत्रिमता नव्हती त्याचप्रमाणें त्याच्या मोहक मुद्रेवरही कपटाची अस्फुट छटाही दिसून आली नाहीं. तरी ईसरसिंग त्याच्या मनाचा थांग घेण्याकरितां म्हणाला, "मानसिंगा, जयमल्ल व पत्ता यांच्या शौर्यकथा म्हणजे लैला मजनूचा किस्सा नव्हे, तुला त्यांत काय गोडी वाटणार ?"

मानसिंगानें अगदीं एकदम व सहज विचारलें, "आषुकमाषुकांच्या प्रेमकहाणीप्रमाणें शूरांच्या वीरकथेंत गोडी नसते का ? काव्यांत शृंगार आणि वीर हे रस परस्पराचे मारक असले तरी सत्यसृष्टींत ते एकमेकाचे पोषक नाहींत का ?"

त्याचा हा चातुर्यदर्शक व सहज बाहेर पडलेला प्रश्न ऐकून ठाकुर ईसर-सिंगाला त्याचें मोठें कौतुक वाटलें. तो म्हणाला, "मान, तुझ्या पित्यावरून व तुझ्या शरीररचनेवरून मी तुझ्या मनाची अटकळ बांधीत होतों, पण ती चुकीची होईल, असें मला वाटतें."

"चुकीची होईल कशाला ? आहेच ती. हें मी जरा धिटाईनें बोलतों आहे आपल्याशीं; पण त्याबद्दल मला क्षमा करा. ठाकुरसाहेब, मघाशीं खान-साहेबाजवळ माझ्या वडिलांविषयीं आपण जे अनुदार उद्गार काढलेत, ते ऐकल्यापासून माझ्या मनाची कांहीं चमत्कारिक स्थिति झाली आहे. मी तुम्हाला फक्त त्या पुतळ्यांची गोष्ट विचारली एवढया वरून असें समजं नका कीं, सहज लहरीनें मी ती विचारीत आहे किंवा तेवढया हकीगतीनं मी संतुष्ट होणार आहे. नाहीं— तसें मुळींच नाहीं. तुम्ही येथें आल्यापासून आणि तुमचें वर्तन व बोलणें पाहिल्यापासून माझ्या मनांत अनेक गोष्टींच्या ऊर्मी उठत आहेत. मला तुम्हाला पुष्कळ पुष्कळ विचारावयाचें आहे, अनेक गोष्टींचा उलगडा करून घ्यावयाचा आहे; आणि लक्षांत ठेवा, माझ्या मनाचें जर समाधान झालें तर मी तुमच्या सुटकेकरितां वाटेल ते श्रम आणि साहस करण्यास तयार होणार आहे," बोलतां बोलतां त्याचा चेहरा उत्तेज-

कतेमुळें ( स्त्रियांच्या बाबतींत असें तेव्हांच घडतें. ) लाल झाला ! आणि तो एकदम मध्येंच थांबून भयचकित दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागला !

ठाकुरईसरसिंगानीं एकदम पुढें होऊन त्याच्या पाठीवर थाप मारीत म्हटलें, " आहेस-मेवाडला शोभणारा रजपूत आहेस. सुग्राजीच्या पोटीं असा पुत्र यावा, हें खरोखरच नवल आहे.-ये मानसिंगा आपण स्वस्थमनानें बोलत बसूं. तुला वाटेल ती गोष्ट मनमोकळें करून विचार. मी ती साग्र सांगण्यास तयार आहे. माझ्या सुटकेचा प्रश्न महत्वाचा नाहीं. ती होईल अगर नाहीं होईल; पण तुझ्यासारख्या तरुणाला स्वधर्म आणि स्वदेश यांच्या दुःस्थितीचा उलगडा पडला पाहिजे. विचार बाळ, विचार तुझे प्रश्न ! या बंदिवासांतही मला दिवंगत मेवाडच्या वीरमूर्तीचें दर्शन घडलें आहे; आणि तुझ्यासारख्या उत्सुक तरुणाजवळ मेवाडचें यश वर्णन करण्यास मिळतें आहे, ही कांहीं कमी भाग्याची गोष्ट नाहीं. किंबहुना या सर्व गोष्टींत कांहीं ईश्वरीसूत्र आहे, असें मला वाटतें. "

असें त्यांचें बोलणें चालू आहे तोंच एका नोकरानें येऊन मानसिंगास अबदुलखानाकडे बोलवून नेलें. ठाकुरईसरसिंग झालेल्या बोलण्यावर विचार करीत बसला होता. आपल्या सुटकेकरितां किंवा मेवाडच्या हिताकरितां मानसिंगाचा उपयोग कसा काय करून घेतां येईल. त्याच्या मनाची खबरी कितपत असावी. ती अजमावण्याकरितां कांहीं परीक्षा घ्यावी कीं कसें ? सुग्राजीसारख्या स्वधर्म व स्वदेश यांची वंचना करणाऱ्याचे पोटीं याचा जन्म कसा झाला, इत्यादि अनेक प्रश्न त्याच्या मनांत आले आणि त्या अनेक प्रश्नाला अनेक कल्पना फुटून त्याचा तो काल एक नवीन धर्तीच्या विचारांत गेला.

सूर्यास्ताचे सुमारास मानसिंग त्याचेकडे आला व हळूंच म्हणाला, "तुमची आतां इथून उचल बांगडी होणार आहे. बहुतेक ठेवणार आहेत याच शहरांत; पण कुठें ठेवणार आहेत, हें नक्की झालेलें नाहीं. पण तें कसें का असेना, या किल्ल्यांतून बाहेर नेत आहेत हें एकप्रकारें बरेंच आहे. बाहेर शहरांत कुठेंही आणि कितीही बंदोबस्तांत ठेविलें, तरी आपल्यास कांहीं कारस्थान करण्याचें झालें, तर किल्ल्यापेक्षां सोपें जाईल. तुमच्या अर्देलाचें

काम मी आपणाकडेस घेणार आहें. तेव्हां तुम्हाला विशेष चिंता करण्याचें कारण नाहीं. " असें बोलून तो आपल्या कामाला निघून गेला.

आपलें स्थलांतर होणार हें ऐकून ठाकुर ईसरसिंगालाही थोडें बरें वाटलें मानसिंगानें म्हटल्याप्रमाणें किल्ल्याच्याबाहेर राहिल्यावर आपणास भेद करण्यास सोपें जाइल असें त्यास वाटलें व त्याचें मन त्या गोष्टीवर विचार करूं लागलें.

त्याचरात्रीं ठाकुरईसरसिंगाला रात्रीच्या दाट काळोखांत दुसरीकडे नेऊन एकेस्थळीं बंदींत ठेवण्यांत आलें. त्यावेळीं अबदुलखान आला होताच. त्यानें त्यास म्हटलें, " ठाकुरसाहेब तुमचे हाल करावे किंवा तुमचा अपमान करून तुमचा छळ करावा, अशी आमची इच्छा नाहीं. तुमच्या इभ्रतीस शोभेल, अशीच व्यवस्था ठेवण्यांत येईल. मात्र मेवाडकडे आमचें जें राजकारण सुरूं आहे, त्यांत तुमचा अडथळा येऊं नये म्हणून तुम्हाला इथें आणिलें आहे. आमचें काम झालें कीं, आम्ही तुमच्या इतमानाप्रमाणें येथून तुमची रवानगी करूं. आतां त्यापूर्वी आपली सुटका व्हावी, असें वाटत असेल; तर तें मात्र सर्वस्वीं तुमच्या हातांत आहे. पादशाही कृपा मान्य करा. त्यामुळें सर्वांचें कल्याण होईल ! पहा, ज्यावेळीं तुम्हाला माझी सल्ला पटेल, त्यावेळीं मला नुसता तोंडीं निरोप धाडा. मी येऊन तुमच्या गुणांचें योग्य चीज आमच्या बादशाहांचे हातून करवीन. " एवढें बोलून अबदुलखान थोडावेळ थांबला. ठाकुरईसरसिंग कांहीं उत्तर देईल, असें त्यास वाटलें होतें; पण तसें कांहीं झालें नाहीं. तो स्तब्ध बसलेला पाहून निराश झालेला अबदुलखान 'ही जुनीं खोडीं मोटीं वस्ताद आहेत.' असें स्वगत म्हणत तेथून निघून गेला.

ठाकुरईसरसिंगाचा नवीन बंदिखाना यमुना नदीच्या किनाऱ्यास असलेल्या एका पडक्यावाड्यांत होता. हें स्थान आग्र्याच्या किल्ल्यापासून दीड कोसांवर शहराच्या अगदीं शेवटच्या टोकाला होतें. लोदी घरांतील शेवटचा बादशाहा इब्राहिमखान लोदी यानें आपल्या एका प्रियकरणीकरितां ही इमारत बांधली होती. पुढें त्या घराण्याचें नशीब फिरल्यावर मोंगलांनीं हें स्थल कांहीं महत्वाचे राजकैदी ठेवण्याकरितां उपयोगांत आणिलें. भोंवताली भव्य मजबूत तट, आंतील बाजूस एक चांगल्या स्थितींत असलेली बाग आणि

त्याचे मध्यभागीं असलेली मुख्य इमारत यामुळें हें स्थान एकांताला मोठें चांगलें होतें. अकबरशहानें आपल्या मीनाबाजारांत, द्रव्यावर लुब्ध केलेली कित्येक सौंदर्यें येथें आणूनच उपभोगिलीं होतीं; आणि पुढें सलीम उर्फ जहांगीर यानें त्याचेविरुद्ध गलथा केला; त्यावेळीं त्याला त्यानें कैद करून येथेंच आणून ठेविलें होतें. असें हें प्रसिद्ध स्थान कैदखान्याच्या रूपानें ईसरसिंगाचे वांटणीस आलें होतें. असो.

नवीनपणामुळें ठाकुरईसरसिंगास हें स्थान प्रथम कांहीं दिवस बरें वाटलें; पहाऱ्याच्या कडक बंदोबस्तांत त्यास तरी लागत असलेल्या दिंडीनें यमुनेला स्नानाला जातां येत होतें; आणि सकाळ संध्याकाळ कांहीं वेळ बागेंत फिरतांही येत होतें. त्यामुळें त्याची कालक्रमणा अगदींच कंटाळवाणी होत नव्हती. परंतु त्याच्यावरचा पहारामात्र अगदीं कठोर अशा कडव्या पठाण लोकांचा असल्यामुळें त्यांना दिलेल्या शिकवणीप्रमाणें ते त्याच्याशीं फार कडकपणानें वागत. त्यामुळें कांहीं कारस्थान करून निसटून जाण्याची आपली कल्पना जागचे जागीं राहणार कीं काय, असें त्यास वरचेवर वाटूं लागलें. त्यांत आणखी एक चमत्कार असा झाला कीं, किल्ल्यांतून इकडे आल्यापासून मानसिंग एकदांही त्याचेकडे आला नाहीं. मग त्याला दुसऱ्या एखाद्या कार्यांत गुंतवविला होता कीं, तो आपण होऊन मूग गिळून बसला होता. हेंहीं कळेना त्यामुळें त्यास भविष्यकाळ मोठा बिकट वाटूं लागला.

अशा स्थितींत दीड महिना लोटला. अद्यापिही मानसिंगाचा पत्ता नव्हता; आणि बंदिखान्याच्या बाहेर जगांत काय चाऊलें आहे, हेंही कळणें ठाकुरसाहेबांना अशक्य होऊन बसलें होतें. पहारेकऱ्यांपैकीं एकही माणसांत जमा नव्हता. ठाकुरसाहेबांना कशाकरितां कैदेंत ठेविलें आहे, हें जरी त्या रानवटांना माहीत नव्हतें, तरी ते हिंदु असून आपले कैदी आहेत, एवढयावरच ते त्यांना क्षुल्लक लेखून पहाऱ्याचा कडकपणा दाखवीत. त्यामुळें त्यांच्यापैकीं एखाद्याशीं थोडासा स्नेह ठेवणेंही कष्टाचें होतें. सुमारें पंचवीस हत्यारबंद लोक त्यांच्या आजूबाजूला असून मनुष्य संगतीचा उपयोग एकाकडूनही होत नसल्यामुळें जिवंत दगडी पुतळयांत आपण वावरत आहों, असें त्यास वाटे. म्हणजे किल्ल्यांतील बंदिवास बरा म्हणण्याची वेळ आली

आणि 'एकलिंगजी, ही कैद जन्मभर भोगतों; पण पहारेकरी–मनुष्याच्या आकारांतील–हे पशु नकोत' अशी प्रार्थना करीत राहण्याचा प्रसंग त्यांच्या दुर्दैवानें त्यास दाखविला !

पण परमेश्वरानें ही त्यांची प्रार्थना लौकरच ऐकली. पूर्वीचे सर्व पहारेकरी बदलून मनुष्यस्वभावाला मिळते जुळते असे नवीन लोक त्यांचेवर आले. त्यांत एका विशेष प्रसंगानें एका पहारेकऱ्याशीं –हा सर्व पहारेवाल्यांचा नाईकच होता–त्यांचें थोडें सूतही जमून आलें. त्यामुळें त्यांना पुनः सुटकेची आशा वाटूं लागली.

प्रसंग असा घडून आला कीं, त्यावेळीं एक चंद्रग्रहण आलें होतें. त्याचा पर्वकाल मध्यान्हीचे सुमारास होता! ठाकुरसाहेब स्नानाकरितां म्हणून पहारेकऱ्यासह यमुनेला गेले, आणि स्नानानंतर त्यांनीं कांहीं जपजाप्यही केला. अजबखानाला–त्या नाइकाला–त्या प्रकारचें मोठें नवल वाटलें, आणि त्यानें परत वाड्यांत आल्यावर 'मघाशीं तुम्हीं काय केलेंत?' असा प्रश्न केला. ठाकुरसाहेबांनी सहज हंसत विनोदानें सांगितलें, " वशीकरण्याचा मंत्र जपला आहे. "

अजबखानाला तें उत्तर समजलें नाहीं व त्यानें सविस्तर उत्तर मागितलें. ती त्याची उत्सुकता व भोळास्वभाव पाहून त्यांच्या डोक्यांत एक कल्पना उद्भवली व त्यांनीं 'ती गोष्ट सांगण्यासारखी नाहीं. त्यामुळें आपण कैदेंत पडलों आहोंत. जहांगीर बादशाहावर मोहनास्त्र घालण्याचा माझा विचार होता, पण तो फसला. नाहींतर एव्हांना मी जयपूरचा राजा मानसिंग याची जागा पटकावली असती; पण अद्यापि मी निराश नाहीं; आणि या गोष्टी कोणाजवळ बोलण्यासारख्या नाहींत. त्यामुळें मंत्राचा गूण जातो. " इत्यादि थापा मारून त्याची उत्सुकता वाढविली व त्याला गुंगवून सोडिलें. त्या घटकेपासून आजबखान त्यांचा दोस्त झाला.

आपल्या ताब्यांतील व्यक्ति कांहीं विलक्षण आहे, असें अजबखानाला अगदीं मनापासून वाटलें. तो स्वतःशीं म्हणाला, "हा मनुष्य कांहीं सामान्य कैदी नव्हे. तो कैदेंत असला तरी ज्या अर्थी त्याची मिजास सरदाराप्रमाणें ठेविली आहे, त्या अर्थी तो–ठाकुर सांगतो त्याप्रमाणें ' जंतर मंतराचीच

कांहींतरी भानगड असली पाहिजे. अगदीं शंकाच नको. आपण या पठ्ठ्या-पासून कांहीं उपयोग करून घेतला पाहिजे." असा पोक्त विचार करून स्वारी ठाकूरसाहेबांच्या नादीं लागली.

दुसरे दिवसापासून त्यानें त्यांच्याशीं खूपच अर्जीजी चालविली. "तुम्ही आमचे कैदी असला तरी आम्ही तुम्हाला फार चांगल्या तऱ्हेनें वागवूं; आणि तुम्हाला वाटेल ती मदत करूं. मी इथल्या सर्व पहारेवाल्यांचा नाईक आहे. माझ्या हातांत पुष्कळच सत्ता आहे. तुम्ही आमचा उपयोग केलात तर आम्ही तुम्हाला विसरणार नाहीं." इत्यादि कितीतरी गप्पा त्यानें ठाकुरसाहेबाशीं मारिल्या, आणि त्यांनींहि त्या मुकाट्यानें ऐकून घेतल्या. उलटपक्षीं ठाकुर-साहेबांनींही त्याच्या स्वभावांतील मख्खी ओळखून आणि आपल्या सुट-केच्या कारस्थानास पुढें केव्हांतरी सोइवार पडावें, म्हणून, आपल्या जारण-मारण वशीकरण उच्चाटन, छिन्नमस्तानीं, धुमावती, जादूटोणा, भूतप्रेतविद्या याविषयीं असतील नसतील तेवढ्या गप्पा मारून "आपण मंत्रतंत्र करण्यास मोकळे असतों तर सारी दुनिया उलथी पालथी केली असती; आणि आतां तरी काय, आपण एक फूंक मारूं तर वीर–महावीरांच्या सहा-य्यानें तेव्हांच उडून जाऊं. पण या विद्येचा स्वतःकरितां उपयोग करावयाचा नसतो." इत्यादि सांगून आपलें अद्‌भूत सामर्थ्य प्रकट केलें! तें श्रवण करून अजबखान अगदीं वेडा झाला व त्यानें एकदम म्हटलें, "अरे यार, असें आहे तर कांहीं कर, मला एक ताईत मंत्रून दे. माझ्या एका माषुकानें मला अगदीं परेशान केलें आहे."

त्याची ही काकुळतीची विनंति ठाकुरसाहेबांनीं मोठ्या मिन्नतवारीनें मान्य केली व त्यास एक ताईत आणण्यास सांगितला. त्याप्रमाणें त्यानें तो आणून दिल्यावर त्यांनीं दोन दिवस मंत्रतंत्राचें सोंग करून, तो भारून त्यास दिला!

कर्मधर्मसंयोग असा, आठदिवसाच्या आंतच अजबखान स्वर्ग सौख्य भोगूं लागला; आणि ती त्याची स्थिति पाहून ठाकुरसाहेबांना भविष्यकालाचा पडदा थोडासा बाजूला झाल्याचा भास झाला!

अद्यापिही मानसिंग आला नव्हता! तो कां आला नसावा, याचें ठाकुर-साहेबांना राहून राहून आश्चर्य वाटत होतें. तो आपल्यास विसरला असेल,

असें त्यांस वाटेना. एखाद्या महत्वाच्या कामांत तो गुंतला तरी असावा किंवा त्याची व आपली भेट होणें इष्ट नाहीं, असें कोणाच्या तरी डोक्यांत आलें असावें आणि म्हणून त्याला इकडे येण्याची बंदी झाली असावी, अशी त्यांनीं अटकळ बांधली.

पण वास्तविक यावेळीं त्यांना मानसिंगाचें आगमन पाहिजे होतें. त्याच्या सहाय्यानें त्यांनीं अजबखानाच्या मूर्खपणाचा फायदा घेण्याचें योजिलें होतें; पण करणार काय ? त्याचाच पत्ता नव्हता ! मग मानसिंग कोठें होता बरें ?

---

# परिच्छेद ९ वा.

## राजधर्माचा जयजयकार !

“बिस् मिल्लाह–1हर–रहिमान्निरहीम !!! ”

धर्मप्रवचनाचे सुरुवातीस ह्मणावा लागणारा हा मंत्र म्हणून, त्या पाकचलन वलीनें–सत्पुरुषानें– प्रवचनास प्रारंभ केला.

तें पुराण एखाद्या मशिदीमध्यें किंवा दर्ग्यामध्यें नसून एका आलीशानी कमऱ्यांत एकाच प्रौढ तरुण श्रोत्यापुढें होतें ! वक्ता अत्यंत उल्हसितवृत्तीनें सांगूं लागला व श्रोता लक्ष्य लावून तें एकूं लागला.

“ अल हमदुल्लीलाह रब्बील आलमीन !!

सर्व जगाचें पालन पोषण करणाऱ्या परमेश्वराचा विजय असो ! बेटा, परमेश्वर एकच असून महम्मद हे त्याचे पैगंबर आहेत, त्याची आज्ञा सांगण्यास आलेले दूत आहेत; त्यांचा महिमा मोठा आहे ! तो माझ्या अल्प बुद्धीला कसा वर्णन करतां येईल ? अल्लाह–ओ–अकबर ! अल्लाह–ओ–अकबर ! अल्लाह–ओ–अकबर !!! ”

वलीची मुद्रा जितकी शांत व आनंदी दिसत होती, तितकेंच त्याचें भाषण प्रमळ होतें आणि त्याच्या गळ्यांत गोडपणा होता.

"बेटा, सच्चा मुसलमानानें पुढील इमान पाळलें पाहिजे! त्यांतच त्याचें कल्याण आहे. हे इमान म्हणजेः–१–अल्लाहवर विश्वास ठेवणें. २–महम्मद पैगंबरांना मानणें. ३–कुराणादि पवित्र ग्रंथांचा आदर करणें. ४–कियामतच्या *दिवसाविषयीं खात्री बाळगणें. ५–परमेश्वराच्या इच्छेवर हवाला टाकणें. ६–पुनरुत्थानें शक्य समजणें. हे इमान पाळून पुढील पांच फर्जही यानें नित्यशः पार पाडलीं पाहिजेत. मुसलमानाचें कर्तव्य आहे कीं, त्यानें कलमा पढला पाहिजे. निमाज पांच वेळांत एकही वेळ चुकवितां उपयोगी नाहीं. रोजे केले पाहिजे. जकात (प्राप्तीवरील धर्मार्प्रीत्यर्थ कर) दिली पाहिज, आणि हज (मक्केची यात्रा) केली पाहिजे. कारण हीं पांच कर्तव्येंच याला मुक्ती देणारीं आहेत! यानें अल्ला सर्वतोपरी प्रसन्न होऊन आपली जिंदगी सुखांत जाते! बेटा, सर्व शक्तिमान् परमेश्वर कसा आहे पहा! तो सर्व जगाचा मालिक असून बादशाहांचा बादशाहा आहे! तो गरिबांचा कनवाळू आहे! भक्तांचा कृपाळू रक्षक आहे, आणि त्यानें आह्मा क्षुद्र मानवांचा उद्धार करण्याकरितां महम्मदांना भूतलावर धाडिलें आहे! अहाहा! ही प्रार्थना किती गोड आहेः–

**खुदाया तो खाविंद सबसे बडा। जमीं अस्मॉ तूने पदा किया॥ सजावार है तुझको तारीफ सब। तूं है सारे अलम् का खाविंद रब॥ जिसे चाहे उसपर करता है दया। तूं ह मिहरबान तेरी सबपर मया। कियामत के दिन का भा तूं है धनी। भिखारी हैं हम सब और तूं गना॥ तेरी बंदगी करते है हम सबमुदाम! मदद मॉंगते हैं तेरी सुबहशाम॥ दिखा राह सिधी तूं हमको तमाम। कि हा दिनदुनियामें हम शादकाम॥ न गुमराहों की वाट हमका दिखा। हम अमीन कहते हैं ऐ किब्रिया॥**

---

*शेवटच्या इन्साफाचा दिवस. पुनरुत्थान–Resurrection.

हे प्रार्थनेचे श्लोक † त्यानें फारच प्रेमळस्वरांत म्हटले, आणि त्याच्या अर्थाची फोड करण्याकरितां तो पुढें म्हणाला, 'परमेश्वरा या जगांत तूंच सर्व श्रेष्ठ असून जमीन व अस्मान ही तुझीच लीला आहे. अलम दुनियेचा तूं बादशाहा असल्यामुळें तूं तारीफ करण्यास सर्वस्वीं योग्य आहेस ! आपल्या भक्तावर तूं प्रेम करितोस व सर्वांवर तुझी मोठी माया आहे. कियामतीच्या दिवसाचा प्रभु तूंच असून, तुझी आम्हीं सर्व लेंकरें आहों ! आम्हीं सकाळ-संध्याकाळ तुझी प्रार्थना करून तुझी मदत मागतों आहोंत ! परमेश्वरा, इहलोक व परलोकसंबंधीचीं कर्तव्यें पार पाडण्याकरितां तूं आम्हांला सन्मार्ग दाखीव ! हे सर्वश्रेष्ठा ! कुमार्गाकडे आमची बुद्धि कधींही न वळो ! अशी प्रार्थना करून आम्ही अमीन ( तथास्तु ) असें म्हणतों.–बेटा, पाहिलेंस, अल्लाची ही प्रार्थना किती सुंदर हेतूनें भरलेली आहे. ही पाठ करून रोज म्हटली तर मनाला मोठा आनंद वाटतो. "

यानंतर आणखीही थोडी धर्मचर्चा होऊन त्यानें त्या प्रौढ तरुणाला आशीर्वाद देत तेथून गमन केलें ! तो जाऊन दहा एक पळें झालीं नाहींत, तोंच मानसिंग तेथें आला आणि आपल्या भावाला–तो प्रौढ तरुण जातीनें हिंदु असून त्याचें नांव मोहनसिंग होतें व तो मानसिंगाचा वडील बंधु होता.– तो म्हणाला, " भाईजी, तुम्ही काय इस्लाम धर्म स्वीकारणार शेवटीं? तुम्ही मुसलमान होणार ? "

" होय. माझा निश्चय आतां अगदीं ठाम झाला आहे. " मोहनसिंग उद्दामपणें म्हणाला, " आठ पंधरा दिवसांतच मी तुझ्या त्या खुळचट सनातन धर्माला ठोकरीनें उडवून देणार. समजलास !–कां ? तुझें तोंड असें आंबट कां झालें ! "

खरोखर मानसिंगाला आपल्या भावाची ती भाषा फारच उद्दाम वाटली, आणि त्यामुळें त्याचें मन दुखावलें ! हा त्याच्या मनाचा पालट ठाकुर ईसरजीच्या संगतीपासूनचाच होता. आपला मेवाड व आपला धर्म या

---

†कुराणांतील कांहीं सर्वोत्कृष्ट सुरांचे (सुरा-श्लोक) हें उर्दू भाषांतर आहे. मूळ सुरा आरबी भाषेंत आहेत.

स्वाभिमानाचें रहस्य त्याला नुक्तेंच कळूं लागलें होतें. नाहींतर मोहनसिंग विधर्मी होणार ही गोष्ट कांहीं आजची नव्हती. आज बरेच दिवसांपासून –किंबहुना वर्षांपासून—त्याचा विचार जगजाहिर झाला होता; पण इतके दिवस कोणा ना कोणाच्या इच्छेकरितां तो नांवमात्रानें हिंदु राहिला होता. मनानें तो केव्हांच मुसलमान झाला होता ! हिंदुधर्माचा तो मनापासून द्वेष करी; परंतु कांहीं दिवस आईबापांच्या धाकानें, कांहीं वेळ आप्तेष्टांच्या समजुतीकरितां, कांहीं काळ पत्नीच्या इच्छेमुळें व कित्येक प्रसंगीं राजा मानसिंगासारख्या मंडळींनीं त्यास प्रतिरोध केला म्हणून त्यानें कलमा पढला नाहीं एवढेंच बाकी अनेक मुसलमान सरदारांचें त्याला आनकुल्य होतें, खुद्द बादशाहा जहांगीरही तूं आमचा सर्वस्वीं हो, असें म्हणत होता आणि त्याच्याही मनानें मुसलमान होण्याचें पक्कें घेतलें होतें. त्याच्या मनाची ही अशी रचना कां झाली होती, याचें रहस्य वाचकांना हळूं हळूं कळेल. तोंपर्यंत आपण त्या दोघा भावांची थोडीशी पूर्वपिठीका पाहून नंतर त्यांचा संवाद ऐकूं, म्हणजे रजपुतांचें बल कोठें व कसें ढासळलें याचा उलगडा पडेल व इतिहासाची ही पुनरावृत्ति पुनः न व्हावी, असें प्रत्येकास वाटेल ! असो.

आपसांतील कलहास अगदीं परदेशस्थ व परधर्मी मनुष्यांचें सहाय्य घेऊन भाउबंदकीचें कालकूट तयार करण्याचा पहिला मान रजपुतांच्या इतिहासांत कनोजचा रजपूत राजा जयचंद यास आहे. यानें दिल्लीचा तत्कालीन राजा पृथ्वीराज चव्हाण याचे पाय तोडण्याकरितां शहाबुद्दीन घोरीच्या तरवारीस आव्हान केलें, आणि त्याच तरवारीनें पुढें हिंदूंचें हिंदुत्व कायमचें नपुंसक झालें ! जयचंदानें पाडलेली आत्मघातकी बेकीची पायवाट सध्यां राजरस्त्याच्या रूपाला पोंचली आहे, हें चाणाक्ष वाचकांना काय सांगायला पाहिजे ?

सांगण्याचें तात्पर्य, जयचंदाचा कित्ता वंशपरंपरेनें पुष्कळ महाभागांनीं गिरविला. महाराणा प्रतापसिंगालाही अकबरापेक्षां घरचे भाउबंदच कंटकवत् झाले ! त्याच्या भावांपैकीं सुक्तसिंग व सुभ्राजी हे मोंगलांचेकडे येऊन त्यांनीं दिल्लीतून प्रतापसिंगावर शरसंधान केलें ! याच सुभ्राजीचे मानसिंग व

मोहनसिंग हे दोन पुत्र होते. त्यांत मोहनसिंग वडील, आणि मानसिंग धाकटा ! यावेळीं मोहनसिंगाचें वय पस्तीस वर्षांचें होतें. याच्या जन्मापूर्वीच सुप्राजी आपल्या तरुणपत्नीसह अकबराच्या आश्रयास आला होता ! अगदीं अल्पकालांतच सुप्राजीवर बादशाहाची बहाल मर्जी झाली ! या अकल्पित मर्जीचा अनेकांनीं अनेक तऱ्हेनें अर्थ लाविला ! जग अनेक मुखी असल्यामुळें एकाच गोष्टीवर अनेक मतें निघणें कांहीं अशक्य नाहीं. कांहीं असो. जहांगिरानंतर दोन तीन वर्षांनीं मोहनसिंगाचा जन्म झाला ! त्यावेळीं अकबरानें सुप्राजीस बधाई दिली ! "आपण ज्याप्रमाणें स्नेही आहोंत त्याचप्रमाणें आमचा सलीम व तुमचा मोहनसिंग भावाभावाप्रमाणें राहून मैत्री ठेवितील." असें बादशाहानें म्हटलें व सुप्राजीनेंही आनंदानें त्यास अनुमति दिली !

बादशाहाच्या इच्छेप्रमाणें मोहनसिंग व सलीम एकेठिकाणींच वाढले ! ते मोठे झाल्यावरही अकबरानें त्यांची जोडी फोडली नाहीं ! रजपुताबरोबर अकबराच्या ज्या लढाया झाल्या व ज्या ज्या युद्धांत म्हणून सलीम होता, त्या त्या युद्धांत त्याचेबरोबर मोहनसिंगही होताच !

पुढें दोघेही तारुण्यांत आल्यावर सलीमाचा विवाह ठरला. त्याच संधीस मोहनसिंगाचाही विवाह घडवून आणण्याचा बादशहानें व सुप्राजीनें दोघांनींही बेत केला; परंतु मोहनसिंगास मोठ्या घराण्यांतील रजपुतकन्या मिळेना ! बरें, त्यानें मुसलमान होऊन एखादी राजकुलोत्पन्न यवनी मिळवावी म्हटलें, तर तेंही शक्य नव्हतें. रजपुतांच्या मुली करण्यास मोंगल नेहमीं उत्सुक असत; परंतु आपल्या मुली रजपुतांना देण्यांत ते कमीपणा समजत. त्यामुळें मोहनसिंग मध्येंच लटकत राहिला ! बाळपणापासून मोंगलीसंगतींत वाढलेलें त्याचें मन रजपुतजातीकडे विशेषसें ओढत नव्हतेंच. त्यांत जेव्हां त्याचे जातभाई 'तूं कम अस्सल आहेस.' असें स्पष्ट सांगून मुली नाकारूं लागले, तेव्हां त्याचा अभिमान खवळून उठला व त्यानें मिशीवर पीळ देऊन "नांवाचा हिंदु असलों तरी मी मनाचा मुसलमान आहें. याचा सूड घेऊन सबंध रजपूत जात झोडपून न काढीन तर नांवाचा मोहनसिंगच नव्हे !" अशी प्रतिज्ञा केली. पुढें त्याचें लग्न कसें बसें उरकलें; पण त्याबरोबर त्याच्या

मनावर बसलेला घाव कांहीं बुजला नाहीं! यानंतर अनेक लहान मोठीं कारणें घडलीं! एकदां तो मेवाडांत आला असतां त्यास पंक्तीस घेण्यास लोक तयार होईनात तर दुसऱ्या एकावेळीं एका मानी मेवाडकरानें ' तूं अकबराच्या बीजाचा आहेस. कशाला गमजा मारतोस?" असें स्पष्ट म्हटलें! दुसऱ्या एका प्रसंगीं आपल्या बापाच्या वर्तनाची निंदा त्यानें ऐकली तर एकदां त्याच्या मातेला नांवें ठेवल्याचेंही त्यास कळलें! अर्थात् या प्रत्येक प्रसंगाला त्याचा क्रोध वाढत गेला, आणि तो मनांतलेमनांत हिंदुचा व हिंदुधर्माचा कट्टा द्वेष्टा बनला! शिवाय आप्तेष्टांमधील कुचेष्टेबरोबरच मोंगल दरबारांत त्याची प्रतिष्ठा वाढत गेल्यामुळें आपल्या जातीवर सूड उगविण्याची त्याची इच्छाही बळावत चालली!

इ. स. १६०५ सालीं अकबराचा अंत झाला, आणि सलीम, जहांगीर या नांवानें बादशाहा झाला! मोहनसिंगाचा अगदीं लंगोटीयारच बादशाही तख्तावर बसल्यामुळें त्यास अस्मानही ठेंगणें झालें. इतक्यांत त्याची मोठ्या कष्टानें मिळविलेली हिंदुपत्नी स्वर्गवासी झाली! आतां मुसलमानी धर्म स्वीकारून आपला हेतु तडीस नेण्यास कसलीच हरकत नाहीं. असें त्यास वाटलें. याच संधीला गोडबोल्या अबदुलखानानेंही ' तूं मुसलमान झालास तर मी आपली भाची-बहिणीची मुलगी-तुला देईन.' असें आश्वासन दिलें. झालें! विधर्मी होऊन स्वजातियांचा सूड उगविण्याचा मोहनसिंगाचा निश्चय कायम झाला. असो.

ठाकुर ईसरसिंगाचें किल्ल्यांतून उच्चाटण झाल्यावर मानसिंग त्याचेकडे गेला नाहीं; त्याचें कारण मोहनसिंगाचा वरील निश्चय होय. आपला भाऊ मुसलमान होणार ही गोष्ट मानसिंगाच्या कोमल हृदयास मोठी कडू लागली! ठाकुर ईसरसिंगाची व त्याची संगत घडून आली नसती तर त्यास मोहनसिंगाच्या धर्मांतराची गोष्ट इतकी खटकली नसती. कारण, आतांपर्यंत त्याच्या समोर अनेकांनीं शेंडी काढून दाढी वाढविली होती! त्यावेळीं तो एक शिरस्ताच होता. अनेक लोक अनेक कारणानें आपखुशीनें महम्मदपैगंबराच्या अर्धचंद्रांकित निशाणाखालीं येऊन, इस्लामधर्माचें यश वाढवीत होते! अनेक

हिंदंच्या दृष्टीनें त्यांत आतां विशेष कांहीं राहिलें नव्हतें; परंतु मानसिंगाला मात्र नवीन दृष्टी आल्यापासून " हें कांहीं बरें नाहीं. हा धर्माचा नाश आहे. " असें वाटूं लागलें; म्हणून तो आपल्या वडील भावाचा निश्चय ऐकतांच त्याचेकडे धाऊन आला व त्यानें अत्यंत आशेनें व काकुळतीनें त्यास वरील प्रश्न विचारिला.

त्याचेवर मोहनसिंगानें काय उत्तर दिलें तें वाचकांपुढें आहेच. तो पुढें म्हणाला, " मानसिंगा, मी तर होणारच आहें मुसलमान; पण माझ्याबरोबर तूंही हो, असें मी तुला आग्रहानें सांगतों. आतांपर्यंत हिंदू राहून काय मिळविलें तें दिसतेंच आहे !"

" मग इस्लामधर्मांत गेल्यावर तरी आपल्यास असा कोणता मोक्ष मिळणार आहे ? " मानसिंगानें बऱ्याच धिटाईनें प्रश्न केला.

" कोणता मोक्ष मिळणार आहे ?— " मोहनसिंग कुचेष्टेनें म्हणाला, "मोक्ष नाहीं मिळायचा कारण मोक्ष देण्याचें काम मूर्ख हिंदुधर्माचें आहे ! आमच्या इस्लामधर्माचें नव्हे."

आमच्या अल्लाचें काम रोख ठोक आहे. मनुष्य मुसलमान होतो न होतो, तोंच त्यास मोठेपणा प्राप्त होतो. वैभव त्याचेकडे धाऊन येतें, आणि अधिकार त्याच्या गळ्यांत माळ घालतो ! हिंदुधर्माचें आहे कांहीं तसें ? हिंदुत्व शरीरी आहे तोंपर्यंत मुसलमानांच्या लाथा खाव्या, लुबाडलें जावें, घरांतून बायका हुसकल्या जाव्यात, आणि सदा काळजींत असावें. असला हा तुमचा नपुंसक धर्म. त्याला उराशीं धरून इतका वेळ झालें इतकें कल्याण पुरे झालें ! "

" असें कसें म्हणतात दादा ? ज्यानें त्यानें आपला धर्म श्रेष्ठ मानलाच पाहिजे. "

" हां–इथेंच चुकतो आहेस. " मोहनसिंग एकदम म्हणाला, "ज्या वस्तूला काडीचेंही महत्व नाहीं, तिला उगीच नस्तें महत्व द्यायचें कसें बुवा? "

"कां बरें ? हिंदुधर्मांत काय वाईट आहे ?"

"चांगलें काय आहे तें सांग बघूं ?" मोहनसिंग म्हणाला, "वेड्या मानसिंगा, तूं नीट डोळे उघडून पाहिलेंस तर या तुमच्या धर्मानेंच तुमचें वाटोळें झाल्याचें तुला दिसून येईल. सांग, तुमचा धर्म एवढा बलीष्ठ होता, तर मुसलमानांनीं येऊन तुम्हाला सारखें कां झोडपून काढिलें ? तुमचीं घरेंदारें कां लुटलीं ? तुमच्या बायका कां काढून नेल्या ? तुमच्या शरीरांत हिंदुत्व असेपर्यंत तुमचें काय कोटकल्याण झालें आहे तें सांग कीं ? का तुमचा मान राहिला आहे, का वैभव राहिलें आहे, का संपत्ति बचावली आहे, का सुख मिळालें आहे; काय झालें आहे तें सांग? मुसलमानांनीं हजारों देवता फोडून छिन्नविछिन्न केल्या; त्यावेळीं एका देवतेनेंतरी हात उचलायचा होता ! त्याचप्रमाणें, हजारों देवळें मशिदीमध्यें रुपांतरीत झालीं, आणि हे अनर्थ होत असतांना तुमच्या ब्रम्हांडनायकानें मुकाटयानें मूग गिळले ? सांग बरें, याचें काय कारण ? बरें, तुमचे देव तरी साधे आहेत ? हे एकेकापेक्षां एकेक बहादुर ! कोणी दोन तोंडांचा तर कोणी सहा तोंडांचा. कोणी चार हातांचा तर कोणी आठ हातांचा ! पुराणांत पाहावें तर असे एकेक पराक्रम त्यांनीं गजविल्याचें वर्णन केलें आहे कीं, वाहवा ! पण बेटयांचें बळ आतांच कुठें गेलें कुणाला माहीत ? नव्हे बाबा, ते देवही नव्हत आणि तुमचा तो सनातन धर्मही नव्हे ! लेकांनीं भटांनीं वाटेल तो खुळचटपणा सांगावा आणि तुम्ही बाकीच्या मूर्खांनीं तो मुकाटयानें ऐकावा एवढेंच ! मानसिंगा, सोरटीसोमनाथाच्या स्वारीची हकीगत तुला माहीत आहे ? महंमूद गजनवीनें अनेक ब्राम्हणांच्या अनेक शापांतही अल्ला हो अकबर ! अशी आरोळी मारून देवालयावर हल्ला चढविला ! त्यावेळीं तुमच्या त्या जगन्नियंत्या सोमनाथाच्या रक्षणार्थ ब्राम्हणांना तोंडें वेंगाडावीं लागलीं ! आहे कांहीं खुळेपणाला पार ! पण महंमुदानें तें ऐकलें नाहीं- 'बुत्फरोश' (मूर्तीविकणारा) म्हणवून घेण्यापेक्षां बुत्‌शिकन (मूर्ति फोडणारा )असें म्हणवून घेणें त्यास विशेष बहुमानाचें वाटलें, आणि असें म्हणतात त्यानें दिसण्यांत अगडबंब अशा त्या सोमनाथाच्या टाळक्यांत घण घातला !"

स्वधर्माची ही निंदा ऐकून मानसिंगाच्या हृदयाचें पाणी पाणी झालें ! तो खेदानें म्हणाला, " दादाभाई, पुरे करा आतां. तुमची ही निंदा माझ्याच्यानें ऐकवत नाहीं आतां."

हें त्याचें उत्तर ऐकून मोहनसिंग अगदीं मनापासून हंसला, आणि म्हणाला, "अरेरे मानसिंगा, या साध्या गोष्टींतही तुमच्या धर्मानें तुमची सोडवणूक करूं नये अं ! अफसोस ! सख्त अफसोस !! "

आपल्याकडून मोहनसिंगाची समजूत पडणार नाहीं, असें मानसिंगास वाटलें आणि म्हणून तो कांहींसा निराशेनें म्हणाला, "भाईजी, कांहीं असलें-तरी आपल्या पूर्वजांचा धर्म सोडून स्वजातींतून उठणें हें कांहीं चांगलें नाहीं."

मोहनसिंग त्वेषानें म्हणाला,"त्या पाजी रजपूत जातीचें नांव काढूं नकोस माझ्या पुढें ! मानसिंग, तूं आतां लहान नाहींस आणि मागील सर्व गोष्टीही तुला माहीत आहेत. सांग बरें, आपल्या जातभाईनीं आपल्याशीं कसें वर्तन केलें.? आपले पिताजी केवळ मोंगलांच्या आश्रयास आले, एवढयावर आमची निमकहराम रजपूत जात आपल्या कुटुंबाशीं किती हलकटपणानें वागली, हें तुला माहीत नाहीं काय? त्याचा सूड आपण घ्यायला नको काय ? अधिकार ,संपत्ति, सौख्य, मान एवढयाकरितांच मी मुसलमान होणार असें नाहीं तर रजपूतजातीला तुडविण्याच्या राक्षसी इच्छेनें मी मुसमान होणार आहें ! रजपूत मोहनसिंग हा रजपुतांना क्षुद्र वाटला आहे, वाटतो आहे पण ज्यावेळीं मी एखादा खान होईन त्यावेळीं त्यांचा कर्दनकाळ होईन; मुसलमान झाल्यावर मी हिंदुधर्माचा व जातीचा नाश करतांना प्रत्यक्ष आई-बापांचासुद्धां मुलाहिजा धरणार नाहीं, आणखी तर काय! तुला माझें म्हणणें अद्यापीही रुचत नाहीं. ठीक आहे. जा तर. तूं माझा शत्रु आहेस. असें मी समजतों!"

"छे छे दादा; असे वर्दळीवर येऊं नका. तुम्ही विधर्मी झालांत म्हणूनच तुमचें माझें प्रेमाचें नातें कां कुठें तुटेल ? "

" अलबत तुटेल ! तूं मुसलमान झाला नाहींस तर तूं माझा भाऊ नव्हेस. आमच्या बादशाहांचा धर्म तूं स्वीकारला नाहींस तर तूं माझा कोणी नव्हेस!

अरबदेशांतून मोठ्या धडाक्यानें धावत येऊन हिंदूंच्या छातीवर नाचणारा इस्लाम तूं आपला म्हटला नाहींस तूं मनुष्य नव्हेस ! मानसिंगा , तूं मर्द आहेस ना, तर तूं मुसलमान हो ! माझा भाऊ आहेस ना तर मुसलमान हो ! आपल्या मानापनाची तुला चाड असेल तर मुसलमान हो ! ' अल्ला हो अकबर ! ' या विजयशाली मंत्रानें आपण मेवाड नामशेष करूं ! रजपुतांचा निर्वंश करूं !! हिंदुधर्माचा मुडदा जाळून नाहींसा करूं !!! "

" भाईसाहेब, " मानसिंग मध्येंच म्हणाला, " तुमचें हें हृदय भेदक बोलणें आतां मला ऐकवत नाहीं. " असें म्हणून अत्यंत खिन्न अंतःकरणानें तो तेथून निघून गेला !

मोहनसिंगाचें पैशाचिक हास्य मागें दुमदुमत राहिलें !

आपल्या भावाची विचारसरणी पाहून मानसिंगाचें हृदय अत्यंत व्याकुळ झालें ! कोणीकडे ठाकुर ईसरसिंगाचें भाषण आणि कोणीकडे मोहनसिंगाचे विचार !

आठ न् आठ दिवस मोहनसिंगास या पापापासून कसें परावृत्त करावें याचा विचार करीत मानसिंगानें एकांतांत कंठले ! कांहीं तोड सुचेना कोणाचें वजन त्याच्या विचारावर पडून त्याचें मन त्या अनिष्ट गोष्टीपासून फिरेल, हें त्याच्या लक्ष्यांत येईना ! अगदीं शेवटीं मातृप्रेमानें कांहीं जमल्यास पाहावें, असा विचार करून आईला आणण्याकरितां तो चितोडास गेला !

---

# परिच्छेद १० वा

## निर्लज्जपणाचें कांटेरी राज्यसुख !

श्रीमन्महाराजाधिराज महिमहेन्द्र यावदार्य कुलदिवाकर महाराणाजी श्री १०८ श्री संगराजित धीरवीर चिरप्रतापी मेदपाठाधीश *

—वाचकांनों ! चितोडचे मोंगलनिर्मित महाराणा संगराजित—चुकलों—श्री १०८ श्री संगराजित महाराज यांच्या पदवीची ही तेढी चढण चढत असतां, मध्यंतरी थोडी विश्रांति घेण्याची इच्छा होण्याचा संभव आहे, नाहीं ?

तख्तनशीन झाल्यापासून- केल्यापासून हें विशेष बरोबर—त्याच्या ताब्यांत असलेल्या व नसलेल्याही मेवाडदेशावर सुखानें राज्य करीत होते ! मोंगलांच्या कृपाछत्राखालींच त्यांच्या राज्यपदाचा जन्म असल्यामुळें भूपतीच्या कित्येक कर्तव्यांतून त्यांची आपोआपच सुटका झाली होती. विधर्मी लोकांकडून राज्यदान घेतलें असल्यामुळें स्वधर्मानें सांगितलेल्या प्रजापालनाच्या जबाबदारींतून ते सर्वस्वीं सुटले होते, आणि परचक्राचें भय तर त्यांच्या दृष्टिक्षेपांत येणेंही शक्य नव्हतें ! मग अशा बिनघोरी राज्यपदापासून सुख कां बरें मिळणार नाहीं ? बिनश्रमाच्या वैभवप्राप्तीनें मनाला आनंद कां बरें होणार नाहीं ?

प—रं—तु !!!

---

* मेदपाट=मेवाड. श्री१०८ श्री=राजपुतान्यांत मोठया लोकांच्या नांवामागें त्यांच्या योग्यतेनुरूप अनेक श्रीकार लावण्याचा प्रघात आहे. संपत्ति, अधिकार, तपोधन, राजैश्वर्य इत्यादि वैभवास अनसरून एका पासून अनेक संख्येपर्यंत—हजारलाखापर्यंत ही संभव आहे—श्रीकार लावून नांव मंडित करावयाचें असतें. या हिशेबीं चितोडच्या महाराण्यांना १०८ श्री वांटणीस आल्या—होत्या—आहेत! इतके श्रीकार कागदावर लिहीण्यापेक्षां आंकडा टाकून हा शिष्टाचार सांभाळण्याची ज्या सुज्ञ मनुष्यानें युक्ति काढली, त्यानें वेळेची व कागदाची तर विलक्षण बचत केलीच, शिवाय भूत-वर्तमान कालांतील लेखकांवरही अगणित उपकार करून ठेविले आहेत हें बिनशर्त कबूल केलें पाहिजे.

महाराणा संगराजित यांचा राज्यरोहणविधी खुद्द बादशाहा जहांगिर याच्या देखरेखीखालीं मोठ्या धूमधडाक्यानें झाला ! 'महाराणा संगराजित महाराज की जय!' या जयजयकारानें गगनाचा इतका वेळ भेद केला कीं, त्याच्या योगें आकाशाची चाळण होऊन त्याच्या आंतलें स्वर्गसौख्य प्रचंड वर्षावानें महाराणाजींचे माथ्यावर कोसळण्यास कसलीच हरकत नव्हती; परंतु खरें सांगायचें म्हणजे त्यांचें लक्ष्य त्या सौख्यवर्षावाकडे नसून दुसरीकडेच होतें ! या आनंद कोलाहलांतही चित्ताचा ग्राह करणारे कांहीं खोंचक उद्गार निघतात कीं काय ? इकडे त्यांचे कान होते व भानही होतें! आपल्याकरितां सुरू असलेल्या त्या समारंभांत व्यग्र होण्याचा महाराणाजीनीं पुष्कळ प्रयत्न केला; परंतु मन ती गोष्ट ऐकेना आणि त्यामुळें कर्मेंद्रियेंही चुकार झालीं !

दुधाकरितां लालायित झालेलें बिडाल, कुजक्या मांसखंडावर टपलेला कृष्णकाक, परछिद्रान्वेषणांत दंग असलेला दुष्ट, कलहाग्नीकरितां कोळसे जमविणारा चहाडखोर, मावळत्या विषयवासनेच्या वेडानें पछाडून एखाद्या तरुणिच्या करास हात लावण्यास तयार झालेला गलितांग वृद्ध आणि स्वधर्म--स्वजातीला पायाखालीं तुडवून शत्रूच्याकृपेनें राज्यासनीं चढणारा नराधम ही सर्व मंडळी एकाच मनःस्थितींत असतात ! संगराजित ऊर्फ सुग्राजी याचस्थितींत होते. मनलज्जेमुळें घामेजलेल्या मुद्रेनें ते चितोडकरांच्या मुद्रा न्याहाळत होते आणि आपल्यासंबंधीं ते मुकाट्यानें काय म्हणतात, हें ऐकण्यास त्यांचे कान टपलेले होते ! त्यांची ही इच्छा कांहीं अगदींच वांया गेली नाहीं.

" भावाशीं– प्रतापसिंगाशीं– केलेल्या द्रोहाचें बक्षीस मिळालें एकदाचें ? धन्य झालांत ! आतां तरी सुखी व्हा ! " हे शब्द अनेकांच्या मुद्रेवर लिहिलेले त्यांना दिसले !

" वाहवा ! राज्यारोहणाचा समारंभ फारच फक्कड झाला बुवा ! अगदीं वृद्ध–तरुणीच्या विवाहाप्रमाणें शोभा आली ! " असेंही कोणी कोणी पुटपुटलें.

" बाकी या समारंभाचें श्रेय कांहीं महाराजांना देतां येणार नाहीं ! महाराणीसाहेब मैनलदेवीसरकार ( सुम्राजीची पत्नी )--यांनीं किती काळापूर्वीपासून याचें संधान बांधून ठेविलें होतें ! फार-फार दिवसांपूर्वीची गोष्ट आहे ती. बोलण्यासारखी नाहीं ती ! " असेंही कित्येकांनीं हळूंची परस्परांत ह्मणून आंख मिचकावले होते !

हिरवळीवरून चालत असतां ज्याप्रमाणें न कळत कांटयावर पाय पडावा, त्याचप्रमाणें एवढया मोठया जयजयकारांतही महाराणाजींच्या हृदयाला हे वाक्प्रहार जाऊन भिडले ! त्यामुळें त्यांचें हृदय व्यथित झालें; पण मुद्रामात्र हासरी ठेवावी लागली ! अंतःकरण अत्यंत कष्टी असतां, मुद्रेवर मुद्दाम हास्य दर्शविणें ह्मणजे केवढी भयंकर कसरत आहे ती ! सुम्राजी यांतून मोठया शिताफीनें बाहेर पडले. लौकरच त्यांची शांततेची कारकीर्द सुरू झाली.

\+ + + +

" राज्यसुख ! राज्यसुख !-हेंच का तें ? याचकरितां का मी जिवाचा आटापाटा केला ? ऐन तारुण्यांत जात, गोत, कूल, धर्म, नीति सर्व सोडून एका क्षुल्लक कारणानें प्रतापाशीं भांडून मी मोंगलांकडे गेलों, तें याच सुखाच्या प्राप्तीकरितां का ?-तारुण्य मोंगलांच्या अजीजींत घालविलें, प्रौढावस्थाही त्यांच्याच तोंडाकडे पाहात घालविली आणि शेवटीं या वृद्धावस्थेंत येऊन पडल्यावर, हें राज्य मला मिळालें ! संबंध आयुष्याचा खटाटोप हा एवढया-करितांच का होता ? जर माझा एवढाच हेतु होता, तर मग तो सिद्धिस गेल्यावर मनाला समाधान कां वाटूं नये ? राज्यसुखाच्या या कडेलोटांत माझें मन निमग्न कां होऊं नये ?-काय चुकलें, कुठें चुकलें, आणि कसलें चुकलें ?-चितोडच्या निष्कंटक राज्यावर बसल्यावर माझ्या मनाला इतक्या यातना व्हाव्यात ! राज्य सांभाळण्याची काडीइतकीही काळजी नसतां, काळजाची हुरहूर थांबूं नये !! माझ्या नांवाचा जयजयकार भोंवताल; दुमदुमत असतांही मी स्मशानांत वावरत असून कोल्हा-भालूकांची ओरड

ऐकतों आहे, असें वाटावें ? कशाचा हा सारा परिणाम ?–राज्यसुख हें असेंच असतें का ? राज्यसुख–राज्यसुख !!– ”

राज्यारूढ झाल्यापासून महाराणा सुम्राजीच्या मनांत हेच विचार येत होते, याच विचारांचा ध्यास घेऊन तो खंगत चालला होता ! राज्यासनी बसला त्यावेळीं त्याचें वय अदमासें बासष्ट वर्षांचें होतें ! पण राज्यसुख भोगून वर्ष दीडवर्ष झालें नाहीं–तो–तों पाऊणशें वर्षांपेक्षांही जास्त झातारों दिसूं लागला ! आपल्याला मृत्यु येईल तर बरें असें त्यास मनापासून वाटूं लागले !—— कां बरें !

आपल्या मनाचा संताप, दुःख, खेद, निराशा यांना घालविण्याकरितां म्हणून महाराणा सुम्राजीनें आपल्याकरितां एक एकांत महाल कायम केला होता. वेळ सांपडला कीं त्यांत तो येऊन बसे; परंतु तेथें आल्यावर तरी काय, त्याचे विकार व विचार इतके उत्तेजित होत कीं, ते त्यास स्वस्थ बसूं देत नसत ! तेथें भिंतीवर रेखाटलेल्या रामचरित्रांतील चित्रांप्रमाणें त्यास स्वतःच्या आयुष्यांतील अनेक बरिंवाईट चित्रें दिसूं लागत, आणि त्यास पिशाळून सोडीत. आजही तो कांहीं न खातांपितां स्वतःशींच नाखुश होऊन तेथें येऊन कुढत बसला होता ! त्याची विचारशक्ति त्यास गेल्या वर्षा दीडवर्षांचें चरित्र सांगत होती !

“ मृगजलास फसलेल्या हरिणापेक्षांही माझी स्थिति वाईट आहे का ? अलबत आहे. अरण्यांत स्वच्छंदानें राहून कालक्रमण करणारा निरुपद्रवी हरीण कोणीकडे आणि मोंगलांच्या मर्जीप्रमाणें माना डोलवून चितोडचा मोडका महाराणा झालेला सुम्राजी कोणीकडे ? –राज्यसुख ! राज्य सुख !! –काय मजा आहे या राज्यसुखाची ! ”

असें बडबडत तो एका खिडकीशीं जाऊन उभा राहिला ! त्यानें बाहेरच्या आसमंतांत नजर टाकली तों नेमकी त्याची नजर कुंभो * महाराण्यानें

---

* साध्वी मिराबाई हिचा पति व महाराणा मोकलजी ( चोंडानें ज्याच्या करितांच राज्य त्याग केला तो. ) याचा मुलगा. मेवाडच्या पुण्यश्लोक नक्षत्रमालिकेंत याचीही गणना करितात. यानें इ.स. १४१९ पासून १४६९ पर्यंत राज्य केलें.

उभारलेल्या जयस्तंभाकडे गेली ! कलाकौशल्यानें युक्त अशा त्या विजय-चिन्हाकडे पाहतांच सुग्राजी थिजल्यासारखा झाला व टकटक त्याचेकडे पाहूं लागला ! बराच वेळ त्यानें त्याचेकडे पाहिलें आणि उन्मत्तपणानें म्हटलें, "जयस्तंभा, या निर्लज्ज व नेभळट सुग्राजीकडे तूं आतां वाटेल तितका वेळ टवकारून पहा–अगदीं खूप टवकारून पाहा !–लाव टकटक !–नाहीं, आतां मी तुझ्या दरडावणीच्या नजरेला भिणार नाहीं, आणि लाजणारही पण नाहीं!–आज मी पुरा निस्संग झालों आहें ! रोज मी या खिडकींत येतांच आणि तुझ्यावर नजर टाकतांच; आपल्या भेदक दृष्टीनें तूं मला भिववीत होतास व लाजवित होतास; पण आज ती तुझी जादू मी तोडून टाकीत आहें ! तुला न भिण्याइतका मी धीट झालों आहे आणि न लाजण्याइतका मी निर्लज्ज बनलों आहें ! कुंभोच्या विजयचिन्हा ! महाराण्याच्या अधिकाराच्या जोरावर मला तुला नमवितां येणार नाहीं; पण मनांत आणिलें तर मी तुला जमीनदोस्त-मात्र करूं शकेन ! मोंगलांचा दोस्त काय करूं शकणार नाहीं ?–अहाहा ! काय हें राज्यसुख ! केवढा हा त्याचा प्रभाव !!–चितोडच्या मोडक्या महाराणा सुग्राजी, काय हें तुझें राज्यसुख ! " असें म्हणत त्यानें पुनः एकवार त्या विजयस्तंभाकडे नजर टाकली आणि तो मोठ्यांदा हंसला !

याचवेळीं एक पोक्त वयाची स्त्री तेथें आली ! वयानें ती पन्नासाच्याही पुढें चारपांच वर्षें गेली असेल; पण मनानें मात्र ती चाळीस वर्षेंतरी मागें होती ! कारण तिच्या त्या नखशिखान्त शृंगारलेल्या बऱ्याचशा स्थूल देहाकडे पाहतांच, पंधरा सोळा वर्षें वयाच्या अल्लड तरुणीलाही दागिने लेण्याची हौस थोडी कमीच असेल, असें वाटल्यावांचून राहिलें नसतें. हातपाय, डोकें, नाक, कान, गळा अगदीं जेथें म्हणून दागिने घालणें शक्य आहे, आणि चाल आहे, ते ते शरीराचे सर्व भाग तिनें सुवर्णाच्या व हिऱ्या मोत्यांच्या दागिन्यांनीं अक्षरशः मढवून काढिले होते. अनंत फुलांनीं बहरलेल्या लतिकेला पाहून भ्रमरही इतका वेडा होणार नाहीं; घनदाट आम्रमंजिरीच्या घमघमटानें कोकीलही अगदींच ताल सोडणार नाहीं; इतका एखादा नवशिक्या चोर दागिन्यांनीं फुललेल्या मैनलदेखील–त्या वृद्धरमणीला–पाहून

कालचला असतां आणि त्यानें सूर्यनारायणाला साक्षी ठेवून अगदीं राजमार्गा-वरही सोन्याची लंका लुटली असती !

चितोडची पट्टराणी, सुम्राजी महाराजांची महाराणी व मेवाडच्या प्रजेची राणीसरकार होतीच तशी दागीन्याची शौकी ! उभ्या जन्मांत या देवीनें दागिन्याचीच बाटाघाट केली व त्यांच्या अस्तित्वावरच ती जगली ! दागिने! दागिने!! दागिने !!! हेंच तिचें जीवन, हेंच तिचें पातिव्रत्य, आणि हेंच तिचें ध्येय ! चितोडच्या तीन्ही जोहारांत हजारों बायका अग्निमुखीं पडल्या याचें कारण त्यांची दागिन्याची हौस पुरली नसावी, असें मैनलदेवीला मनापासून वाटे; शिवाय त्या सर्व बायांनीं आगींत उडया घेऊन प्राण दिले याचेंतरी कारण अग्नि सोन्याच्या रंगाचा आहे म्हणून !!!

आतां मैनलदेवी प्रौढ, स्थुल व गलितगात्रा होती; पण तिच्या वयाचें एकेक वर्ष बाद करीत जर मागें गेलें, तर तेवढयाबरोबर तिच्या शरीराचा सढळपणा कमी होत जाईल आणि ऐन तारुण्यांत कोणाचीही नजर दाबून टाकण्याइतकें तिचें सौंदर्य भरदार असल्याचें दिसून येईल ! पण या सर्व भूतकालाच्या गोष्टी ! आपल्या खुशामती दासींच्यासमोर मैनलदेवी आर-शांत पाहात 'तेहि नो दिवसा गतः 'असें म्हणत रोज सुस्कारा टाकीत होती, आणि म्हणूनच जणूंकाय कालाचा प्रभाव जसा शरीरावर गाजला तसा मना-वर गाजूं नये म्हणून ती आपल्या पूर्वीच्या स्वभावाला फार जपून होती. ऐन तारुण्यांत ती जितकी थिल्लर, मानी, कर्कश, स्वस्तुतिप्रिय, बोलभांड आणि वक्रहृदयीं होती; तितकीच आतांही होती ! किंबहुना वयाबरोबर जसा शरीराला जूनपणा आला होता, तसाच तिचा स्वभावही सर्व बाजूंनीं कोणालाही न नरमण्यासारखा कणखर झाला होता ! अर्थात् आमच्या सुम्राजीमहाराजांचें आतांपर्यंतचें कौटुंबिक सौख्य किती बहारीचें असेल, हें सांगायाला आणखी निराळें कवित्व केलें पाहिज, अशांतला मुळींच भाग नाहीं. असो.

मैनलदेवी त्या महालांत येतांच तिनें आपल्या पतीकडे पाहिलें. याचवेळीं सुम्राजी वेडयासारखा हंसला होता. त्याबरोबर ही प्रेमळपत्नी पुढें होऊन एकदम म्हणाली, "काय हें? हें असं वेडयासारखं केवढयांदा हंसायचंय!"

सुम्राजी चटकन् मागें वळला. एखाद्या हिंस्रपशूच्या क्रूरदृष्टीनें त्यानें तिच्याकडे पाहिलें ! जणुंकाय तिच्यावर झडप घालण्याकरितां तो किरण साधत होता; पण मैनलदेवी कांहीं कोमलांगी-कोमलस्वभावी–हरिणी नव्हती ! आपल्या पतिरूपी पाळीव जनावराला कसें वळवावयाचें, याचा तिला अभ्यास थोडाच करायचा होता ? जवळ जवळ चार तपें ती आपल्या पतीला ओळखत होती ! मग ती त्यास कां भील? त्याच्या क्षुब्ध नजरेला तिनें आपलीही तेढी नजर सामनी देऊन ती म्हणाली, "पुनः आपल्या डोक्यांत एखादें भूत शिरलं वाटतं ?"

सूर्यतापांत सांपडलेल्या हिमकणाप्रमाणें सुम्राजीचा क्षोभ झिरपूं लागला, तो उद्वेगानें पुढें येऊन म्हणाला, "नाहीं राणीसरकार ! तुम्ही एवढया जबरदस्त मांत्रिक माझ्या सन्निध असतां, मला पछाडण्याची कोणत्या भुताची छाती आहे ?" नंतर तो अत्यंत विनयाचें सोंग घेऊन म्हणाला, "सरकारांचें कां आगमन झालें होतें इकडे ?"

"हें असं अलीकडे मला सारखं खोचून टोचून बोलायचं !–का बरं माझा असा छळ करायचा ?—मी नाहीं जा–"असं म्हणून तिनें तेथील एका कोचावर घालून घेतलें आणि हुंदके देण्यास प्रारंभ केला ! बिचारा सुम्राजी! ही लीला रोजची असूनही तो अगदीं गांगरून गेला !

थोड्यावेळानें हुंदके देण्याचें 'स्वगत' झाल्यावर मैनलदेवी उघडपणें म्हणाली, "नाहीं आतां माझ्यानें हा छळ सोसवत ! मला पणवंड होण्याची वेळ आली तरी माझा असा अपमान करायला, तुमच्या मनाला कांहींच कसं वाटत नाहीं म्हणतें–खरोखर तुमचें हें असलं खवचट बोलणं ऐकून मला जीव नकोसा वाटतो!–नाहीं, मी देतेंच आजच्या आज जीव–हो, मी जर कुणाला नकोशी झालें आहें –तर जगून करायचं काय ? एकटेच राज्य भोगा हो-"असें म्हणून तिनें हातवारे करीत तेथून झपाट्यानें गमन केलें !

खुळा सुम्राजी ! तिच्या मागोमाग धांवत गेला. आणि त्यानें तिला धरून परत आणिली आणि म्हटलें, "बरं बुवा, आम्ही चुकलों ! आम्ही आपली क्षमा मागतों मगतर झालं ! हं–सांगा कां येणं केलं होतं ?"

अर्थात् एवढयाशा मिनतीनें प्रसन्न होण्याइतकी मैनलदेवी भोळी नव्हती. तिनें शक्य तितका पोरकटपणा करून नंतर प्रसन्न होऊन म्हटलं, " आपल्या लाडक्या सलीमाचा ( जाहांगिर बादशाहाचा ) वाढदिवस जवळच आला आहे, लक्षात आहे का ? फार तर पंचवीस दिवस अवकाश असेल. त्यावेळीं मी दिल्लीला जायचं ठरवलं आहे. आपण येणार का ? नजरनजराणा काय न्यायचा तें ठरवायला नको कां आतांपासून ?– "

असें त्यांचें बोलणें चाललें आहे तोंच एका दासीनें आंत येऊन मानसिंग दिल्लीहून आल्याची वर्दी दिली ! त्याबरोबर पुत्रागमनाच्या आनंदांत मैनलदेवी तेथून निघून गेली !

युवराजी एकटाच विचार करीत बसला ! आपल्या नेभळट वर्तनाचें त्यास स्मरण झालें व तो स्वतःवरच संतापला ! तो दांतओंठ खात स्वगत म्हणाला , " + + चें सर्व लक्ष दिल्लीकडे लागलेलें ! हिच्या तोंडावर संतापून तिचा धिक्कार करण्याचा मला कां बरें धीर होत नाहीं ?–मी पशू आहें– निव्वळ बेअकली पशू आहें ! त्याशिवाय या लावसटीचा मजवर वरचष्मा कां होतो ? दुसऱ्या एखाद्या पुरुषाची अशी पत्नी असती तर तिचा प्राण तरी घेतला असता, किंवा तिचें पुनः तोंड तरी पाहिलें नसतें ! ( विचार करीत ) बस्स् आपणही असेंच केलें पाहिजे ! सर्व धैर्य एकवटून या चांडाळणीला जर मी ठार केलें तरच बरें होईल. माझ्या मनाला थोडें तरी समाधान होईल ! थांब, छिनाल मैनल ! तुझा प्राण घेतोंच घेतों ! माझ्या संबंध आयुष्याची काळोखी तूंच आहेस ! तुला नाहींसें केलेंच पाहिजे ! –हा ! हें राज्यसुख ! निर्लज्जपणाचें कांटेरी राज्यसुख !!

---

# परिच्छेद ११ वा.

## " निर्लज्जे ! हा तुझा खुषरोज ! "

मानसिंगाच्या मनाचें स्वरूप पार पालटून गेल्यामुळें, आपल्या मातेच्या प्रेमवात्सल्ययुक्त स्वागताचें त्यास पूर्वीप्रमाणें विशेष कौतुक वाटलें नाहीं; उलट, तिची ती अलंकार विभूषित मूर्ति पाहून आणि तिच्या पोक्तवयाला न शोभणारा तिचा थिल्लरपणा पाहून, त्याच्या मनाला कसेंसेंच वाटलें. यापूर्वी तो दिल्लीहून आला असतां, मैनलदेवी त्याच्या आगमनाचें इतकें कांहीं चोज करी आणि त्या लाडिकपणांत तो इतका कांहीं बुडून जाई कीं, तो जगाला विसरून जात असे, असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. त्यावेळीं त्या दोघांही मातापुत्रांचें दिल्लीकडील हकीगतीविषयीं इतकें कांहीं लांबलचक रहस्य चाले कीं, दिवसाचे आखे चोवीस तास त्यांना कमीच पडत; परंतु यावेळीं मात्र सर्व प्रकार उलटा झाला. मैनलदेवीच्या अनेकानेक प्रश्नाला त्यानें हो वा नाहीं अशीं अगदीं तोकड्यांत तोकडीं उत्तरें दिलीं. आपल्या काटछाटीच्या जबाबांनीं आपल्या आईच्या प्रश्नांला खळ पडून, ती आपल्यास कांहीं निराळें बोलण्यास सवड होईल, अशी मानसिंगास मोठी आशा होती; परंतु संभाषण करण्याचे बाबतींत मैनलदेवी इतकी खंबीर होती कीं, तिच्या पन्नास पंचावन्न वर्षांच्या अमदानींत तिच्या जवळचा बडबडीचा दारुगोळा संपल्याचा एखादा दिवसही सांपडणें अशक्य होतें; मग ती आजवरी कशी पराभूत होणार ?—आपल्या मुलाच्या उदासीनतेकडे काडीइतकेंही लक्ष्य न देतां, तिनें दिल्ली दरबारच्या बादशहाच्या, जनानखानाच्या, अनेक ओळखीच्या ठिकाणच्या गोष्टी एकामागून एक अगर आलटून पालटून विचारिल्या !—बिचारा मानसिंग ! तटकन् तोडून बोलण्याचें त्यास मनोधैर्य नसल्यामुळें, आपल्या मातेच्या बडबडीपुढें अगदीं जडमूढ बनला !

किती वेळांनीं तरी त्यास सुस्कारा टाकण्यास व स्वतःचे चार शब्द उच्चारण्यास एक छोटीशी संधि मिळाली. त्याच्या बोलण्यांत एक दासी

कांहीं कारणामुळें आड आली व तेवढा प्रसंग गांठून त्यानें शब्दोच्चार केला, " **माजी** मी आतां जरा पिताजीकडे जाऊन येतों अं ! मग बोलूं आपण आणखी ! " असें म्हणत तो उठला व जाऊं लागला.

पण मैनलदेवीनें दासीची हकालपट्टी करीत, त्याचा हात धरून त्यास खालीं बसविलें आणि म्हटलें, " बैस रे मान, आणखी एकच गोष्ट मला विचारायची आहे. फार महत्वाची आहे ती, तेवढी सांग न् मग जा कुठं जायचं तें. " असें म्हणत ती किंचित् पुढें झुकली व हलक्या स्वरांत म्हणाली, " कायरे बाळ, मेहरुन्निसाचं * पुढं काय झालं ? सलीमचं म्हणणं ऐकण्याचा तिचा इरादा आहे कीं नाहीं ?— कांहीं कळलं का तुला ? ती फार फार सुंदर आहे म्हणे ! सलीम तिच्या नादानं अगदीं वेडा झाला आहे म्हणतात. इतकी का खुबसूरत आहे ती ?—तुझ्या दृष्टीला ती कधीं पडली आहे कीं नाहीं ?— काय नाहीं पडली ?— तूं प्रयत्नच केला नाहींस ! वारे शहाण्या ! अगदींच कसारे अरसिक आहेस ! अशा गमती करण्या-भवरण्याचं तर हें तुझं वय !— लहानपणापासून पाहातें आहे, हा असा तुझा बायकी स्वभाव. शोभतं का तुला हें !— का असं वेड्यासारखं माझ्या तोंडाकडे काय पहातोस ?—तिथं पाहण्यासारखं कांहीं राहिलं नाही मान—"

---

* मेहरुन्निसा उर्फ नूरजहान हिच्यावर सलीम उर्फ जहांगिराची अगदीं लहानपणापासून नजर होती. तिच्या आईस व अकबरास ही गोष्ट न रुचून त्यांनीं नूरजहानचें लग्न शेरखान अफगन् याजबरोबर लावून, त्या जोडप्यास बंगालप्रांतीं लावून दिलें. पुढें इ. स. १६०५ मध्यें जहांगिर गादीवर बसला; आणि त्यावेळीं त्यानें आपला मित्र कुतुबुद्दिन यास बंगालकडे पाठवून शेर-खानाचा खून करविला आणि नूरजहानला आग्र्यास आणिलें; परंतु ती बादशहास अनुकूल होईना. तेव्हां जहांगिरानें तिला सकियाबेगम नांवाच्या आपल्या सावत्र आईच्या परिवारांत दासीप्रमाणें ठेविलें. आणि तिचे पोटापाण्याचे हाल होतील, अशी व्यवस्था केली. आमच्या या कथानकाचे वेळीं नूरजहान या अशा दरिद्री स्थितींत होती. यावेळीं ती कपडे शिवून अगर कशिदा काढून आपला निर्वाह चालवीत होती.

## निर्लज्जे ! हा तुझा खुषरोज !

" माजी, तुमच्या बोलण्याला कांहीं ताळ आहे का ?" मोठ्या कष्टानें आपला उद्वेग आंतल्याआंत दाबीत मानसिंगानें म्हटलें, " बोलण्याच्या भरांत तुम्ही मातापुत्राचें नातेंही विसरतां !–काय बोलूं मी ?" असें म्हणून तो झट्दिशीं तेथून निघून गेला.

मैनलदेवीला त्याच्या वेड्या स्वभावाचें मनापासून हंसूं आलें !

आपल्या उद्विग्न मनाला स्थिर करण्याकरितां मानसिंगानें एकांत गांठला. दिल्लीहून तो अस्वस्थ चित्तानेंच निघाला होता. त्यांतच चितोरगडी येतांच मैनलदेवीच्या या अश्लाघ्य भाषणाची भर पडली ! त्याच्या अस्वस्थ चित्ताला ते बेताल बोल फारच कडू वाटले ! वास्तविक त्यानें आपल्या आईच्या स्वभावाची योग्य परीक्षा करून ठेविली असती अगर तिच्या चरित्राचें रहस्य त्यास माहीत असतें तर त्यास त्या शब्दांचें इतकें महत्व वाटलें नसतें. परंतु त्याच्या मनाच्या परिवर्तनानें त्यास प्रत्येक गोष्ट निराळ्या स्वरूपांत दिसूं लागली आणि खटकूं लागली !

मैनलदेवीचे ते कांही शब्द मनांतून काढून टाकण्यास व आपल्या चित्ताची अस्थिरता अंशतः कमी करण्यास मानसिंगास बरेच कष्ट पडले. नंतर तो आपल्या पित्याकडे गेला.

महाराणा सुम्राजी आपल्या कमरेला हात लाऊन एका कोचावर बसला होता. त्याची मुद्रा अत्यंत उदास व चिंतातुर दिसत होती. मानसिंगानें पुढें होऊन त्याच्या प्रकृतीविषयीं स्वतःच्या मनाशीं सखेदाश्चर्य करीत त्यास प्रणाम केला. सुम्राजीनें त्यास आशीर्वाद देत आपल्याजवळ बसण्यास सांगितलें. पुनः तो आपल्या चिंतेंत मग्न झाला.

मानसिंगानें विचारिलें, " पिताजी, आपली तब्येत मला बरोबर नाहीं वाटत. पांच सहा महिन्यापूर्वी मी इथें आलों होतों, त्या वेळेपेक्षां आतां तुमची प्रकृती फारच खालावलेली दिसते. असें कां बरें व्हावें ?"

सुम्राजीनें एक सुस्कारा सोडून दीनमुद्रेनें मानसिंगाकडे पाहात म्हटलें, " बाळ, माझें आतां वय होत आलें. आतां मी खालावतच जाणार. माझ्या

प्रकृतीविषयीं इतकी काळजी करण्यासारखें कांहीं नाहीं." एवढें बोलून त्यानें मुद्दाम हंसण्याचा प्रयत्न केला; आणि संवादाला निराळा ओघ देण्याकरितां तो म्हणाला, बरें तें असो. दिल्लीकडील कांहीं विशेष खबरबात. ठाकुर ईसर-सिंगजींना मुकाट्यानं पकडून आणून तिथं ठेवलं आहे म्हणतात. खरें कां हें ? अगदीं गुप्त आहे ही बातमी—"

मानसिंगानें थोडक्यांत त्या बातमीविषयीं सांगितलें व नंतर म्हटलें, " पिताजी, तें कांहीं असो म्हणा, मी एका निराळ्याच कामाकरितां आलों आहें. फार महत्त्वाचें आहे तें. त्याचा विचार आपण ताबडतोब न केला तर आपल्या कुलाचा फारच मोठा बदलौकिक होईल."

सुप्रजीनें तोंडानें कांहीं एक न बोलतां चेहऱ्यावरच जिज्ञासा दर्शविली. मनाशीं तो असें म्हणाला कीं, काय कोण जाणे ? " लौकिक राहिला असेल तर बदलौकिक होईल कीं नाहीं ! ! !"

मानसिंगानें त्याच्या उद्विग्नमुद्रेकडे पाहात त्यास मोहनसिंगाच्या धर्मांत-राच्या निश्चयाची गोष्ट सांगितली. आपण त्याचा प्रतिकार करण्याचा कसा प्रयत्न केला व त्यानें तिकडे लक्ष्य न देतां आपली व धर्माची कशी टर उड-विली इत्यादि सर्व हकीगत त्यानें अगदीं सविस्तर सांगितली. सुप्राजीनें ती मुकाट्यानें पण लक्ष्यपूर्वक ऐकून घेतली. मध्यंतरी जरी तो कांहीं बोलला नाहीं, तरी मानसिंगाचें बोलणें संपतांच तो एकदम उठला व कांहीं स्वगत व कांहीं उघड अशा धर्तीनें तो म्हणाला, " असें ! एकूण मोहन मुसलमान होणार ?—तो आपला धर्म टाकून परधर्मांत जाणार ?–वाहवा ! फारच आनंदाची गोष्ट आहे ही ! ऐकून मनाचें व कानांचें समाधान झालें !— अगदीं मैनलदेवीच्या मुलाला शोभण्यासारखी गोष्ट होत आहे ही !!!– हरहर ! परमेश्वरा !—हेंच का माझें संसार सौख्य ? " एवढें बोलून तो अत्यंत अस्व-स्थमनानें मागें पुढें येरझारा करूं लागला. अंतरस्थ संतापानें त्याची मुद्रा मोठी उग्र झाली !

मानसिंगाच्या भाषणानें सुप्राजीचें मन हळूं हळूं उत्तेजित होत गेलें होतें. विस्तवावर ठेविलेल्या पाण्यामध्यें ज्याप्रमाणें हळूं हळूं उष्णता येऊन नंतर

त्याला उकळी फुटते; त्याचप्रमाणें मानसिंगाच्या प्रत्येक वाक्याला सुप्राजीचें मन कडकडत गेलें; पण बोलण्याच्या भरांत मानसिंगाचें त्याच्या मुद्रेवरील फेरफाराकडे मुळींच ध्यान गेलें नाहीं. मनुष्याच्या चेहऱ्यावरील विकारदर्शनानें त्याचें मनोगत ताडण्याचें ज्ञान मानसिंगाला नव्हतें त्यामुळें सुप्राजीच्या संतापाचें त्यास थोडेंसें नवल वाटलें !

सुप्राजी येरझारा घालतां घालतां आपल्या मनाशीं कांहीं बोलत असावा. कारण त्याची मुद्रा सारखी पालटत होती. निराशा, क्रोध, खेद, उद्वेग, आश्चर्य इत्यादि विकार उमटत होते आणि विलय पावत होते ! मानसिंगाचें अस्तित्वही त्याच्या लक्ष्यांतून उतरलें असावेंसें दिसलें.

थोडा वेळ तो सारखा फिरत राहिला. एकदोन वेळ तो आपल्या त्या ठरावीक खिडकीजवळही गेला ! यावेळीं संध्याकाळ झाली होती ! मावळत्या सूर्याचे लाल किरण कुंभोराण्याच्या जयस्तंभावर पडले होते. रक्तांवर झालेल्या एखाद्या महापुरुषाप्रमाणें हवे मध्यें ताठ उभा राहून तो सुप्राजीकडे पाहात होता ! " खिडकींतून बाहेर नजर टाकतांच तूं आपल्या तुच्छ दृष्टीनें मला लाजविण्याचा प्रयत्न करणार ? बरें आहे ! सुप्राजीची अब्रु कोणी न घ्यावी !-" असें मनांत म्हणत तो मागें फिरला. विचाराचें चक्र सारखें सुरू होतें. पायांची चालही बिन हरकत सुरू होती !

मध्येंच तो मानसिंगाजवळ येऊन थांबला. अत्यंत क्रुद्ध नजरेनें त्यानें याच्याकडे पाहिलें आणि नंतर कर्कश स्वरांत म्हटलें, " मान, आपल्या मासाहेबांना सांगितलीस कां ही वार्ता !—नाहीं ?—वाहवा ! मग तूं मोठीच आगळीक केलीस ! जा—अगोदर जा, आणि त्यांना सांग—त्यांना सांग कीं, तुमची खुषरोजची जत्रा चांगली फळाला आली म्हणावं !—मोहन मुसलमान होणार !—अहाहा !—हा ! हा !! हा !!! खरोखरीच हा खुषरोजचा मोठा जयजयकार आहे !—जा, मानसिंग, आनंद कर जा ! "

सुप्राजीचें हें बोलणें इतकें विसंगत होतें कीं, मानसिंगाला त्याचा कांहीं उलगडा पडला नाहीं, तो आश्चर्यानें व भीतीनें त्याच्या भेसूर मुद्रेकडे पाहात

राहिला. आपल्या पित्याला अनिवार संताप झाला आहे, येवढें त्यानें ताबडतोब ओळखलें. तो भयभीत होऊन म्हणाला, "पिताजी —"

सुभाजी मध्येंच त्यास दटावून म्हणाला, " पिताजी ?--मी पिताजी ? कोणाचा?--तुझा?—मोहनचा?—नाहीं! मुळींच नाहीं!—मोहन माझा असता तर--नव्हेच तें ! खुषरोजची जत्रा फळाला आली हेंच खरें !--चितोडच ज्याप्रमाणें मी नामधारी महाराणा आहें!—या दाढीमिशा धारण करण्यापुरताचा ज्याप्रमाणें मी पुरुष आहें ! दोन पायावर चालण्याचा व बोलण्याचा सराव असल्यामुळेंच ज्याप्रमाणें मी मनुष्य आहें; त्याचप्रमाणें मी फक्त नांवापुरता तुमचा पिता आहे! निदान त्या मोहनचा तर खास आहे.--म्हणून म्हणतों, मानसिंगा--जा, आपल्या मातोश्री साहेबांकडे जा, आणि त्यांना ही मोहनची कीर्ति सांग जा.--"पुन: सुभाजी इकडे तिकडे फिरूं लागला.

मानसिंग अगदीं हतबुद्ध झाला! एखाद्या अनोळखी मनुष्यानें येऊन त्याचे दोन्ही हात धरून, त्याच्या मुस्कटांत खडकावण्यास सुरुवात केली असती, तरी तो इतका गांगरून गेला नसता ! सुभाजीचा क्रोध त्यास स्पष्ट दिसत असतांही त्याचें रहस्य ज्याप्रमाणें त्याच्या लक्ष्यांत येईना; त्याचप्रमाणें त्याचें बोलणें अगदीं स्पष्ट असूनही त्याचा भावार्थ त्यास उमगत येईना ! एखाद्या पाषाणमूर्तीप्रमाणें तो तारवटलेल्या दृष्टीनें आपल्या पित्याच्या हालचालीकडे पाहात राहिला !

बाहेर संध्याकाळ होऊन गेली! काळोख पडूं लागला ! एक नोकर दिवे लागण्याकरितां आला असतां, सुभाजीनें त्यास फक्त एकच दिवा लावण्यास फर्माविलें ! तेवढा हुकूम बजावून नोकर निघून गेला. मानसिंग कोचावरच बसून होता. सुभाजी आपल्या आवडत्या खिडकीजवळ येऊन भिंतीला टेकून उभा राहिला ! त्याची शून्य दृष्टी बाहेरच्या वाढत्या अंधारावर स्थिरावली होती!

अशाच स्थितींत मैनलदेवी तेथें येऊन पोंचली. तिची चाहूल लागण्यास कोणासच फारसे प्रयास पडत नसत ! सुभाजीला तर तिची पूर्ण ओळख होती.

"हें काय तुम्ही एकटेच आहांत ?—मान इकडे आला नाहीं ?—आणि अशा काळोखांत बसायचं ?—काय बाई तरी हें वेड ? " मैनलदेवीनें म्हटलें.

"मैनल! तुझ्या चरित्रानें माझ्या सबंध आयुष्यावर एवढा मोठा काळोख पडला आहे कीं, त्याचेवर प्रकाश पाडण्यास परमेश्वरही समर्थ नाहीं ! "

मनलदेवी आश्चर्यानें त्याच्यामुद्रेकडे पाहात राहिली! मानसिंगाचें आस्तित्व दोघांच्याही लक्ष्यांत आलें नाहीं आणि त्यालाही पण तें दर्शविण्याचा होश राहिला नाहीं.

सुप्राजी आश्चर्यानें पुढें म्हणाला, "मजकडे पाहातेस !–पहा, बेमुर्वतपणें माझ्याकडे पाहा ! माझ्या नजरेला नजर भिडविण्याचें सामर्थ्य तुझ्यामध्यें खास आहे. बेशरम कुलटेनें का लाजावें ?"

आजपर्यंत मैनलदेवीनें सुप्राजीचे तोंडून असली अश्लील वाणी स्वतांचे संबंधांत ऐकली नव्हती. त्यामुळें तिला प्रथमतः त्यांचें आश्चर्य वाटलें; मागून त्याचा क्रोध आला. ती एकदम ह्मणाली, " बेशरम !–कुलटा !! प्रत्यक्ष पत्नीला तुह्मी हीं घाणेरडीं नांवें देतां ? शुद्धीवर आहांत का आज ?" असें ह्मणत तिनें इकडे तिकडे पाहिलें. नोकरचाकरांपैकीं तिला कोणी दिसलें नाहीं; पण त्याबरोबरच तिला मानसिंगाची **पत्थरलेकी** मूर्तीही दिसली नाहीं !—क्रोधयुक्त दृष्टीनें ती पुनः आपल्या पतीकडे पाहूं लागली.

सुप्राजी क्रोधाचे घुटके गिळत घोगऱ्या स्वरांत ह्मणाला, " पहा, वाटेल तेवढया संतापानें मजकडे पाहा ! तुझ्या क्रोधाला, तुझ्या त्या येमालून कांगाव्याला अगर मोहक लडिवाळपणाला कशालाही ह्मणून मी भीक घालणार नाहीं–तुझ्या कोणत्याही लीलेचा यापुढें मजवर परिणाम होणार नाहीं !— मैनल, नीट कान फोडून ऐक; मी तुलाच निर्लज्ज कुलटा ह्मणतों ! खुषरोजच्या बाजरांत आपल्या सौंदर्याचा सौदा खुषीनें विकणाऱ्या बेसवे, ऐकलेंस नीट—",

संतापातिरेकानें मैनलदेवीनें धडकन् जमिनीवर घालून घेतलें. ती किंचाळत ह्मणाली, " माझ्या गरीब गाईचा तुह्मी असा अपमान करितां ?– असा छळ करतां; तुमचं वाटोळं होईल ! " असें ह्मणून तिनें दांत ओठ खात आपले हात खसखसा चोळले ? पुढेंही ती बेगुमानपणें ह्मणाली,

" तुमच्या तोंडांत, सर्वांगांत किडे पडतील, हो !–माझा शाप तुमचा छळ केल्यावांचून कधीं राहवायाचा नाहीं !" एवढें बोलून ती मारे ढसढसा रडूं लागली !

मोठा अजब देखावा !

एका दिव्याचा अल्प प्रकाश ! कोना कोपऱ्यांत व खांबांच्या सावलीनें अंधार पसरलेला ! कोंवळ्या मनाचा मानसिंग सुन्न होऊन बसलेला आणि प्रत्यक्ष त्याचे मातापिता या अशा घाणेरड्या कलहांत मग्न झालेले ! सुभ्राजी तीरस्कार, क्रोध या विकारानें भरलेल्या अशा क्रूर दृष्टीनें मैनलदेवीकडे पाहात आहे आणि ती कांगावा करून हुंदके देत आहे ! संसार सौख्याचें काय हें विलक्षण चित्र !

सुभ्राजीचें मन आज अगदीं बिथरून गेलें होतें ! मैनलदेवीच्या प्रत्येक लीलेपुढें मेणाप्रमाणें वितळणारें त्याचें हृदय दगडासारखें कठिण झालें होतें. पूर्वीप्रमाणें त्यास तिच्या रडण्यापासून भय किंवा दया न वाटतां, त्याला आतां तिचा अत्यंत तिरस्कार वाटला. त्यानें पुढें होऊन त्या महालाचें दार लावून घेतलें आणि तो पुनः तिचेपुढें येऊन उभा राहिला ! खुनी नजरेनें तिला टेहळीत तो ह्मणाला, " चालूं दे–रडणें चालूं ठेव ! मैनल, पुनः ऐक––अकबरशहाला तूं आपला देह विकला होतास ! अशी तूं नीच आहेस ! बोल, यावर काय आहे तुझें ह्मणणें ? "

" तुम्ही खोटं बोलतां आहां. माझ्यावर हा अगदीं खोटा खोटा आळ आहे. माझ्यावर असा आरोप करणाराचं वाटोळं वाटोळं होईल !" मैनलदेवीनें ठिसकारत ह्मटलें, " थांबा, मी जातेंच इथून. देतें जाऊन जीव कुठंतरी !" असें ह्मणत ती उठली व तेथून जाऊं लागली; तोंच सुभ्राजीनें तिच्यावर झेंप घालून तिला मागें ओढली आणि तिला, खालीं पडून, दोन खणखणीत लाथा तिच्या पेकटांत मारल्या !

सुभ्राजीचें हें स्वरूप मैनलदेवीला अगदींच नवीन होतें ! त्याच्या राक्षसी मुद्रेकडे पाहतांच हा आज आपला जीव घेतो कीं काय ? अशी तिला भीति वाटली आणि ती गांगरलेल्या दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागली.

सुम्राजीनें तिला बजावीत म्हटलें, “ चांडाळणी, तुझ्या पापाचें मूर्तिमंत व स्पष्ट असें चित्र आज माझ्या डोळ्यापुढें उभें राहिलें आहे ! आतां मी तुला मुकाटयानें जाऊं देईन होय ?-शक्य नाहीं. तुला प्राण द्यायचा आहे ना ? खुशाल दे-पण मी तुला एकाएकीं नाहीं मरूं देणार ! तुला आपल्या पापाची हाय खात झिजून झिजून मेलें पाहिजे ! मैनल, माझा पुरुषार्थ तुझ्या बदचलनामुळें मातीमोल झाला ! तुझ्या चवचाळपणामुळेंच माझा जिकडे तिकडे बदलौकिक झालेला आहे ! माझ्यापेक्षां तुझाच वरचष्मा सगळीकडे असणें तुझ्या नांवानें मी ओळखला जाणें; सर्व नोकराचाकरांनीं माझ्या हुकुमापेक्षां तुझ्या हुकुमाकडे विशेष लक्ष्यपुरवणें या सर्व गोष्टींचा उलगडा मला इतके दिवसांत पडला नव्हता ! मी मूर्ख महामूर्ख म्हणून तुझी स्तुति ऐकून फुगून जात होतों आणि तुझ्या प्राप्तीनें आपल्यास भाग्य-वान् समजत होतों. माझ्या पश्चात् लोक माझी छिः थू: करीत होते आणि तोंडावर शालजोडी खालचा आहेर करीत होते !-या सर्व गोष्टी आतां मला स्पष्ट स्पष्ट कळूं लागलेल्या आहेत ! चितोडचें राज्यपद मला मिळालें तें अकबराशीं तुझी जी दोस्ती होती त्याचा प्रसाद होय; हेंही मी समजून चुकलों आहे ! चितोडगडावर राहिल्यानें मला या गोष्टी कळूं लागल्या ! माझ्या परमपूज्य पूर्वजांचीं जीं पराक्रम चिन्हें या पुण्यस्थलावर इतःस्ततः पसरलीं आहेत; त्यांनीं मला ही नवीन दृष्टी दिली आहे ! ही देणगी फार उशीरा प्राप्त झाली; पण तिचा आतां मी दुरुपयोग नाहीं करणार ! तुझ्या पापाचें प्रायश्चित मी तुला देणारच देणार ! बोल, आपला अपराध कबूल कर-तेवढयानें तुला मी क्षमा करीन अशांतला भाग नाहीं; पण तुझ्या तोंडानें तूं सगळें पाप कबूल केलें पाहिजेस ! ”

मैनलदेवी ताडकन् उठली ! ती उन्मत्तपणानें खेकसली, “ होय, आहे मी तशी ! सांगा, तुम्ही काय करणार माझें ? पुरुषांनीं हातांत बांगड्या भरल्या म्हणजे स्त्रिया अशाच वागायच्या ! ”

मानसिंगाला हा सर्व देखावा आतां अगदीं असह्य झाला! तो बसल्या जागींच ओरडून म्हणाला, "मासाहेब-पिताजी, मी इथें आहे!—या तुमच्या संभाषणानें माझे प्राण व्याकुळ झाले आहेत! पुरे करतां का हें नाटक? परमेश्वरा,—" असें म्हणून तो बेशुद्ध होऊन कोचाखालीं पडला!

सुम्राजी दचकून त्याचेकडे पाहूं लागला! मैनलदेवीही तेथल्या तथेंच खिळून गेली! ती अस्फुट स्वरांत चित्कारली, "मानसिंगानें सर्व ऐकलें? अरे देवा!!"

सुम्राजीनें तिच्याकडे वळून म्हटलें, "निर्लज्जे! हा तुझ्या खुषरोजाचा जयजयकार आहे! मोहन मुसलमान होतो आहे, हें पाहून तो बिचारा धडपडत येथें आला! त्याला काय माहीत की, हें मुसलमानाचें रक्त मुसलमानाकडे वळणार म्हणून!"

मैनलदेवी काळीठिक्कर पडली!

---

# परिच्छेद १२ वा.

## मीनाबाजाराचें स्मरण.

गेल्या भागांत वर्णन केलेल्या देखाव्याला पुढें कोणतें वळण मिळालें असतें; हें कांहीं बरोबर सांगतां येणार नाहीं. कदाचित् कांहीं प्रकार घडला असता तर तो त्याहूनही वाईटच असता, हें निःसंशय होय. परंतु सहज योगायोगानें कोणी मोठ्या दर्ज्याचे पाहुणे माणूस गडावर आल्याची वार्ता आली आणि त्याबरोबर सुम्राजी व मैनलदेवी यांना सकृद्दर्शनीचें पतिपत्नीचें गोड नातें कडवट अंतःकरणानें, स्वीकारावें लागलें. मानसिंगाच्या दाईला बोलावून आणून तिच्या स्वाधीन त्यास करण्यांत आलें आणि नंतर तें जोडपें पाहुण्यांच्या स्वागतास निघून गेलें.

मानसिंगाची प्रकृति एकाएकीं बिघडण्यास काय कारण घडलें, हें जरी त्याच्या दाईस कळलें नाहीं, तरी तिनें त्याची योग्य शुश्रषा करून, त्यास लौकरच शुद्धीवर आणिलें.

मानसिंगानें एकवार डोळे उघडून सर्वत्र पाहिलें. आपल्या दाईला त्यानें तेव्हांच ओळखलें. नंतर त्यानें एक सुस्कारा टाकून पुनः डोळे मिटले. क्षणभर त्यानें कांहीं विचार केला आणि मग नेत्र उघडून दाईस विचारिलें, " पिताजी–मासाहेब कुठं आहेत ?"

दाईनें शांतपणें उत्तर दिलें, " सरदार अब्दुलखान आहेत ना, त्यांची बायको व भाची खालीं ब्न्हाणपुराकडे गेल्या होत्या; त्या दोघीही परत आग्र्यास चालल्या आहेत. त्यांची व आपल्या मासाहेबांची चांगली दाट ओळख आहे. तेव्हां त्यांच्या भेटीला म्हणून त्या मामीभाची आल्या आहेतः–आतां तुला कसें वाटतें ? असं एकाएकी घेरी यायला काय झालं बरं ?–उन्हातान्हानं पित्त तर नाहीं वाढलं ?–तुझी प्रकृती अशी लहानपणापासून नाजूक. इतक्या तांतडीचा प्रवास कशाला बरं केलास ?"

मानसिंग काय बोलणार ? बेशुद्धीमुळें त्याचें मन जें कांहीं वेळ निर्विचार झालें होतें, तें पुनः भिरभिरूं लागलें ! अवघ्या दहापांच पळांचे अवधींत, घडून गेलेला सर्व देखावा त्याच्या अंतश्चक्षू पुढें उभा राहिला !

बिचारा मानसिंग ! निवडुंगांत पडून इजावलेल्या मनुष्याप्रमाणें त्याची स्थिति झाली ! सर्वांगांत कंटक रुतल्यामुळें व बोचल्यामुळें त्याचें शरीर ज्याप्रमाणें कोणत्याहि स्थितींत सारखें ठणकावें; त्याचप्रमाणें मानसिंगाच्या मनाची स्थिति झाली ! मातापित्याच्या दरम्यान घडलेल्या दुर्भाषणाचे कांटे त्याच्या हृदयांत खोल खोल जाऊन रुतले होते !

दाईनें त्याच्या विचारी मुद्रेकडे पाहून विचारिलें, " तूं कांहीं तरी काळजींत आहेस बाळ. काय होतंय तुला ?"

मानसिंगानें निर्हेतुक दृष्टीनें तिच्या मुद्रेकडे पाहिलें नंतर बऱ्याच वेळानें जणुं काय कांहीं तरी आठवल्याप्रमाणें करून तो म्हणाला, " दाई, मला कांहीं होत नाहीं. मी कसल्याही चिंतेनें ग्रासलों नाहीं. मला सध्या कांहीं

नको आहे. मला भूक नाहीं, तहान नाहीं कसली कसलीही इच्छा नाहीं. फक्त एकांतांत, अगदीं अंधारांत स्वस्थ पडून राहण्याची माझी इच्छा आहे. तेवढी जर पार पडली, तर मला अगदीं छान बरं वाटेल. म्हणून म्हणतों, तूं मला एकटा सोडून इथून जा. रागाउं नकोस; पण मला तुझ्या किंवा कोणाच्याही सान्निध्यानें बरें वाटणार नाहीं आहे. मला एकांत पाजिजे. आणि तेवढा देण्याची कृपा कर."

हें त्याचें सांगणें जरी थाडें विक्षिप्त होतें, तरी तें इतकें निक्षून होतें कीं, त्याचें म्हणणें नाकारणें बरें नव्हे, असें दाईला वाटलें. ती जाण्याकरितां तात्काळ उठली व म्हणाली' " बरं तर पड स्वस्थ. थोडया वेळानं येऊन जाईन पाहिजे तर. " असें बोलून ती तेथून निघून गेली.

ती गेल्यावर मानसिंगानें कांहीं विचार केला आणि त्या महालाचें दार आंतून कडी लावून दुसऱ्या एका दारानें तो बाहेर पडला. नंतर त्यानें 'आतां कुठें बरें जाऊन बसावें ?—हो, तीच जागा बरी आहे ! " असें पुटपुटत रणवासाकडे गमन केलें. सर्वांची नजर चुकवून त्यानें आपलें अपेक्षित स्थान गांठलें. त्या ठिकाणीं निजण्या बसण्याची व्यवस्था नेहमींची होती; पण त्याचा उपयोग मात्र क्वचित् वेळीं होत असे. त्यामुळें त्या भागीं दिवा बत्ती लावलेली असेच, असें होत नसे. तेथें मुकाटयानें जाऊन पडूं. म्हणजे कोणी त्रास देण्यास येणार नाहीं. अशा हेतूनें तो तेथें आला होता. रोजच्या प्रमाणें आज तेथें अंधार नव्हता. दोन उज्वळ दीप तेथें लाविले असून, बिछानेही झाडून ठेविलेले दिसत होते. आज ही व्यवस्था कां असावी, हें मानसिंगाच्या कांहीं लक्ष्यांत आलें नाहीं. त्यानें दाराकडे पाहिलें तें लाविलें होतें. त्याच्या मनाला समाधान वाटलें. हवा होता तो एकांत त्यास मिळाला. तेव्हां त्याचें समाधान मानीत तो एका कोचावर बसला व आपल्या विचारांत गुंग झाला!

कर्मधर्मसंयोग, ही खोली सरदार अब्दुल्लखानाची तरुण व सुंदर भाची गुले हसीन ( सौंदर्याचा गुलाब ) उर्फ हसीना हिच्या निद्रेकरितां योजिलेली होती ! असो.

\+ + + + + +

प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यांत असा एक तरी प्रसंग येत असतो कीं, ज्यावेळीं त्यास जगाच्या खऱ्या स्वरूपाची ओळख पटते ! यावेळीं त्याची विवेकशक्ति मोठी तीव्र होते व तिच्या साहाय्यानें त्यास जग कसें आहे, आपण कसे आहोंत, आपल्या सभोंवतींचा परिवार कसा आहे, शत्रुमित्र कोण आहेत, आपलें चुकलें कोठें, आपण काय केलें असतें तर बरें झालें असतें इत्यादि किती गोष्टींचा तरी त्यास उलगडा पडतो ! त्याची ही वेळ मोठी आणीबाणीची असते ! तो विचारी, सुबुद्ध, खंबीरमनाचा असला तर या जाणीवेनें त्याचें कल्याण होतें. अविचारी असला तर जगावर चडफडून स्वतः-चाच कांहीं तोटा करून घेतो. या विचित्र प्रसंगाच्या शहाणपणानें सावध होऊन आपलें आयुष्य व्यवस्थित करणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्यकर्म आहे.

मानसिंग हा अशा प्रसंगांत आज उभा होता. ठाकुर ईश्वरसिंगानें त्यास जी नवी दृष्टी दिली, त्याच दृष्टीनें त्यानें आपल्या भावाच्या—मोहन सिंगाच्या वर्तनाकडे पाहिलें आणि त्याचेवर आपली मात्रा चालणें शक्य नाहीं, हें पाहून मातापित्याचें साहाय्य घेण्याकरितां तो चितोडगडास आला; पण तेथें त्यास काय दिसलें ? जें त्यास नको होतें, ज्याची त्यास कल्पनाही नव्हती, असेंच एक भयंकर चित्र त्यानें पाहिलें ! त्याच्या कोंवळ्या मनाला तें सहन झालें नाहीं ! आणि उत्तेजकतेनें तो एक बेशुद्ध झाला ! त्याचा चित्तक्षोभ बेशुद्धीवरच भागला; वास्तविक अशा स्थितींत त्याच्या प्रकृतीच्या मनुष्याचा प्राण जाणेंही शक्य आहे !

प्रभातकालीं आजूबाजूच्या वस्तुमात्रावरून अंधकाराची छाया जशी मंद-गतीनें नाहींशी होत जाऊन सृष्टीचें स्वरूप दृगोचर होऊं लागतें, त्याचप्रमाणें मानसिंगाच्या मनांत नव्या स्थितीचा उदय झाला ! प्रत्येक गोष्ट त्यास स्पष्टपणें कळूं लागली; अनेक प्रकारावरील संदेहाचें आच्छादन नाहींसें होऊं लागलें ! हाय ! हाय ! !—आपण बायकी स्वभावाचे कां ? हें त्यास आतां कळलें ! आपला भाऊ मोहनसिंग कां बाटणार ? याचा उलगडा त्यास आतां झाला ! आपले आईबाप कसे आहेत ?—( भो भगवन् !!!—मानसिंगाच्या

कोणत्या पापाचा तो उदय होता म्हणून त्यानें तो कलह पाहिला ! ! )–हेंही त्यास आतां पुरतें उमजून आलें ! जग कसें आहे ? हेंही त्यास आजच समजलें.

चित्तक्षोभानें खचलेला मानसिंग दीनदीनतेनें भोंवतालीं पाहूं लागला ! प्रभातकाळच्या प्रकाशाप्रमाणें परिस्थिती त्याचेपुढें हळूं हळूं स्पष्ट होत होती, परंतु त्याचवेळीं त्याचे मनास भरदोनप्रहरीं चंडांशूच्या प्रखर तापानें तप्त झालेल्या वाळवंटांत सांपडलेल्या प्रवाशाच्या पायांप्रमाणें असह्य चटके बसत होते !

मानसिंग संगतीचा त्रास चुकविण्याकरितां त्या एकांत स्थलीं येऊन बसला होता. त्याचें आसन मऊ होतें आणि दोन दीप त्यास प्रकाश देत होते; परंतु ज्यावेळीं त्याचें मन घडून गेलेल्या प्रकारांतून स्मरणाच्या पाय-वाटेनें जाऊं लागलें, त्यावेळीं त्यास आपण एखाद्या आगीच्या डोंबांत सांपडलों कीं काय, असें वाटलें !

* खुषरोज ! खुषरोज ! ! चार अक्षरीं शब्द आणि चांगल्या अर्थाचा ! पण मानसिंगास त्याचें स्मरण होतांच, त्याचा उभ्या जन्माचा आनंद जळून गेला ! !–खुषरोज !–आनंदाचा दिवस ! त्यादिवशीं किती–किती जीव तरी सुखावले असतील ! कित्येकांना तरी त्या दिवसाची आठवण हर्षरोमांचित करीत असेल ! पुढच्या सालीं तो दिवस केव्हां उगवतो, याची उत्कंठा किती जणांना तरी लागली असेल; परंतु त्याच्या नुसत्या नामोच्चार श्रवणानें मानसिंगाची काय स्थिती झाली ? ज्या दिवसानें कित्येकांना भूलोकींच स्वर्लोकीचें सौख्य आणून पोंचविलें त्याच दिवसाच्या नुसत्या नांवानें दुसऱ्या एका जिवाला यमयातनेचा अनुभव यावा काय ? पण विधिघटना अशी आहे खरी !

---

* इतिहासामध्यें अकबर बादशाहाच्या उज्वल चरित्राला एक अत्यंत काळी बाजूही आहे. त्याच काळ्या बाजूचा 'खुषरोज' हा एक देखावा आहे ! या धूर्त बादशाहानें 'खुषरोज' ( आनंदांचा दिवस ) या नांवाखालीं आपल्या व अमिर उमरावांच्या जनानखान्यांतील सुंदर स्त्रियांनीं केलेल्या कलाकुसरीच्या

खुषरोज व मैनलदेवी !
मैनलदेवी व अकबर !
अकबर व मोहनसिंग !
मोहनसिंग व धर्मांतर !

अशी सृष्टि मानसिंगाचे नजरेसमोर नाचूं लागली ! आणि ती पाहून त्याचें हृदय उद्वेग व तिरस्कार या विकारांनीं अगदीं अस्थिर होऊन गेलें !

विचारास विचारांचे फाटे फुटले ! कल्पनेवरून कल्पना वाढत गेली ! स्मरणशक्तीनें अनेक देखावे अंतःकरणास दाखविण्यास प्रारंभ केला ! सुमारें तीन तपापूर्वी खुषरोजच्या बाजारांत कोणता प्रकार घडला असेल; त्याचा एक छोटासा नमुना मानसिंगाचे आयुष्यांत गेल्या वर्षीच खुषरोजचा भाऊ जो मीनाबाजार, त्यांत घडून आला होता; त्याचें त्यास स्मरण झालें. खुषरोजच्या नामस्मरणानें व्याकुळ होणारें त्याचें दुबळें मन मीनाबाजाराच्या एका विशेष स्मरणानें घटकाभर सुखस्तंभित झालें !

मानसिंगाचें जागृतस्थितींतील तें गोड स्वप्न असें होतें:--

---

-जिनसा विकण्याचा एक अगदीं खाजगी बाजार भरविण्याचा उपक्रम सुरू केला होता. या बाजारांत खानदानीच्या तरुण व सुंदर स्त्रिया आपल्या जिनसा विकण्यास किंवा दुसऱ्यांच्या विकत घेण्यास जमत. पुरुषांना येथें येण्याची मनाई होती. स्वतः बादशहामात्र आपल्या निवडक मित्रांसह स्त्रीवेषानें त्या जलशांत वावरण्यास व निदानीचें शरीरस्पर्शसुख अनुभवण्यास येत असे. अर्थात् अशावेळीं पुष्कळ प्रसंगीं शील, सौंदर्य, तारुण्य व संपत्ति यांचीही देवघेव होत असे हें सांगायाला नकोच आहे. ( कारण हेतूच तो होता. ) जहांगिरानें याच मेळ्यास पुढें ' मीनाबाजार ' नांव देऊन बापाचें व्रत पुढें चालविलें. नूरजहान व तो यांची अगदीं पहिली भेट या अशा जत्रेंतच घडून आली, असें ह्मणतात. विशेष माहिती राजस्थानच्या इतिहासांत पाहावी.

एके दिवशीं जहांगीर बादशाहानें मानसिंगास म्हटलें, " मान, आज वेषांतर करून मीनाबाजाराची मौज पाहण्यास जावयाचें बरें का !

मानसिंगानें तें मान्य केलें. संध्याकाळ होतांच दोघांनींही ( जहांगीर व मानसिंग ) सुंदर स्त्रीवेष धारण केला ! मीनाबाजारास प्रारंभ होतो न होतो, तोंच दोन सौदागर तरुण इतर अनेक चंद्रमुखी रमणींमध्यें फिरतांना दिसूं लागल्या !

राजप्रासादा मागील एका विस्तृत उद्यानांत मीनाबाजार भरला होता. काळोखाचे दिवस होते तरी दिव्यांच्या लखलखाटानें वरच्या चांदण्यांनीं सजलेल्या गगनास तें उद्यान लाजवीत होतें ! शिवाय बिनधुराच्या चंद्रज्योती लावून वारंवार त्या शोभेस द्विगुणित करण्याचा प्रयत्न चालू होता.

अनेक रंगाच्या, भिन्नभिन्न पोषाखांच्या आणि लहान मोठ्या वयाच्या अनेकानेक ललना तेथें एकत्र आल्या होत्या. कोणी स्वकृत कलाकौशल्य विकण्यास आल्या असून कोणी त्या विकत घेण्यास आल्या होत्या ! जिन्नस विकण्यास बसलेल्या तरुणी जणूं पुतळ्यांच्या रूपानें सौंदर्यच विक्रीस ठेविल्याप्रमाणें वाटत होतें, तर खरेदी करण्यास इतस्ततः चमकणाऱ्या सुंदरी चालत्या बोलत्या लावण्यलतीच भासत होत्या. सर्वांचे मुद्रेवर आनंदाच्या लहरी उठत होत्या ! कांहीं कांही तर इतक्या खुषबेहोश झाल्या होत्या कीं, त्यांच्या हास्यनिनादानें वातावरण खळबळून जात होतें ! बाजारास शोभणारा कोलाहल येथेंही होता; पण तो तरुणीकंठजनित असल्यामुळें कर्कश नव्हता ! कोठें कोठें परस्पर तरुणींमधील हास्यविनोदाचा अतिरेकही झालेला दिसत होता.

स्त्री वेषधारी जहांगीर मानसिंगास तो हास्यविनोदानें तरंगित झालेला सौंदर्यसागर पाहून मोठी मौज वाटली ! अनेक तरुणींच्या स्पर्शसुखानें त्यांचीं गात्रें रोमांचित झालीं !

थोड्या वेळानें दोघांची जोडी फुटली. जहांगिराचें लक्ष्य एकेठिकाणीं गुंतलें म्हणून तो त्याच ठिकाणीं तरंगूं लागला. मानसिंग टेहळणी करीत

दुसरीकडे गेला. पण थोडयाच अंतरावर त्याच्या हृदयाचेंही एका काळ्या-भोर नेत्रद्वयानें बंधन केलें.

त्या सुंदर नेत्रांची मालकीण अठरा एकोणीस वर्षांची लावण्यलता होती. यवनी तरुणींनां केव्हांही शोभणारा असा उत्तम मलमलीचा पोषाख तिनें केला होता. तिच्या आजूबाजूस असणाऱ्या अनेक तरुणींच्या मानानें तिचा वर्ण काळसर असून, ती जात्या ठेंगणी होती. पण तिचें अंग सौष्ठव मात्र मनांत भरण्यासारखें होतें. तिच्या शरीराचा उघडा भाग म्हणजे प्रफुल्लित वाटोळी मुद्रा व कोंपरापासूनचे गोंडस हात होत. पण तेवढ्यावरून तिच्या सौंदर्याची योग्य कल्पना होत होती. तिच्या मुद्रेवर असें कांहीं एक सततचें मंदस्मित झळकत होतें कीं, तें तिच्या नेत्रांत, कपोलभागीं, ओंठावर पसरलेलें दिसत होतें. इतका हंसरा व गोंडस चेहरा मानसिंगानें या काळपर्यंत पाहिला नव्हता.

त्या तरुणीनें स्वकृत नाजूक कशिदा काढलेलें काम विक्रीस आणिलें होतें. मानसिंग तिच्याजवळ गेला आणि कोणी जवळ नाहीं, असें पाहून कोमल-स्वरांत म्हणाला, " हां जी, हूजूर !

" कहिये हुजूर ? " तरुणीनें हंसत म्हटलें.

" क्या लाये हो बेचने ? "

" दिल चमन—"

" अहा ! मानसिंग घायाळ झाल्याप्रमाणें करून म्हणाला, "क्या कीमत ?

" हुजूर क्या देना पसंद करते हैं ? " तरुणीनें उत्तर दिलें. वास्तविक मानसिंग स्त्री वेशांतील पुरुष आहे, हें तिला ओळखूं आलें नाहीं. तिनें त्यास एक सुंदर तरुणीच मानिलें; पण ज्या अर्थीं ती ( मानसिंग ) पुरुषी थाटानें विनोद करीत आहे, त्याअर्थीं आपणही तिला ( मानसिंगाला ) तशीच रसीक उत्तरें देणें योग्य आहे, असें तिला वाटलें. म्हणून तिनें पुनः म्हटलें, " कहिये, क्या देवोगे ? "

मानसिंगानें तिच्या अगदीं जवळ झुकून हळूंच म्हटलें, " फकत् एक बोसा ! " तरुणीनें आपलें मुख मागें घेत मधुर हास्य करीत म्हटलें, " क्यों साहिब, ये कैसी दिल्लगी ? "

मानसिंगानें तिचें काम हातांत घेत म्हटलें, " जब आपकी तिरछी नजर हमारे दिल लगी तब हम कैसे न करेंगे ऐसी दिल्लगी ? "

शेवटीं सौदा ठरला व मानसिंगानें तो कशिदा विकत घेतला व नंतर तो तिला म्हणाला, " अच्छा ! आतां इथं उगीच बसून काय करणार ? चला, बाजारची मौज बघूं. " तरुणीनें तें मान्य केलें व दोघेंही हातांत हात घालून चालूं लागलीं, पण तीं दोघेंही दहा पांच पावलें गेलीं नाहींत, तोंच त्यांच्या स्पर्शानें तरुणीला कांहीं अननुभूत भावना झाली ! ती एकदम चपकली व आपला हात सोडवून घेऊन मानसिंगाच्या मुद्रेकडे पाहूं लागली. ती कांहीं बोलणार तोंच मानसिंगानें भोंवतालीं चटकन् नजर टाकिली. त्याच्या इच्छेप्रमाणें एकांत होता व प्रकाशही कमी होता. त्यानें एकदम पुढें होऊन धीटपणानें तिला आपल्या बाहूंत कवटाळलें, आणि तिच्या मुख-कमळाचें आघ्राण केलें ! आश्चर्यानें तरुणी तटस्थ झाली ! तिनें आपल्यास सोडवून घेतलें. मानसिंगाच्या रूपाची तिला पूर्ण ओळख पटली ! लज्जेनें तिची मान आपोआपच खालीं झाली.

तिच्या त्या गोंधळलेल्या मनःस्थितीचा मानसिंग आणखी कांहीं फायदा घेणार, तोंच तिनें त्यास दूर सारीत ' बेहोश पागल दूर सर ' असें तिर-स्कारानें म्हणत तेथून पलायन केलें. मानसिंग ओशाळून पाहातच राहिला !

× × × ×

हें गोड स्वप्न पाहण्यांत मानसिंग इतका दंग होऊन गेला होता कीं, घटकाभर त्यास आपल्या दुःस्थितीचा पूर्ण विसर पडला ! एक वर्षापूर्वी मीनाबाजारचे उत्सवांत आपल्या नेत्रांपुढें चमकून गेलेल्या लावण्यलतेचें गोड स्वरूप आठवीत तो तिच्या संबंधीं कांहीं विचार करीत आहे, तोंच त्याच्या दुर्दैवानें त्या देखाव्यावर आपल्या मंत्राची फुंक मारिली ! निमिष-मात्रांत सर्व देखाव्यास कांहीं निराळेंच रूप प्राप्त झालें.

मानसिंगानें पाहिलें, त्या तरुणीचे ठायीं त्यास मैनलदेवी दिसूं लागली; आणि स्वतःचे स्थानीं अकबराची छाया पसरली ! पाहतां पाहतां अकबराचे छायेनें मैनलदेवीच्या भासमूर्तीची चेष्टा केली आणि बलात्कारानें चुंबनही घेतलें;

मेनलदेवीची भासमूर्ति थोडीशी लाजली, पण त्याबरोबरच अनुमति-दर्शक अशी गोडशी हंसलीही! हळू हळू भोंवतालच्या अंधेरांत त्या दोन्ही मूर्ति एकमेकांजवळ येत येत एकमेकांत पूर्ण मिसळून गेल्या!

तो देखावा पाहूतांच मानसिंगास खरोखरीच झीट आली!

\+ \+ \+ \+

मानसिंगानें उद्वेगानें आपल्या कपाळावर हात मारून घेत म्हटलें, "हायरे दुर्दैवा!—हा असला खुषरोज!! गेल्यावर्षी मीनाबाजारांत मी जें आचरण केलें, तशाच धर्तीचें आचरण तीन तपापूर्वी अकबरानें माझ्या—नको, त्या प्रसंगाचें नुस्तें काल्पनिक स्मरणहि नको" असें म्हणत त्यानें आप नेत्र मिटून घेतले!

याच वेळीं जिच्याकरितां ती खोली शयनागार म्हणून योजिली होती, ती अबदुलखानाची भाची गुलेहसीन हळूंच दार उघडून आंत आली आणि तिनें पुनः दार लावून टाकिलें!

ती पुढें येण्यास, तिची चाहूल मानसिंगास समजण्यास व त्या दोघांचीही एकमेकांवर नजर पडण्यास एकच गांठ पडली! दोघेंही आश्चर्यानें चकित झालीं! दोघांनाही परस्परांची ओळख पटली. वास्तविक दोघांचे ही पोषाख भिन्न होते; पण दोघांच्याही मनावर एकमेकांच्या स्वरूपाचा असा कांहीं गाढ ठसा उमटला होता कीं, अगदीं पहिल्या नजर भेटीला दोघांनींही एकमेकांस ओळखिलें!

मानसिंगानें मीनाबाजारांत याच तरुणीच्या मुखकमलाचा आस्वाद घेतला होता! त्या वेळीं दोघांनाही परस्परांचा आगापिछा माहीत नव्हता प्रवाह पतित काष्ठाप्रमाणें त्यावेळीं दोघेंही अल्पकालाकरितां एकत्र झालीं आणि पुनः तात्काळ दूर झालीं! तेव्हांपासून दोघेंही एकमेकांविषयीं विचार करीत होतीं आणि पुनः आपली भेट होणें शक्य नाहीं, अशा समजुतीनें निराश होत होतीं; परंतु योगायोग त्यांच्या पुनःसंयोगाची जुळणी करीत होता आणि संधि येतांच त्यानें अशा रीतीनें त्या दोघांस एकत्र आणिलें!

# परिच्छेद १३ वा.

## पतिव्रतेचें जीवनसंगीत.

अलीकडे जयचंदाचे मनांत विविध विचारांचें तुंबळ युद्ध सतत सुरू होतें. आयुष्यक्रमांतील सर्व व्यवहार तो नित्याप्रमाणेंच करीत होता; पण त्याच्या आड वावरणारें मन मात्र पूर्वीचेंच राहिलें नव्हतें. खरें पाहिलें तर, आतां तो जयश्रीचा जयचंद नव्हता; महाराण्याचा सच्चा मंत्रि नव्हता; कीं, मेवाडचा अस्सल रजपूत नव्हता! ज्या दिवशीं तो मोंगलांचा मिंधा झाला, त्याच दिवशीं त्याचें मूळचें स्वरूप नष्ट झालें; त्याच्या मनाला मरण आलें! हें मरण कोणास कळूं नये म्हणून मात्र त्यास अनेक सोंगें करावीं लागत होतीं. जयश्रीजवळ खोटया स्वदेश-स्वधर्माभिमानाचें नाटक करणें त्यास भाग होतें! महाराण्यास आपल्या मुठींत ठेवण्याकरितां त्यास दक्ष असावें लागत होतें; आणि सरदार अबदुलखानाच्या कह्यांत न जातां त्याची मैत्री दृढ ठेविण्याकरितां प्रयत्न करणें त्यास इष्ट वाटत होतें. असा तीनपंथी अभिनय करणें सोपें नव्हतें; पण करणार काय? जयश्रीच्या अनुमतीच्या अभावीं त्यास ही अवघड कसरत करणें अगदीं भाग होतें.

अहा! एक जयश्री अनुकूल झाली असती अगर प्रयत्नानें होण्याजोगी असती तर काय बहार झाली असती?—मोठा गोड विचार! 'जर-तर' ज्या किनारीनेंच त्यास थोडेंसें वैगुण्य आलें होतें! तें नसतें तर जयचंदाच्या सृष्टीनें नंदनवनास लाजविलें असतें!

जयश्रीची अनुकूलता कशी मिळणार? हा एक फार बिकट प्रश्न जयचंदापुढें सारखा उभा होता. त्याचा जिवलग मित्र अबदुलखान यानें त्यास दोन अचुक युक्त्या सांगून ठेविल्या होत्या. त्या नामी आहेत, कदाचित् त्यांच्यायोगें आपलें अवघड कार्य बेमालूम पार पडेल, असेंही त्यास वाटत होतें; परंतु त्यासंबंधीं खात्री देतां येत नव्हती. त्या युक्त्यांच्या बरोबरीलाच जयश्रीचा तेजस्वी स्वभाव त्याच्या अंतश्चक्षूपुढें उभा राहून

गजावीत होता, " पहा, हा मी असा आहे. मी तुला डाव साधूं देणार नाहीं ! "

अबदुलखानाच्या युक्तया अमलांत आणाव्या कीं न आणाव्या ? याचा विचार चालू असतां, त्याच्या मनाची अस्वस्थता जयश्रीच्या लक्ष्यांत आल्यावांचून राहिली नाहीं. तिनें एकेदिवशीं विचारिलें, " अलीकडे आपलं मन स्वस्थ नाहीं, कां बरं ? "

जयचंद चपापला ! बराच चपापला ! तो अडखळत उत्तरला, " माझं–मन–स्वस्थ–नाहीं ?—हो, नाहीं खरं अलीकडे ! " एवढें बोलल्यानंतर त्याचें मन थोडें धीट झालें व नंतर जयश्रीला बोलण्याची सवड न देतांच तो पुढें म्हणाला, " तसं काळजी करण्यासारखं कांहीं नाहीं. सगळं लक्ष्य चितोडच्या उद्धाराकडे लागलं आहे. परवाचं तुझं बोलणं माझ्या मनांत सारखं सटकतं आहे. चितोडचा उद्धार केव्हां होईल, असं मला झालं आहे. " एवढें बोलून तो जयश्रीच्या नजरेंतून निसटला ! अर्थात् त्या बिचारीला कसलीही शंका न येतां, उलट आपला पति स्वकर्तव्यांत इतका चूर झाल्याचें पाहून, तिला एक प्रकारचें समाधानच वाटलें ! पतिव्रतांच्या अशा या भोळ्या विश्वासानेंच पुष्कळवेळां त्यांच्या चुकलेल्या पतींना जास्त चुका करण्यास चांगली सवड मिळते. असो.

त्याचदिवशीं जयचंदानें आपल्या पटिक कपटांवशाचा श्रीगणेशा लिहिण्यास घेऊन जयश्रीस मारण्याचें नक्की ठरवून टाकिलें :

विश्वासू व धूर्त अशीं माणसें निवडण्यांत आलीं. उक्याचें पाणी शिंपडून त्यांना शुद्ध करून घेण्यांत आलें. प्रत्येकास त्याच्या योग्यतेप्रमाणें व आवश्यकतेप्रमाणें कानमंत्र देण्यांत आला. लौकरच कार्यास प्रारंभ झाला.

आतां जयचंदानें आपल्या मनाची अस्वस्थता विशेष प्रमाणांत दाखविण्यास प्रारंभ केला. जयश्री आसपास असतांच जास्त विचारग्रस्त व्हावें, भोजन करितांना मध्येंच हात आवरून शून्यदृष्टीनें कोणीकडे तरी पाहूं लागावें, जयश्रीनें कांहीं प्रश्न विचारल्यास गोंधळून जावें इत्यादि प्रकार करण्यास

त्यानें सुरुवात केली. हेतु हा कीं, जयश्रीनें 'तुमच्या विमनस्कतेचें कारण मला सांगा.' असा हट्ट घ्यावा आणि केवळ तो हट्ट पुरविण्याकरितां आपण खरी हकीगत सांगतों आहोंत, असें तिला भासावें.

जयचंदाची ही तपस्या फळाला येण्यास फार काळ लागला नाहीं. चारदोन दिवसांतच जयश्रीस त्याचा अभिनय खरा वाटला व तिनें " आपण कांहीं तरी फार विचारांत आहांत. मला तो कां सांगत नाहीं ? " असा प्रश्न केला. त्यावर जयचंदानें " हूं: ! तुझी उगीच कांहींतरी कल्पना आहे. तुझ्या संगतींत माझ्या सौख्याला कमीपणा आणणारी गोष्ट घडणेंच शक्य नाहीं. " असें तिला गुदगुल्या करणारें पण तिची उत्कंठा वाढविणारें उत्तर देऊन जास्त उत्तेजित केलें.

" सांगायचं नाहे, आपलं संकट ? "

" श्री, वेडी तर नाहींस. तसं सांगण्यासारखं कांहीं नाहीं. "

" आपलं माझ्यावर प्रेम नाहीं, हेंच खरं. "

" वा ! ही तर फारच अजब गोष्ट सांगितलीस. बरं बुवा, सांगीन हं तुला. "

अशा आढयावेढयांत आणि तडजोडींत आणखी चार दिवस लोटले. जयश्रीची उत्कंठा कळसाला पोंचली. तिची मनोभूमि जयचंदास पाहिजे होती, तशी तयार झाली. त्यानें आपलें हृद्गत मोकळेपणानें सांगण्याचें आपल्या प्रिय दयितेस अभिवचन दिलें.

पण आतां जयश्रीचा मान जाग्रत झाला ! मानिनीपदावर आरूढ होत ती फुसफुसत म्हणाली, " हो, मी इतके दिवस मनधरणी केली त्याची नाहीं आली कुठं दया ? मी नाहींच बोलायची आपल्याशीं ! मला अगदींच मान नाहीं वाटतं ? "

अहाहा ! जयचंदाच्या प्रेमळ जयश्रीचें हें मानी चित्र किती मनोहर होतें ! प्रियपत्नींचें असलें हें शृंगारपोषक चित्र भाग्यशाली पतींना केव्हां केव्हां पाहण्यास सांपडतें ! अलीकडे जयचंदानें जी तपस्या चालविली होती,

नी कांहीं या प्रेमभावाकरितां नव्ह. त्याचा हेतु निराळा होता; पण तो सहजसाध्य असतांनाच मध्यंतरी या अपूर्व योगाची पर्वणी त्यास लाधली!

रात्रीच्या एकांत वेळीं आपल्या शयनागारांत असतांच जयश्रीनें मातृपदाचा गंभीर वेष टाकून दिला! खोटाच कां होईना, पण मानिनीचा अभिनय आपणास आजही अवगत आहे, हें तिनें जयचंदास तेव्हांच जाणविलें! त्यावेळेपुरता दोघांच्याही आयुष्यांतील तारुण्याचा वसंतकाळ पुनः आसमंत भागीं पसरलेला दिसला.

"बाले!"— "नाथ!" विमुञ्च मानिनि! रुषं"
"रोषान्मया किं कृतम्?"
"खेदोऽस्मासु" "न मेऽपराध्यति भवान् सर्वेऽपराधा मयि!"

या वर्णनाप्रमाणें त्या दोघांच्या प्रेमकलहास प्रारंभ झाला. जयचंदानें पराजय पत्करून आपल्या प्रियतमेच्या चरणीं क्षमायाचनेची खंडणी भरपूर मोजली; आणि पुनः कोणत्याही प्रणयनियमाचा भंग होणार नाहीं, अशी ग्वाही दिली. वास्तविक एवढ्यानेंच जयश्रीचा मान लुप्तप्राय व्हावयास पाहिजे होता आणि तसा तो होत चालला होताही; परंतु इतक्या लौकर प्रसन्नता दर्शविल्यास, आपली थट्टा होईल, या शंकेनें जयश्री रुष्टच राहिली. तिच्या मनाची ही हालचाल जयचंदासही समजली; तरीपण ती आपल्यास कळली नाहीं असें दर्शविण्याकरितां तो तिला ऐकूं जाईल, असें स्वगत म्हणाला, "शेवटीं बाणानें म्हटलें त्याप्रमाणेंच अनुभवास आलें. स्त्रियांचें हृदय मुळांतच कठिण असतें आणि त्यांत त्याचा सहवास–" यावेळीं जयश्री चोरट्या नजरेनें आपल्याकडे पाहात आहे, असें पाहून तो मध्येंच थांबला व म्हणाला, "पहा तूं चोरून मजकडे, पण बाणकवीनें स्त्रीच्या कठिण हृदयाबद्दल काय उद्गार काढिले आहेत, हें कांहीं मी तुला सांगणार नाहीं."

"न का सांगायचं होईना; मला आहे माहीत त्यानं काय तारे तोडले आहेत ते." असें म्हणून जयश्री तोंड फिरवून बसली; पण खरें पाहतां तिच्या मनांतून पतीचें पुढील बोलणें ऐकण्याचें होतें.

थोडा वेळ गेल्यावर जयचंद स्वगतच पण मोठ्यांदा ह्मणाला,

" गतप्राया रात्रिः कृशतनु शशी शीर्यत इव ।
प्रदीपोऽयं निद्रावशमुपगतो घूर्णत इव ॥
प्रणामान्तः कोपस्तदपि न जहासि क्रुधमहो !
स्तनप्रत्यासत्त्या हृदयमपि ते चण्डि कठिनम् ॥ "

पण शेवटची ओळ पूर्ण होण्याचे आंतच जयश्रीनें आपल्या करपल्लवानं त्याचें तोंड बंद केलें आणि लज्जित होऊन ह्मटलें, " मी नाहीं असं बोलू शायची ! "

\+ \+ \+ \+ × \+

दोघांचीही जीवात्मैक्याची शुद्ध प्रेममय समाधि हळू हळू उतरली ! उभयतांनींही श्रान्त दृष्टीनें एकमेकांकडे पाहिलें ! दृष्टभेट होतांच जयश्रीच्या श्रमित मुद्रेवर लज्जायुक्त मधुर हास्य क्षणमात्र उमटलें ! त्या हास्यलकेरींत कोणतें रहस्य ह्मणून नव्हतें ? विवाहाच्या परमोच्च ध्येयाचें–धर्म–अर्थ काम या त्रयीचें–सुंदर चित्र त्या अस्पष्ट हास्यांत होतें ! षड्गुणशील भार्येच्या निर्मल हृदयाची प्रसन्नता त्यांत प्रतिबिंबित झाली होती ! स्वतःबरोबर प्राणप्रिय पतीलाही परमेश्वरपदाला पोंचविण्याचें पतिव्रतेचें पवित्र सामर्थ्य त्यांत झळाळत होतें !

जयश्रीच्या त्या हास्यानें मोहित होऊन जयचंद एकटक तिच्याकडे पाहात राहिला. यावेळीं तो सुखाच्या अंतिम सीमेवर होता. अर्थातच त्याच्या शंकाकुल मनानें भत भविष्याचें परस्पर विरोधी चित्र दाखविण्यास प्रारंभ केला ! वर्तमान काळाच्या सूक्ष्म सांध्यावर उभें राहून त्यानें मागें पाहिलें; एक अल्लड बालिका त्याच्याजवळ जवळ येत त्याच्या देहांत, त्याच्या आत्म्यांत इतकेंच नव्हे, त्याच्या अनुरेणूंत समाविष्ट झाली ! अल्पावकाशांतच त्याचें पूर्ण अद्वैत झालें ! त्या भासमय मूर्तीकडे पाहात असतां कधीं त्यास आपण जयश्री आहोंत असें वाटे तर दुसऱ्याक्षणीं जयश्रीनेंच जयचंदाचें रूप धारण केलें आहे, असेंही वाटे. इतक्यांत विद्युत्पाताप्रमाणें कांहीं कडाडलें !

तावडतोब त्या मूर्तीला द्वैत आलें ! एकाच सिंहासनावर आपण व जयश्री परस्परांच्या निकट उभें राहून भयचकित दृष्टीनें एकमेकांकडे पाहात आहोत; असा देखावा त्यास दिसूं लागला. अल्पकाळांत त्यांच्या खालील सिंहासनास एक भेग पडली ! जणूं काय दोन चिरे सांधून त्यांची बैठक केली होती ! असें वाटूं लागलें.

अशा प्रकारें जयचंदाचें मन भूतकाळावरून वर्तमान काळावर आलें; आणि तेथें क्षणमात्र विसंबून त्यानें भविष्यकाळावर उडी मारिली.

सर्व देखावा बदलूं लागला. सिंहासनाचा सांधा निखळला ! क्षणांत दोनी मूर्तीखालचे दोनी चिरे अगदी दुभंग झाले ! हळू हळू ते दुरावूं लागले ! एक बोट अंतर होतें तें दोन बोटांवर गेलें ! मूर्तीचीं शरीरेंही तितक्याच प्रमाणांत एकमेकांस अंतरलीं ! चार बोटें, सहा बोटें, वीत, हात, अंतर वाढत चाललें ! तो प्रकार पाहून वरील मूर्तींनीं एकमेकांस कवटाळण्याचा प्रयत्न केला पण व्यर्थ ! चिऱ्यांची दूर होण्याची गति क्षणों-क्षणीं वाढूं लागली ! दोनी मूर्ति परस्परांपासून हां हां म्हणतां दहा पंधरा हात दूर गेल्या ! मध्यें एक मोठा चर दिसूं लागला ! त्यांच्यांतील अंतर वाढविण्याचें कार्य कोणती शक्ति करीत होती, देव जाणे ! तें झपाटयानें वाढत चाललें होतें ! दोन्ही मूर्ति परस्परांपासून कोसाच्या अंतरावर गेल्या ! मध्यंतरी अत्यंत गंभीर अशी भयंकर गर्त्ता दिसूं लागली ! तरीही अंतर वाढतच होतें !

तारवटलेल्या दृष्टीनें जयचंद ही मनानें निर्माण केलेली माया पाहात होता ! व्याकुळतेनें त्याच्या हृदयाचें पाणी पाणी होत होतें ! पुनः त्यानें आपल्या—भासमय भविष्यचित्राकडे पाहाण्यास सुरुवात केली !—किती आश्चर्य ! त्या दोनी मूर्तीतील अंतर दिशा भेदून पलीकडे जाऊं पाहात होतें ! भीतीनें चेतनारहित झालेली जयश्रीच्या मूर्ति किंचाळून ओरडली, "पतिदेवा हें काय झालें!" आणि एवढें बोलून तिनें त्यांच्या मूर्तीकडे येण्या-करितां खालच्या गर्त्तेत उडी घेतली ! गर्तेच्या भयंकर खोलींत कालरात्रीचा

अंधकार पसरलेला होता ! त्यानें जयचंदाचें हें अमूल्य रत्न आत्मसात् केलें! एका कडयावर आतां फक्त एकच मूर्ति दिसत होती ! जिकडे जिकडे भयंकर खोली भासत असून, अंधाराचा समुद्र जोराजोरानें उसळ्या मारीत होता;

जयचंद निधडया छातीचा वीर आणि त्यास दिसलेलें चित्रही काल्पनिक; पण तो तें पाहून इतका घाबरला कीं, त्यास कसलेंच भान राहिलें नाहीं ! तो अत्यंत दुःखानें चित्कारून आपले बाहू पसरून म्हणाला, " जयश्री, जयश्री !–माझ्या हृदय विरामा ! !—"

जयश्री आपल्याच आनंदांत मग्न असल्यामुळें आपल्या पतीच्या मनांत कसला कल्लोळ उडाला आहे, याकडे तिचें लक्ष्यच नव्हतें. शिवाय तिच्यावर निद्रेची झांपडही पडूं लागली होती. तोंच तिनें पतीचा चित्कार ऐकला ! त्याबरोबर ती दचकली व घाबरत त्याच्या बाहूंत शिरत म्हणाली, " काय –काय ?–हें काय आत्मारामा ! ! "

जयचंदानें तिला घट्ट कवटाळलें. तिचा स्पर्श होतांच तो भानावर आला ! पण त्याच्या भयाचें व व्याकुळतेचें चिन्हमात्र घर्माच्या रूपानें त्याच्या मुद्रेवर ठिपकूं लागलें ! त्याचें अंतःकरण धडधडत होतें, तरी त्यानें आपल्या प्रियपत्नीला हृदयाशीं धरून निर्भयतेचा एक सुस्कारा टाकिला !

जयश्रीनें भयभीत दृष्टीनें त्याच्या घर्मस्नात मुद्रेकडे पाहिलें व आपल्या वस्त्रानें त्याची मुद्रा टिपत तिनें हळूंच विचारिलें, " एवढा कसला बरं विचार मनांत आला ? कांहींतरी तो अशुभ होता ! अशा आनंदाचे वेळीं कसली अभद्रकल्पना आली मनांत ? "

"जयश्री, तूं माझी आहेस ! " जयचंदानें प्रश्नाप्रमाणें कांहींतरी म्हटलें !"

" मी आपली आहें ! " जयश्रीनें म्हटलें, " एकाच जन्माची का, अनंत जन्माची मी आपली आहें. एकवेळ आपण माझे नसाल, पण मी मात्र निःसंशय आपली आहें !—पण हें असलं काय बरं विचारणं ? "

जयचंद आपली सर्व कपटविद्या विसरला. तो म्हणाला, " श्री, ज्याप्रमाणें तूं माझी आहेस, त्याचप्रमाणें मीहीपण निव्वळ तुझाच आहें. जयचंदाच्या शरीरावर व मनावर फक्त त्याच्या जयश्रीची सत्ता आहे; आणि

त्या एकाच गोष्टीनें मी कोणत्याही पापांतून वर निघेन अशी मला खात्री आहे." एवढें बोलून तो थांबला. जयश्रीला त्याच्या शेवटच्या वाक्याचे रहस्य कळलें नाहीं. ह्मणून ती ह्मणाली, "पतिपत्नीच्या प्रमळ ऐक्यांत पापाची अस्पष्ट छायाही दिसणें शक्य नाहीं. परमेश्वरी तेज त्या जोडीचें सर्व आपदांपासून संरक्षण करितें!"

जयश्रीचें तें मार्मिक वाक्य जयचंद्राच्या विवेकबुद्धींत चांगलं घुमलें. याक्षणीं आपल्या मनाचा अधःपात आपल्या देवतेपुढें सांगून, तिची व परमेशाची क्षमा मागून शुद्ध व्हावें; अबदुलखानाशीं चालू असलेला सर्व स्नेहसंबंध तोडून टाकावा आणि आपल्या पत्नीच्या प्रेमळसहवासांत प्रतापानें आखून दिलेला मार्ग आक्रमित मेवाडकरितां मरावें; असें त्यास अगदीं मनापासून वाटलें.

आपली कथा कोठून व कशी सांगावी याचा तो विचार करूं लागला. अनेक विचार त्याच्या मनांत आले व गेले. जयश्रीची दृष्टि त्याच्या मुद्रेवर खिळली होती. सुमारें घटका काळ लोटला तरी जयचंद्राचा जम बसेना. मनांतील विचाराप्रमाणें त्याची मुद्रामात्र सारखी पालटत होती. तें पाहून जयश्रीनें त्याच्या हनुवटीला हात घालून ह्मटलें, "ऐकलं का? आपल्या मनांत कसल्या तरी वेड्या वांकड्या विचारांचा फार मोठा गोंधळ उडालेला दिसतो आहे. ते आपले विचार मला कसे सांगावेत, अशीही पंचाईत आपल्यास पडली असावी. तेव्हां माझं सांगणं आहे, आपण आतां कसलाच विचार करूं नये. आपण उद्यां परवां अगर आणखी केव्हां तरी बोलूं. ते विचार मला सांगण्यासारखे नसले तर ते एकण्यावांचून माझं कांहीं नडलं नाहीं. आपण मला कांहींच सांगू नये. स्वस्थ आपण निजावं कसं! मनुष्यानं असे फाजील विचार करून उगीच आपलं डोकं भणभणून घेऊं नये. मन मोठं खोटं आहे! एकदां तें तारवटलं ह्मणजे त्याला ताळ ना तंत्र! सुखाच्या लालसेनें तें सारखं धडपडत असतं, पण ऐन सुखांत असतां त्यांतच रममाण न होतां, कांहीं तरी काल्पनिक दुःख निर्माण करून त्याकरितां तें झुरूं लागतें असं तें मोठं चत्कारिक आहे."

जयश्रीची ही विचारसरणी जयचंदास इतकी अचुक पटली कीं, त्या भरांत तो चटकन् उठून बसला व एकदम म्हणाला, "अहाहा! जयश्री, तूं हें किती बरोबर बोललीस? अगदीं तुझें हें बोलणें मला सर्वस्वीं पटलें. मनुष्याचें मन इतकें मूर्ख आहे खरें." असें म्हणून त्यानें थोड्या वेळापूर्वी आपल्या मनाला कसकसा भास झाला, याचें सविस्तर वर्णन केलें. जयश्रीनें तें लक्ष्यपूर्वक ऐकलें. पण तिला त्याचें कांहीं विशेष भय वाटलें नाहीं. कारण ज्या फलकावर ( जयचंदाच्या अधम वर्तनावर ) त्या भासाचें चित्र उमटलें होतें, त्याची तिला अस्पष्ट कल्पनाही नव्हती. ती जर का असती, तर तिच्या स्त्रीहृदयाला तें चित्र अशुभ भविष्य सूचक वाटलें असतें; आणि तिच्या मनाला विलक्षण हुरहूर लागली असती. पण तसें कांहींच नव्हतें. त्यामुळें ती हंसली व म्हणाली, "आपली फसवणूक करण्याकरितां आपल्या मनानें हा मोठाच खेळ केला म्हणायचा, कल्पनेंतील आपली जोडी फुटली तरी सत्य सृष्टींतील ही जयश्री आपल्या पंचप्राणापासून अणुमात्र ढळणार नाहीं!" इतकें बोलून ती उठून बसली. थोडावेळ तिनें जयचंदाकडे पाहिलें आणि नंतर आपलें वस्त्र नीटनेटकें करीत ती म्हणाली, "कल्पनेंतील जयश्रीनें आपल्या प्रेमाच्या जोरावर दुरावलेल्या अनंत अंतरावरील जयचंदजीच्या बाहूंत उडी न घेतां खालच्या अंधेराच्या समुद्रांत उडी घेतली, हें अनुचित झालें. सत्य सृष्टींतील जयश्री तसं वेड्यासारखं नाहीं करणार." असें म्हणत तिनें मांडी घातली व तिच्यावर अंगुली निर्देश करीत म्हटलें, "यावं, प्राणाधार! इथं तें भणभणलेलं मस्तक टेका आणि विश्रांति घ्या! आपल्या प्रेमाच्या जादूनं मी आपणांस निद्रा आणित्यें."

ती आज्ञा–ती विनंति–तें जिवलग आव्हान जयचंदानें स्निग्ध दृष्टीनें तिच्याकडे पाहात मान्य केलें. त्याची मान न अवघडेल, अशा धर्तीनें तिनें त्याचें मस्तक आपल्या मांडीवर घेतलें! दोघांचीही पुनः हास्ययुक्त दृष्ट भेट झाली! जयश्रीनें मिटत्या नेत्रांनीं त्याच्या हंसत्या ओष्ठांचें चुंबन घेतलें!

लज्जेची लाली निवळल्यावर तिनें म्हटलें, “ गाणें म्हणूं का एखादें ? जयचंदानें अनुमति दर्शविली.

घटकेपूर्वी रंगारूपानें नटून पतिसेवा करणारी पतिव्रता आतां मातृवेष धारण करून आपल्या प्राणनाथास वत्सल रसाचा आस्वाद देऊं लागली !

हलक्या हातानं त्यास थोपटीत जयश्री मंजुळ स्वरांत गाणें म्हणूं लागली.

---

# परिच्छेद १४ वा.

## कपटविद्येचा श्रीगणेशा.

कोणत्याहि पुरुषास तावडतोब निद्रा प्राप्त होण्यास जयचंद्राची त्या वेळची परिस्थिति किती परीनें तरी अनुकूल होती ! प्राणापेक्षांही प्रिय अशा पत्नीनें काया-वाचा-मनेंकरून अर्पण केलेली सेवा भोगून शांत झालेलें मन, तें सौख्य आठवीत निद्रामंदिरांत शिरण्यास मस्तकाला आवश्यक असणारी पायरी ( उशी ) पत्नीच्या मृदुतुल जंघेची, विचारास स्थिरता यावी म्हणूनच जणूंकाय मंदगतीनें होणारा पत्नीच्या कोमल करकमलाचा प्रेमळ आघात, सर्व मनोवृत्ति तन्मय होण्याकरितां झटलें जाणारें मंजुळ गीत आणि रात्रीचा अतिक्रम इतक्या गोष्टी एक समयावच्छेदेंकरून अनुकूल असल्यावर निद्रा येण्यास कितीसा अवकाश लागेल बरें ? परंतु इतक्या सर्व साधनांच्या प्राप्तीनेंही जयचंदास निद्रा आली नाहीं; नव्हे, येण्याचें चिन्हही दिसलें नाहीं! चाणाक्ष वाचकांनीं ताडलें असेल; याला एक फार मोठें कारण होतें. जयचंदाची विवेक शक्ति स्थिर नव्हती ! ती त्यास निद्रा सौख्य भोगूं देईना ! उलट त्याच्या भोंवतीं निद्रेकरितां जमलेल्या साधनांचा उपयोग त्याची अस्थिरिता तिनें करून घेतला!

त्याच्या मस्तकावर कोमल आघात अविरत पडत होतें; जणूं गुलाबांच्या फुलांचा वर्षाव सुरू होता. गाण्यांतील शब्दार्थागणिक उठणाऱ्या लहरी त्याच्या कर्णपुटांत शिरत होत्या; जणुं त्याच्या निद्रेला खुलविण्याकरितां गुदगुल्या केल्या

जात होत्या आणि जयश्रीच्या मांडीचा कोमलतर स्पर्श त्याच्या मस्तकास अलगद झेलून धरित होता; जणूं त्याची मूर्ति जयश्रीच्या हृदयसंपुटांत समाविष्ट झाली होती; परंतु अरेरे! आंतील बाजूला त्याच्या विवेकशक्तीनें त्याच्या मनाला कांटयाच्या पिंजऱ्यांत अडकवून धरिलें होतें! त्यामुळें त्याच्या हृदय-भूमीवर अनेक विचारांचे अनिवार थैमान सुरू झालें!

**पहिला विचार**--जयचंद, आज तूं भाग्यवान् आहेस. इहलोकांतील परमसुख तुझ्यापुढें हात जोडून उभें आहे. श्री आणि सरस्वती, धर्म-अर्थ व काम, शील व सत्कीर्ति या सर्व गोष्टी एकत्र होऊन जयश्रीच्या रूपानें तुझ्या अणुरेणूंशीं संयुक्त झाल्या आहे. सांग वीरा, असें भाग्य कितीजणांच्या वांटयाला आलें आहे ? आमच्या आजूबाजूला नजर फेंकून पहा बरें: संसार तापानें पोळलेले अनेक जीव तुला प्राप्त झालेल्या सौख्यासारखें सौख्य लाभावे म्हणून तडफडत नाहींत का ? मग असें सौभाग्य केवळ अविचारानें गमा-विणार का ?

**दुसरा विचार**--इहलोकांच स्वर्ग आणणारी जयश्रीही तुला पाहिजे आणि तुझ्या जिण्याला मातीमोल करणारी मोंगलाची मैत्रीही तुला पाहिजे. पण या दोन्हीं गोष्टी इतक्या परस्पर विरोधी आहेत कीं, तूं वाटेल तो प्रयत्न केलास तरी त्यांचा जोड जमणें अशक्य आहे. जयश्रीला सोड, इहलोकच्या स्वर्गाला मूक आणि पारलौकिक उद्धाराला शेवटचा राम राम कर ! मोंगलाची मैत्री धर, वीराला कलंक लावणारा निर्लज्जपणा पदरांत घे आणि नरकाचें साधन कर !

**तिसराविचार**--जयश्रीला सोडण्याची तुझी इच्छा नाहीं ! मोंग लाच्या मैत्रीची लागलेली चटकही सोडवत नाहीं. कारण, जयश्री तुझ्या-सौख्याची अधिष्ठात्री देवता आहे तर मोंगलांच्या मैत्रीनें भोग विलासादि नश्वर सखें लाभण्याची तुला आशा आहे ! दोन्ही लोहचुंबक सारख्याच शक्तीचे आहेत. जयचंद, तूं कोणाला यशस्वी करणार ?

**मुख्य विचार**-कसें वागावें ? काय करावें ?

**चवथा विचार**-पण जयश्रीनें तुझ्या मताला अनकूल कां होऊं नये

ती आपल्यास पतिव्रता म्हणविते. तेव्हां तुझ्या इच्छेप्रमाणें चालणें तिचें कर्तव्य नाहीं का ? हो, ही गोष्टही कांहीं खोटी नाहीं. जयश्रीनें तुझ्या सुखाकरितां, इच्छेकरितां, मताकरितां, वाटेल तें कार्य मग तें कार्य सत्कार्य असो कीं, कुकार्य असो, केलें पाहिजे ! हा तिचा सतीधर्म. हा ती जर न आचरील तर ती पतिव्रता म्हणतां येईल काय ?

**पांचवा विचार**—असें असलें तरी जयश्री तुझा धर्म आचरणार नाहीं. कारण, पातिव्रत्य कशाला म्हणतात, हें ती जाणते आहे. पतीच्यामागें आंधळेपणानें जाणें म्हणजे सतिधर्म नव्हे. पतीला अधर्माचरण करूं देणें महापाप आहे. तेव्हां तशा पापापासून जयश्री निग्रहानें तुझें निवारण न करील, तर ती स्वकर्तव्यास चुकली असें होईल. जयश्री तसें करणार नाहीं. कारण, ती अस्सल रजपुताणी आहे व ती प्रतापसिंगाचे पंखाखालीं वाढली आहे.

**सहावा विचार**—मग तिला सर्व सांगून टाकीनास. ऊठ, जयचंद, आपल्या हातून घडलेलें पाप सांगून टाक, आणि ती सांगेल तें प्रायश्चित्त घेऊन मोकळा हो ! जयश्रीचा शुद्ध जयचंद हो ! यांतच तुझें, तिचें, मेवाडचें, सकळ रजपुतांचें कल्याण आहे ! तुला माहीत नाहीं वेड्या, तूं असाच तिला फसवीत राहिलास आणि पुढें केव्हां तरी तिला तुझें सर्व कपट कळलें तर त्या साध्वीची काय स्थिति होईल, असें तुला वाटतें. तुझ्यावर तिचा किती निर्मळ विश्वास आहे ! तो किती प्रेमानें तुझ्या सर्वस्वाचें संरक्षण करिते आहे !! सांग जयचंद, त्या प्रेमाला तूं खंडित करणार का ? तुझ्यावर अवलंबून असलेली ती तुझी सुखलता तूं आपल्या हातानें तोडणार का ?

**सातव्या विचार**—पण–पण, मोंगलांना मित्र करण्यांत अधःपात होतो ? स्वदेश स्वधर्म यांचा अभिमान पाळला पाहिजे म्हणजे वीरजन्माचें सार्थक होतें, नाहींतर होत नाहीं, असें म्हणतात; पण हें खरें कशावरून ? ज्यांचें भाग्य उत्कर्षांत असतें ते वर चढत असतात. ते कसेही वागले तरी त्यांचा वरचष्माच असतो. अर्थात् अशा भाग्यवान् लोकांशीं विरोध कर-

ण्यांत काय मौज आहे. आज मोंगलाचा तारा चढतो आहे. त्यांचीं अनन्वित कृत्यें परमेश्वरसुद्धां खपवून घेतो आहे, मग त्यांच्या मैत्रीचा दोष कां असावा ?–कांहीं नाहीं. देवधर्म, स्वदेश, पापपुण्य, इहलोक, परलोक इत्यादि सर्व गोष्टी खुळचट लोकांच्या आहेत ! मनुष्यानें चालू घडीकडे लक्ष द्यावें, हेंच बरें.

**आठवा विचार**—पण मग रामानें वनवास कां बरें पत्करला ? हरिश्चंद्रानें स्वतःस कां विकून घेतलें ? पांडवांनीं वनवास कां भोगला ? श्रीकृष्ण गोळीवाड्यांतच कां रमला ? केवळ धर्माकरितांच ना ? मग वीरांचा धर्म कोणता आहे जयचंद ? प्रतापाच्या पुतण्या, **संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते** ! या भगवदुक्तीचा अर्थ काय ?

**मुख्य विचार**—कसें वागावें ? काय करावें ?

या किंवा अशा धर्तीचे दुसरे अनेक विचार करीत जयचंद अगदीं भांबावून गेला. जयश्रीचें गाणें चालू होतें. तिच्या मनांत पतिसेवेखेरीच दुसरें कांहीं व्यवधान नव्हतें. ' आपण किती भाग्यवान् आहोंत ! ' याच विचारानें ती डोलत होती.

पुण्यशील पतिव्रता आणि पापप्रवृत्त पति यांचें हें चित्र आपणास कोणता उपदेश देणार नाहीं ? असो.

कांहीं एक ठाम विचार ठरवून जयचंद ताडकन् उठून बसला व आपल्या पत्नीकडे पाहूं लागला.

जयश्रीचें गाणें एकदम बंद पडलें. ती आश्चर्यचकित होऊन म्हणाली, " काय ? झोपेचें नांव नाहीं ?—कां बरं आपलं मन आज अस्वस्थ झालंय् ?"

जयचंदानें उत्तर दिलें, " माझ्या मनांत घोळत असलेल्या कांहीं गोष्टी तुला सांगितल्यावांचून मला स्वस्थता वाटणार नाहीं. त्या गोष्टींचा तुझ्या माझ्या आयुष्याशीं इतका कनिष्ठ संबंध आहे कीं, तुला त्या कळल्याच पाहिजेत. त्या तुला कशा सांगाव्यात याचाच मला मोठा विचार पडला आहे.– त्या सर्व गोष्टी इतक्या चमत्कारिक आहेत कीं, एकाएकीं तुझा त्याच्यावर विश्वाससुद्धां बसणार नाहीं. "

जयश्रीला विशेषच आश्चर्य वाटलें. ती विमनस्कतेनें म्हणाली, " अशा कोणत्या बरं गोष्टी आहेत? कारण, आपलं मन इतकं अस्वस्थ कधींच पाहिलं नव्हतं. "

जयचंदानें विचार करीत म्हटलें, " तें सर्वच विलक्षण आहे. वास्तविक याच्या पूर्वींच मी तुला सर्व सांगून टाकावयास पाहिजे होतें; परंतु काय असेल तें असो; मला धैर्यच होईना--" असें म्हणत त्यानें तिला आपल्या-जवळ ओढीत म्हटलें, " अस्सें, जयश्री, माझ्या अगदीं जवळ बैस. म्हणजे तुझ्या निकट सान्निध्यानें मला त्या गोष्टींचा उच्चार करण्यास सुलभ वाटेल." इतकें बोलून तो पुनः विचारमग्न झाला.

जयश्री त्याच्या वामांकीं बसून त्याच्या वामबाहूवर तिनें आपलें मस्तक ठेवलें आणि आश्चर्यानें ती त्याच्या मुद्रेकडे पाहूं लागली. जयचंदाचा पक्का विचार ठरला. आपल्या पत्नीस सर्व सांगून टाकावयाचें, असें त्यानें अगदीं निश्चित केलें. त्यानें तिच्या हनुवटीस हात घातला व करुणदृष्टीनें तिच्याकडे पाहात म्हटलें, " लाडके, मी तुला फसविलें आहे. "

इतक्यांत एक चमत्कार झाला ! त्यांच्या खोलीच्या बाहेरच्या बाजूस एक फार मोठा जाळ झाल्याप्रमाणें फटींतून दिसलें ! वास्तविक तीं दोघेंही पति-पत्नि आपल्या विचारांत अगदीं पूर्ण गढलीं होतीं; परंतु रात्रीच्या काळोखा-मुळें व एकदम भक्कन् प्रकाश दिसल्यामुळें दोघांचेंही लक्ष तिकडे गेलें. " अगबाई ! हा जाळ कसला ?" असें म्हणत जयश्री एकदम ताठ उठून उभी राहिली. जयचंदही उठला ! पण तितक्यांत पुनः सगळीकडे काळोख झाला ! तो प्रकार पाहून दोघांनींही विस्मय पावून एकमेकांकडे पाहिलें. तोंच पुनः भक्कन् जाळ झाला !--पुनः दोन पळांत गाढ अंधकार !

जयश्रीनें एकदम दाराकडे धाव घेतली. जयचंदही तिच्या पावलावर पाऊल टाकून आला ! जयश्री दार उघडणार तोंच जयचंद तिला अटकाव करून तिच्या कानांत म्हणाला, " थांब, श्री, अविचार करूं नकोस. " असें म्हणून पुढें तो कांहींसा अडखळत बोलला, " माझ्या अस्वस्थतेचें खरें कारण हा जाळच होय. "

" म्हणजे काय ? " जयश्रीनें मान मुरडून आश्चर्यानें विचारिलें.

शेवटीं जयचंद आपल्या नव्या वळणावर गेला. तो आपला सर्व पश्चाताप विसरून गेला. आपल्या कपटविद्येनें जयश्रीस मारणेंच इष्ट आहे, असे त्यानें ठरविलें. अबदुलखानानें शिकविलेला गुरुमंत्रच सिद्धीस न्यावयाचा; असा त्यानें निश्चय केला.

तो म्हणाला, " जय, आपल्या या गढींत एक भुताटकी सुरु झाली आहे ! —तो पहा, पुनः जाळ झाला !"

जयश्री स्तंभित झाली ! ती उद्गारली, " आपल्या गढीवर भुताटकी ?"

जयचंदानें नाकावर बोट ठेऊन तिला आपल्यामागें येण्यास सांगितलें. त्यानें खांकरत खोकत पुढें होऊन दार उघडलें. जयश्री त्याच्यामागें होतीच. तिनें हळूंच विचारिलें, " तलवार आणूं का ?"–" नको "– जयचंदानें तशाच स्वरांत उत्तर दिलें व दोघेंही बाहेर आलीं ! बाहेर जिकडे तिकडे अगदी सामसूम होतें ! दोघेंही मुकाट्यानें घराच्या अगदीं बाहेर पडलीं ! जिकडे तिकडे तीच शांतता ! आकाशांत मात्र अनंत तारा चमकत होत्या !

त्या जागीं त्यांना येऊन पांच पळें झालीं नाहींत, तोंच त्यांच्यापासून पंचवीस हातांच्या अंतरावर एका झाडाखालीं एकदम मोठा जाळ झाला व तो अल्पावकाशांत नाहींसा झाला ! जयश्री भयचकित नेत्रांनीं आपल्या पतीकडे पाहूं लागली ! जयचंद एकटक जाळ दिसलेल्या दिशेकडे पहात होता. दहापांच पळें गेलीं नाहींत, तोंच तो जाळ पुनः चमकला व नाहींसा झाला. मात्र यावेळीं त्यानें आपलें पहिलें स्थान बदललें होतें.

जयचंदानें जयश्रीस म्हटलें, " तूं आंत जा. मी धनुष्य बाण घेऊन या जाळाचा पाठलाग करितों. थोड्या वेळानें येतोंच परत." असें म्हणत तो घराकडे वळला.

दोघेंही मुकाट्यानें घरांत आलीं. जयचंदानें झटकन् कपडे चढविले व धनुष्य बाण हातीं घेतला. त्यानें जयश्रीकडे पाहिलें तों तीही बाहेर निघण्याची तयारी करीत होती. त्यानें चकित होऊन म्हटलें, " हें काय ?

" मीही आपल्याबरोबर येणार !"

" वेडी तर नाहींस.–तूं मजबरोबर आल्यावर इथं बाळाकडे कोण पाहील ?"

" आपण लौकरच परत येऊं.–नाहींतर आपणही जाऊं नये."

जयचंदास हेंच पाहिजे होतें. त्यानें जयश्रीकरितां मोठया कष्टानें त्या चमत्कारिक जाळाचा पाठलाग करण्याचा बेत रहीत केला.

दोघेंही दार लाऊन निजण्याच्या विचारास लागलीं ! पण आतां जयश्रीलाही झोंप येणें शक्य नव्हतें. ती त्या चमत्कारासंबंधीं अनेक विचार करीत पहुडली. तिला झोंप लागत नाहीं, असें पाहून जयचंद म्हणाला, " जयश्री, त्या जाळानें तुझ्या मनावर चांगलाच परिणाम केलेला दिसतो. हं: जाऊंदे. त्यांत कांहीं विशेष घाबरण्यासारखं नाहीं."

" मला भय नाहीं वाटत त्याचं; पण हा काय चमत्कार असावा, याचं नवल वाटतंय्. कुणा बिचाऱ्याला ती योनी ( पिशाच योनी ) प्राप्त झाली आहे. देव जाणे."

" महिना झाला, मी हा चमत्कार पाहतों आहें. शिवाय अलीकडे मला एक फारच चमत्कारिक स्वप्न पडतें. वरचेवर एकच स्वप्न पडतें. त्यावरून ह्या जाळाशीं आपला कांहींतरी संबंध आहे, असें मला वाटूं लागलें आहे व त्यामुळें माझें मन अवस्थ झालें आहे.–पण आतां या गोष्टी नकोत. रात्र बरीच झाली आहे. देवाचें नांव घेऊन निजूं या कसें !"

---

# परिच्छेद १५ वा.

## वरचेवर पडणारें स्वप्न.

ऐनवेळीं जयचंदाच्या मनानें उलट खाल्ली ! चांचे लोकांच्या जहाजाप्रमाणें त्यानें आपलें शीड चटकन् अगदीं विरुद्ध दिशेला बदललें ! पश्चात्तापाच्या झुळुकेनें सन्मार्गाकडे झुकतां झुकतां त्यानें कोल्हाटी उडी घेऊन आपला स्वीकारलेला मार्ग कायम ठेविला !

जयचंदाच्या या चित्तचांचल्याचें आश्चर्य वाटायला नको आहे अथवा त्यास नांवें ठेवण्याचेंही कारण नाहीं. पृथ्वीच्या पटावर हालणारीं सर्व काळांतील सर्व मनुष्य प्यादीं तोच आचार करीत नाहींत काय ? धर्माधर्माचें ज्ञान सांगणारा साव स्वतःवर प्रसंग येतांच एकदम कच कां खातो?–चित्तचांचल्यामुळेंच ! ईश्वरप्रेमांत मुरत चाललेला भक्त क्षुल्लक कंकणध्वनीनें मोहित होऊन कां फसतो ? चित्तचांचल्यामुळेंच ! मूर्खाला ज्ञानोपदेश देणारा शहाणा परीक्षेच्या वेळीं हिणकस कां ठरतो ?–चित्तचांचल्यामुळेंच ! ज्ञानी, अज्ञानी, सधन, निर्धन, सुस्वरूप व कुरूप, शिष्ट व भ्रष्ट, तरुण व वयस्क स्त्री व पुरुष सर्व प्राणी या चित्तचांचल्याच्या भोंवऱ्यांत सतत गिरक्या घेत आहेत, आणि स्वतःस स्थितप्रज्ञ समजून दुसऱ्यांस हंसत आहेत ! हीच परमेश्वरी माया होय. जयचंद याच मायेला बळी पडला ! मग त्यास हंसण्याचा आपल्यास अधिकार काय ?

एव्हांपासून जयचंदानें प्रत्यक्ष जयश्रीवरही कपटप्रयोग करण्याला प्रारंभ केला.

रात्रीं निजल्या निजल्याच त्यानें विवेकशक्तीला पार एका दूरच्या खड्डयांत गाडून टाकिलें आणि धिमेपणानें आपला योजिलेला हेतु हातीं घेतला !

दुसरे दिवशीं जयश्रीला नवीन विचारांत गुंगवत ठेऊन त्यानें आपले इतर धागे जुळविण्याकरितां बहिरामगडाकडे प्रयाण केलें.

जयचंदानें अटकळ बांधून ठेविल्याप्रमाणें जयश्रीच्या मनावर त्या चमत्काराचा–भुताटकीचा–विलक्षण परिणाम झाला. त्यारात्रीं अर्धवट झोंपेंतही तिला त्याचा धसका होताच. शिवाय दुसरा दिवस सबंध तिनें त्याविषयीं विचार करण्यांत घालविला. तिच्या बुद्धीप्रमाणें व समजुतीप्रमाणें ती स्वगत विचार करूं लागली. पवित्र स्थळीं व पुण्यवान् मनुष्यांजवळ पिशाच्चें येत नाहींत; त्यांना तीं दिसत नाहींत, असें म्हणतात. मग गेल्यारात्रींचा चमत्कार चंबेलवाडींत नव्हे तर अगदीं आपल्या कुटिकेच्या आवारांत घडावा आणि तो आपणा दोघांना कां बरें दिसावा ? तेव्हां आपल्या धर्माचरणांत तर कांहीं बिघाड झाला नाहीं ?–तसें नसलें; आपल्या कोणा आप्तेष्टाच्या कांहीं

आशा राहून त्यास पिशाचयोनी प्राप्त झाली असावी आणि त्यानें आपल्या कांहीं इच्छा कळविण्याकरितां आगमन केलें असावें म्हटलें तरी तसें जवळचें असें आप्त एका मातापित्याच्या जोडीखेरीज आपणास कोण आहे ? आणि त्यांच्या इच्छा तरी कोणत्या राहिल्या असाव्या ? त्यांना मरून बारा वर्षे होऊन गेलीं; इतक्या दिवसांत त्यांचें या योनींतील दर्शन झालें नाहीं. अर्थात् आपल्या मातापित्यापैकीं कोणी नसावें ! बरें, सासरच्या मंडळीपैकीं तरी पिशाचयोनीला जाण्याइतकें दुष्ट व पापी कोण होतें ?–कोणी नाहीं. मग या चमत्काराचा उलगडा कसा करावयाचा ? असे अनेक विचार तिच्या डोक्यांत आले व गेले.

चार दिवस जयचंदाचें वास्तव्य परगांवीं असल्यामुळें त्या दिवसाच्या रात्रीही तिच्या मनाला अस्वस्थतेच्या गेल्या. पहिल्या दोन रात्रीं तर तिनें तो चमत्कार पुन: दिसतो कीं काय ? या जिज्ञासेनें जागून काढिल्या.

अशाप्रकारें जयचंदानें आपल्या अविचारानें आपल्याबरोबर जयश्रीच्या चित्तासही कायमचें व्यथित करून ठेविलें !

चार दिवसांनीं जयचंद आपलें काम उरकून–खरें सांगायचें म्हणजे त्यास विशेष गती देऊन–चंबेलीस परत आला.

" पुनः कांहीं तसला प्रकार ? " सवड मिळतांच जयचंदानें प्रश्न केला.

" कांहीं नाहीं.–पण माझं मन कांहीं तेव्हांपासून स्वस्थ नाहीं. "

" हूं: ! या अशा बाबींची एवढी काळजी ती काय करायची ? तुम्हां बायकांचा स्वभावच काळजीखोर ! नाहीं त्याची चिंता करीत बसाल.— जाऊंदे. तुला सांगितल्याप्रमाणें या गोष्टीचा बोभाटा करूं नकोस म्हणजे झालें. मी या गोष्टीचा बारकाईनें तपास करणार असून त्याचा अगदीं छडा लावणार आहें. न जाणों कदाचित् आपल्या शत्रूचेंसुद्धां कांहीं कारस्थान असावयाचें ! "

" भुताटकी दाखवून ? " जयश्रीनें आश्चर्यानें विचारिलें.

जयचंदानें तिची जिज्ञासा अतृप्त राहील, असें कांहीं उत्तर देऊन, तो विषय बदलला.

\+ \+ \+ \+

जयचंद वामकुक्षीची मुखशुद्धि करीत पहुडला होता. इतक्यांत जयश्री तेथें आली म्हणून त्यानें पुनः झोंपेचें सोंग केलें. तें बेमालूम साधलें. आपला पति अद्याप निद्रेंत आहे, असें पाहून व जाणून ती आपलें कशिद्याचें काम काढून बसली.

थोड्यावेळानें जयचंद झोंपेंतच बरळतो आहे, असें जयश्रीस वाटलें. म्हणून ती कांहीं आश्चर्यानें त्याच्या निद्रित मुद्रेकडे पाहूं लागली. झोंपेंत बरळण्याची संवय पुष्कळांना असते; परंतु ह्याकाळपर्यंत जयचंदास बरळतांना तिनें मुळींच ऐकलें नव्हतें.

जयचंदाचे पहिले कांहीं शब्द तुटक, अस्पष्ट असे होते. ज्याचा कांहीं अर्थ समजेल, असें एकच वाक्य जयश्रीनें ऐकलें. तें म्हणज हें:-" हें खरें कशावरून ? "

त्यानें असें झोंपेंत बरळावें हें तिला बरें वाटलें नाहीं किंवा आणखी कांहीं कल्पना तिच्या मनांत आली म्हणून म्हणा, जयश्रीनें पुढें होऊन जयचंदास जाग्रत केलें. त्यानें डोळे उघडून तिच्याकडे पाहिलें. कांहीं वेळ गेल्यावर तो उठून बसला व इकडे तिकडे पाहून म्हणाला, " एकूण तें रोज पडणारें स्वप्नच तर ?-आश्चर्य आहे ! "

जयश्रीनें त्यास चूळ भरण्यास पाणी आणून दिलें आणि म्हटलें, " कसलें स्वप्न होतें तें ? "

" तें वरचेवर पडणारें एकच स्वप्न आहे. त्या भुताटकीप्रमाणें त्या स्वप्नाचाही मोठा चमत्कार आहे. " असें म्हणून त्यानें बराच वेळ स्वप्नमीमांसा केली; आणि नंतर जयश्रीच्या इच्छेकरितां त्यानें तें स्वप्न तिला सांगितलें. जयश्रीशीं स्वतः कपटी भाषण करण्याइतकें जयचंदाचें मन धीट झालें होतें.

जयचंद म्हणाला, " वरचेवर एकाच धर्तीचें पडणारें हें स्वप्न मला केव्हांपासून पडूं लागलें, हें कांहीं सांगतां येणार नाहीं. मी त्याची मुद्दाम आठवण करितों आहें. पण कांहीं लक्ष्यांत येत नाहीं. मात्र तें पडूं लागल्यापासून प्रथम कांहीं दिवस आठ दहा दिवसांनीं केव्हांतरी पडे. पुढें तें चार दिवसांनीं दिसूं लागलें. अलीकडे पाहावें आपलें एकदिवसाआड आणि मधून मधून तर रोज पडतें—"

जयश्रीनें आश्चर्यचकित होऊन म्हटलें, " काय बाई तरी नवल ! "

" नवल ?—स्वप्नाचा मजकूर ऐकलास तर तुला त्याहूनही नवल वाटेल. मी काय सांगतों तें नीट ऐक; अगदीं पहिल्यांदा मला स्वप्न पडलें तें असें: मीं कुठेंतरी गांवाला जात होतों. कोणत्या गांवाला जात होतों आणि कशाकरितां, हें कांहीं सांगतां येणार नाहीं. एका रस्त्यानें आपला हळू हळू चाललों होतों. माझें शरीर अगदीं गळून गेलें होतें व पाय तर अगदीं थकले होते. तरी मी चालत होतों. रस्त्यावर मी एकटाच होतों. हळू हळू मी एका जंगलांत आलों व तिथें माझी वाट चुकली. तेव्हां मी एका झाडाखालीं बसलों. थोडी विश्रांति घ्यावी व कोणी येणारा जाणारा वाटसरू भेटल्यास त्यास पुढचा रस्ता विचारून पुन: चालूं लागावें, अशा विचारानें मी कितीवेळ तरी त्या झाडाखालीं पडलों होतों. एक घटका दोन घटका करीत मी प्रहरभर तेथें बसलों होतों; पण तिकडच्या बाजूस मनुष्य तर राहोंच पांखरूंही फिरकलें नाहीं. दिवस तर मावळत चालला; अद्याप किती दूर तर जावयाचें होतें, आणि वाट तर चुकलेली. पुढें काय करावें ? अशी मला मोठी पंचाईत पडली. इकडे तिकडे पाहात मी विचारांत पडलों आहें, तोंच कोणी एक वृद्ध मजकडे येतो आहे, असें मला दिसलें. हा इसम एकाएकीं कोठून आला असावा. इतका वेळ मी सगळीकडे नजर फिरवितों आहें; त्यावेळीं तो कसा दिसला नाहीं. अशा बुचकळ्यांत मी पडलों आहें, तोंच तो मजपुढें येऊन उभा राहिला ! मी त्याच्या मुद्रेकडे पाहिलें तों त्यास मी कोठेंतरी पाहिलें असावें, असें मला वाटलें. म्हणून मी त्याच्याकडे निरखून

पाहूं लागलों, तों मला त्याची मुळींच ओळख पटेना. एकदां वाटे तो आपल्या अगदीं ओळखींतला आहे. पुनः त्याच्याकडे पाहूं लागावें, तों त्याची मुद्राच पालटल्याप्रमाणें वाटूं लागे. हा त्याचा चेहरापालट पाहून मला भुताटकीचीही शंका आली व मी थोडा भ्यालोंही. मी त्यास कांहीं विचारणार, तोंच तो मला म्हणाला, " चुकलेल्या पांथस्था, तूं आपली वाट सोडून इकडे कोणीकडे आलास ?–यावेळीं तुला राजयोग आहे. तें वैभव टाकून तूं या जंगलांत कशाला आलास ?–ऊठ, मजबरोबर चल. मी तुला तुझ्या मुक्कामावर नेऊन पोंचवितों. " असें म्हणून तो पुढें झाला व मी त्याच्या मागोमाग मुकाट्यानें जाऊं लागलों. या अनोळखी मनुष्याचे मागून जाणें बरें नाहीं, असें मला वाटलें; परंतु तेवढ्यानें मी कांहीं त्याच्या मागोमाग जायचा थांबलों नाहीं.

" इतकं सर्व आपल्याला स्वप्नांत दिसलं ?–काय बाई तरी हें विचित्र स्वप्न ? " जयश्रीनें म्हटलें, "–बरं पुढं काय झालं ? "

हळूच डोकावणाऱ्या विवेकशक्तीला खालीं दडपून जयचंद सांगूं लागला. तो म्हणाला, " खरी मौज तर पुढेंच आहे. पुढें ऐक. तो म्हातारा व मी मुकाट्यानें चालूं लागलों. आम्ही दोघेही खूप खूपच चाललों. वाट अगदी सरळ होती. तो पुढें चालला होता व मी त्याच्या मागोमाग जात होतों. तो कांहीं बोलला नाहीं व मीही त्यास कांहीं विचारिलें नाहीं. वरचेवर तो मागें वळून मजकडे पाही व मी त्याच्या मागोमाग जातों आहें असें पाहून पुनः चालूं लागे.

असे आम्हीं सूर्यास्तापर्यंत चाललों. नंतर आम्हीं एका भुईकोट किल्ल्याजवळ येऊन थांबलों. किल्ल्याचा मुख्य दरवाजा बंद होता. आणि त्याचा बाहेरचा एकंदर देखावा, असा कांहीं उदास होता कीं, तो किल्ला ओस असावा, असें मला वाटलें.

" अगबाई ! मग तो बोवा कोणी समंध होता कीं काय ?–का, माणसाचं रूप घेतलेला एखादा राक्षस होता ?" जयश्रीनें भयचकीत सहज प्रश्न केला.

जयचंद म्हणाला, "पुढें ऐक म्हणजे कळेल.--त्या म्हताऱ्यानें पुढें होऊन दरवाज्यावर कांहीं [illegible] [illegible]. त्याबरोबर तो मोठा दरवाजा हळू हळू किलकिला होत सताड उघडा झाला. मी आश्चर्य करीत आंत नजर टाकिली, तों आंतल्या बाजूस एक मोठा वाडा दिसला. आंत जिकडे तिकडे दिव्याचा लखलखाट असून, माणसेंही पुष्कळ होतीं. स्वत:शींच अत्यंत विस्मय करीत मी उभा आहें, तोंच त्या म्हाताऱ्यानें ' मालक आले. होशियार ! ' असें उच्च स्वरांत ललकारिलें ! ती ललकारणी ऐकून आंतल्या माणसांमध्यें खूपच गडबड उडालेली दिसली. नंतर अल्पकालांतच दहा पांच आसामींचा एक जमाव राजवाड्यांतून बाहेर पडून थेट आमचेकडे आला व त्यांपैकीं एकानें मोठ्या अदबीनें पुढें येऊन आमचे अभिवादन केलें व आंत येण्याविषयीं विनंति केली. म्हाताऱ्यानें माझकडे पाहून म्हटलें, " महाराज, चलायचें आंत. " असें म्हणून तो स्वत: पुढें झाला. आमचें स्वागत करण्यास आलेल्या मंडळीपैकीं कांहीं मागें व कांहीं पुढें झाली. म्हातारा व मी त्यांचेमधून चाललों."

" साराच चमत्कार म्हणायचा--" जयश्री विस्मयानें म्हणाली, " हें स्वप्न कसलें म्हणायचं?--ही एक अद्भुत गोष्टच म्हटली पाहिजे. "

जयश्रीनें हें अगदीं सहज लीलेनें म्हटलें. पण जयचंदास तें कांहींसें खोंचक वाटलें. तो म्हणाला, " तुला हें सर्व खोटें वाटतें ?--नाहीं--यांतील एक अक्षरही खोटें नाहीं. मी हें स्वप्न खास पाहिलें आहे. "

हें स्वप्न सांगणारें मनुष्य जयचंदाचे ऐवजीं दुसरें कोणी असतें, तर जयश्रीला तें खोटें वाटलें असतें व आतां जयचंदानें जसे उद्गार काढिले, तसे जर का त्यानें काढिले असते तर त्या स्वप्नाच्या खरेपणाविषयीं तिला जबरदस्त शंका आली असती. कारण, मनुष्य एखादी गोष्ट बनवून सांगूं लागला म्हणजे आपल्या सांगण्यावर ऐकणारांचा विश्वास बसतो कीं नाहीं, कोणास माहीत? या शंकेनें तो त्याच्या खरेपणाची भाक हडसून खडसून देऊं लागतो. त्यावेळीं ऐकणारांपैकीं एखादा श्रोता चाणाक्ष असला म्हणजे तो वक्त्याची मखी तेव्हांच ओळखतो. जयश्री तशी चाणाक्ष खास होती; परंतु ज्याच्यावर तिचा पूर्ण विश्वास, अशा पतीचेंच बोलणें ती ऐकत असल्यामुळें तिला

त्याच्या सांगण्यांत असत्यता भासली नाहीं. ज[illegible]ाला जयचंद बिचकला, ते तिच्या तोंडून अगदीं सहज बाहेर पडले [illegible]

" हं, पुढं काय झाली गंमत ? " जयश्रीनें संवाद पुढें चालविण्याकरितां प्रश्न केला. तो ऐकून जयचंदानें पुन: विशेष साशंक होऊन तिच्या मुद्रेकडे पाहिलें. आपलें बोलणें बनावट आहे, असें तर हिला वाटत नाहीं ना ? अशी त्यास शंका आली आणि म्हणून त्यानें तिच्या मुद्रेकडे निरखून पाहिलें. नंतर त्यानें आपल्या अस्वस्थ मनाची कशीतरी समजूत करीत, आपलें स्वप्न पुढें सांगण्यास प्रारंभ केला.

तो म्हणाला, " आतां पुढें कांहीं विशेष सांगण्यासारखें नाहीं. एकच चमत्कार सांगण्याजोगा आहे. किल्ल्याचा दरवाजा ओलांडून आम्ही आंत गेलों. आंतील राजवाडा प्रशस्त व सुंदर बांधकामाचा होता. ठिकठिकाणीं पहारेकरी, मंत्री, नोकर चाकर आपआपल्या स्थानीं व कामीं तत्पर होते. त्या सर्वांचे मुजरे घेत आम्ही आंत गेलों. प्रवेशद्वारांत उभे राहून वृद्धानें ' राजकन्येला पंचारती घेऊन आपल्या पतीला ओवाळण्यास ये म्हणावें. ' असा हुकूम सोडिला. "

" ठीक—" जयश्री हंसून एकदम म्हणाली, " एकूण मला स्वप्नांत तरी सवत आहेच म्हणायची ! "

" वेडी आहेस. तुला सांगितलं तर खोटं वाटेल—" जयचंदानें म्हटलें, " पण ती राजकन्या दुसरी कोणी नसून तूंच होतीस. तूंच येऊन मला ओवाळलंस. त्यावेळचा तुझा थाट काय सांगावा ? उत्तम वस्त्रें तूं नेसली होतीस. हिऱ्यामोत्यांच्या दागिन्यांनीं तूं नखशिखान्त नटली होतीस. त्यामुळं तूं इतकी सुंदर भासत होतीस--जणूं अप्सराच ! तुझें तें रूप कांहीं औरच होतें. "

जयश्री हंसत हंसत म्हणाली, " खोटं--खोटं--खोटं ! हें मात्र अगदीं निव्वळ खोटं !! केवळ मला खुलविण्याकरितां हें कांहींतरी बनवून सांगायचं; अगदीं शंका नको.--बरं मग पुढं काय झालं ? "

" तुला माझं सगळं सांगणं खोटं वाटतं तर आतां पुढं कशाला सांगं माझं स्वप्न ? " जयचंदानें विनोदानें म्हटलें.

" आपलं सगळं स्वप्न मी खोटं नाहीं म्हणत. मनुष्याला काय नाना-तऱ्हेचीं स्वप्नं पडतात. पण राजकन्या मात्र मीच होत्यें; हें मात्र मला नाहीं खरं वाटणार. बरं जाऊंदे कीं तें. पुढं सांगावं गडे काय झालं तें. मीच राजकन्या होतें. असं कां होईना घडीभर. हं--मी आपल्याला ओवाळलं पुढं ? "

" पुढं काय ? तूं मला ओंवाळल्यानंतर त्यावृद्धानें तुला मला दोघांनाही आशीर्वाद दिला आणि म्हटलें, " हें राज्यवैभव तुमचं आहे. याच्यावर खरी सत्ता तुमची आहे. सुखानं त्याचा उपभोग घ्या. " असें म्हणत तो तेथल्या तेथेंच अंतर्धान पावला !-पुढें स्वप्नांतच त्या राज्यवैभवांत तूं न् मी कित्येक वर्षें राहिलों. असें हें चमत्कारिक स्वप्न ! "

" आणि तेंच आपणास अलीकडे रोज पडतं ? आतां मघाशीं आपणास तेंच पडत होतं ? " जयश्रीनें प्रश्न केला.

---

# परिच्छेद १६ वा.

## स्वप्नाचा व्यास.

जयचंदानें म्हटलें, " हो, अशाच अर्थाचें पडतें म्हणण्यास हरकत नाहीं. मात्र अलीकडच्या स्वप्नांत तो वृद्ध मला कित्येक गोष्टीबद्दल दटावीत असतो. तो आपला हेतु कांहीं केल्या उघड सांगत नाहीं. कांहीं तरी संकेतानें तो बोलत असतो. तूं डोळे उघडून नीट पहा. आलेल्या वैभवास दूर सारूं नकोस. असें कांहींतरी तो चमत्कारिक बोलतो; आणि त्याच्यापुढं काय बोलावं, याचा मला कांहीं उमज पडत नाहीं. "

" सगळंच नवल. बरं, त्या बोवाचं वय किती आहे, चेहरा कसा असतो? त्याचा आवाज कसा आहे ? " जयश्रीनें कौतुकानें प्रश्न केला.

" तें कांहीं नक्की सांगता येणार नाहीं. आपली तुलनाच करायची झाली तर तुझ्या पित्याच्या चेहऱ्या मोहऱ्याशीं जुळेल. त्याचा आवाज तर अगदीं तुझ्या पित्याप्रमाणें आहे. निदान तो बोलतांना तसा भास होतो—"

" माझ्या बाबांच्या प्रमाणं तो म्हातारा आहे ?—" जयश्रीनें नवलानें विचारिलें. " हें स्वप्न मग कांहीं अर्थपूर्ण किंवा भविष्यसूचक तर नाहीं ?"

" मलाही तोच घोंटाळा पडला आहे. "

यानंतर दोघांनींही त्या विचित्रस्वप्नाची बरीच भवति न भवति केली. त्यापासून प्रत्यक्ष फल असें कांहींच निष्पन्न झालें नाहीं; पण जयचंदास जें कांहीं पाहिजे होतें, तें झालें. जयश्रीच्या मनावर त्या स्वप्नाचा परिणाम विशेषच झाला. पाहिलेला भुताटकीचा चमत्कार आणि ऐकलेलें विचित्र स्वप्न या दोहोंमध्यें कांहींसंबंध आहे, असें तिच्या मनानें घेतलें व ती त्याविषयींच सारखा विचार करूं लागली.

कर्मधर्मसंयोग म्हणा अगर जयचंदाची करतूत म्हणा, त्या दिवशींच्या रात्रीं अगदीं त्यांच्या शयनागारांत मध्यान्हीच्या सुमारास तो भुताटकीचा चमत्कार पुनः दिसला !

त्यानंतर चार दोन दिवस कांहीं घडलें नाहीं.

परंतु जयश्रीचें मन मात्र त्या स्वप्नश्रवणापासून अगदीं अस्वस्थ झालें. तिला आपल्या पित्याचें शेवटचें चरित्र आठवलें व त्यावरून त्यास पिशाच-योनीतर प्राप्त झाली नसेल, अशी तिला शंका आली. ती शंका घालविण्याचे तिनें अनेक प्रयत्न केले, अनेक सयुक्तिक विचार करून आपल्या मनाची समजूत घालण्याचा सायास तिनें केला पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. उलट तिची शंका बळावत गेली व तिचें हृदय अत्यंत व्यथित झालें !

आपल्या मनाची स्थिति तिनें आपल्या पतीलाही सांगितली. तेव्हां त्यानें वरकरणी " हें पहा. एवढ्याचकरितां मी तुझ्यापासून ही गोष्ट लपवून ठेवीत होतों उगीच काळजी करण्यांत काय अर्थ आहे. मला त्याचं कांहीं

वाटत नाहीं." इत्यादि म्हटलें; परंतु मनांतून त्यास तिच्या मानसिक अस्वस्थतेचा मनापासून आनंद झाला. तिच्या मनाची अशी स्थिति व्हावी म्हणजे आपला पुढला डाव अचूक साधेल, अशी त्याची इच्छा होती व त्याप्रमाणें झालेलें पाहून, साहजिकच त्यास बरें वाटलें.

पुढें जयश्रीला त्या स्वप्नाचा व त्या भुताटकीच्या चमत्काराचा ध्यासच लागला म्हणण्यास हरकत नाहीं. तिच्या मनाची ही अशी स्थिति होण्याचें मुख्य कारण म्हणजे आपल्या पित्यास पिशाचयोनी प्राप्त झाली असेल काय? ही दुःखदायक शंका होय.

\+ + + + + + +

जयचंदानें तयार केलेलें औषधीसरबत फारच नामी झालें होतें. चित्ताला शांती देणें हा त्याचा मुख्य धर्म होता. तें पिण्यास रुचिकरही होतें. जयश्रीनें तें दोन प्याले झोंकलें. मनाला मोठा आनंद वाटला! लिंबाचा आम्लपणा, साखरेची गोडी, जायफळ केशरादि पदार्थांचा नाजुक व मधुर गंध आणि इतर औषधींची रुची यामुळें तें तिच्या पोटांत जातांच, तिला अशी कांहीं जायकेदार ढेंकर आली! अहाहा! सरबत पण सरबत! जयचंदानेंही त्याचा स्वाद घेतला होता.

घटकेंतच जयश्रीच्या मनावर त्या सरबताच्या गुणाचा प्रभाव पडूं लागला. तिचें चित्त अत्यंत उत्तेजित झालें! शरीर हलकें वाटूं लागलें! थिल्लरपणाची छटा तिच्या हंसण्यांत व बोलण्यांत चमकूं लागली! नेत्र मदभरित झाले. झोंपेची वेळ झाली नसतांही तिला जांभया येऊं लागल्या व आळसावल्याप्रमाणें झालें!

जयचंदानें तिच्या कानाशीं लागत म्हटलें, "जयश्री, यावेळीं तूं माझ्या स्वप्नांतील राजकन्येप्रमाणें शोभत आहेस खरेंच, यावेळीं तूं फारच सुंदर दिसत आहेस."

जयश्री कारण नसतां मोठ्यांदा हंसली. ती म्हणाली, "मी राजकन्याच काय महाराणीसुद्धां शोभेन. मला आतां त्रास देऊं नये. मला झोंप येत आहे."

" मग नीज तर——पण पहाहो, माझ्यासारखें एखादें स्वप्न मात्र तुला न पडूं दे. नाहींतर म्हणतात ना त्या स्वप्नाच्या ध्यासानें तुला हें दिसूं लागावयचें."

" कांहीं हरकत नाहीं. स्वप्नांत तरी मी राणी होईन. खरंच प्राणनाथ, आपलं तें स्वप्न फारच चमत्कारिक नाहीं ? " असें म्हणून ती पेंगूं लागली.

जयचंद पुनः तिच्या कानांत म्हणाला, " तसं स्वप्न पडलंच तर तो म्हातारा कोण तें नीट ओळख हो—"

जयश्रीनें गुंगीतच अर्धवट नेत्र उघडीत म्हटलें, "ते माझे बाबाच असले-तर मी त्यांना ओळखीन.——मला आतां बोलवूं नये गडे—मला आज गाढ झोंप येणार."

हळूं हळूं ती झोंपी गेली.—बेहोश झाली !

जयचंद हळूच उठला व त्यानें आपले हस्तक ( दोन तीन दासी व दोन नोकर ) गोळा केले व त्यांना पुढें काय करावयाचें तें सांगितलें.

बाहेर मेणा तयार होताच बेहोश जयश्रीला त्यांत घालण्यांत आलें. तिच्या कन्येला घेऊन एक दासी दुसऱ्या एका मेण्यांत बसली. जयचंद आपल्या घोड्यावर स्वार झाला. नंतर सर्व मंडळी बहिरामगडाच्य मार्गाला लागली.

बारा तासाचा झपाट्याचा प्रवास करून सर्व मंडळी बहिरामगडापासून अलीकडे अर्ध्या कोसावर एक खनाळ होती, तेथें येऊन पोंचली. तेथें बहिराम-गडावरील बादशाही इतमाम जयश्रीला पुढें नेण्यास आला होता.

जयश्रीला मेण्यांतून काढून एका लहानशा तंबूंत नेण्यांत आलें. येथें तिला सर्व कांहीं अनोळखी होतें. हळूं हळूं तिला जागी-सावध-करण्यांत आली !

जयश्री जागी झाली व बिछान्यावर उठून बसली. अनेक दासी तिच्या सेवेंत तत्पर असल्याचें तिला दिसून आलें.

" सरकार ! – " एक दासी पुढें येऊन नम्रपणें म्हणाली, " [illegible]या प्रवासास लगेच निघावयाचें आहे का ?– आपल्या आज्ञेवर अवलंबून आहे. आपण काल सांगितलें होतें, सूर्योदयीं पुढचा प्रवास उरकायचा म्हणून तेव्हां काय ती आज्ञा व्हावी—"

जयश्रीच्या नजरेपुढें सर्व देखावा अजब होता, नवा होता. तिनें सर्व दासींचे चेहरे पाहिले.—नवें! आजुबाजूला नजर फेंकली—सर्व नवें! ती भांबावून गेली! मी सरकार? कुणाची?—या दासी कोण? प्रवास कोठला?—असे अनेक प्रश्न! तिला खास वाटलें, आपण स्वप्नांत आहों! एक फार चमत्कारिक स्वप्न आपण पाहात आहों!—पुनः तिनें आश्चर्यानें इकडे तिकडे पाहिलें.

" छोटया सरकारांना आणूं?" एका दासीनें विचारिलें व ती बाहेर गेली.

थोडया वेळांत हंसती चंबेली तिच्या मांडीवर आली!—खरोखर सर्व स्वप्न!!!

चंबेलीची न्याहारी झाल्यावर एका दासीनें तिला मुखमार्जनादि विधींस उठण्याविषयीं प्रार्थना केली. जयश्रीनें तें मान्य केलें व ती तंबूच्या बाहेर आली.

सूर्योदयाची उज्वल वेळ होती. खानाळींतून स्वच्छ पाण्याची चोळ वाहत होती. गर्द हिरव्यागार झाडीवर प्रातःकाळची प्रभा पसरली होती. पक्ष्यांचा कलकलाट सारखा सुरू होता! मोठा रमणीय देखावा! तंबूच्या शेजारींच मेणे व रथ तयार होते. घोडे थय थय नाचत होते. अनेक शिपाई व नोकर प्यादे आपल्या राणी सरकारच्या हुकुमाची वाट पाहात सज्ज होते.

मग हें स्वप्न कीं, सत्य?—छे, निव्वळ स्वप्न! जयश्रीनें स्वतःची समजूत केली.

जयश्रीचा प्रातःविधि आटोपला! दुग्धाहाराची तयारी होतीच. तीही तिनें स्वीकारला—हो, स्वप्नांतील वैभवाबद्दल तक्रार कशाला?—स्वप्न! स्वप्न! स्वप्न!!!

जयश्री कांहीं विचार करीत होती तोंच, एक म्हातारा रजपूत तिच्याकडे आला व म्हणाला, " राजकन्ये! आपलें सत्तेचें वैभव टाकून तूं कोठें तरी भटकते आहेस. तुला मी तुझ्या राज्यांत पोंचवून देणार आहें. तयारी कर." असें म्हणून त्यानें एका दासीस कांहीं फर्माविलें!

थोडयाच वेळांत वस्त्रांचा व अलंकारांचा आहेर तेथें प्राप्त झाला ! जय-श्रीवर तो लादण्यांत आला !–किती चमत्कारिक स्वप्न हें !

आपल्या इतमामासह जयश्री पुढच्या प्रवासास लागली.

जयचंदानें निर्माण केलेली ही माया अगदीं सत्य असतांही जयश्रीस मात्र आपण हें एक फार चमत्कारिक स्वप्न पाहात आहोंत, असें वाटत होतें, भासत होतें !

जयश्री पुढें बहिरामगडीं गेल्यावर काय झालें, तें पुढें पाहूं.

---

# परिच्छेद १७ वा.

## ' तो ठसा मनावर ठसला तो घाव जिव्हारीं बसला.'

अ अगदीं आकल्पित–अकस्मिक–भेटीचा योगायोग ! त्यामुळें दोघेंही चकित झालीं, अनिमिष नेत्रांनीं एकमेकांकडे पाहात राहिलीं ! नेत्रांप्रमाणें त्यांचीं मनेंही स्थिरावलीं, वाचेला मूकत्व प्राप्त झालें !

कालाचा जप अखंडित सुरू होता ! तेवढया अल्प वेळांत त्यानें अनेक पळें विपळें वर्तमानकालाच्या कवाळांतून घेऊन भूतकालांत जमा केलीं; इतर मानवांच्या नेत्रांच्या उघडझांपीही कांहीं थोडया झाल्या नसतील; परंतु मान-सिंग–हसीनेच्या चार नजरा जमतांच त्या तेथेंच थांबल्या !

हसीना आश्चर्यचकित होऊन स्वगत म्हणाली, " ही व्यक्ति येथें कशी ? आणि तीही आपल्याकरितां योजिलेल्या शय्यागारांत ? "

मानसिंगाच्या मनांत मात्र मिरच्यांच्या ठाटाप्रमाणें अनेक विचार एकाच वेळीं उधळले ! ही रमणी इथें चितोरगडावर ? आणि कां आली ? नुकतेंच जें भासमय चित्र आपण पाहिलें, त्यांतीलच नायिका पुनः सत्य स्वरूपानें दृष्टीस पडावी ?—का मघांचाच मृगजलाचा देखावा पुनः दिसूं लागला आहे ?

त्यानें आपल्या दृष्टीवरून हात फिरविला ! दिसणाऱ्या मूर्तीची सत्यास-त्यता पाहण्याकरितां त्यानें भोंवतालीं पाहिलें ! कांहीं उलगडा पडेना !—स्वप्न कीं सत्य ? सत्य कीं भास ? भास कीं कल्पना ?—कांहीं प्रकाश नाहीं ! शून्य अंधःकार ! !

कालगतीप्रमाणें विचारांची गतीही अप्रतिहत सुरू होती ! किंबहुना पहिलीपेक्षां दुसरी जास्त वेगानें—उलटया सुलटया गतीनें—धावत होती ! तरीही प्रकाश नाहीं.

मानसिंगाच्या दुर्दैवानें शेवटीं निकाल दिला; भास अगर सत्य कांहीं असलें तरी हीच रमणी तुला दिसण्यांत माझा कांहीं हेतु आहे !—तुला जीव-न्मृत करण्याकरितां जी संकटपरंपरा मी सुरू केली आहे, त्यांतीलच हा एक नवीन दुवा आहे ! जहरापेक्षांही कडू आणि सर्पगरलाप्रमाणें मारक व दाहक असें तुझ्या मातेचें जें रहस्य तुला कळलें आहे; त्याचीच मरण न देणारी मारकता व दाहकता वाढविण्याकरितां हें एक नवीन वीष मी तयार केलें आहे ! मानसिंगा, तोंड वेडेंवाकडें न करतां याचा एक घुटका घेऊन तरपहा !

दुर्दैवाचा हा निकाल ऐकून मानसिंगानें आपली मान खालीं केली. त्यानें आपली दृष्टि बंद केली व झणझणणारें मस्तक दोन्ही हातांनीं दाबून धरिलें ! त्याच्या या कृतीचा हसीनेला कांहीं उलगडा पडला नाहीं. ती विशेषच भांबावली !

पण मानसिंगाच्या बंद नजरेच्या आंतल्या चौकांत एक नवीनच देखावा दिसूं लागला. त्या देखाव्यांतील ती रमणी—हसीना—तिरस्कारानें हंसत होती. दुर्दैवाचा निकाल तिनें जणूं कांहीं ऐकलाच होता. ती ठसक्यानें म्हणाली, “ मीनाबाजारांतील हा देखावा पहा ! बेशरमपणानें माझ्याशीं केलेल्या अति प्रसंगानें तुला मोठी धन्यता वाटली असेल नाहीं ? मोठाच पराक्रम केलास तूं !—पण पहा, त्याच [illegible] दृष्टीनें आणि प्रफुल्लित मनानें फार वर्षामागें खुषरोजच्या जत्रेंत [illegible] ही चित्रपट पाहून घे. परस्परांच्या गळ्यांत हात घालून विहरणारें हें [illegible] मैनरूचें जोडपें पहा तर खरें ! मान कां मुरडली ?—मानहानी झाली म्हणून ?—नजर रंजीत कां झाली ?—हस-

याला इंगळी डसली म्हणून ?--मानसिंगा, इस हात दे--उस हात ले !--थू थू !! ”

तो देखावा पाहून मानसिंगाच्या शरीराचा व जिवाचा थरकांप झाला ! त्याचें सरतें धैर्य समाप्त झालें ! त्यानें एकवार अत्यंत दीनवदनानें वर मान करून हसीनेकडे पाहिलें आणि गहिंवरलेल्या कंठानें म्हटलें, “ सुंदरी!–क्षमा कर ! क्षमा कर !! ”

दुसऱ्या क्षणीं त्यास झीट आली व तो बेशुद्ध होऊन धाडकन खालीं पडला !

हा प्रकार पाहून हसीनेवर विद्युत्पातच झाला ! तिच्या तोंडावरून एकच चित्कार बाहेर पडला, “ परवरदिगार ! ये क्या हुवा ? ”

पाषाणमूर्तीपेक्षांहीं जास्त निश्चलतेनें ती पडलेल्या मानसिंगाकडे पाहूं लागली !

हसीना आंत येऊन, मानसिंग बेशुद्ध होईपर्यंत कांहीं फार वेळ गेला नाहीं. जास्तींत जास्त पाव घटका !–पण झालेला प्रकार पाहून स्तंभित झालेल्या हसीनेस भानावर येण्यास मात्र बराच वेळ लागला ! बरें, पुढें भानावर आल्यावर तरी काय उपयोग झाला ? आपण पुढें कसें वागावें याचा तिला उमज पडेना ! कितीवेळ तरी ती निर्बुद्ध मनानें पुढें काय करावें ? याच विचारांत घोंटाळली.

एक वेळ तिला वाटलें, येथून बाहेर जावें आणि कोणाला तरी हाक मारून घडलेला प्रकार सांगावा आणि आपण आपल्या मामीसाहेबांकडे जाऊन निजावें. त्याप्रमाणें ती उठली आणि दारापर्यंत गेली. पण तितक्यांत तिच्या मनांत दुसऱ्या अनेक शंका आल्या. आपण यौवनदशेंत आहोंत. आपण सांगितलेली गोष्ट प्रत्यक्ष आपल्या मामीलाही खरी वाटणार नाहीं; मग इतरांना आपलें म्हणणें कोठून पटणार ?–त्यापेक्षां इथेंच बसावें आणि हा सुंदर जवान जागा होतांच त्यास येथून मुकाट्यानें जाण्यास सांगावें. याखेरीज दुसरा उपाय नाहीं. असें ठरवून ती तेथेंच दाराचे तोंडाशीं खालच्या सज्जाम्यावर बसली !

' तो ठसा मनावर ठसला, तो घाव जिव्हारीं बसला.'

बसल्या बसल्या ती आपल्या अनाथपणाचा व घडलेल्या चमत्कारिक प्रकाराचा विचार करीत होतीच.

हसीना खरोखरीच अनाथ होती ! ती माता पिता विहीन होती. आई वारून कांहीं फार वर्षें झालीं नव्हतीं; पण बाप असूनही नसल्यासारखा होता. तो कुठें आहे, जीवंत आहे कीं, नाहीं, हेंही तिला माहीत नव्हतें. कांहीं वर्षामागें तो फकीर होऊन कोठें परागंदा झाला होता. तेव्हां पासून हसीना आपल्या मातेसह सरदार अबदुलखानाकडे राहात होती. पुढें आई ही परलोकीं गेली. तिचे मामामामी वाईट होते अगर ते तिला दुष्टपणानें वागवीत होते आणि त्यामुळें तिचें जीवित कंटाळवाणें झालें होतें, अशांतला भाग नाहीं, स्वतः अबदुलखान मोठया उमद्या मनाचा होता व त्याचें प्रेम आपल्या भाचीवर होतेंही. त्याचप्रमाणें मामीसाहेबही कांहीं विशेष कडक नव्हत्या; पण किती झालें तरी मामी ती मामी आणि आई ती आई ! दुसरीची सर पहिलीला कोठून येणार ? हसीना अनाथ होती ती अशी आणि तिला बाहेर जाण्याचा विचार रद्द करावासा वाटला तो या अशा परिस्थितीमुळें ! असो.

पेंचांत पडल्यामुळें हसीनेला प्रत्येक पळ घटकेप्रमाणें वाटूं लागलें. हा आतां भानावर येईल; या आशेनें ती सारखी मानसिंगाकडे पाहात बसली. आतां ती स्वस्थितीचे विचार सोडून मानसिंगाविषयीं विचार करूं लागली. सुमारें एकदोन वर्षांपूर्वी मीनाबाजारांत स्त्री वेशांत तो भेटल्यापासून तो आतां बेशुद्ध पडेपर्यंत त्याचे संबंधीं जे कांहीं प्रकार घडले, त्या सर्वांचा तिनें विचार केला. तिच्याशीं त्यानें जो अतिप्रसंग केला होता, तोही तिला आठवला आणि आतांचें त्याचें जें संदिग्ध वर्तन घडलें, तेंही तिनें अवलोकन केलें; परंतु तिला दुसऱ्या प्रकाराचा पहिल्या प्रकाराशीं काय संबंध आहे, याचा काडीमात्र उलगडा पडला नाहीं. इतकें होतें तरीं दोन्ही प्रकारामुळें मानसिंगाविषयीं तिला रागही वाटला नाहीं किंवा विरागही वाटला नाहीं. आपण या चमत्कारिक प्रसंगांतून कशा सुटतों ? एवढयाच एका विचारानें ती अस्वस्थ होती.

पाव घटका झाली, मानसिंग बेशुद्धच ! अर्धी घटका झालीं, तरी त्याला शुद्धि येण्याचें चिन्ह दिसेना ! वास्तविक अर्ध्या घटकेचा काळ कांहीं विशेष नव्हता; परंतु तिला तो काल जवळ जवळ प्रहराइतका लांबलचक व मोठा जड वाटला ! शुद्धीवर येऊनही त्यानें कांहीं हेतूकरितां ढोंग तर केलें नसेल, अशीही तीला शंका आली आणि म्हणून ती आपलें अस्तित्व दर्शविण्याकरितां एक दोन वेळ खाकरलीही ! परंतु त्याचा कांहीं उपयोग झाली नाहीं. मानसिंग खरोखरीच बेशुद्ध पडला होता व लांकडाच्या ओंडक्याप्रमाणें निश्चळ होता. मग मात्र ती घाबरली. तिच्या मनांत एकदम एक काळी कल्पना आली ! याचा पटकन प्राण गेला नाहीं ना ? बस्स् ! याच कल्पनेनें तटकन् उठली व त्वरेनें त्याच्या जवळ आली ! त्याच्या हृदयावर हात ठेऊन सदयतेनें तिनें त्याच्या सुंदर मुखाकडे पाहिलें ! त्याचा श्वास धिमेपणा चालला असून मुद्रा विवर्ण दिसत होती.

पुढें काय करायचें ? या विवंचनेंत असतांच रमणीहृदयाची स्वाभाविक वत्सलता तिच्या मनांत जागृत झाली व त्या झटक्यांत ती त्यास शुद्धीवर आणण्याच्या खटपटीस लागली.

प्रथमतः तिनें त्याचे अस्ताव्यस्त हातपाय सरळ करून, त्यास सरळ निजविलें. नंतर त्याच्या मानेखालीं एक उशी देऊन त्याच्या मुद्रेवर आलेला घाम आपल्या ओढणीनेंच पुसून काढिला. नंतर पाण्याची सुरई घेऊन ती त्याच्या उशाशीं बसली व ओढणीचें एक टोंक ओलें करून, त्याची घडी त्याच्या कपाळावर ठेविली ! मधून मधून तिनें त्यास वाराही घातला. इतक्यांत तिला सहज आठवलें; कांहीं सुगंधित पदार्थ हुंगण्यास दिल्यास मगज हलका होतो. वेलदोडे, जायपत्री, लवंगा इत्यादि पदार्थांची भुकटीकरून त्याची पुरचुंडी नाकाला लावतात, असें तिनें ऐकलें होतें. त्याप्रमाणें तिनें करून पाहाण्याचें योजिलें. तिच्या कबजीच्या* खिशांत वरील जिनसा सहजीं मिळण्यासारख्या होत्या. तिनें

* कबजी म्हणजे एक प्रकारची चोळी. सध्यांच्या जाकिटाप्रमाणें ही असते. उच्चकुळांतील यवन तरुणी या कबजी अद्यापीही वापरतात. सुंदर मखमालीवर कलाबतूचें काम केलेल्या कबजी तात्कालीन हिंदुरमणीही वापरीत असत. मेहरन्निसा उर्फ नूरजहान हिनें पोषाखांच्या ( स्त्रियांच्या ) नखरेबाज तऱ्हा पुष्कळच काढिल्या होत्या.

आपले खिसे चाचपले. तिला हव्या होत्या त्या जिनसा मिळाल्या. पण पुढें प्रश्न पडला, त्याचें चूर्ण करण्याचा! त्यांचा सुवास भपकन् येण्यास त्यांचें चूर्ण होणें अगदीं इष्ट होतें! त्यांचें चुरडून चूर्ण करणें तिच्या करांच्या कोमलतेस केव्हांही शक्य नव्हतें. तिनें इकडे तिकडे पाहिलें, कांहीं विचार केला; पण कांहीं साधन सांपडेना व तोडही सुचेना. बरें, तो उपाय करण्याचेंच रहीत करावें तर? कारण नसतां तिच्या मनाला वाटूं लागलें, त्या उपायानें याची बेशुद्धी नाहींशीं झालीच पाहिजे.

शेवटीं एक तोड तिला सुचली. ती अमलांत आणावी कीं न आणावी असा तिला क्षणमात्र विचार पडला खरा; पण तिची त्यास शुद्धीवर आणण्याची उत्कटता तीस गप्प बसूं देईना! या उत्कटतेमध्यें—मग ती कसली होती देव जाणे—ती सर्व—सर्व विसरली! भर्रकन तिनें वेलदोडे जायपत्री व लवंग यांची मूठ तोंडांत टाकिली व त्या जिनसा कचा कचा चावल्या!- लवंगांनीं तिच्या तोंडाची आगडोंब केली; पण तिकडे तिचें लक्ष्य नव्हतें. त्या सुगंधित द्रव्यांचा गंध तिच्या मुखांत महकूं लागतांच तिला समाधान वाटलें व त्या आनंदात तिनें आपलें मुख त्याच्या मुखाजवळ नेऊन, आपल्या तोंडाचा सुगंधित व क्षणक्षणीं भपकारा त्याचे नाकावर सोडण्यास प्रारंभ केला!

चारसहा भपकारे तिनें त्याच्या नाकावर सोडले. एका भपकाऱ्याचे वेळीं अगदीं न कळत—आणि असें होणें अगदीं अपरिहार्य होतें–तिच्या ओठाचा स्पर्श त्याच्या मुखाला झाला, आणि याच वेळीं या अपूर्व अमृतमय स्पर्शानें म्हणा, अगर त्या मधुरमधुर श्वासांनीं म्हणा अगर फार वेळ झाला होता व तिनें प्रयत्नही पुष्कळ केले होते म्हणून म्हणा, मानसिंग सावध झाला व त्यानें जडपणानें आपल्या पापण्याचे पडदे वर सारिले!

त्या ओष्ठ स्पर्शानें हसीना दचकली आणि मानसिंगाची उघडती नजर पाहतांच तर ती फारच ओशाळली! लज्जेनें ती चटकन् मागें सरली! त्या स्पर्शाचें तिला राहून राहून नवल वाटूं लागलें आणि मनाला उमज न पडणारी अशी एक संवेदना तिच्या हृदयांत जागृत झाली!

मानसिंग सावध झाला पण त्यास त्या स्पर्शाचा, हसीनेच्या निकटच्या अस्तित्वाचा उलगडा मुळींच झाला नाहीं. त्यानें जडपणानें नेत्र उघडिले,

क्षणभर शून्य दृष्टीनें हसीनेकडे पाहिलें आणि पुनः तितक्याच मंदगतीनें ते मिटले! लवमात्रांत ही गोष्ट घडून गेली; पण तिनें हसीनेच्या मनावर केवढा कायमचा ठसा उमटवून ठेविला!

मानसिंग डोळे मिटून आपली विस्कळित विचारमाला आवरूं लागला. हसीना त्याच्या मुद्रेकडे आतुरतेनें पाहात राहिली. आतां तिला त्याच्या निकट येण्याचें धैर्य होईना. भीतीनें तिचे नेत्र कावरेबावरे झाले; श्वास जोरानें सुरू झाला; हृदय धडधडूं लागलें. आणि मुद्रेवर घर्मबिंदु ठिपकूं लागले!

दहापांच पळें लोटलीं. पण तितका अल्पकाळही हसीनेस असह्य झाला. मानसिंग शुद्धीवर कां येत नाहीं, याची तिला हुरहूर वाटूं लागली. तिनें किंचित् पुढें झुकून चुटकी चटकावीत हळूच म्हटलें, " सावध नाहीं का व्हायचं? "

तिचा तो कोमल प्रश्न ऐकतांच मानसिंग पूर्ण भानावर आला. तो प्रश्न त्याच्या अंतःकरणांत चांगला भिनला त्यानें पुनः आपले नेत्र उघडून कृतज्ञतेनें हसीनेकडे पाहिलें. अंग दुखावलें असतांही तो तोंड वेडेंवांकडे करीत व कण्हत उठून बसला. हसीना चटकन उठली व दूर सरून बाजूला उभी राहिली.

मानसिंगानें एक वार सभोंवती पाहिलें. आपल्याला शुद्धीवर आणण्याची खटपट फक्त या रमणीनें केली हें त्यास तेव्हांच कळून आलें आणि त्यावेळीं —त्यावेळीं त्यास मधाच्या अमृतमय स्पर्शाचें सुख समजलें! कांहीं आनंद व अत्यंत आश्चर्य मानीत त्यानें पुनः एकवार तिच्याकडे पाहिलें! कां कोणास माहीत, ही दृष्टभेट उभयपक्षीं मंदहास्याच्या गुलाबी छटेनें रंगली होती!

त्या स्वागतानें हसीनेस काय वाटलें असेल तें असो, मानसिंगाच्या सर्व मानसिक यातना एकदम बंद झाल्या! सोसाट्याचा वारा सुटला आहे, मेघवर्षाव सैरावैरा होतो आहे, खालच्या कर्दमानें अगदीं बेजार केलें आहे, आणि वरचेवर कांटे, खडे बोचून घायाळ करीत आहेत; अशा विपत्तींत सांपडलेला मनुष्यास ज्याप्रमाणें मनोराज्यांत एखादी अद्भुतरम्य कल्पना सुचून त्यानें स्ववास व स्वस्थितीस क्षणभर विसरून तल्लीन व्हावें तसेंच

तो ठसा मनावर ठसला, तों घाव जिव्हारीं बसला.'

हसीनेच्या मंद हास्यानें मानसिंगास झालें! दुर्दैवाच्या फेरांत सांपडून देशो-धडीला लागलेल्या हुमायून बादशहासही अकबर पुत्र प्रसवल्याबद्दल इतका आनंद झाला नसेल तितका यावेळीं मानसिंगास झाला! अहा! रमणीचें तें मंदहास्य कस्तुरीगंधाच्या झुळके प्रमाणें किंवा वाऱ्यावरून वाहात आलेल्या मंजूळ गानलकेरीप्रमाणें मानसिंगास अमोदप्रद झालें! त्या आमोदांत त्याचा सर्व ताप विरून गेला.

पुनः मानसिंगानें हसीनेकडे पाहिलें. तिच्या विषयींची एक विलक्षण स्पृहा त्याचे हृदयांत उद्भूत झाली! या तरुणीला हृदयाशीं धरून आपलें हृदय मोकळें केलें तर? त्या स्पृहेनें विचारलें.

पण त्याच्या विवेकशक्तीनें या विचाराचा धिःकार केला! ती म्हणाली, "छीः छीः मानसिंग! तूं असा पशूच राहणार का? आपल्या उपकारकर्त्री विषयीं ही भावना? जिनें उदारांतःकरणानें क्षमा केली, तिच्याशीं पुनः असली वेडगळ सलगी? छीः छीः! मानसिंग, हें तुला शोभत नाहीं—मुळींच शोभत नाहीं! वेडया कुमारा! झालेल्या उपकाराबद्दल कृतज्ञता दर्शवून येथून एकदम निघून जा पाहूं! तरच तूं मनुष्य! तरच तूं विवेकी!—नाहींतर!—निवळ पशू! अगदीं पशू!!"

मानसिंगाला ही शिकवण तेव्हांच पटली. तो एकदम उठला व म्हणाला, "तुम्ही थोर अंतःकरणानें मला क्षमा केली, हा खरोखरीच माझ्यावर मोठा उपकार आहे!—मी हें खरें बोलतों आहे!—इतके दिवस मी जनावर होतों. व तसाच वागत आलों. यापुढें मी मनुष्य होणार आहें. आपल्या उपकारी शीलानें तुम्ही मला जो उपदेश दिला आहे, तो मी केव्हांही विसरणार नाहीं. परमेश्वर आपणास सुखी ठेवो!" एवढें बोलून तो तेथून मुकाटयानें निघून गेला.

त्याच्या बोलण्याचा हसीनेस कांहीं उलगडा पडला नाहीं, हें खरें; पण त्याची मुद्रा, त्याचा स्वर, त्याचें कृतज्ञतेचें भाषण तिच्या मनांत सारखें घुमत राहिलें.

---

# परिच्छेद १८ वा.

## पूर्वजांचीं पराक्रम चिन्हें.

निशा संपली. आदित्याचें बालरूप दृगोचर झालें. जुन्या जगाची सततची रहाटी नव्या उमेदीनें सुरू झाली.

मानसिंगास मात्र सूर्योदयाचे सुमारास जागें येऊनही उठण्याचा हुरूप राहिला नव्हता. त्याचें जुनें जग नवें झाल्यामुळें त्याची ताजी उमेद मात्र त्यामुळें सर्वस्वी जुनी झाली होती.

झांकली मूठ उघडी पडली ! कल्पनेंत नव्हतें तें रहस्य उदयाला आलें, आणि त्याचमुळें जिकडे तिकडे घोर अंधकार दिसूं लागला ! पुढें काय करावयाचें ? या विचारानें त्याचें चित्त त्रस्त झालें !

आतां त्यास आईची मूर्ति मनांत आणणेंही शक्य नव्हतें; मग तिचें दर्शन त्यास कोठून रुचणार ? पित्याशीं तो काय बोलणार आणि कोणत्या तोंडानें बोलणार ? अर्थात् त्याच्याकडे जाणेंही अनावश्यक होतें ! आग्रयास जावें तर ? मोहनसिंग दादा मुसलमान होण्याच्या गडबडींत असणार आणि त्याचा तो मंगलविधि पाहतांना, त्याच्या ( मानसिंगाच्या ) मनांत अनेक अमंगल कल्पना येऊन त्रास होणार ! माता असून मेलेली, पिता असून निरुपयोगी, बंधु बंधुत्व मानण्यास राजी नाहीं ! मानसिंग कोणाच्या तोंडाकडे पाहणार ? सनाथ असून अनाथ, श्रीमंत असून दरिद्री, सुखी असून दुःखी !–मानसिंगाचें नवीन जग हें असें होतें ! भोंवतालच्या या अंधेरांत फक्त एकच तारा चमकत होता; हसीनेचें तेंच मधुमधुर मंदहास्य !

पण मानसिंगाच्या विवेकशक्तीस तो ताराप्रकाश नको होता ! लालस चित्तानें त्या रमणीचें चिंतन करूं नकोस, असें ती त्यास बजावीत होती ! मग काय त्यानें पुढचा आयुष्यमार्ग निराशेंत, मानसिक तापांत, एकट्यानेंच क्रमावयाचा ?

मानसिंग असेच विचार करीत बिछान्यावर पहुडला आहे तोंच त्याची धाय त्याच्या प्रकृतीची चौकशी करण्यास आली. तिचाही सहवास त्यास

नको होता; पण तिला दुखवणें त्यास बरें वाटलें नाही. त्यानें ती अंत येतांच तिच्या मर्जीप्रमाणें केलें. मुखमार्जनादि आटोपून त्यानें थोडा उपहार केला व पुनः त्यानें एकांत गांठला. तेवढ्या वेळांत त्यानें पाहुण्यांची थोडीशी माहिती ऐकली. त्यांचा मुक्काम आठ दिवस होणार होता. आलेल्या पाहु-ण्यामंडळींत कोण कोण आहे हें त्यास कळलें ! त्याच्या भाग्य ताऱ्याचें नांव ऐकूण गुले हसीन ऊर्फ हसीना होतें तर ?

विवेकशक्ति बजावीत असतांही तो तेंच रूप आठवीत, त्याच कोमल मुखस्पर्शाचें चिंतन करीत, त्याच मंदहास्यावर अंतःचक्षु रोखीत आणि त्याच गोड नांवाचें स्मरण करीत एकांतांत गेला !

विवेकशक्तीचें सांगणें ऐकण्याचा त्यानें पुष्कळच अट्टहास केला; पण त्याचा कांहीं इलाज चालेना. तेव्हां त्यानें गडावर पायींच दूरपर्यंत फिरून यावें म्हणजे मन दुसऱ्या गोष्टींत रंगेल, असा विचार करून तो आपल्या महालांतून एकटाच बाहेर पडला. तें पाहून एका वृद्ध नोकरानें ' बरोबर येऊं का ? एकटेच कुठें निघाला ? ' असा प्रश्न केला. मानसिंगास तो प्रश्न अर्थातच रुचला नाहीं. त्यानें त्याचें निवारण केलें व तो पुढें झटकला. राजपुत्रास मनमोकळेपणानें एकटें फिरण्याची सुद्धां चोरी !

राजप्रासादांतून बाहेर पडून मानसिंगानें अगदीं एकीकडचा मार्ग धरून कोठेंतरी जाण्यास सुरूवात केली. मार्गांत आढळलेल्या सर्व लोकांना त्याच्या या आजच्या कृतीचें नवल वाटलें. बहुतेकांनीं त्यास आदरानें मुजरे केले व त्यानें ते स्वीकारलेही पण तेवढ्यांत त्याच्याशीं कोणी बोलण्याचा प्रयत्न केल्यास, तो त्याचा धिःक्कार करून पुढें जाऊं लागला. नव्या जगांतील सर्व माणसें एकाना एका दुर्गुणानें पिशाचाप्रमाणें आहेत, असें त्याचें मत झालें. " खरोखर ! या जीवंत मनुष्यांच्या भेसुर स्मशानांत वावरण्यापेक्षां मी मेलेल्यांच्या स्मशानांत गेलों तर जास्त सुखी होईन. " असें पुटपुटत तो खरोखरीच गडावरील स्मशानभूमीकडे वळला.

स्मशानाचे सीमेवर येण्यास त्यास पाऊण घटका लागली ! तेथें येतांच त्यानें एकवार सर्वत्र नजर टाकली ! अनेक समाधी व छत्र्या तेथें पसरल्या

होत्या. मधून मधून झाडें झुडपें वाढलीं होतीं ! कित्येक ठिकाणीं पडझडही झाली होती ! कित्येक स्मशानवासी पक्षी इतस्ततः फिरत होते. कित्येक मोठया छत्र्यांच्या सौधावर पारव्याच्या जोडया घुमकार घालीत होत्या ! सूर्याचा प्रकाश सर्वत्र पसरला होता.

चितोडची स्मशानभूमि किती सुंदर होती ! मानसिंगाच्या मनास संतोष झाला !

विस्मयानें इकडे तिकडे पाहात मानसिंग स्मशानांत प्रवेश करता झाला ! सकृद्दर्शनीं सर्व स्मशान निर्मनुष्य आहे, अशी त्याची कल्पना; परंतु तसें नसून आणखी एक व्यक्ति त्या स्थानीं आली आहे; असें त्यास आढळून आलें. फिरतां फिरतां तो एका वळणांत आला व त्याची नजर त्या व्यक्तिवर पडली. थोडें निरखून पाहतांच त्याचे नेत्र आश्चर्यानें पसरले ! ठाकुर ईसरसिंग इथें ?–चितोडगडावर ? त्याचे तोंडून एकदम असे उद्गार निघाले, व तो झपाटयानें त्या व्यक्तीजवळ गेला. त्याची चाहूल लागतांच त्या व्यक्तीनें वचकून मागें वळून पाहिलें. अगदीं चेहरा मोहरा सुद्धां थेट ठाकुर साहेबाप्रमाणें. वेष मात्र एखाद्या मुसलमानी फकीराप्रमाणें होता.

त्या मनुष्यास मानसिंगानें आपादमस्तक अनेक क्षण न्याहाळूनही त्यास उमज पडेना. ठाकूरसाहेब कांहीं वेषांतर करून पळून तर आले नाहींत ? अशीच त्यास शंका आली. त्याच्या या आश्चर्यचकित दृष्टीचें त्या मनुष्यासही मोठें नवल वाटलें व तोही कौतुकवश होऊन त्याचेकडे पाहूं लागला.

मानसिंगानें आपली शंकाच खरी मानून प्रश्न केला, " आपण इकडे ? "

त्या मनुष्यास त्याच्या प्रश्नाचा भावार्थ कळला असावा. त्यानें म्हटलें, " मी कोण असावा, अशी तुमची कल्पना आहे?–मला तुम्ही ओळखतां?"

फक्त स्वरांत बदल ! मानसिंग थक्क झाला. तो म्हणाला, " अहा ! तम्ही दोघांत किती विलक्षण साम्य आहे ? अगदीं हुबेहूब. " आणि तो हंसला तो वृद्धही हंसला. त्यानें विचारिलें, " मी कोणाप्रमाणें वाटलों ?"

मानसिंग त्या गोष्टीचा खुलासा करणार तोंच, ठाकुर ईसरसिंग मोंगलाच्या कैदेंत आहेत, ही गोष्ट गुप्त आहे, बाहेर फोडण्यासारखी नाहीं; याचें त्यास

स्मरण झालें. तेव्हां त्यानें शांतपणें त्या वृद्धाचें मुखाकडे पाहात म्हटलें, " आपली मुद्रा मोठी दानतीची दिसते आहे; तरी पण आपला व माझा परिचय नसल्यामुळें मला आपल्या प्रश्नाचें उत्तर देतां येत नाहीं. "

आपल्या उत्तराचा त्या वृद्धास राग येईल, अशी मानसिंगाची कल्पना; पण तसें कांहीं दिसलें नाहीं. तो फक्त त्याचें उत्तर ऐकून किंचित् हंसला आणि म्हणाला, आजच्या चितोडकराला हें उत्तर शोभण्यासारखें आहे. "

त्याची बोलण्याची ढब सुद्धां ठाकुर साहेबाप्रमाणेंच. मानसिंगास त्याचेंही नवल वाटलें; त्यानें प्रश्न केला, " आजच्या चितोडकराप्रमाणें म्हणजे ? "

वृद्धानें म्हटलें, " याचें उत्तर स्पष्ट भाषेंत देऊं ?–तुझें मघाचें उत्तर ऐकून मला राग आला नाहीं, पण माझें उत्तर ऐकून मात्र तुला खास बरें वाटणार नाहीं. "

वृद्धाचे बोलण्यांत रेकार सहज आला व तो शोभूनही गेला. मानसिंगास त्याबद्दल कांहीं वाटलें नाहीं. तो म्हणाला, " तुमचें उत्तर इतकें झोंबण्यासारखें असेल तर तें मला ऐकवूं नका. कांहीं कारणामुळें माझें मन इतकें कमकुवत झालें आहे कीं, कोणतेंही दूर्भाषण शांतपणें ऐकून घेण्याची मला शक्ती नाहीं. म्हणजे मला राग आवरत नाहीं, असें नाहीं. मी आजपर्यंत कोणावर फारसा रागावलों नाहीं. फार करून मला राग येतच नाहीं; तरीपण जगाचें कृष्ण स्वरूप पाहून मी अगदीं कंटाळलों आहे आणि म्हणून मी माणसांच्या बजबजपुरींतून बाहेर पडून इथें स्मशानांत आलों आहें. इथें कोणाचीही भेट होऊं नये अशी माझी मनीषा होती. परंतु ती सफल झाली नाहीं. तुमच्या भेटीनें माझा म्हणजे फार मोठा घात झाला, अशांतली गोष्ट नाहीं. मी तुम्हाला टाळून दुसरीकडे गेलों असतों ती माझा हेतु सहज पार पडला असता. परंतु योगायोग चुकत नाहींत. त्याप्रमाणें तुमची आमची भेट घडून आली. तेव्हां आपण सहज गमतीच्या कांहीं गोष्टी बोलूं. तुम्ही वृद्ध आहांत. तुम्ही जगाचा पुष्कळ अनुभव घेतला असेल, पुष्कळ देश तुम्ही पायाखालीं घातले असतील; तेव्हां त्यापैकीं कांहीं गमती सांगण्यासारख्या असल्यास सांगा. कोणीकडून माझें मन दुःखमुक्त व्हावें असा कांहीं उपदेश मला पाहिजे. तो तुम्ही सांगा. "

मानसिंग हें इतकें भाषण भराभर बोलून गेला. परक्या गृहस्थाजवळ इतकें खुलासेवार बोलण्याचें कांहीं कारण नव्हतें; पण त्याला आपलें तें बोलावेसें वाटलें. त्या वृद्धालाही त्याच्या त्या भाषणाचें नवल वाटलें. त्यांत जी एक दुःखाची व निराशेची छटा होती, तीही त्यास उमगून आली. तो एकदम म्हणाला, "तूं आपल्या ऐन उमेदींत असतां इतका निराश असावास, याचें खरोखरीच मोठें नवल वाटतें. तूं जातीवंत रजपूत आहेस, चर्या-वरून तूं राजकुलोत्पन्नही असावास; असें असतां राजविलास सोडून तूं मनाच्या समाधानार्थ स्मशानांत यावेंस, मोठेंच नवळ म्हणावयाचें!–असें तुझें दुःख तरी कोणतें बुवा?—" असा प्रश्न करून तो लागलाच पुढें म्हणतो, " अरे पण हो, तुला आपलें दुःख सांगावयाचें नसेल, नाहीं?–नको सांगूस. मला तें ऐकण्याची इच्छा नाहीं आणि गरज ही पण नाहीं. यावरून तुझें दुःख मी क्षुल्लक समजतों, असें मात्र नाहीं हो. तुझ्यासारख्या जवानानें मनांत कुढावें, हें कुणालाही बरें वाटणार नाहीं.–असो, ही गोष्ट आतां आपण अगदीं बाजूला ठेवूं.–मघां तूं काय म्हटलेंस, कीं, दुसरें कांहीं गमतीचें बोलणें काढा. ठीक आहे, तूं येण्यापूर्वी माझ्या मनांत जे विचार चालले होते, तेच मी तुला सांगतों. पहा तुला रुचलें तर–बेटा, तुझें नांव काय पण?–कां तेही न सांगावें अशी तुझी इच्छा आहे?"

"छे छे, तसें नाहीं कांही–" मानसिंग एकदम म्हणाला, मी माझी साधारण माहिती मोकळ्या मनानें सांगतों: माझें नांव आहे मानसिंग चितो-डचे आजच सम्राट् जे महाराणा सुप्राजी, त्यांचा मी धाकटा मुलगा. मी नेहमीं आग्र्यासच असतों. काळच सकाळीं इथें दाखल झालों."

वृद्धानें कांहीं विचार करीत प्रश्न केला, "अकबर बादशाहा जवळ संय-राजित उर्फ सुप्राजी या नांवाचे एक रजपूत सरदार होते. तेच तर तुझे वडील नसतील?– तेच असावेत. त्यांचेवर बादशहाची खूबच मेहेरनजर होती त्याचेंच फळ म्हणून ही चितोडची मोडकी गादी तुझ्या वडिलांकडे आली असावी–तुला मोहनसिंग या नांवाचा एकादा थोरला भाऊ आहे का?–कां, तुझी मुद्रा अशी बदलली कां?"

मानसिंगानें अत्याश्चर्यानें विचारिलें, " तुम्ही कोण ?–तुम्हाला आमच्या कुटुंबाची बरीच माहिती दिसते. "

" होय–आहे थोडी थोडी. " वृद्धानें शांतपणें म्हटलें, " तुझ्या पित्याची व माझी जानपिछानही आहे. "

मानसिंग स्तब्ध बसला. आपल्या कुळाचें चरित्र त्याच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें ! तेंही या वृद्धास माहीत असेल काय ?–आणि माहीत असेल तर ? पुनः त्याचे मनांत विचाराचे कढ उठूं लागले व त्याची मुद्रा खिन्न झाली. तो वृद्ध त्याच्या मुद्रेकडे पाहात होता. त्यास काय वाटलें कोणास माहीत तो मानसिंगास एकदम म्हणाला, " जाऊंदे बेटा तो मागचा इतिहास. आपण आपल्यापुढें पसरलेला हा इतिहास पाहूं. पहा बेटा, शांत मनानें आजूबाजूला नजर तर टाक. पाहिलेंस हा सर्व पसारा रजपुतांच्या शौर्याचा, धैर्याचा, स्वाभिमानाचा व शील रक्षणाचा आहे. तुझ्या पूर्वजांच्या पराक्रमाचीं ही चिन्हें पाहून धन्य हो. मान, येथील प्रत्येक धोंडयाला जर वाचा फुटली तर तो येथील पूर्वकालीन रहिवाश्यांच्या खऱ्या पण अत्यंत अद्भुत अशा इतक्या कथा सांगील कीं, त्या ऐकून तुझा जीव सर्वस्वी तृप्त होईल. चितोरगडावर तूं कोठेंही हिंड, कोणत्याही स्थानाकडे नजर टाक; कोणतीही इमारत पहा, प्रत्येक वस्तूंत तुला तुझ्या जगाच्या दृष्टीनें मेलेल्या पण मरूनही चिरंजीव झालेल्या पूर्वजांचे पराक्रम पाहण्यास मिळतील. मान, ही स्मशानभूमि आहे; पण जगांतील कोणत्याहि पुण्यभूमीला हिची तोड होणार नाहीं. तो पत्थर पाहिलास, सांग त्याच्या खालीं काय असेल, असें तुला वाटतें?—पहा–पहा, त्या धोंडयास उलथून पहा. "

वृद्धाच्या समजुतीकरितां मान त्या अपेक्षित धोंडयाजवळ गेला व पायानेंच त्यास दूर ढकलूं लागला. तें पाहतांच तो म्हातारा त्याचे अंगावर धाऊन आला व म्हणाला, " [illegible] मनुष्या ! त्या दगडाला पाय लावतोस ? तुझी योग्यता तरी आहे ? [illegible] ! अरे मूर्खा, येथील जमिनीवरून तुझ्या माझ्यासारख्या पामरांनी [illegible] सुद्धां योग्यता नाहीं. पाहतोस काय तोंडाकडे–" असे म्हणून [illegible] पुढें होऊन तो धोंडा बाजूला सारला.

तों त्याचेखालीं राख दिसूं लागली. वृद्धानें ती हातावर घेतली व मानसिंगा-पुढें हात करून म्हटलें, " पाहिलीस ही रक्षा ?–नीट पहा.–मान, ही तुमच्या चुलखंडांतील राख नव्हे, एखाद्या भट्टींतील ही राख नव्हे. अगर जळून खाक झालेल्या एकाद्या वाड्याची ही राख नव्हे !–ही राख त्या रज-पुतरमणींची आहे, ज्यांनीं आपल्या शील रक्षणार्थ आपले कोमल देह जिवंत जाळून घेतले ! मान, जोहाराच्या विलक्षण यज्ञांतील ही राख आहे ! नीट निरखून पाहिलेंस तर या राखेच्या प्रत्येक कणांत रजपुतरमणींच्या शीलाच्या व मनोधैर्याच्या हिरकण्या चमकतांना दिसतील ! या राखेकडे पाहणारी दृष्टी, मोंगलाच्या वैभवानें दिपलेली असतां उपयोगी नाहीं. तरच या राखेचें तेज त्यास समजून येईल ! मान, तुझें दुःख कितीही जालीम असो. हा अंगारा कपाळीं लाव आणि तो कसा निर्माण झाला याचें चिंतन कर म्हणजे तुझ्या मनाचा अंगार आपोआप नाहींसा होईल. " असें म्हणत त्यानें ती विभूती मानसिंगाचे व आपल्या भालप्रदेशीं लाविली व बाकीची वाऱ्यावर सोडून दिली ! !

त्याच्या भाषणानें मानसिंग बेभान झाला. त्यानें अत्यंत आदरानें प्रश्न केला, " आपला उपदेश मला सर्वस्वी पटला. यापुढें प्रत्येक क्षण मी माझ्या पूर्वजांचे पराक्रम आठवण्यांत घालवीन.–पण आपण कोण ? आपलें नांव काय ? आपलें वास्तव्य कोठें असतें हें मला कळेल काय ?

" माझी गोष्ट–माझी हकीगत कांहीं महत्त्वाची नाहीं. तुझी इच्छाच असेल तर ती मी मागाहून सांगेन. सध्यां तुला मी तुझ्या पूर्वजांचा इति-हास सांगतों तो नीट ऐकून घे. तो वर्णन करण्यांतच मला विशेष आनंद आहे. चल मान, तुला मी आणखी एक पवित्र स्थान दाखवितों. " असें म्हणून त्यानें त्यास एका भयंकर विवराकडे नेलें. तिच्याकडे बोट दाखवून तो म्हणाला, " पाहिलीस ही गुहा ! हिनें तिन्ही जोहार पाहिले आहेत ! अनेक रमणींना आनंदानें मरण पत्करतांना हिनें पाहिलें आहे. राणी पद्मि-नीच्या वेळचा व तिच्याकरितां झालेला जोहार हिनें पाहिला. पुढें संग-राण्याची पत्नी कर्णवती व जव्हारबाई यांनीं गुजराथेच्या सुलतानाशीं युद्ध

खेळून निरुपायानें पत्करलेला स्वाहाकारही हिनें अवलोकन केला! त्यावेळीं हिच्याच पोटांत अग्नीची स्थापना केली होती आणि पतंगाप्रमाणें हजारों स्त्रियांनीं त्यांत आपले देह विसर्जन केले होते! पुढें अकबरशहानें स्वारी केली. त्यावेळचा राणा उदेसिंग दुसरीकडे होता. त्याची एक नाटकशाळा गड संभाळून होती; पण त्या वीर स्त्रीनें अकबरशहास कित्येक दिवस झुंजत ठेविलें! मान, त्या युद्धांत मी प्रत्यक्ष होतों. अहा! रजपुतांनीं त्यावेळीं येवढे मोठमोठे पराक्रम केले! त्या सांगीवांगीच्या गोष्टी नव्हेत. प्रत्यक्ष मी डोळ्यांनीं कित्येक गोष्टी पाहिल्या! धन्य धन्य ते रजपूत! धन्य त्यांच्या स्त्रिया! तुला त्यावेळची मी ऐकिलेली एक गोष्ट सांगतों. तुझ्यासारख्या तरुणानें ती लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. केळवाडयाचा पत्ता नांवाचा एक बाळवयी तरुण चितोडरक्षणार्थ सकुटुंब आला होता. लढाईचे शिंग फुंकतांच सर्व योद्ध्यांबरोबर तो बाहेर पडला नाहीं. कां तर त्याच्या पत्नीस तो विचारण्यास गेला होता. ती नुकतीच ऋतुस्नात झालेली होती. दोघांची प्रेमभेटही झाली नव्हती. जे दिवशीं त्यांची फुलशय्या व्हावयाची त्याच दिवशीं रणनिमंत्रण आलें. पत्ता त्यास डगमगला नाहीं. तो आनंदानें निघाला होता. फक्त पत्नीच्या हातचा पहिला व शेवटचा तांबुल घ्यावयाचा आणि बाहेर पडावयाचें अशा विचारांत तो होता. पण त्याच्या वीरमातेला तेवढाही उशीर खपला नाहीं. ती त्या जोडप्याजवळ आली व सद्गदित कंठानें म्हणाली, " मुलांनों! हा उशीर आपल्या कुळाला कलंक लावील! जा– पत्ता, मागें न पाहतां रणांगणावर जा आणि तूं ( सुनेस ) बेटा जोहारास चल! पुरुषांचें कर्तव्य पुरुष करूं देत आपण आपलें व्रत आचरूं या! "– मान, तो प्रसंग डोळ्यांपुढें आणून प्रत्येकाच्या मनाचा विचार कर! मोहाची केवढी वस्तु पत्तापुढें होती!––त्याच्या तरुण नवोढा पत्नीला काय वाटलें असेल, याचीही कल्पना करितां आल्यास पहा. आणि त्याच्या मातेला ते नवें जोडपें फोडतांना काय मानसिक यातना झाल्या असतील, याचाही विचार कर; परंतु त्यांनीं काय केलें?––अगदीं योग्य तेंच केलें. आईच्या आज्ञेप्रमाणें पत्ता रणांगणीं मुकाटयानें चालता झाला! त्याच्या

आईनें व बायकोनें आनंदानें जोहार पत्करला !–मान, यावेळीं पत्ताचें वय वीस वर्षाला एक दोन सालें कमीच होतें; पण केवढें हें धैर्य ?––चल मान, त्या वीराच्या समाधीकडे आपण जाऊं."

वृद्ध पुढें झाला. मानसिंग त्याचे मागोमाग गेला. थोडयाच वेळांत ते तेथें जाऊन पोंचले !

पत्ताची समाधी उंच नव्हती, सुंदर नव्हती, भव्य नव्हती ! पण मानसिंगानें तिच्याकडे पहातांच त्यास गहिंवर आला. त्यानें एकदम तिच्यापुढें लोटांगण घेतलें आणि सद्गदित कंठानें म्हटलें, "पत्ता ! पत्ता !!–" पुढचा शब्द त्याचे तोंडून निघालाच नाहीं. वृद्धानेंही त्या समाधीस प्रेमपूर्वक वंदन केलें.

जरा वेळानें मानसिंग उठून बसला. त्याच्या नेत्रांतून प्रेमाश्रु गळत होते. तो आपलें सर्व दुःख विसरून गेला. पत्ताच्या घरांतील देखावा त्यास दिसूं लागला. त्याची तरुण पत्नी, त्याची माता यांचीं मानचित्रें त्यास दिसलीं !

त्यानें आठवण करून विचारलें, "आग्र्याच्या किल्ल्यांत जे दोन पुतळे ठेविले आहेत; त्यांपैकीं एकावर बहाद्दर पत्ता असें आहे. तो पुतळा याच शूर निधानाचा का ?—यांचाच ना ! मग जयमल्लाची समाधी कुठें आहे ?"

"ती त्या पलीकडच्या बुरुजाजवळ तटाला लागून आहे ! त्याचें आयुष्य जर भरपूर असतें तर त्या एकटया वीरानें अकबरशहाचीं हाडें ढिलीं केलीं असतीं ! जयमल होताच तसा शूर !"

"चला आपण त्याही समाधीचें दर्शन घेऊं." मानसिंग पुढें होत बोलला.

जयमल्लाचे समाधीजवळ जाऊन त्यांनीं तिचेंही दर्शन घेतलें.

त्या समाधीपुढें बसून कांहीं वेळ दोघेही आपआपल्या विचारांत गुंग झाले. त्या वृद्धाचे मनांत कोणते विचार येत असतील, हें त्याचें तो जाणें. मानसिंग मात्र पत्ताचें चरित्र आठवून त्याच्या चरित्राशीं आपल्या चरित्राची तुलना करून खेद पावत होता. असो.

बऱ्याच वेळानें भानावर आल्यावर मानसिंगानें त्या वृद्धास त्याची हकीगत विचारली. तो म्हणाला, "आज तुम्ही माझ्या मनाला कांहीं एक नवीन शिकवण दिलीत. तेव्हां हे तुमचे उपकार मी केव्हांही विसरणार नाही.

तुमचा इतिहास सांगण्यासारखा असल्यास म्हणजे मला सांगण्यास हरकत नाहीं, असें आपल्यास वाटल्यास, सांगावा. आपलें कांहीं कार्य असलें, माझें कांहीं सहाय्य आपणास हवें असलें तर सांगावें; मी यथाशक्ति तें पार पाडीन. सांगा, आपलें नांव काय? जात कोण? इकडे कां येणें केलें?"

तो वृद्ध उत्तरला, "मानसिंग, मी जातीनें मुसलमान आहें. माझें नांव फर्जंदबेग!—असा नवलानें मजकडे पाहूं नकोस. रजपुतांविषयीं इतका आपलेपणाचा अभिमान जागृत होण्यास चितोडचा तिसरा जोहार कारण झाला! अकबरशहाच्या नादानें, संगतीनें व अनुमतीनें माझे हातून बरींच वाईट, शूराला न शोभणारीं कृत्यें घडलीं! मागून त्याचा मला एवढा मोटा पश्चात्ताप झाला कीं, माझें डोकें फिरलें व त्या भरांत मी संसार सोडून फकीर बनलों. दिल्लीदरबारांतील प्रसिद्ध सरदार खानखानन हा माझा मेहुणा. त्याची बहीण मळा दिली होती. खानखाननचा धाकटा भाऊ अब-दुलखान सरदार तुझ्या माहितीचा असेलच. रजपुतांकडील राजकारण सध्यां त्याचेकडेच आहे. इतके दिवस मी मक्का, मदीना इत्यादि यात्रा करीत हिंडत होतों. सुमारें महिन्यापूर्वी आग्र्यास आलों. त्यावेळीं मला माझी पत्नी वारल्याचें कळलें. मला एक गुलेहसीन नांवाची मुलगी आहे. तिला एकवार भेटावें नंतर मेवाडच्या हिताकरितां देहत्याग होईपर्यंत कांहीं कृत्य करीत राहावें, असा संकल्प आहे. माझी मुलगी आपल्या मामीसह खालीं ब्ऱ्हाणपुरास गेली होती, असें मला आग्र्यासच कळलें; म्हणून मी तिकडे जाण्यास निघालों तों मार्गांतच कळलें कीं, त्या वर येण्यास निघाल्या असून मध्यंतरीं चितोडगडीं त्यांचा मुक्काम होणार आहे. तेव्हां तिची भेट होण्या-करितां इथें आलों. विचारांत होतों मुकाट्यानें तिची भेट कशी घ्यावी? तोंच तुझी गांठ पडली. अल्लानें ऐतीच खैर केली. मान, मला तुझें सहाय्य पाहिजे असेल तर एवढेंच. माझ्या कन्येची व माझी मुकाट्यानें भेट होईल, असें कर."

फर्जंदबेगाचा वृत्तांत ऐकून व त्याची कामगिरी पाहून मानसिंगाच्या मनांत काय काय विचार उद्भवले असतील, याचा विचार वाचकांनींच करावा.

——:०:——

# परिच्छेद १९ वा.

## स्वर्गाचा प्रारंभ–नरकाचा शेवट !

मानसिंगाशीं साक्षात झाल्यापासून गुलेहसीनचें मन बावचळलें; तिच्या मनाला एखादी वस्तु गमावल्याप्रमाणें हुरहूर लागली ! घटिकेनें प्रहर संपले; प्रहरांनीं रात्र संपली व या रात्रीनें त्या दिवसास जन्म दिला ! त्या दिवसानेंही सकाळ मागें टाकली, दुपार जमा केली आणि सायंकाळांत पदार्पण केलें; तरी हसीनेचें चित्त स्थिर झालें नाहीं. उलट काळगतीनें त्याची अस्थिरता वाढतच गेली ! आपल्या मानाची ही लपती छपती चाल कोणाच्याहि लक्षांत येऊं नये व ती न कळत नाहीशी व्हावी म्हणून तिनें चांगला प्रयत्न केला; पण त्याचें अर्धेंच यश तिच्या पदरांत पडलें ! तिची मानसिक अस्वस्थता कोणाचें लक्ष्यांत आली नाहीं हें खरें; पण ती नाहींशी मात्र झाली नाहीं.

मिनाबाजारांतील प्रसंग झाल्योपासून मानसिंगाची स्त्रीवेषधारी मूर्ति मेघोदरांतील विद्युल्लहरी प्रमाणें मधून मधून तिच्या चित्ताकाशांत चमकत होती आणि तिला किंचित्काळ अस्वस्थ करीत होती; परंतु कालच्या प्रसंगानें कांहीं न्याराच प्रकार घडून आला ! कांहीं एका नवीन भावनेनें तिच्या हृदयावर कायमचा ठसा मारला !—तो जीवंत होता, जळजळीत होता, सतत सलणारा होता ! तो ठसते वेळीं तिला भान नव्हतें आणि ज्यावेळीं तिला भान आलें; त्यावेळीं तिनें पाहिलें तों तो कायम ! कोणी केली कोण जाणे; पण हसीनेच्या भोळ्या अंतःकरणाशीं ही दगलबाजी होती !

हसीना मानसिंगाच्या मूर्तीचें, करुणमुद्रेचें, संदिग्ध भाषेचें चिंतन करीत होती आणि त्यांतच ती आपल्या अस्वस्थतेचें कारण शोधून पाहात होती. चिंतन करितां करितां एका कल्पनेला ती अडखळली. तिचें अस्वस्थ मनही म्हणालें, " हां ! हेंच तें कारण ! "

ती स्वगत म्हणाली " खरंच ! इथं माझं अगदींच चुकलं ! त्यावेळीं एक दोन शब्द तरी गोड बोलून त्यांच्या तापलेल्या मनाचं शांतवन मा

करायला पाहिजे होतं. मीनाबाजारांत त्यांनीं जें कांहीं वर्तन माझ्याशीं केलं, तें इतकं मनाला लागून घेण्यासारखं जरी नसलं, तरी त्यांना त्याचा फारच पश्चात्ताप झाला आहे !--मी त्यांच्याशीं कां बरं एक दोन शब्द बोलल्यें नाहीं !--ते किती करुणवाणीनें बोलले ! पण माझ्या तोंडांतून कांहीं शब्द निघाला नाहीं. अगदींच निष्ठुर मी !--मी त्यांना भ्याल्यें कां ?—नाहीं, भिण्यासारखं असं कांहीं घडलंच नाहीं ! मग त्यांचा राग मला आला होता ?--तसंही नाहीं. नाहींतर त्यांना मग शुद्धीवर आणण्याची खटपट मी कां केली असती ?—मी--मी" याच ठिकाणीं ती स्वगतच चपापली व स्तब्ध झाली ! सहजीं घडलेल्या त्या ओष्टस्पर्शाचें तिला स्मरण झालें व ती लाजली ! अगदीं न कळत तिचा कर तिच्या मुखावर गेला व तिनें आपली मान मुरडली ! ती एकांतांत असतांही या विचारानें तिला चोरट्या प्रमाणें केलें !

इतक्यांत मानसिंगाच्या धायेनें बाहेरून दार खडकावलें व हाकही मारिली. हसीनेनें आपले हातांतील कशीद्याचें काम सांवरीत उठून पुढें होऊन कडी काढिली. धाय आंत आली व हळूच म्हणाली, आमचा मानसिंग--महाराणाजींचा छोटा बेटा--कांहीं महत्वाच्या कामा करितां तुमची एकांतीं अगदीं थोडावेळ भेट पाहिजे म्हणतो. भिऊं नका. त्याला एक चारच शब्द तुमच्याशीं बोलावयाचे आहेत. मजजवळच तो निरोप सांगणार; पण पुनः त्याला काय वाटलें, कोणास माहीत. तुमची खुद्दच गांठ घ्यावी, असें त्यानें ठरविलें. पण तुम्हाला सवड आहे का ?--होय म्हणून सांगूं ना त्याला ? तो स्वभावानं अगदीं चांगला आहे हो. अगदीं अश्राप ! तुमच्या समोर आला तर तुमच्या नजरेला नजर सुद्धां द्यायचा नाहीं ! तुम्ही त्याची भेट घ्यायचं नाहीं म्हणूं नका. "

कारण नसतां हसीना बावरली, लाजली व खालीं आपल्या कशीद्याकडे पाहूं लागली. वास्तविक मानसिंग कोण आहे, काळा आहे कीं गोरा आहे, पोक्त आहे कीं पोर आहे हें तिला माहीत नव्हतें. तरीपण मानसिंगाचें नांव एकतांच तिचें चित्त थरारलें व तिच्या नेत्रापुढें तिच्या हृदयस्थ सुंदर

तरुणाचीच मूर्ति उभी राहिली. आणि तो आपली गांठ घेऊं इच्छितो, हें धायेच्या तोंडून ऐकतांच ती इतकी बावरली कीं, पुढें धाय काय काय बोलली, हें कांहीं तिच्या लक्षांत आलें नाहीं. शेवटीं धायेनें 'मग आणूं कां त्याला आतांच ?' असें विचारिलें व तिनेंही त्याचें 'हूं' म्हणून उत्तर दिलें ! धाय तिच्या गोंधळल्या मुद्रेकडे पाहात मुकाटयानें तेथून निघून गेली. हसीनेच्या गोंधळाबद्दल तिला कसलीही शंका आली नाहीं. हसीना तरुण मुलगी आहे, परक्या इसमाची गांठ कशी घ्यावी ? या शंकेनें गोंधळली असेल, असेंच तिला वाटलें. शिवाय मानसिंगानें निरोप सांगतांना जी मुद्रा धारण केली होती, त्यामुळें ती इतकी गंभीर व निर्विकार होती कीं, मनाच्या चोरटया छटा ओळखणाऱ्या मैनलदेवीलाही त्या दोन अंतःकरणाचें समीकरण झालें आहे किंवा होणार आहे, हें ओळखूं आलें नसतें; मग बिचारी साधीभोळी धाय हसीनेच्या मनाचा कसचा थांग लावणार ? असो.

या नवीन निरोपानें भांबावलेली हसीना भानावर येण्याच्या आंतच मानसिंग तेथें येऊन दाखल झाला ! त्यानें आपली मुद्रा खूपच गंभीर केली होती. अगदीं अनोळखी मनुष्याप्रमाणें हसीनेपुढें उभें राहून तिच्या पित्याच्या आगमनाची वार्ता तिला कळवावयाची व ती सांगेल त्याप्रमाणें पुढें वागावयाचें; अशा निश्चयानें तो तेथें आला होता; परंतु त्या रमणीय छबीवर नजर जातांच त्याचा सर्व निश्चय ढासळला ! त्याची दृष्टी चंचल झाली, मन अस्वस्थ झालें व जिव्हा विलक्षण जड झाली !

दोघेही भांबावलीं आणि कितीवेळ तरी परस्परांचे नकळत एकमेकांकडे पाहात राहिलीं ! हसीनेच्या मनांत कितीदां तरी आपण कांहीं बोलावें असें आलें. आतां तब्बेत कशी आहे ? एवढें विचारून तरी आपली सहानुभूति दाखवावी; असें तिच्या मनांत आलें पण जिव्हा ते शब्द उच्चारण्यास धजावेना !

शेवटीं मोठ्या कष्टानें तिनें हलक्या स्वरानें विचारिलें, "काय आज्ञा आहे ?"

मानसिंग मुस्कटींत मारल्याप्रमाणें त्या तीन शब्दांनीं सावध झाला. तो अत्यंत अदबीनें म्हणाला, " आपल्या समोर आल्यानंतर माझ्यांतील माणुसकी कोठें जाते, कोण जाणें ?--पण यापुढें मी याबद्दल खबरदारी घेईन. खरोखर, माझ्या आगमनापासून आपल्यास त्रास होण्यापेक्षां, आपल्या दर्शनाची अनिवार उत्सुकता असतांही, मी आपल्या पुढें न येणें जास्त इष्ट आहे, असें मला मनापासून वाटतें. यावेळींही मी अत्यंत महत्वाचें काम घेऊन आलों आहे आणि जरी माझ्या येण्यानें आपल्यास थोडाफार त्रास झाला असला तरी ज्यावेळीं मी माझ्या येण्याचें कारण सांगेन, त्यावेळीं आपल्याला खास आनंद होईल. "

हें त्याचें भाषण ऐकतांच हसीनेस कांहींसें आश्चर्य वाटलें आणि तिनें कांहींसें उत्सुकतेनें त्याच्या मुद्रेपुढें पाहिलें. तेव्हां त्यानें विशेष पाल्हाळ न लावितां तिच्या पित्याच्या आगमनाची आनंददायक वार्ता तिला सांगितली!

ती ऐकतांना हसीना लाजलज्जा विसरली. तिनें अत्यानंदानें विचारिलें, " खरेंच माझे बाबा इथें आले आहेत ? "

" होय.--आणि ते आपली मुकाटयानें गांठ घेऊं इच्छीत आहेत. " मानसिंगानें शांतपणें म्हटलें, " कांहीं कारणामुळें त्यांना उघड होतां येत नाहीं. आपण ज्या महालांत निजतां त्याच महालांत मी त्यांना आणूं शकेन. केव्हां आणूं ? त्याची आज्ञा यावी म्हणजे त्याप्रमाणें मी पुढची व्यवस्था करीन. "

" आपली इच्छा असेल तेव्हां--" हसीनेनें लाजत उत्तर दिलें. मानसिंगाशीं बोलण्यांत तिचें मन थोडें थोडें धीट होऊं लागलें.

" मग आज रात्रींच त्यांना घेऊन येतों--" येवढें बोलून व त्या गोष्टीला तिचा रुकार आहे, असें पाहून तो पुढें म्हणाला, " मग मी आतां रजा घेतों तर ? "

क्षणभर तो थांबला, घोंटाळला व त्यानें पाठ फिरविली. एकवेळ मागें वळून पाहण्याची त्यास अनिवार इच्छा झाली; पण त्यानें ती प्रयत्नानें दाबली. हसीना त्याची हालचाल पहात होती. तिच्या मनांत कांहीं निराळें

कळण्याचें होतें. त्यानें मागें वळून पाहिलें तर नेत्रांनीं त्याच्याशीं आपणांस बोलतां येईल, असें तिला वाटलें; पण तितक्यांत त्यानें दाराबाहेर पाऊल बाटलें ! हसीनेचा जीव अगदीं व्याकुळ झाला ! तिच्या तोंडांतून शब्द उमटला नाहीं; फक्त खाकरली मात्र ती.

त्या अस्पष्ट स्वराच्या धक्क्यानें मानसिंगाचा निश्चय धडाक्यानें कोसळून पडला ! त्यानें चटकन मागें वळून पाहिलें ! नेत्रांची भाषा नेत्रांना कळली! मनाचे भाव मनाला उमजून आले !

" कांहीं सांगायचें आहे ? " मानसिंगानें प्रश्न केला.

" होय--" हसीनेकडून उत्तर आलें.

" काय ? "

हसीना चाचरत म्हणाली, " आपण आपल्या तब्येतीला जपून असावं. ज्यामुळं माझ्या बाबतींत आपणास पश्चात्ताप होतो आहे, ती गोष्ट आपण विसरून जावं ! मी ती गोष्ट आपल्या मनांतून अजिबात काढून टाकली आहे. " ती गोष्ट या शब्दावर तिनें किंचित् आघात केला होता. पण बाकीच्या प्रत्येक शब्दांत विलक्षण मार्दव होतें. नेत्रांनीं नेत्रांस जें सांगितलें, मनाचे जे भाव मनास कळले, त्यांचाच प्रतिध्वनी या भाषणांत दिसून आला.

त्या मर्मस्पर्शानें मानसिंगाच्या सर्वांगांत आनंदाच्या विद्युल्लहरी खेळूं लागल्या पण शंकाकुल मनाला तें सत्य पटेना. त्यानें करुणवाणीनें म्हटलें, " तुमचें औदार्य माझ्यावर वाटेल ती कृपा करील; पण त्या कृपेस मी नालायक आहें ! अगदीं-अगदीं अयोग्य आहें !—नको--नको, ती गोड कल्पना नको ! तो भासमय आनंद नको—कांहीं-कांहीं नको ! मानसिंग—हा दुर्दैवी करंटा फक्त दुःखच-दुःखच भोगण्याकरितां जन्माला आला आहे !--" येवढें कांहींसें वैतागानें बोलून तो पुढें म्हणाला, " हसीने !—एकेरी नांवानें संबोधीत आहें, याबद्दल क्षमा कर. तूं थोर मनानें मला क्षमा केलीस; एवढी एकच जाणीव माझ्या पुढच्या दुःखमय आयुष्यांत माझ्या तप्त मनाला विश्रांतिस्थानाप्रमाणें होईल; बाकी सर्व दुःखच माझ्या-पुढें वाढून ठेविलें आहे. "

हसीनेनें आपल्या नेत्रपल्लवीनें त्यास एकदम स्तब्ध केलें ! चकित केलें ! " मी असतांना आपण दुःखी ? " असाच प्रश्न त्या दृष्टींत होता ! त्या दृष्टींत विलक्षण जादू भरली होती !

मानसिंग या जादूनें जागचेजागीं खिळला !--नाहीं-इतका उत्तेजित झाला कीं, त्यानें एकदम पुढें धावून आपल्या परीला हृदयाशीं धरिलें !

पुढच्या क्षणीं तो प्रेमोन्मादांत बेहोष होऊन म्हणाला, " हसीने !-- सौंदर्यकलिके ! या अपमानाबद्दल या अभाग्याला वाटल्यास शाप देऊन दग्ध कर ? मानसिंगाच्या मेहरुन्निसे ! पायरी सोडून वागल्याबद्दल वाटल्यास तिरस्कारानें माझ्या तोंडावर थुंक ! मला लाथेनें ठोकरून नरकांत झोंकून दे ! अथवा याहीपेक्षां जास्त कडक शासन देणें तुला मान्य असेल तर ज्या तुझ्या बाहुलतांचें कंठभूषण व्हावें म्हणून माझी इच्छा आहे, त्याच बाहूंनीं माझ्या मानेला विळखा घालून माझा प्राण घे ! या देहांतून मला मुक्त कर !--माझ्या प्रेमदेवते, काय वाटेल तें माझें कर ! तार अगर मार ! मान दे अगर दूर कर ! हृदयाशीं धर अगर लाथेनें उडवून दे ! तुझ्या नेत्रांनीं माझी फसवणूक केली आहे ! त्या उन्मादानें मी हा अमृतापेक्षांही गोड परंतु विषापेक्षांही जास्त मारक असा इष्काचा जहरी प्याला ओंठाशीं लाविला आहे, तो शेवटपर्यंत पिणार ! प्राण जाईपर्यंत मीही सुळावरील पोळी खात सुटणार ! देहाचा चक्काचूर होईपर्यंत मी माझ्या या बिजलीला हृदयाशीं कवटाळणार !--हसीने !--हसीने !! " इत्यादि बडबडत प्रत्येक वाक्यागणीक त्यानें तिला वरचेवर हृदयस्थ केलें आणि तिच्या ओठावरील व कपोलावरील लाली वाढविली व कमी केली !

सूर्याच्या शेवटच्या किरणानें हा प्रकार एका गवाक्षांतून अवलोकन केला व तेथून गमन केलें !

कांहीं वेळानें हसिनेनें मोठ्या कष्टानें त्याच्या बाहूंतून आपली सुटका करून घेतली आणि त्याच्या कानांत कांहीं पुटपुटून त्यास तेथून लावून दिलें!

भ्रमिष्ट मानसिंग दुसऱ्या एका महालांत जाऊन विचार करीत पडला ! बऱ्याच वेळानें मानसिंग भानावर आला. आतां त्याचें चित्त बरेंच शांत

झालें ! हसीनेचें आपल्यावर प्रेम आहे; आपण खरोखरीच भाग्यवान आहों ! या आनंदांत तो आपलें सर्व दुःख विसरला ! अत्यंत प्रफुल्लित अंतःकरणानें तो हसीनेच्या पित्याची व तिची भेट घडवून आणण्याच्या खटपटीला लागला !

प्रहर रात्रीनंतर त्यानें मोठ्या दक्षतेनें ती भेट घडवून आणिली आणि त्या बापलेकीस संतुष्ट केलें

फर्जदबेग कांहीं वेळ आपल्या कन्येजवळ बसला. तिच्या सुखदुःखाच्या कांहीं गोष्टी त्यानें ऐकून घेतल्या आणि आपले पुढचे कांहीं विचार त्याने तिला सांगितले आणि नंतर दीड दोन घटिकेनें तिचा निरोप घेतला ! मानसिंगानें त्यास त्याच्या विश्रामस्थानीं नेऊन पोंचविलें !

सर्व गोष्टी कशा सुखाच्या व आनंदाच्या झाल्या ! किती वर्षांनीं तरी हसीनेचा पिता तिला भेटला. तिला त्या गोष्टीचा अत्यंत आनंद झाला आणि त्यांत मनाला दुसरी प्रसन्नता केवढी ? ज्याला आपलें मन दिलें त्या तरुणानेंच हा योग घडवून आणिला. नवयुवतीला यापेक्षां दुसरा हर्ष तो कोणता असणार ?

मानसिंगाचें मन इतके प्रसन्न साऱ्या आयुष्यांत झालें नसेल ! तो आपले मागचें व आतांचें, भोंवतालचे व दूरचें सर्व दुःख विसरून गेला ! ज्या रहस्यामुळें त्यास सर्व जगांत अंधकार भासूं लागला होता व जीवही नकोसा झाला होता, ते तो अजिबात विसरला ! बस्स !––हसीना––एक हसीना !–– तिचा स्पर्श, तिचें कोमल भाषण ! तिचें प्रेम ! तिचे वचन ! तिचें सौंदर्य ! तिचें सर्व कांहीं ! !

हेच गोड स्वप्न पाहात तो आपल्या शयनागारांत धिमेपणानें चालला होता; तोंच एका अस्पष्ट प्रकाशाचे ठिकाणीं त्याच्या खांद्यावर कोणीतरी हात ठेऊन त्याचा मार्ग आडविला !

मानसिंग खूपच मोठ्यांदा दचकला ! तो एकदम म्हणाला, "कोण तें ?" त्या अस्पष्ट प्रकाशांत त्यानें डोळे फाडून पाहिलें तों, त्याचा पिता––महाराणा सुम्राजी ! ! !

काय असेल तें असो, मानसिंगास ही भेट रुचली नाहीं; इतकेंच नव्हे तर त्यास आपल्या पित्याचा मोठा तिरस्कार वाटला ! त्यानें एकदम खेकसून विचारिलें, " कोण ? पिताजी ?--इथं अंधेरांत काय करताय् ? -मी घाबरलों ना ?--निजण्याची वेळ नाहीं का झाली तुमची ? "

सुम्राजीनें मुकाट्यानें नाकावर बोट ठेवून त्यास चुप्प केलें आणि त्याचा हात धरून त्यास आपल्या मागें ओढीत आपल्या महालांत नेलें. तेथें गेल्यावर त्यानें एका हातानें मानसिंगास पुढें ढकलीत, आपणही आंत शिरून दार लाविलें ! त्याचें हें वर्तन इतकें गूढ व भीतिप्रद होतें ! मानसिंगास त्याचा कांहींच उलगडा होईना. तो भयचकित नेत्रांनीं आपल्या पित्याकडे पाहूं लागला.

सुम्राजीची सुरकुतलेली व काळवंडलेली मुद्रा मोठी भेसूर दिसत होती. कांहींतरी क्रूर विचार त्याच्या डोक्यांत घोळत असावेत, हें त्याच्या नेत्राच्या चमत्कारिक झांकीवरून वाटत होते !

माससिंगानें भयभीत होऊन विचारलें, " बाबा, तुमचा विचार तरी काय आहे ? "

सुम्राजीनें त्यास एका कोचावर बलात्कारानें बसविलें आणि स्वत:ही त्याचे पुढें बसून तो म्हणाला, " खुळ्या पोरा, आपल्या कुळाला आग लागण्याची वेळ आली तरी तूं काय असाच गप्प बसणार ?-आश्चर्यानें असा मजकडे पहातोस ! काळच संध्याकाळीं पाहिलेला देखावा तूं विसरलास? मान, त्या कवटाळणीचे हे चाळे काय असेच चालूं द्यावयाचे ?-तुझ्या शरीरांत सळसळणारें रक्त आहे कीं कुजक्या डबक्यांतील खातेरा भरला आहे ? टकमक तोंडाकडे काय पहातोस ! कुलांगर कुलटा तिचें सर्व कवटाळ बाहेर आल्यावरही जीवंत ठेवावयाची ?-नाहीं मान, ही गोष्ट तुला कमीपणा आणणारी आहे ! मला लाजीरवाणी आहे ! सिसोदिया वंशाची अब्रु मातीमोल करणारी आहे !-मान, कांहीं वेळा पूर्वी पर्यंत मी तुझा पिता होतों ! आतां आपण परस्परांचे मित्र आहोंत आणि मित्र या नात्यानें मी तुला ही सल्ला विचारीत आहें. सोळा वर्षाच्या पुढें पुत्राला मित्राप्रमाणें

मानावें, असें शास्त्रवचनच आहे. त्यांत तुला तर इतक्या गोष्टी माहीत झाल्या आहेत कीं,–पण 'जाऊंदे ती नरकतुल्य हकीगत !–मान, सांग तिला जिवंत ठेवणें योग्य आहे का ?–ती किती निर्लज्ज आहे याची तुला कल्पना नाहीं ?–काल तुझ्या समोर इतका घाणेरडा प्रकार घडला कीं, तिच्या ठायीं दुसरी कोणी असती तर आपलें कृष्णचरित्र आपल्या पुत्राला समजलेलें पाहून तिनें प्राण दिला असता–मान–ध्यानांत ठेव तिनें प्राणत्याग केला असता; पण ही लासवठ पाहिलीस कशी पूर्ण निस्संग बनली आहे ? खुशाल त्या पाहुणीच्या आनंदांत गर्क आहे ! बेशरम !–निमकहराम !! मान, यापुढें तिला जिवंत ठेवणें इष्ट नाहीं! त्यामुळें कोणालाच सुख होणार नाहीं !–आज तू स्मशानांत गेला होतास! पाहिलेंस पोरा, कुलांगार स्त्री घरांत असली म्हणजे पुरुषांना घरापेक्षां स्मशानच बरें वाटूं लागतें; म्हणून म्हणतों, मान, तिला यमसदनीं पाठवायला नको का ?"

हायरे दुर्दैवा! काय हा विलक्षण प्रसंग? मानसिंगाला कशाचा उमज पडेना ! तो व्याकुळतेनें आपलें मस्तक कोचाच्या पाठीवर टेंकून त्याला हाताचा आधार देत म्हणाला, "मग मी काय करूं म्हणतां ?"

सुग्राजी एकदम म्हणाला, "जा तिचा प्राण घे ! खून कर ! तिला चेंचून नाहींशीं कर अगर पोत्यांत घालून कडेलोट कर ! आपल्या कुलाची अब्रु राखण्याकरितां, आपल्या मनाचा मर्दपणा दाखविण्याकरितां, पित्याच्या संतोषाकरितां आणि सर्वांच्या सुखाकरितां, मान, तूं कुलटेचा खून कर !–मैनलचा खून कर!–आपल्या आईचा खून कर!–खून कर–मान–तिचा खून कर !!!"

मानसिंगानें आपल्या कपाळावर हात मारून घेतला व अत्यंत उद्वेगानें म्हटलें, "परमेश्वरा! एकाच दिवशीं तूं मला स्वर्गाची पहिली पायरी दाखवून नंतर थोड्याशा कालांतरानें नरकाच्या शेवटच्या पायरीवर ढकलून दिलेंस अं !"

एवढें बोलत असतां त्यास झीट आली. सुग्राजी त्यास उपदेश देतच होता.

———:०:———

# परिच्छेद २० वा.

## मरण्याचें श्रेय !

हसिनेनें लाजत मुरकत ओठांतल्या ओठांत उच्चारिलेलें प्रेमाचें आश्वासन आणि सुर्याजीनें दातांखालीं ओठ रगडीत केलेली खुनाची आज्ञा यांच्या अर्थामध्यें केवढा भयंकर विरोध होतो !

" जिगर ! दिलका सौदा हो चुका ! राजीखुषीमें हो चुका ! ! " हे हसिनेचे शब्द कोणीकडे आणि--

" मान, मैनलचा खून कर ! आपल्या जारिणी मातेचा प्राण घे ! ! " ही सुर्याजीची बजावणी कोणीकडे ? जमीन अस्मानचा फरक !--छे, परस्परांची तुलनाच होणें शक्य नाहीं ! प्रेमदान आणि प्राणघात ! ! !—तुलना करायची तरी कशी ?

एका कानांत अमृत-दुसऱ्यांत हलाहल ! एकीकडे स्वर्गाचा सुंदर सोपान-दुसरीकडे नरकाचें भयंकर विवर ! ! या बाजूस दिलचमन-त्या बाजूस खा खा करणारा वणवा ! ! !

एकाच वेळीं एकाच स्थळीं उभयतांची विलक्षण मिलावट-अगदीं बेमालूम जोड ! मानसिंगाच्या दुर्दैवानें किती अजब डाव धरला हा !

दुर्दैवानें त्यास बजावलें. मानसिंगा, सणाचें स्वर्गसौख्य पाहिजे असेल तर अनंत काळचें नरकाचें वैभव मान्य केलेंच पाहिजे ! स्वर्ग नको असेल तर नरक नाहीं आणि तो पाहिजे असेल तर हा त्याचे मागोमाग--अगदीं पावलावर पाऊल टाकून येणार ! तुझी अनुमति असो वा नसो ! सुखदुःखाची ही जोडी तुझ्या कपाळीं कायमची आहे ! एका हातानें लोण्याचा गोळा झेलीत असतां, दुसऱ्या हातानें रखरखलेला अंगार खेळविण्याची कसोटीची कसरत तुला केलीच पाहिजे.

मानसिंग मनांतले मनांत दुःखानें करपून गेला ! तो शून्यामध्यें हात जोडीत उद्वेगानें म्हणाला, " बाबा दुर्दैवा ! तुला माझे शतशः प्रणाम असोत ! नको—माझ्या संवगड्या, तुझा तो घडीचा स्वर्ग नको आणि

चिरकालीन नरकही नको !—नको—नको, हसीनेचें आलिंगन नको ! मातेचें दर्शन नको ! पित्याचें भाषण श्रवण नको ! बंधूचें मुखावलोकन नको !--कांहीं कांहीं नको ! दुर्दैवा तुझ्या संतोषाकरितां मी सर्वांचा त्याग करितों बरें !--मग तरी तूं तुष्ट होशील ना ? मग तरी माझ्या या जिवंत मरणाचा शेवट होईल ना ?--दे, दुर्दैवा ! मरण दे ! माझी ही पहिली व शेवटची विनंति मान्य कर ! कर एवढी कृपा ! दे, मरण दे—मरण दे-मरण दे !!!"

अहोरात्र तीन दिवस मानसिंगानें मरणाची मागणी केली; पण कांहीं उपयोग झाला नाहीं ! त्यास मृत्यु मिळाला नाहीं !

खुळा मानसिंग ! अभाग्याला हुकमी मरण मिळत नसतें, ही साधी गोष्टही त्याच्या लक्षांत आली नाही ! याचनेमध्यें इतकी घृणा भरलेली आहे कीं, मृत्यूचें दानही पदरांत पडणें अशक्य असतें !

तीन दिवस झाले ! मानसिंगाच्या याचनेकडे कानाडोळा करून मृत्यूनें इतरांच्या संसारांत किती तरी घडामोडी केल्या ! मृत्युप्रमाणें त्याचे आप्तेष्टही त्याचेपासून ( या तीन दिवसांत ) दूरच राहिले ! माता येऊं इच्छीत नव्हती. सुप्राजी भानावर नव्हता. हसीना जगदृष्टीनें अद्यापीही परकी होती ! राहतां राहिले नोकर चाकर. त्यांना मानसिंग स्वतः आपणाकडे फिरकूं देत नव्हता !

आतां गडावर निराळेंच युग सुरू झालें होतें ! महाराणी तशी, सुप्राजी असा, मानसिंगाची ही तऱ्हा ! दोन माणसें जमलीं कीं, कुजबुज याच गोष्टीची. चितोडच्या मोडक्या महाराण्याचें कुटुंबसौख्य हें असें होतें ! असो.

तीन दिवसांच्या उपोषणानें मानसिंगाच्या मृत्युकरितां आर्त असलेला जीवात्मा अन्नाकरितां तडफडूं लागला ! मानसिंगानें मृत्यूजयजप बाजूला सारून पोटपूजा केली ! उदरपूर्ति झाल्यावर मानसिंगास त्या गोष्टीचा पश्चात्ताप होऊं लागला !

हें पाहून त्याचें दुर्दैव हंसलें व म्हणालें, " खुळ्या पोरा, मरण पाहिजे होतें ना तुला ? मग मांन का हालवलीस ? अशा अल्पशा पुरश्चरणानें का कुठें मरण प्रसन्न होतो ? वेडारे वेडा !—हा उपाय तुझ्यासारख्या कमकुवत

मनाच्या वाद्यानाकडून होणार नाहीं. जा, मानसिंगा, तुला मृत्यु हवाच असेल तर जा—गडाच्या तटाखालीं तो आ वासून बसला आहे ! कुठ-ल्याही कड्यावरून त्याच्या मुखांत उडी घे !—कां जीवाचा थरकांप कां होतो ?—तें धाडस करवणार नाहीं ?—मग शस्त्रागारांत जा ! तेथें तुला भाल्यांच्या टोकावर, जंबियांच्या पात्यावर, तलवारींच्या धारेवर तो खेळ-तांना आढळेल ! जा, त्याला जाऊन मिठी मार !—तीही छाती नसेल तर जा, गडाखालीं गंभेरी नदी वाहाते आहे. तिच्यांतील एखाद्या डोहाचा ठाव घे; मृत्यूची आणि तुझी तेथें खास गांठ पडेल ! इतकेंही करवत नसेल तर, स्मशानांत जा आणि एखादी चांगली फरशी पाहून मृत्यूच्या नांवें आपल्या मस्तकाचा नारळ एका धडकींत फोडून टाक, तुझें काम होईल ! नुस्त्या याचनेनें तुझें काम नाहीं भागणार ! ”

मरणाचे विचार करीत असतां, मानसिंगानें शेवटचा निश्चय केला. तो दुर्दैवास ह्मणाला, “ अदृष्टा ! तुझ्या इच्छेप्रमाणें होऊं दे. मृत्यु मजकडे येत नसेल तर मी त्याचेकडे जाईन ! अगदीं आतांचे आतां जातों ! ” असें ह्मणत तो उठला व त्यानें भानावर येऊन आपल्या सभोंवतीं पाहिलें ! रात्रीचें राज्य सुरू झालें असून जिकडे तिकडे गंभीर शांतता पसरली होती! याचवेळीं मध्यरात्रींचा चौघडा दुडुम दुडुम वाजत होता.

मानसिंग मुकाट्यानें प्रासादाबाहेर पडला ! तो स्वगत ह्मणाला, “चल, कपाळकरंट्या ! स्मशानांत चल. एखादा कृष्ण सर्प आढळेल ! त्याच्या शेंपटीवर पाय दे; म्हणजे मृत्यूचें मुख तुझ्याकडे आपोआपच वळेल ! ”

इकडे तिकडे न पाहतां, पहारेवाल्यांच्या प्रश्नास न जुमानतां त्यानें स्मशानमार्ग स्वीकारला ! शुभ्र चांदणें त्यास मार्ग दाखवीत होतें.

स्मशान येतांच मानसिंग तीराप्रमाणें त्याचेमध्यें प्रवेश करता झाला ! मृत्युप्राप्तीच्या आशेनें त्यानें मुद्दाम वाढलेल्या गवतांतून, दाट झुडपांतून, थरावर थर जमलेल्या पाचोळ्यांतून आपला मार्ग काढला; हेतु हा कीं, एखाद्या विषारी जनावरावर बेभानपणें पाय पडावा आणि त्यानें चवताळून आपणास स्वर्गाची वाट दाखवावी; पण ह्याची ही युक्तिही विफल झाली !

जवळ जवळ दोन घटका तो अशा तऱ्हेनें हिंडला असतांही साधारण खरचरण्यापलीकडे त्यास कसलीही इजा झाली नाहीं. शेवटीं थकून तो एका समाधीवर जाऊन बसला ! खालींवर, आजूबाजूस त्याची दृष्टि नाचली ! गंभीर, शांत, भयानक, अद्‌भुत असा देखावा पाहून त्याचें बावचाळलेलें मन आपल्या मुळच्या विचारावरून ढळलें ! सोन्याच्या तेजाळ थालीप्रमाणें शोभणारा चंद्र पाहून तो शांत झाला ! समिद्धेश्वराच्या देवालयांत देवापुढें काळ्या फरशीवर ठोकलेल्या चकचकीत रौप्यमुद्रेप्रमाणें झळमळणारें तारामंडळ पाहून त्याची दृष्टि चकित झाली आणि भोंवतालची स्मशानवासी शांतता पाहून त्याचें मन जागचेजागीं थबकलें ! परिस्थितीचा परिणाम मनावर झाला !

हळू हळू त्यास फर्जंदबेगाचें भाषण आठवलें ! पूर्वजांच्या पुण्यस्मृतीनें त्याच्या मनाचा रंग पालटून गेला ! अल्पकालांत विकाराचें दमन होऊन विवेकशक्ति ठिकाणीं आली. तिनें त्यास पत्ताच्या समाधीजवळ चलण्यास सांगितलें. त्याच्या पायांनीं ती आज्ञा मुकाट्यानें मान्य केली.

पत्ताच्या समाधीसमोर येऊन मानसिंगानें तिला प्रमाण केला. कीर्तिरूपानें उरलेल्या त्या बालवीराचें चरित्र मानसिंगाच्या मानसचक्षुपुढें उभें राहिलें, आणि त्यानें त्याच्या चरित्राशीं आपल्या चरित्राची तुलना केली ! त्यामुळें त्याची त्यालाच मोठी खंत वाटली ! त्यानें स्वतःचा अत्यंत धिक्कार केला आणि समाधीकडे पाहात म्हटलें, " पराक्रमी बालवीरा, माझें येथील अस्तित्व तुझ्या समाधीलाही रुचणार नाहीं; मग तुझ्या पुण्यात्म्याला तें कोठून बरें वाटणार ? पण पत्ता, तूं शूर आहेस तेव्हां तुझें हृदय थोर असलेंच पाहिजे ! माझ्या या आगमनाबद्दल मला क्षमा कर आणि मला मार्ग दाखीव ! माझी कींव करून मी पुढें काय करूं तें सांग ! माझ्या जींवाची मला आतां ओकारी आली आहे ! निदान मला मरण्याचा एखादा अचूक उपाय सांग ! एखाद्या पाषाणापेक्षांही कमी किंमतीचें आयुष्य कंठण्यापेक्षां मरणें श्रेयस्कर नाहीं का ? "

त्याची विवेकशक्तीच समाधिरूपानें त्यास म्हणाली, " मानसिंगा, तुला मरण पाहिजे ?—तूं नर असून नारीचें वर्तन करूं इच्छितोस ?—नांवानें

मानसिंग असून अपमानाच्या मोताची वांछा धरितोस ?--रजपूत असून रजकाप्रमाणें भ्याडपणा दाखवितोस ?—वयानें मोठा असूनही अज्ञान मुला-प्रमाणें रडत बसतोस?—हें तुला शोभतें का ? विचार कर, मानसिंगा, विचार कर ! वेड्या राजकुमारा, मरण ही एक सहजप्राप्त अवस्था आहे ! त्याच्याकरितां इतकी याचना–इतकी करुणवाणी पाहिजे कशाला ? आज उद्यां, येथें अगर तेथें कोठेंतरी आणि केव्हांतरी तूं खास मरणार ! तुझा देह मातीला मिळणार ! तेव्हां या साध्या गोष्टीकरितां इतकें आर्त व्हायला नको आहे.—तुला मरायचेंच आहे ना; मग त्याचें श्रेय मृत्यूला तरी कां देतोस ! मानसिंगा, मरणाचें श्रेय फार मोठें आहे बरें. तें पदरांत पाडून घेण्याकरितां तर मनुष्याचा जन्म तुला मिळाला आहे ! मानसिंगा, तूं जरूर मर; पण मरणाचें श्रेय सोडूं नकोस ! तूं रजपूत आहेस--मर्द आहेस. त्या स्थानास शोभण्यासारखा मर. किड्या मुंगीच्या क्षुल्लक मरणानें मरूं नकोस ! कुत्र्याच्या मोतीनें मरूं नकोस ! तर जीवंत वीराला शोभणाऱ्या मरणानें मर !--ती पहा गुहा--हजारों तरुणींनीं तिच्या धगधगलेल्या मुखांत प्रवेश करून मरणाचें श्रेय मिळविलें ! या इतस्ततः पसरलेल्या समाधि पहा ! यांतील प्रत्येक मनुष्यानें आपलें मरणें श्रेयस्कर करून दाखविलें ! तो पद्मिनीचा महाल, तो कुंभोचा विजयस्तंभ, तो मोकळचा विजयध्वज, तो हमीराचा महाल, मानसिंग--या आपल्या गडावर कोठेंही जा आणि कांहींही पहा; तुझ्या गतपूर्वजांनीं मरणाच्या ध्येयाकरितां धडपड केल्याचा इतिहास तुला कळून येईल ! परिस्थितीनें भांबावून गेलेल्या तरुणा, निराशा, दुःख, अपमान, मनस्ताप कोणाला नव्हता आणि नाहीं ? तो काल होता आज आहे, उद्यां असणार ! त्यांतून मार्ग काढून श्रेयस्कर मरणें हाच पुरुषार्थ--हेंच मनुष्य जन्माचें सार्थक ! तें सार्थक करून मर ! मरणाचें श्रेय घेऊन मर ! ”

मानसिंगानें उद्वेगानें म्हटलें, “ नालायख बाप, जारिणी माता, धर्मलंड भाऊ आणि मोंगलाची सेवा यांनीं मी जखडलों आहें. हे बंध मी कसे तोडूं ? या चमत्कारिक संकटांतून मी आपला मार्ग कसा काढूं ?

विवेकशक्तीनें सांगितलें, " मनाचा एक व एकदम निश्चय करशील तर हे बंध तांबडतोब तटातट तुटतील आणि तूं मोकळा होशील ! हीं बंधनें अगर त्यांची बळकटी ही तुझ्या कमकुवत मनाची स्वकर्तव्यविमुखता आहे. तिचा त्याग कर म्हणजे हीं बंधनें आपोआपच गळून पडतील ! आपला मार्ग शोधून काढण्यास, आपल्या जन्माचें सार्थक करण्यास तुला सध्यां एक आयता मार्ग खुला आहे. मेवाडचा शूर सरदार ठाकुर ईसरसिंग मोंगलाच्या कैदेंत आहे. जा, त्याची मुक्तता करण्याचा प्रयत्न कर ! तुला तें कार्य सहजसाध्य आहे. देवेच्छेनें त्यांत तुला यश मिळालें तर ठाकुरसाहेबांना गुरु मानून ते सांगतील त्या प्रमाणें वाग. कदाचित् त्यांत तुझी फसवणूक झाली व तुझे प्राण धोक्यांत आले, तरी तुझें काम झालें; तुझें मरण श्रेयस्कर होईल ? सध्यांच्या स्थितींतून आपला उद्धार करण्यास हाच एक मार्ग तुझ्यापुढें आहे."

मानसिंगास तो उपदेश पटला.त्यानें समाधीस प्रणाम केला आणि उच्च स्वरांत म्हटलें, " स्मशानवासी पुण्यात्म्यानों ! मला आशीर्वाद द्या ! तुमच्यासारखें मरण मला मिळणार नाहीं हें खरें; पण माझ्या शक्तीप्रमाणें मी मरणाचें श्रेय .मिळविल्यावांचून मात्र मरत नाहीं---मरणार नाहीं."

दुसरे दिवशीं प्रभात कालींच त्यानें आग्र्याकडे कूच केलें,



# परिच्छेद २१ वा.

## सुंदर कांतेचें आमिष.



कोणालाही न पुसतां, कोणाचीही अनुज्ञा न घेतां, इतकेंच नव्हे तर हसीनेच्या नजरभेटीचाही मोह न धरितां, मानसिंग आपल्या इतमामासह आग्र्यास येऊन पोंचला. मार्गांत त्याला एकच गोष्ट वरचेवर टोंचत होती; आपण एकवार तरी हसीनेस भेटावयास पाहिजे होतें. ती नवबाला आपल्या निष्ठुरतेमुळें सारखी तळमळत राहील तिचा त्यागच करावयाचा होता तर आपण तिचें प्रेम तरी कशाला स्वीकारिलें ? इत्यादि विचार त्यांचे मनांत आले व त्यास कांहीं वेळ त्याबद्दल खेदही झाला; पण दुसऱ्याच क्षणीं त्यास दुर्दैवाच्या वजावण्याचें स्मरण झालें. हसीनेच्या भेटीचा आनंद उपभोगला असता तर त्याचे बरोबर तसेंच कांहींतरी चमत्कारिक दुःखही आपल्यापुढें दत्त म्हणून उभें राहिलें असतें; तेव्हां आपण तो आनंद टाळून आलों, हेंच बरें केलें, असेंही त्यास वाटलें. नंतर त्यास आग्र्याहून आपण कोणत्या हेतूनें आलों आणि त्याचा शेवट कसा झाला, याचें स्मरण झालें. मागील गोष्टींचा-घडून गेलेल्या त्रासदायक प्रकारांचा—मुळींसुद्धां विचार करावयाचा नाहीं; असा त्यानें आपल्या मनाशीं अगदीं दृढ निश्चय केला होता. तरी मातेचें रहस्य, पित्याची स्थिति आणि बंधूचा विचार त्याचे मनांत वरचेवर येऊन त्यास त्रास देतच राहिला ! आपण आग्र्यास जाऊन पोंचलों नाहीं तोंच मोहनसिंग एखादा-खान झाल्याचें वृत्त आपल्या कानीं येणार, अशी त्यास सारखी धास्ती वाटत होती. तसें झालें असल्यास आपण त्याचे जवळ राहावें कीं नाहीं ? त्याच्याशीं आपण कसें वागावें ? इत्यादि विचारांनींही त्याचें मन गोंधळून गेलें. शेवटीं त्यानें एकच ठरविलें: ठाकूरसाहेबांना सर्व कथा प्रांजळपणें निवेदन करावयाची आणि ते सांगतील तो मार्ग आचरावयाचा.

मानसिंग, यथावकाश एके सायंकाळीं आग्र्यास येऊन दाखल झाला येतांच त्यास आपल्या वाड्यांत मोठी गडबड असल्याचें दिसलें. कारण विचारतां, उदईक प्रात:काळीं मोहनसिंगाचा धर्मांतरविधि होणार असल्याचें कळलें ! असें कांहीं भविष्य मानसिंगानें अजमावून ठेविलें असल्यामुळें, त्यास त्या वार्तेनें विशेष दुःख झालें नाहीं. त्यानें तिकडे कानाडोळा करून, भोजनादि विधि आटपून,कोणाचीही गांठ न घेतां शयनगृहांत प्रवेश केला. बराच वेळ नानाप्रकारचे खेदजनक विचार करीत तळमजल्यावर, त्यास निद्रा आली.

प्रभातकाळींच जवळच्या मोठ्या मशिदींतून बांगीची पुकार ऐकूं येऊं लागली. मानसिंग पडल्या पडल्या ऐकत होता.

अल्ला हो अकबर ! अल्ला हो अकबर ! !
असला तो खैरुम् मिन्नूम् !!!
अल्ला हो अकबर ! अल्ला हो अकबर ! !

मानसिंग बिछान्यांत होता, परंतु मोहनसिंग अगोदरच उठून न्हाऊन माखून साफसुथरे कपडे घालून मोठ्या तयारीनें बसला होता. त्याचें मन आज मोठें प्रसन्न होतें. आपला कित्येक दिवसांचा हेतु तो आज तडीस नेणार होता.

आज त्याचे येथें त्याच्या बरोबरीची कितीतरी मुसलमान मंडळी त्यास बधाई देण्याकरितां एकत्र झाली होती. मोहनसिंगासारखा खानदानीचा रजपूत आपल्या जातींत कायमचा समाविष्ट होणार, याचा सर्वांना मोठा आनंद वाटत होता.

बांगीची पुकार सारखी सुरू होती.

अशहद अल् ला इलाह इल्लिलाह !
अशहद अल् ला इलाह इल्लिलाह ! !
अशाद अन महमुद रसुल्लिलाह !

\+ + + +

अल्ला हो अकबर !ऽऽऽअल्ला हो अकबर ! !

मोहनसिंग सर्व स्नेही मंडळी समवेत पायीं चालत मशिदींत येऊन पोंचला. तेथें आज फज्र पढण्याकरितां अनेक मोठमोठी मुसलमान मंडळी एकत्र झाली होती व सारखी येत होती. खुद् जहांगीर बादशाहा ही त्याच मशिदींत निमाज पढण्यास येणार होता. त्यामुळें मोठमोठे उलमा, फकीर, मुल्लाह, इमाम, काजीही हजर झाले होते. मोहनसिंगाव्यतिरिक्त इतर अनेक मुसलमान होऊं इच्छिणारे हिंदुही एकत्र झाले होते. मोंगली साम्राज्यास सर्वस्वी शोभणारा, त्याचा उत्कर्ष दर्शविणारा त्या वेळचा त्या मशिदींतील देखावा खरोखरच मोठा प्रेक्षणीय होता !

सूर्योदय होण्याचें आंतच नमाज पढणारे सर्व मुसलमान एकत्र झाले. बादशाहाची स्वारी येऊन पोंचली ! सर्वांचे वजू झाल्यावर, प्रत्येकानें आप आपलें स्थान ग्रहण केलें ! ऊद जाळण्यांत आले ! वातावरण सुगंधित झालें !

मुख्य काजीनें मोहनसिंगाजवळ येऊन त्यास कलमा ( मुसलमानी धर्माचा गायत्री मंत्र ) पढविलाः--

**ला इलाह इल्लिला हो—महम्मद रसुल्लिलाह !**

( परमेश्वर एकच आहे आणि महम्मद हा त्याचा प्रेषित आहे ! ) मोहनसिंगानें हा पवित्र मंत्र गंभीरतेनें म्हटला !

नांवाकरितां किंचित् वाटाघाट होऊन त्याचें नांव महाबतखान किंवा मोहबतखान असें ठेवण्यांत आलें !

मोहनसिंग मुसलमान झाला ! सुप्राजीचा पुत्र, मानी प्रतापाचा पुतण्या सिसोदिया वंशाचा एक रजपूत मुसलमान झाला ! कां झाला आणि कशाकरितां झाला हें वाचकांना माहीत आहेच ! हिंदूच्या पाडावांत ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे.

केवळ कौतुकाकरितां वाचकांनीं थोडी तसदी घेऊन जर मुसलमानी रियासतींतील जहांगीराची कारकीर्द उघडून पाहिली तर मोहबतखान ही केवढी प्रचंड शक्ति मोंगलांना मिळाली, हें सहज कळून येईल. जहांगिर

बादशाहाची एकतृतीयांश कारकीर्द मोहनसिंगाच्या नव्हे–मोहबतखानाच्या पराक्रमाने आणि कर्तबगारीनें रंगल्याचें सत्य उदाहरण तेथें आहे ! त्यावरून विचार करतां अतिशयोक्तीचा दोष पदरीं न येतांही असें बिनदिक्कत म्हणतां येईल कीं, मोंगली साम्राज्याचा जो अवाढव्य विस्तार पुढें झाला; त्यास एकच व्यक्ति कारणीभूत झाली आणि ती म्हणजे मोहबतखान होय ! मोंगलाचें यश हिंदूनीं पेरलें. त्याला खतपाणी त्यांनींच दिलें ! त्याच्या अंकुरांची वाढ करण्यास तेच कारणीभूत झाले आणि त्याला बहरास आणण्याचा खराखुरा प्रयत्न त्यांनींच केला ! इतिहास ती साक्ष देतो आहे. पुढेंही देत राहील ! हिंदूच्या आजच्या अधःपाताची मीमांसा करण्याचें कोणी मनांत आणिल्यास त्यानें समतोल चित्तानें मोंगल इतिहासाचें पर्यालोचन केलें पाहिजे ! त्याचेवर मनन केलें पाहिजे ! समाजहिताच्या दृष्टीनें हा प्रयत्न कांहीं अगदींच वायां जावयाचा नाहीं. असो.

त्या दिवशीं मोहबतखानास खुद्द बादशाहानें भरजरीचा पोषाख अर्पण केला. दुसऱ्याही मोठमोठ्या लोकांनीं त्यास चांगले चांगले नजराणे देऊन त्याचा सत्कार केला. उलटपक्षीं त्यानेंही मुसलमानी धर्मरिवाजाप्रमाणें मोठमोठीं दानें करून, पांखरांना धान्य घालवून, फकीर अवलियांना वस्त्रप्रावर्णें देऊन आपलें इस्लामीपण जगजाहीर केलें. तो आपल्या वाड्यांतून बाहेर पडला त्यावेळीं हिंदु होता. मोहनसिंग होता. परत आला तो मुसलमान होऊन आला. मोहबतखान होऊन आला. परत येतांच त्यानें आपल्या निवासस्थानांतील हिंदुत्वाची सर्व निशाणी नामशेष केली ! मुख्य नोकर चाकर, स्वैंपाकी यांचीही फेरबदल झाली ! एक प्रहरानंतर येऊन पाहुण्यांस एके काळीं तो प्रासाद एका हिंदुगृहस्थाचा होता, हें समजण्यास क्षुल्लक कारणही राहिलें नाहीं !

इकडे आपण पुढें काय करावें या विवंचनेंत मानसिंग बसला होता. याची सेवकमंडळीही पुढें काय आज्ञा आहे हें विचारण्यास त्याचेकडे येऊं. जाऊं लागली. इतक्यांत जयपुरच्या राजा मानसिंगानें त्यास आपल्याकडे

येऊन राहण्याचा निरोप पाठविला. त्याप्रमाणें या मानसिंगानें आपलें बिऱ्हाड ताबडतोब उचललें ! दोघांही भावांनीं एकमेकांची भेट घेण्याचें मनांत आणिलें नाहीं. मात्र घडलेल्या प्रकारानें मानसिंगाचें मन अत्यंत व्यथित झालें ! आठ दहा दिवस तरी त्यानें आपला काळ एकांतांत व उदासीनतेंत घालविला ! तावत्कालापुरत तो आपले सर्व बेत विसरून गेला !

आतांपर्यंतच्या मानसिंगाच्या चरित्रावरून वाचकांना हें कळून चुकलें असेलच कीं, जी प्रमुख गोष्ट डोळ्यांपुढें त्याच्या असेल, त्याकरितांच तड-फडावयाचें, असा त्याचा स्वभाव होता व त्या नियमास अनुसरूनच तो भावाच्या धर्मांतरानें भांबावून गेला होता. याच स्थितींत तो आणखी बराच काळ राहिला असता; पण तितक्यांत एक नवीन गोष्ट त्याच्या नज-रेपुढें आली आणि त्याचें मन तिकडे वळलें.

एके दिवशीं राजा मानसिंगाचा पुतण्या सूरजमल्ल याच्याशीं तो गप्पा मारीत बसला होता. विषय होता मोहनसिंगाच्या धर्मत्यागाचा. मानसिंगास त्या गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटत आहे, असें पाहून सूरजमल्ल म्हणाला, " तुम्हाला त्याचें एवढें कोडें काय पडलें आहे बुवा ! अहो, संपत्ति आणि मानमरातब एवढाच कांहीं मोह मोहनसिंगाला नाहीं. त्यांत आणखीही कांहीं गोम आहे."

" ती काय !"

" ती !—म्हणजे ! तुम्हाला त्यांतलं अगदीं कांहींच ठाऊक नसल्या-सारखं दाखवितां अहां ?—वाह ! "

" नाहीं— देवाशपथ मला यांतलं कांहीं माहीत नाहीं ! " मानसिंगानें सरळपणानें म्हटलें, " दादांच्या धर्मत्यागाची ही गोष्टच मला अप्रिय अस-ल्यामुळं मी त्याबद्दल फाजील चौकशी केलीच नाहीं. "

" तें खरं. पण त्यांतली खरी गोम कानीं येण्यास कांहींच हरकत नव्हती " सूरजमल्ल म्हणाला, "अरे बाबा, यांत सुंदर कांतेचें आमिष आहे आमिष !—

सुंदर कांतेचें बरं का ?–मुसलमान लोक आपल्या मुली लेकी बाटग्या हिंदूला देण्याला नाखूष असले तरी सरदार अबदुलखान आपल्या घरची कोणी एक मुलगी तरुण सुंदर युवती या तुझ्या दादास–आमच्या मोहबत-खानसाहेबास देण्यास तयार आहे ! ”

त्याचे हें उत्तर ऐकतांच मानसिंग विलक्षण चपापला. आबदुलखानाचे घरची ही तरुणी म्हणजे आपली गुलेहसीन तर नव्हे ? अशीच शंका त्याचे मनांत आली व तो व्याकुळ झाला. तो एकदम उद्गारला, “ अबदुल-खान आपल्या घरची मुलगी देणार ?–म्हणजे काय ?–अबदुलखानाला मुलगी तरी आहे का ? ”

“ कां ? तुला या गोष्टीचें एवढें आश्चर्य कां वाटतें बुवा ?–” सूरज मल्लानें म्हटलें, “ अरे मुलगी नसली तर भाची असेल, बहीण असेल, पुतणी असेल किंवा एखादी अनाथ छोकरी पाळलेली असेल. त्याचें काय घेऊन बसलास एवढें ? ती फार सुंदर आहे असें म्हणतात. आणि त्या सांगण्यावर हा तुझा दादा भाळला झालें ! आहे काय नाहीं काय ! कामिनीचें आमिष–भाई, असेंच जबरदस्त असतें. कां ? तूं अगदीं विचारांतसा पडलास ? दादाला सुंदर बायको मिळण्याबद्दलचा हेवा वाटत असल्यास तूंही त्याचा मार्ग धर म्हणजे एखादी सुंदर यवनी तुलाही मिळेल. शिवाय मोहनपेक्षां तूं रूपवान असल्यामुळं तर कोणीही परी तुझ्यावर सहज आषिक होईल. ”

मानसिंगास ही थट्टा रुचली नाहीं. तरीपण त्याच्या डोक्यांत आतां निराळ्याच विचारांनीं थैमान मांडल्यामुळें तो थोडा वेळ स्तब्ध बसला. नंतर त्यानें एकदम विचारिलें, “ कायरे सूरज ? तुला त्या तरुणीचें नांव माहीत आहे कां ?–वयानें ती किती आहे ? तिची या कार्यास अनुमति आहे कीं नाहीं ?–कांहीं कळलें कां तुला ? ”

सूरजमल्ल थोडासा चाणाक्ष असता तर मानसिंगाच्या या प्रश्नाचें त्यास मोठें नवल वाटलें असतें व कांहीं शंकाही आली असती; परंतु तशी त्यास

दृष्टि नव्हती. त्यानें फक्त ' मला त्यांतलें कांहीं माहीत नाहीं. ' असें बोलून पुढें कांहीं स्मरल्यासारखें करून तो म्हणाला, " अरे मान, एके ठिकाणीं गंमत पाह्यला येतोस का ? आज आतां आपल्यामागें काम कांहीं नाहीं.मग कशाला इथें माश्या मारीत बसा. चल जाऊन येऊं त्या नाजुमीकडे—"

" गंमत ?–नाजुमी ?–तें काय ? " मानसिंगानें विमनस्क होऊन प्रश्न केला. तोंडानें त्यानें हे शब्द बाहेर टाकिले. डोळ्यांनीं तो सूरजमल्लाकडे पाहात होता; पण मन मात्र हसीनेकडे होतें. शंका त्यास हेंच विचारीत होती. आपल्या दादाचा आणि हसीनेचा विवाह होणार असेल काय ? "

इतक्यांत सूरजमल्लाचा स्नेही तेथें आला. मानसिंगाचा व त्या तरुणाचा थोडासा परिचय होतांच, उभयतांचे बंदगी व कुशल प्रश्न झाल्यावर त्यानेंही " त्या नाजुमीकडे येतां काय ?– सहज गंमत पाहून येऊं–" असा त्या उभयतांना ( सूरजमल्ल–मानसिंग यांना ) प्रश्न केला.

त्या नवीन मित्राच्या आगमनानें मानसिंगाचे मनांतले विचार बाजूला झाले. त्यानें उत्सुकतेनें प्रश्न केला, " हा नाजुमी कोण काढलात बोवा ?"

सूरजमल्ल म्हणाला, " म्हणजे काय ? तुला आग्र्यांतील नवीन हाल-चालीं कांहींच माहीत नाहींत वाटतं ?–अरे पण खरंच, तूं इतके दिवस चितोडगडीं गेला होतास नाहीं ?—सांगतों तुला इकडे काय काय गमंती झाल्या आहेत त्या. अगदीं पहिली गोष्ट तुझ्या दादाची तुला माहीत आहेच. दुसरी गोष्ट म्हणजे आम्ही म्हणतों त्या नाजुमीची होय. हा एक अवलिया फकीर आहे. फलज्योतिष सांगण्यांत, हात पाहून भविष्य वर्त-विण्यांत हा मोठा वस्ताद आहे म्हणे ! मंतरलेले ताईत, दोरेही करून देतो. त्याचा गुणही विलक्षण येतो, अशी आख्या आहे. "

या गोष्टीनें मानसिंगाचें मन बरेंच रमलें. त्यानें विचारिलें, " हा कोठून आला, त्याचें नांव काय ?–तो राहतो कुठें ? "

" तो राहतो कुठें, हें सर्वांना माहीत आहे. पण तो आला कुठून, आहे कसा आणि त्याचें नांव गांव काय, हें मला वाटतं कुणालाच माहीत नाहीं. त्याचं महत्व वाढविलं या मेहरुन्निसेनें. त्याला जगापुढंही तिनंच

आणिला. मोठी वस्ताद बायको आहे ती. वाटेल तीं कारस्थानं करून एके दिवशीं ती आपल्या बादशाहांची प्यारी राणी होणार आणि अलम-दुनियेचें राज्य करणार! माझी खात्री आहे आणि त्या नाजुमीचं भविष्यही पण असंच आहे, म्हणतात–"

"पण त्याची आणि हिची तरी कुठं गांठ पडली?"

"तें सर्व गूढ आहे–" नव्या मित्रानें म्हटलें, "आग्र्यामध्यें सर्वांना तें गूढ आहे–पण तें कांहीं कां असेना, माझे मनांत त्याला एकदां हात दाखवावयाचा आहे. काय, म्हणतो तरी काय, पाहूं!—चला, गमंत बघायला आपलं काय जातं?"

या नंतर मग विशेष वाटाघाट न करितां तिघेही त्या नाजुमीकडे निघाले.

ठाकूरईसरसिंगाला ज्या स्थानीं कैद करून ठेविलें होतें त्या वाड्या पासून जवळच कांहीं अतंरावर एक जुनाट पडकी इमारत होती. या ठिकाणीं तो फकीर येऊन उतरला होता. एरवीं या इमारतीकडे कोणी ढुंकूनही पाहिलें नसतें. परंतु आतां त्या स्थानाला विलक्षण महत्व आलें होतें. हे तिघेही स्नेही त्या स्थानीं येऊन पोहोंचले नाहींत तों त्यांना तेथें बरीच गर्दी असलेली आढळली. कोणीतरी मोठमोठे लोक अवलियाकडे आले असावेत. कारण रस्त्यावर घोड्याच्या गाड्या व रथ, मेणे सुटलेले दिसत होते. मात्र इतकें होतें तरी शांतता विलक्षण होती. कोणीही मोठ्यांदां बोलत नव्हतें. सर्वांचा सर्व व्यवहार अगदीं स्तब्धतेनें चालला होता. घोडे सुद्धां खिंकाळत नव्हते

त्या तिघांनीं फकिराची भेट आज होणें शक्य नाहीं, हें तेव्हांच ताडलें. पण ते गंमतच पाहण्यास आले असल्यामुळें, त्यांनीं तेथेंच इकडे तिकडे फिरून त्या नाजुमीची विशेष माहिती काढण्यांत, आज कोण कोण बडी मंडळी आली आहेत व त्यांचे आगमनाचे हेतु काय आहेत, याची चौकशी करण्यांत वेळ घालविण्यास सुरुवात केली. त्या तिघांप्रमाणें आणखी बरीच तरुण मंडळी तेथें उगीच भटकण्यास आली होती. मानसिंगाचें मन

थोडा वेळ त्यांत रमलें व कदाचित् पुढेंही रमलें असतें; पण तितक्यांत त्याच्या बंधूचें आगमन त्या ठिकाणीं झालें.

मोहनसिंग उर्फ मोहबतखान आज कांहीं सडा किंवा अशा तशा पोषाखांत आला नव्हता. आपल्या जंगी इतमामानिशीं आला असून, त्याची त्या अवलियाकडे दादही लौकरच लागली ! मोटया दिमाखानें इकडे तिकडे नजर फेंकीत व आपल्या हांजीहांजीखोर मित्राशीं संवाद करीत तो आपल्या गाडींतून उतरून त्या हवेलींत शिरला ! त्यानें मानसिंगास पाहिलें नाहीं; पण मानसिंगाची मात्र त्याचेवर तात्काळ नजर गेली ! आपल्या भावास पाहतांच मानसिंगाचा आनंद मावळला. तो पुढें काय करावें, या विचारांत आहे तोंच सूरजमल्ल त्यास म्हणाला, " ए मान, तुमचे बंधुराज आले आहेत. काय बेटयाला वैभव आलें आहे ? "

त्याच्या मित्रानें म्हटलें, " अरे कां नाहीं येणार ? स्वत: बादशाहा त्याचा मित्र. नुकतीच मोठी सरदारकी मिळालेली त्यांत सरदार अबदुलखानाशीं लौकरच सोयरीक होणार. मग त्यानें का मिरवूं नये ? "

सूरजमल्लानें विचारिलें, " खरेंच कायरे भाई, अबदुलखान या बाटग्याला आपली मुलगी कशी देणार बुवा ? "

" अरे, अबदुलखान मोठा लुच्चा आहे. त्याची मुलगी कोठली.' त्याचेजवळ त्याची एक अनाथ भाची आहे बहिणीची मुलगी. तिला आई ना बाप. देणार तिला याचे गळ्यांत आडकवून."

मानसिंगाचें लक्ष्य या बोलण्याकडे मोठया आतुरतेनें लागलें होतें.

सूरजमल्लानें प्रश्न केला, " पण ती सुंदर तरी आहे का ? "

"सुंदर ?–हो नसायला काय झालें ? तिचें नांवच मुळीं गुलेहसीन असें आहे. म्हणतात–सौंदर्याचा गुलाब आहे गुलाब ! "

मानसिंगाच्या डोक्यावर वीज कडाडली ! त्याच्या तोंडांतून चकार शब्द निघाला नाहीं. शून्यदृष्टीनें तो त्या मित्राचे तोंडाकडे पाहात राहिला. पुढे

त्यास तेथें राहवेना. त्यानें आपल्या मित्रांची परवानगी घेऊन घरचा रस्ता धरला.

घरीं येतांच त्यानें आपलें शयनमंदिर गांठलें. एकांत सांपडल्यावर तो उद्वेगानें चित्कारला, " दुर्दैवा ! आणखी कोण कोणते खेळ तूं मला दाखविणार ? हसीना मोहनसिंगास वरणार ?--खुशीनें ?--शक्य नाहीं--पण तिला खुशी नाखुशीचा प्रश्न काय ?--"

जीवनावीण मासोळीप्रमाणें मानसिंगाचें अंतःकरण तडफडूं लागलें !

---

# परिच्छेद २२ वा.

## मायेंत गुरफटलेली पतिव्रता !

---

मनुष्याचा देह निद्रावस्थेंत असतां मन जो कांहीं कल्पनेचा खेख दाखवितें किंवा पाहातें, त्या क्रियेस स्वप्न अशी संज्ञा आहे. स्वप्नसृष्टि निखालस खोटी असतां, ती घडतेवेळीं मनुष्यास अत्यंत सत्य वाटते. याच्या उलट ज्या गोष्टी घडून येतील, असें आपल्यास वाटत नाहीं; त्या गोष्टीही एकदम घडल्यास आपल्या बुद्धीस तेवढ्या वेळेपुरता भ्रम होऊन आपण स्वप्नांत तर नाहीं ? अशी शंका घेऊन त्या गोष्टींची शक्याशक्यता ठरवितों. पण जयश्री या दोनी प्रकारांच्या बाहेर होती. जयचंदानें आपल्या मायेचा धगान् धागा इतक्या निपुणतेनें जुळविला होता कीं, सत्यसृष्टींत वावरत असतांही जयश्रीस आपण एक फार मोठें चमत्कारिक स्वप्न अनुभवितों आहों असें पदोपदीं वाटत होतें !

इतका हा खटाटोप कशाकरितां ? तर जयश्रींस विलासाची व वैभवाची चटक लागावी म्हणून ! आपल्या प्रमाणेंच आपल्या पत्नीनेंही नाना प्रकारच्या सौख्याविषयीं लाचित व्हावें, अशी जयचंदाची इच्छा होती व ती

सरळ मार्गानें पूर्ण होणें अशक्य आहे, अशी त्याची खात्री असल्यामुळें अबदुलखानाच्या अनुमतीनें-साह्यानें-त्यानें हा बदरस्ता धरिला होता !

जयश्री बहिरामगढीं आली, त्यावेळीं तेथें विलास, वैभव आणि सौख्य याचा शक्य तितका उत्कर्ष जयचंदानें योजून ठेविला होता. या बाबतींत अबदुलखानानें त्यास अगदीं सरळ हातानें मदत केली होती. त्यामुळें जयश्रीस ती सत्यसृष्टि निःसंशय स्वप्नसृष्टि वाटूं लागली.

मोठमोठे शृंगारलेले महाल ! शेकडों दासदासी सेवेंत हजर ! स्वतःचा देह भूषविण्यास नानाप्रकारचे मूल्यवान् अलंकार व उंची आभरणें !! आणि याच वैभवास शोभेल असें भोजन, एवढें वैभव एकदम प्राप्त झाल्यावर तें कोणाच्या बुद्धीला सत्य वाटेल ?

जयश्री राजबीजाची व राजकुलांतील खरी; परंतु राजवैभवाशीं ती बाळपणापासून पारखी होती ! म्हणजे आज ती एक गरीब रजपुताणी होती ! शिवाय आपलें पूर्वार्जित राजवैभव मिळविल्याखेरीज तशा वैभवाची आशा करावयाची नाहीं. उलट तसें वैभव सहजीं चालून आल्यास निश्चयानें त्यास पाठमोरें व्हावयाचें, असेंच शिक्षण तिला मिळालें होतें. त्यामुळें असें सौख्य आपणास मिळावें, असें तिला कधीं वाटलेंही नाहीं. पण तेंच आज तिच्या पायीं लोळण घेत होतें; मग तिला वस्तुस्थिति स्वप्नमय कां वाटूं नये ?

आपली माया जयश्रीच्या बुद्धीस अगदीं योग्य प्रमाणांत भुरळ पाडीत आहे, असें पाहून जयचंदानें सुमारें आठ दिवस तिला त्या वैभवांत राहूं दिलें आणि नंतर एके दिवशीं पुनः तिला मोहनिद्रा घालून चंबेलीसह पूर्वस्थळीं-चंबेलवाडींत नेलें !

जयश्री जागी होऊन पाहाते तों काय ? आपल्या झोंपडींत !!! सूर्याची सकाळचीं कोंवळीं किरणें गवाक्षावाटे आंत येऊन पडलीं होतीं. नेहमीं प्रमाणेंच भोंवतालच्या हंसत्या सृष्टीनें तिच्या दृष्टीचें स्वागत केलें !

जयश्री आचंभित झाली ! मोहनिद्रेपूर्वी अनुभविलेल्या गोष्टींचें प्रतिबिंब अद्यापिही तिच्या मनावर अगदीं स्पष्ट होतें ! विस्फारित नेत्रांनीं इकडे तिकडे पाहात बसली असतां साध्या वेषाचा जयचंद चिमुकल्या चंबेलीला घेऊन आंत आला व तिला म्हणाला, " श्री ! अग काय ही तुझी झोंप ?– झोंप का सोंग ? आज आपला हा चिमखडा सुद्धां उठून अर्धा तास झाला !" असें म्हणत त्यानें चंबेलीचें चुंबन घेत तिला वर झेलीत म्हटलें, " चंबे ! तूं रडवी नाहींस त्यामुळें तुझ्या आईची फार सोय झाली आहे नाहीं ?– हंसते गुलाम ! " इत्यादि बोलत तो इकडे तिकडे फिरूं लागला.

आपण पाहिलें, अनुभवलें आणि उपभोगिलें तें सर्व स्वप्न अशी जयश्रीची आतां अगदीं खात्री झाली ! तिनें आपलें वस्त्र सांवरलें, उठून बिछाना आवरून ठेवला आणि नंतर पतीजवळ जाऊन चंबेलीला त्याचे जवळून घेत गंभीरपणें म्हटलें, " इतकी गाढ झोंप मला कशी लागली कोण जाणे बाई ?—काळच्या सरबतांत आपण कांहीं भांग नाहींतर अफू तर घातली नव्हती ! छे बाई, फारच गाढ झोंप ! आणि ऐकलं का, त्यांत मी एक भलं मोठं स्वप्नही पाहिलं ?–फारच चमत्कारिक ! "

" चमत्कारिक ?–स्वप्न ? " जयचंदानें आपल्या तलवारीच्या तपासणीचें मिष करीत म्हटलें.

" हो बाई, भारीच नवलाचें स्वप्न ! आतां कामाला जातें. दुपारीं सांगीन त्याची गंमत. " असें म्हणत ती निघून गेली.

जयचंदही आपल्या विचारांत कांहीं गुंग झाला.

तिसरे प्रहरचे सुमारास दोघांही पतिपत्नींना स्वस्थपणें बोलत बसण्यास वेळ मिळाला आणि त्यावेळीं जयश्रीनें आपल्या अनुभविलेल्या स्वप्नाचें–सत्याचें–वर्णन केलें ! वरचेवर आश्चर्योद्गार काढीत, त्याच त्याच गोष्टींचें पुन: पुन: वर्णन करीत, तें सौख्य अनुभवतांना आपल्याला किती चमत्कारिक वाटत होतें, याचा पाल्हाळ लावीत तिनें आपली कथा पूर्ण केली. जयचंदानेंही तें ऐकून आश्चर्यचकित झाल्याचा खूपच बहाणा केला ! नंतर त्यानें गंभीरपणें म्हटलें, " तुला व मला असें एकाच धर्तीचें स्वप्न पडावें

हें त्यांत फारच मोठें आश्चर्य आहे !-मीं सांगतों ना, तूं ज्या ज्या स्थलाचें वर्णन करते आहेस, तेंच माझ्याही स्वप्नांत दिसलें आहे आणि तूं ज्या ज्या वैभवाचें, विलासांचें, सौख्याचें वर्णन करते आहेस, तें अगदीं बरोबर तेंच माझ्याही स्वप्नांत प्रत्यहीं येतें आहे. हा केवढा चमत्कार ! मला नाहीं वाटत असें एका धर्तीचें स्वप्न दोघांनाही पडत असेल ! ”

“ म्हणजे काल ज्या वेळीं मी स्वप्नांत राज्यसुख भोगीत होतें, त्यावेळीं आपणही त्याच सुखांत होतां ?--मोठंच बाई नवल !

“ नवल म्हणजे असं तसं आहे कां ! मोठंच नवल हे ! अगदीं नवलांतलं नवल !! ”

या नंतर पुढें दोन दिवस त्या जोडप्याला हाच विषय सतत बोलण्यास पुरेसा झाला !

तिसरे दिवशीं रात्रीं जयचंदानें स्वप्नांतील राजवैभव दाखविण्यास आपल्या राणीची पुनः उचलबांगडी केली.

जागृतावस्था प्राप्त होतांच जयश्रीच्या विचित्र स्वप्नसृष्टीस प्रारंभ झाला ! यावेळी तिला प्रारंभीं इतकें जरी आश्चर्य वाटलें नाहीं, तरीपण आपण हें स्वप्नच अनुभवितों आहों, ही समजूत मात्र तिची कायम राहिली !

इकडे जयचंदाचें मन मात्र पहिल्या वेळेपेक्षां जरा जास्त धीट झालें. आपली माया मध्यंतरींच भंग पावेल कीं काय, अशी त्यास त्यावेळीं मोठी भीति वाटत होती. पण आतां ती तितकी वाटेनाशी झाली. सहज प्राप्त वैभव स्वप्नसृष्टीच्या भरंवशावर जयश्री उपभोगण्यास विशेष अप्रसन्न नाहीं, एवढें त्यास कळून येतांच त्यानें थोडया मोकळ्या मनानें वागण्यास प्रारंभ केला.

“ नाथ, केवढें विचित्र स्वप्न आपण अनुभवितों आहों !” जयश्री मधून मधून म्हणत असे, “ कोणाला सांगितलें तर खरें देखील वाटणार नाहीं ! किती खऱ्यासारखें, किती लांबलचक, किती गंमतीचें !! ”

जयचंदानें तिला आलिंगन देऊन म्हटलें, “ लाडके, हें स्वप्न नव्हे. ही सत्यसृष्टि आहे. मोंगल सम्राट् जहांगीर बादशहा यांची माझ्यावर

मोठी मेहरनजर झाली आहे!–माझ्याकडे अशी नवलानें पाहूं नकोस. खरेंच सांगतों. दिल्लीपतीची आपल्यावर मोठी कृपा असून त्यांच्याच कृपा प्रसादानें हें वैभव आपणास मिळालें आहे आणि तें कायमचें आपलें आहे. तूं हा भ्रम–आपणास कांहीं तरी स्वप्न पडतें आहे, हा विश्वास–सोडून दे आणि पहा! जयश्री, आपण भाग्यवान् नाहीं कां?" असें म्हणत त्या धूर्तानें तिच्या तोंडाकडे पाहिलें.

जयश्रीची मोठी चमत्कारिक अवस्था झाली! आपल्या पतीचें वरील भाषण तिला कसेसें वाटलें; तरी पण स्वप्न पाहतों आहोंत असेंच तिला वाटत राहिल्यामुळें ती कांहीं विशेष बोलली नाहीं. विलासोपभोग घेण्यांत ती सक्तही नव्हती आणि विरक्तही नव्हती. एखाद्या खऱ्या भ्रमिष्टाप्रमाणें ती वागत होती. आपण सत्यसृष्टींतच आहोंत कीं काय? असा तिला संशय येतो न येतो तोंच जयचंदाचें एखादें वर्तन असें कांहीं घडे कीं, तें तिच्या मनाला एकदम न पटणारें! बस्स! त्याबरोबर तिला वाटे कीं आपण स्वप्नांत आहों!

तात्पर्य, दुसऱ्या फेरींतही जयचंदानें आपलें जाळें जास्त कुशलतेनें विणलें! कांहीं दिवसांनीं जयश्रीला पुन: चंबेलवाडीस आणण्यांत आलें!

"छे बाई, हे स्वप्न आहे कीं भुताटकी आहे, कोण जाणे!"

"माझीसुद्धां तीच स्थिति झाली होती. पाहिलें नाहींस मागें मी किती अस्वस्थ झालों होतों?–या स्वप्नाला कांहीं अर्थ आहे कीं काय कांहीं समजत नाहीं?"

"अर्थ कसला आला आहे डोंबलाचा? स्वप्नांत आपण किती ते विलासी आणि बेफाम असायचं?––दिल्लीपतीचं नांव निघालेलं सुद्धां जिथं आपल्या मनाला रुचायचं नाहीं; तिथं आपण कालच्या स्वप्नांत धडधडीत असं सांगत होतां कीं, मोंगलांच्या कृपेनें हें वैभव आपणांस प्राप्त झालं आहे म्हणून! माझे आतांचें आपण आणि स्वप्नांतील आपण यांत किती फरक आहे?–जमीन अस्मानाचा!– छे बाई मी आपला एकलिंगजीला नवस केला आहे कीं, पुन: असलें स्वप्न न पडंदे म्हणून.

" कां बरं ? " जयचंदानें तिच्या मनाचा ठाव घेण्याकरितां प्रश्न केला, " स्वप्नांत सुद्धां राज्यवैभव उपभोगण्यास तूं राजी नाहींस का ? "

" मोंगलांकडून मिळालेलं वैभव भोगण्यास ?—मुळींच नाहीं. "

" आणि समज—तसं वैभव खरंच आलंच तर ? "

" मी आपल्याशीं बोलणार नाहीं. चितोड स्वतंत्र होईपर्यंत स्वप्नांत सुद्धां सुखी व विलासी असणं महत्पाप आहे ! जाऊं दे गडे ! तें स्वप्नही नको आणि त्यांतील तें मोंगलांनीं दिलेलें भ्रष्ट वैभवही नको ! "

जयचंद कांहीं बोलला नाहीं; पण मनांत तो मोठा विरमला ! आपल्या या योजनेनेंही जयश्री ह्मणजे आपल्या अधःपातास अनुकूल होईल, अशी त्यास आशा वाटेना ! नाहीं तर अबदुलखानानें व त्यानें असें धोरण बांधलें होतें कीं, साधारणपणें एक दोनदां ती राजविलासोपभोगांतून गेली कीं, तिचें मन तिकडे गुंतलें; पण जयश्रीच्या आतांच्या बोलण्यानें तें त्यांचें धूर्त धोरण यशस्वी होण्याचें चिन्ह दिसेना. शेवटीं जयचंदानें स्वतःच्याच निराश मनाचें समाधान केलें. " योजलेली सर्व युक्ति शेवटपर्यंत अंमलांत आणून पाहिली पाहिजे. त्यापूर्वींच हातपाय गाळण्यांत अर्थ नाहीं. "

या नंतर दुसरेच दिवशीं जयचंदास अबदुलखानाचें पत्र आलें. त्याचा आशय असा होता कीं, जहांगिराचा वाढदिवस जवळच आला आहे. त्यावेळीं आपल्यास व महाराणा अमरसिंगास आग्र्यास येण्याविषयीं आमंत्रण येईल. तें आपण स्वीकारलें पाहिजे व निदान आपण तरी येण्याचा मुनसबा बांधलाच पाहिजे. आपल्या येण्यानें पुष्कळच कार्यभाग होणार आहे. आपल्या घरांतील सर्व इंतजाम आपण उभयतांनीं ठरविल्याप्रमाणें लागला असेलच. तरी सकुटुंब आल्यास आम्हाला जास्त आनंद होईल. इत्यादि.

दिल्लीदरबारीं जाण्याविषयीं जयचंदाचें मन पूर्वींपासूनच आतुर होतें. त्यांत हें निकडीचें आमंत्रण प्राप्त झालें ! जमल्यास जयश्रीसह आग्र्यास जावें असेंही त्यास वाटलें. पण हें होणार कसें ? जयश्रीची अनुकूलता मिळणार कशी ? हाच मोठा प्रश्न होता.

नाहींतर त्यानें इतर संधानें किती अचूक बांधून ठेविलीं होतीं. विला

सोन्मुख महाराण्यास त्यानें विलासाचीं साधनें पुरवून पुरतें विषयासक्त करून ठेविलें होतें. दरबारांतील प्रमुख सरदार मंडळीच्याही जहागिरी वाढवून त्यांनाही प्रसन्न ठेविलें होतें. प्रतापसिंगाच्या कालांत वणवणलेली मेवाडची प्रजाही शांतीकालाचा अनुभव घेण्यांत दंग होती. मोंगलही स्वस्थ होते. अर्थात् सर्व अनुकूलता होती. फक्त घरांतले घरांत अर्धांगीच प्रतिकूल ठाकुर ईसरसिंगाचा कांटा कसाही काढतां आला; हण हृदयांत रुतलेला आणि न खुपणारा हा कांटा बोंथट कसा करावयाचा हाच काय तो प्रश्न होता.

आग्र्यास जाण्याची हिकमत कशी काय लढवावी याचा विचार करीत असतां, त्यास एक तोड सुचली ! ती अत्यंत नीचपणाची होती; हें त्याच्या विवेकशक्तीनें त्यास ताबडतोब बजावलें; परंतु तिला हाकून देऊन आपल्या मनाचें करण्यास मागें पुढें न पाहण्याइतका निगरगट्टपणा त्याच्या मनास येत चालला होता ! त्यानें ती तोड अमलांत आणण्याचें ठरविलें.

एके दिवशीं तो मोठ्या गंभीरपणें आपल्या पत्नीस म्हणाला, " श्री, आपल्या मेवाडच्या अदृष्टांत काय आहे, कांहीं कळत नाहीं ! "

कां बरें ? काय झालं ? " जयश्रीनें सचिंत होऊन प्रश्न केला.

जयचंद सुस्कारा टाकून म्हणाला, " एक मोठा बिकट प्रश्न आमच्या पुढें उभा राहिलेला आहे. चितोडच्या उद्धाराकरितां आम्ही पुन: उठाव करणारा होतों; परंतु मोंगलांची कांहींच गडबड दिसेना म्हणून सामोपचारानें काम भागल्यास पाहावें, या हेतूनें परवां आम्ही मोंगल बादशाजहांगीर यास खलिता लिहिला. त्याचा आशय असा होता कीं, पूर्वकालापासून चालत आलेला बखेडा पुढें चालू ठेवण्यापेक्षां, मोंगलांनीं सबंध मेवाड खालीं करून हें भांडण मिटवावें. "

" मग त्यांनीं हे साधें म्हणणंही कबूल नसेल केलं होय ना ? "

" तसंच कांहीं नाहीं. त्यांच्याकडून असं लिखाण आलं आहे कीं, यासंबंधींचें बोलणें पत्रोपत्रीं होणं शक्य नाहीं. तरी आपले जे कोणी मुख्य मंत्री असतील त्यांनीं आग्र्यास बादशाहाच्या भेटीला यावं, म्हणजे भानगड मिटवून टाकूं. "

जयश्री विचारांत पडली. उत्तर कांहीं प्रतिकूल नाहीं. असें तिला वाटलें. जयचंद तिच्या मुद्रेकडे पाहात राहिला.

बऱ्याच वेळानें जयश्रीनें म्हटलें, " मला वाटतें, मोंगलांच्या दरबारीं कोणाला तरी पाठविण्याचें ठरल्यास ती पाळी आपल्यावरच येणार. आपला स्वभाव पडला तापट. अपमानाचा एक शब्द आपल्याला खपायचा नाहीं तेव्हां अशा स्थितींत आपण त्यांच्या गोटांत जाण्यापेक्षां, त्यांच्या, वकिलांना आपल्याकडे बोलावणें जास्त इष्ट होईल. "

हें तिचें सरळ भाषण जयचंद्रास कसें काय भासलें असेल, याचा विचार वाचकांनींच करावा. त्यानें आपल्या मनाचा ओशाळपणा बाहेर न दाखवितां म्हटलें " तूं म्हणतेस तें मला पटलें आणि पहिला माझा विचार तसाच होता; परंतु मोंगल दरबारांतील एक खाजगी बातमी आज आली आहे, ती ऐकल्यापासून या घोंटाळ्याला काय उपाय करावा हेंच मला समजत नाहीं ! "

" ती काय बरं ? "

जयचंद निर्लज्जपणें म्हणाला, " तुला मी कशी सांगावी, याचीच मला पंचाईत पडली आहे. श्री. मोठे वाईट दिवस प्राप्त झाले आहेत. आपले ठाकुर इसरसिंग आहेत ना, ते मोंगलांना जाऊन मिळाले आहेत ! "

" म्हणजे ? म्हणजे काय म्हणतां हें आपण ? "

" बातमी अशी आली आहे खरी ! ठाकुरसाहेब महाराणाजीवर जे रागाऊन गेले ते मोंगलांकडे गेले व त्यांच्या कृपेंत शिरले ! ! बंगाल्यांत त्यांना एक मोठी जहागीर बादशहानें दिली असून, व तिकडे चैनींत आहेत. असें कळतें.

देवा ! देवा !! " जयश्री कळवळून म्हणाली, " हें काय कर्म झालं ? मुक्तीकाकांनीं जें केलं, सुभ्राजीकाकांनीं जें केलं तेंच ठाकुर साहेबांनीं केलं प्राणनाथ, हा अनिष्ट प्रकार पाहून त्या पुण्यवंताला काय बरं वाटेल ? "

जयचंद हळूच आपला हेतु पुढें ढकलीत म्हणाला, " ह्या घोटाळ्यामुळं कदाचित् आम्हयास जाणं भाग पडेल. आलेल्या बातमीची शहानिशा झाल्यावर काय करायचं तें ठरवावयाचं ? तूं तं पेंचांत सांपडलों आहोंत खरें !"

# परिच्छेद २३ वा.

—o—

## स्वप्नराज्यांतील परिचय.

आपल्या वाढत्या नीचपणाकडे जयचंदानें मुळींच दुर्लक्ष्य केलें ! ठाकुर ईसरसिंगाचे बाबतींत आपलें वर्तन किती अधमपणाचें होत चाललें आहे; हें त्याच्या ध्यानांत आलें नाहीं, असें नाहीं. पण एकदां त्यानें बेशरमपणाच्या पायरीवर जो पाय ठेविला, तो पापाच्या गर्त्तेत उडी घेण्याकरितांच ! पुढें मागें सत्य बाहेर पडलें आणि आपल्या अमानुष कर्मांची परंपरा जयश्रीच्या लक्ष्यांत आली तर केवढा अनर्थ घडण्याचा संभव आहे, इकडे त्यानें डोळेझांकच केली !

त्यानें सोंगानें अगर ढोंगानें म्हटल्याप्रमाणें मेवाडचें अदृष्ट खोटें होतें हेंच खरें ! मेवाडचा अपकर्षकाल सुरू होता.' प्रतापाच्या या अभागी देशावर भविष्यकालीं पारतंत्र्याची जी घोर काळरात्र पसरणार होती, त्याच काळरात्रीचा तो मनमोहक संधिकाल होता ! महाराणा अमरसिंगाची उत्कर्षाची वाटणारी कारकीर्द म्हणजे पुढील भयंकर गुलामगिरीची प्रस्तावना होती ! इतिहासाच्या एका सामान्य सिद्धांतानेंच ही गोष्ट सिद्ध होत होती !

देशांतील प्रत्येक व्यक्ति स्वार्थपर बनणें, जबाबदार माणसांना विलासोपभोग सुचणें, नायक म्हणविणारांत एकोपा नसणें, एकाचा उत्कर्ष दुसऱ्यास सहन न होणें, स्वबंधूचा नाश करण्यांत परक्याचें सहाय्य घेणें आणि कोणाचाही पायपोस कोणाच्याही पायांत नसतां सर्वांनीं एकोप्याचें सोंग आणून देशनिष्ठेचें ढोलकें बजावीत एकमेकास फसविणें इत्यादि प्रकार सुरू झाला म्हणजे जयश्रीसारखी सरळ हृदयीं मनुष्यें मोहवश व्हावयाचींच आणि ठाकुर ईसरसिंगासारखा तळमळणारा एखादा वृद्ध महात्मा शत्रूच्या तुरुंगांत पडावयाचाच ! हा नियम त्रिकालाबाधित आहे ! कालचीं कथापुराणें हें तत्व सांगीत आहेत. आजचा इतिहास हेंच बोलतो आणि उद्याचें भविष्य असेंच अनुभवास येणार आहे !

राष्ट्राच्या अवनतींत त्याच्या वदनियतीचें चित्र स्पष्ट दिसूं लागतेंच त्यावेळीं असत्य राज्यारूढ होतें तर सत्य कारागृहांत खितपतें ! अधर्म पूर्ण स्वातंत्र्य उपभोगतो तर धर्माला तोंड उघडण्याइतकीही मोकळीक नसते अन्याय तूपसाखर खातो तर न्यायाच्या कपाळीं मातीच बसते ! कपट बहराला येतें तर सारल्यमृत्युमुखीं पडतें ! अभागी देशाचा दुर्दैवकाल अशा वर्णांनीं रंगून शेवटीं त्यावर नाशरूपी काजळाची कुंचली फिरली जाते ! मेवाडचा संधिकाल हा असा सुरू होता. म्हणूनच महाराणा विलासी झाला. प्रधानमंत्री मोंगलाच्या कच्छपीं लागला. सारी प्रजा सुस्त झाली. आणि ठाकुर ईसरसिंग तुरुंगांत जाऊन पडला !

जयश्रीला हें कांहीं कळलें नाहीं. परिस्थितीचा कांहीं आदरमास तिला घेतां आला नाहीं ! त्यामुळें तिला ठाकुरसाहेबासंबंधीं कळलेली वार्ता ऐकून अत्यंत दुःख झालें ! ठाकुरसाहेबांच्या स्वभावाची तिला चांगली ओळख असतांही, प्रत्यक्ष पतीनेंच तिला फसविलें असल्यामुळें तिला ती वार्ता खोटी मानतां येईना !

चालू घडी निभावून नेण्याकरितां जयचंदानें आपल्या पत्नीच्या हृदयास हा नवीन दंश केला खरा; पण त्याचा परिणाम वाढूं नये, त्या वार्तेविषयीं जयश्रीनें कांहीं शंका घेऊन वेडेवांकडे प्रश्न विचारूं नयेत म्हणून त्यास नवीन योजना करणें भाग पडलें ! त्यानें तो खटला मिटविण्याकरितां जयश्रीला पुनः एकवार तिच्या स्वप्नसृष्टींत नेलें ! वास्तविक त्याचें मनांतून त्या गोष्टीची पुनरावृत्ति इतक्यांतच करावयाची नव्हती. जयश्रीच्या मनांत दारिद्र्याचें दुःख आणि वैभवाची स्पृहा ठळकपणें उठून यावी, या उद्देशानें तशी कांहीं युक्ति तो अंमलांत आणणार होता; परंतु मध्येंच या वार्तेनें घोंटाळा केला ! एक हिकमत लढवावयास गेला तों दुसरीला खो बसला ! त्याचा परिणाम कसा झाला, तें पुढें कळेल. असो.

एके दिवशीं जयश्री आपल्या शांतनिद्रेंतून जागी झाली आणि पहातें तों काय ? ती आपल्या स्वप्नसृष्टीच्या राजवैभवांत ! तेच शृंगारलेले महाल, तींच वस्त्राभूषणें, त्याच दासदासी, तेच विलास आणि तेंच वैभव !!

तिला अशी पंचाईत पडली कीं, आपण चंबेलीस राहतो तें स्वप्न कीं, या राजवैभवांत येऊन पडतों हें स्वप्न !!!

त्यावेळीं जयचंदानें आपलें वर्तन व तेथील एकंदर धोरण आपल्या चंबेलवाडीच्या आयुष्यक्रमापेक्षां इतकें भिन्न ठेवलें होतें कीं, एखाद्या चाणाक्ष मनुष्यालाही हे दोनी जयचंद एक व्यक्ति नाहीं असाच भ्रम व्हावा ! मग जयश्री भुरळली यांत नवल तें काय ?

या नव्या चमत्काराच्या भरांत जयश्रीही स्वप्नभ्रम समजून आपल्या पूर्वाश्रमीचें आयुष्य विसरून जात होती. या तिसऱ्या खेपेलाही तिचें असेंच झालें इतकेंच नव्हे तर जयचंदाला जसें तिचें मन पाहिजे होतें तसें तें थोडेंतरी झालें ! पहिल्या स्वप्नदर्शनानें ती आश्चर्यानें मूढ झाली होती. दुसऱ्या वेळीं ती साधारण मूढ, साधारण वैभवलोलुप अशी दिसली; पण या तिसऱ्या वेळीं वैभव दिसतांच तिच्या मुद्रेवर समाधानाचें हंसूं दिसलें !

मनुष्यस्वभावाचा-विशेषेंकरून कोमल स्त्रीहृदयाचा-विचार केल्यास जयश्रीच्या मनाचा हा पालट सहज प्राप्त होता ! झोंपडीच्या ठिकाणीं वाडा, गरीबीच्या ठिकाणीं राजवैभव आणि गरीब शेजाऱ्यापाजाऱ्याऐवजीं दासदासींचा भरणा एकदम प्राप्त होणें चित्ताला भ्रम पाडणारेंच होतें ! आपल्या तान्हुल्याच्या अंगावर कांहीं नसणें आणि क्षणांत त्याच्यावर बाळलेणीं पाहाणें यांत पहिल्या चित्रापेक्षां दुसरें चित्रच स्त्रीहृदयाला जास्त मोहक व जास्त हवेसें वाटणार ! श्रीरामाच्या सीतेला-राजकन्येला व राजस्नुषेला ऐन अरण्यांत कांचनमृगाचा मोह झाला त्याचें कारण मनुष्याची मुळची वैभवलालसाच होय. मग जयश्री त्या नियमास अपवाद नसल्यास चुकलें कोठें ?

जयश्रीच्या राज्यवैभवयुक्त स्वप्नसृष्टीची तिसरी पुनर्घटना सुरू झाल्यानंतर लौकरच त्या वैभवांत ती रुळूं लागली ! पहिल्यांदा दिसून आलेला तिचा संकोच यावेळीं बराच कमी झाला ! आपल्या स्वामित्वाची तिला जाणीव झाल्याचें दिसलें. आतां ती दासदासींवर सौजन्ययुक्त अधिकार गाजवूं लागली, वस्त्राभूषणांची आवडनिवड दर्शवूं लागली आणि पतीशीं नव्या वैभवास अनुसरून लडिवाळपणा करूं लागली ! हा फरक पाहून

जयचंदाचें समाधान झालें ! आज ना उद्यां जयश्री या वैभवास चटावणार आणि मग आपलें परिवर्तन तिला कळलें तरी विशेष भानगड पडायची नाहीं, असें त्यास वाटलें ! परिस्थितीच्या फेरपालटानें मनुष्याचें मन आशे-निराशेच्या टोंकांत क्षणोक्षणीं असेंच कंपन पावतें ! असो.

तें जोडपें राजवैभवांत असतांचीच गोष्ट !

प्रहर रात्र होऊन गेली होती. जयश्री आणि जयचंद यांनीं भोजनादि विधि उरकून निरापद मनानें आपल्या विलास मंदिरांत पदार्पण केलें होतें. तांबुल ग्रहण आटपल्यावर एकमेकाशीं विनोदसंवाद करीत दोघेंही चौरस ( सोंगटयांचा डाव ) खेळण्यास बसलीं. जयश्रीला त्या खेळाचा भारी शोक. आणि त्यांत ती होतीही निपूण ! हुकमी दान घेणें, कोठली सोंगटी कुठें जाईल, हें चटकन् हेरणें इत्यादि कामांत ती पटाईत होती. आणि इतर कोणत्याहि वेळीं ती कितीही पतिनिष्ठ असली तरी यावेळी ती पूर्ण कावेबाज बनून हां हां ह्मणतां जयचंदास चकवून त्यास ठकवीत होती ! तें जोडपें खेळायला बसलें कीं, बाजी आपली हटकून जयचंदाचे अंगावर ! आजच्या डावाचा रंग मात्र अगदीं प्रथमपासून निराळा दिसूं लागला. जयश्रीला अपयश येण्याचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं. आणि अशा अपयशाची कधींच संवय नसल्यामुळें जयश्री हिरमुसली होऊन थोडी थोडी चिरडीला जाऊं लागली ! स्वभावतः ती चिडखोर किंवा शिघ्रकोपी नव्हती; पण प्रकरण थोडें बिनसलें खरें ! जयचंदास हा प्रकार नवीन होता तरी त्याला तिच्या चिरडीपासून एक प्रकारचा आनंद वाटला. त्यानें तिला जास्तच चिडविलें! त्याचा परिणाम असा झाला कीं,जयश्रीनें रागाचे भरांत पट उधळून टाकला व फुसफुसत ह्मटलें, " आज आपण चिरडीला येऊन खोटं नाटं खेळायचं. मी नाहीं अशा दुष्ट न् कपटी माणसाशीं खेळत ! "

जयचंदानें हंसत ह्मटलें, " वा ! चिरडीला गेलीस तूं आणि त्याचा आरोप माझ्यावर ! वाहवा ! चिडखोर मनुष्याची ही संवयच. रागवायचं संतापायचं आपण अन् दुसऱ्याला ह्मणायचं चिडखोर ह्मणून ! मोठी गंमत आहे बुवा !

पतिपत्नीचा कलह तो ! या कलहाची स्थिति अशी असते कीं, त्यांचें आयुष्य नक्की किती असतें, हें सांगतां येणेंच कठिण आहे. एखादेवेळीं तो प्रारंभालाच समाप्त होतो, एखाद्यावेळीं थोडयाशा मनधरणीनें तो नाहींसा होतो तर एखादेवेळीं शब्दागणिक ताणत जाऊन खूप लांबतोही ! या अशा लांबलेल्या कलहाच्या वाढीचीं कारणेंही इतकीं हास्यास्पद असतात कीं मागून त्यांचें त्यांनाच हंसू यावें; पण ऐन कलहाचे वेळीं त्यांस किती महत्व येतें ? जयश्री जयचंदाच्या आजच्या कलहाला असेंच कांहीं स्वरूप येत चाललें होतें. दोघांनाही वाटत होतें यावेळीं दुसऱ्यानें पडतें घऊन आपली मनधरणी करावी !

इतक्यांत एक गोष्ट घडली. महालाच्या बाहेर पहारा देत असलेल्या दासीनें दार उघडण्याची कांहीं खूण केली !

दोघांनींही दचकून ह्मटलें, " कोण आहे ? काय पाहिजे ? "

" कांहीं महत्त्वाचें काम आलें आहे. " दासीनें दाराशीं तोंड लावून उत्तर दिलें.

जयचंदानें पुढें होऊन कडी काढिली. दाराबाहेर त्यानें दृष्टी टाकतांच चंबेलवाडीचा त्याचा एक हस्तक त्यास दिसला ! त्यास पाहतांच जयचंदाचें मन एकदम अस्वस्थ झालें ! याचवेळीं हलक्या पावलांनीं जयश्री त्याच्या पाठीशीं येऊन उभी राहिली होती. ही गोष्ट कोणाच्याच लक्ष्यांत आली नाहीं.

जयचंदानें प्रश्न केला, " कांरे मध्येंच. "

त्या सेवकानें दासीकडे पाहात दबत दबत ह्मटलें, " मोठाच चमत्कार घडला आहे. ठाकुर ईसरसिंग मेवाडांत परत आले ! "

" आँ ! " जयचंदानें आश्चर्यानें हतवीर्य होत ह्मटलें !

जयश्रीनेंही पतीच्या खांद्यावर हात ठेवीत पुढें झुकून ह्मटलें, " खरं कीं काय ? कुठं अन् केव्हां ? "

जयचंद जास्तच घाबरला ! त्यास काय बोलावें हेंच सुचेना.

सेवक पुढें ह्मणाला, " चार दिवसांपूर्वी सायंकाळचे सुमारास ते

थोरल्या महाराणाजींच्या छत्रीजवळ फिरतांना आढळले !–पण–पण आह्मी त्यांना पकडून इकडे आणिलें आहे ! ”

काय ह्मणतोस ? शाबास ! ” जयचंदानें एकदम ह्मटलें, “ ठीक केलेंत! जा त्यांस नीट बंदोवस्तांत ठेवा. सकाळीं पाहूं त्यांची व्यवस्था—”

जयश्री एकदम पुढें होऊन ह्मणाली, “ नाहीं. त्यांना आतांच्या आत्तां आमच्या समोर घेऊन या !–या ह्मातारपणांत त्यांचे हातून मेवाडशीं इतकी बेइमानी कशी झाली, हें त्यांना मला विचारायचं आहे. जा, त्यांना इथं घेऊन या ! त्यांच्या ( जयचंदाच्या ) तोंडाकडे काय पाहतोस ? मी तुझी मालकीण नव्हे का ?–जा, त्यांना तसेच्या तसे आमच्यापुढें घेऊन ये जा ! ”

जयचंदानें तिची ती लहर नाहींशीं करण्याची पराकाष्ठा केली पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. मग जयचंदालाही कांहीं विशेष बोलतां येईना· त्यामें नाखुशीनें त्या गोष्टीस रुकार दिला. तो सेवक तेथून निघून गेला.

जयश्रीचा हा हट्ट जयचंदास बिलकुल रुचला नाहीं. पण यावेळीं त्याची स्थिति इतकी नाजूक होती, कीं, जास्त ओढाताण केल्यास आपलें सर्वच रहस्य बाहेर पडण्याचा संभव आहे, असें त्यास वाटलें. त्यापेक्षां जयश्रीच्या कलानेंच वागून पुढची वेळ निभावून न्यावी, असें त्यानें ठरविलें.

थोड्याच वेळांत त्याचा अपेक्षित कैदी त्यांच्यापुढें आणून उभा करण्यांत आला; पण वास्तविक तो ईसरसिंग नसून त्याच्याच प्रमाणें भासणारा फर्जंदबेग ( गुले हसीनचा पिता ) होता !

बाकी फर्जंदबेगास पाहतांच त्यास ठाकुर इसरसिंग समजून जयचंद प्रथम तर चपापलाच. जयश्रीनेंही आपला पदर सांवरीत आश्चर्य चकित दृष्टीनें त्याचेकडे पाहिलें.

पुढें त्या दोघांस फार वेळ संदेहांत राहावें लागलें नाहीं. फर्जंदबेगानें थोडक्यांत आपलें व्रत सांगितलें व म्हटलें, “ सरदार साहेब, जरी मी मुसलमान आहे तरी मेवाडचा मित्र आहे ! अलीकडे मी सूफीमत अनुसरलें असून फकिरीवृत्तीनें मेवाडांत राहूनच कालक्रमणा करावी, अशा

हेतूनें इकडे आलों आहे! महाराणा प्रतापसिंग यांचे विषयीं मला अत्यंत पूज्य बुद्धि असल्यामुळें त्यांच्या समाधीच्या आसपास कोठें तरी राहावें, या हेतूनें मी फिरत असतां तुमच्या लोकांनीं मला गिरफदार केलें! मी फकीर असल्यामुळें मला कसलीच भीति अगर काळजी नाहीं म्हणून मी तुमच्या लोकांबरोबर आलों. आतां यापुढें तुमची इच्छा असेल तर मी मेवाडांत राहतों. तुमची तशी इच्छा नसेल, आणि माझें मेवाडांत राहाणें त्याच्या हिताच्या आड येत असेल तर मी मुकाटयानें दुसरीकडे जातों! येथे राहण्याविषयीं माझा मुळींच हट्ट नाहीं. महाराणा प्रतापाच्या या पुण्य-भूमीनें सदैव स्वतंत्र राहून निरापद असावें अशीच माझी इच्छा आहे!"

त्याचें हें बोलणें अगदीं सरळ व मनापासून होतें. जयश्रीनें तें श्रवण करितांच तिला त्याच्याविषयीं एक प्रकारचा विशेष आदर वाटूं लागला. जयचंदाला मात्र तसें वाटेना! ज्यास आपल्या लोकांनीं ठाकुर इसरसिंग म्हणून आणिलें, तो मनुष्य अगदी भिन्न आहे, अशी त्याची खात्री झाला तरी, फर्जंदबेगाचें अस्तित्व मेवाडांत असणें अधिक होईल, असेंच त्याच्या मनानें घेतलें. पण जयश्रीच्या आग्रहावरून त्यानें त्यास मुकाटयानें मुक्त केलें. मात्र त्यानें त्यास 'तुम्ही नेहमीं आमच्या नजरेखालीं राहिलें पाहिजे. तुम्हालाही कसलाही त्रास होणार नाहीं, याबद्दल मी व्यवस्था करितों; पण राजकारणार्थ तुमच्यावर आमची नजर असणें इष्ट आहे! राग मानुं नका असें बजावलें.

फर्जंदबेगानें तें मान्य केलें व दुसरेच दिवशीं त्यास बहिरामगडाहून मेवाडांत जाण्याची परवानगी देण्यांत आली.

---

## परिच्छेद २४ वा.

### भुताटकी!

ठाकुर इसरसिंग पुनः मेवाडांत हें वृत्त ऐकतांच जयचंदाचें मनांत भीतीचा जो लोळ उठला होता, तो जरी खरा प्रकार कळल्यानंतर नाहींसा झाला. तरी झाली गोष्ट बरी झाली नाहीं, असेंच त्याच्या मनाला

वाटलें. ज्या सत्य सृष्टीस जयश्री स्वप्नसृष्टि समजत होती, त्या सृष्टींत तरी फर्जंदबेगाचें आगमन नको होतें, अशी त्याच्या मनाला सारखी चूटपूट लागली ! आणि यापुढें जयश्रीच्या मनाभोंवतीं टाकलेलें रहस्य आवरतें घ्यावें कीं कसें ? याची त्यास चिंता पडली !

जयश्रीस स्वमतास अनुकूल करून घेण्याप्रीत्यर्थ त्यानें जो व्यूह रचला होता, त्याची वाढ व पूर्ति मंदगतीनें घडवून आपला हेतू साधावयाचा असा त्याचा मुळापासूनचा बेत. त्याप्रमाणेंच सर्व कांहीं सुरळीत चालले होतें; परंतु मध्येंच फर्जंदबेगाची भानगड होऊन चुकली ! तेव्हां त्यास विचार पडला कीं पुढें काय करावें ? फर्जंदबेगास त्यानें नजर कैदेंत राह्ण्याचें बजावलें, त्याचा हेतु एवढाच जयश्रीच्या नजरेस तो पुन: पडू नये. पण एवढ्या बंदोबस्तानें आपला चालू कार्यभाग शेवटास जाईल, अशी त्यास खात्री वाटेना ! ठाकुर ईसरसिंगाच्या रूपाशीं सादृश्य असणारा फर्जंदबेग नकळत आपला प्रमुख विचारास अपशकुन करणार असें त्यास सारखें वाटूं लागलें ! त्यापेक्षां आपली माया शक्य तितक्या लौकर आवरून जयश्रीच्या मनावरच अपेक्षित विजय मिळवावा, असें त्यास वाटूं लागलें.

विमनस्क स्थितींत त्यानें दोनचार दिवस घालविले. विचारांतीं त्यास आपलें रहस्य शक्य तितक्या लौकर आणि आपल्याकडूनच जयश्रीला कळणें इष्ट आहे; असें नक्की वाटलें. नाहीं तर यावेळीं त्यानें तिला बहिरामगडीं आणिलें होतें तें तिच्यासह बरेच दिवस विलासोपभोगांत काढावे या हेतूनें; पण आतां तो विचार त्यानें रहित केला.

एके दिवशीं जयश्री एका सत्य सृष्टींतून दुसऱ्या सत्यसृष्टींत–तिच्या दृष्टीनें स्वप्नसृष्टींतून जाग्रतावस्थेत-स्थलांतरित झाली !–जयश्रीनें नेत्र उघडून पाहिलें, ती चंबेलवाडीचीच ठाकुराणी होती !

शिरस्त्याप्रमाणें त्या जोडप्याचें जयश्रीस पडणाऱ्या स्वप्नाबद्दल मोठें रसभरीत भाषण झालें ! यावेळीं तिच्या बोलण्यांत स्वप्नगत वैभव नाहींसें झाल्याबद्दल किंचित् विषाद दिसला ! जयचंदास हेंच पाहिजे होतें मात्र यावेळीं आपण पाहतों–अनुभवतों–तें स्वप्नच असेल का ? इतकें खरें खुरे

वाटणारें स्वप्न कसें असेल, अशी तिला शंका येत असल्याचें जयचंदास उमगून आलें. त्यावेळीं तो फक्त हंसला व आपल्या विनोदी वचनानें त्यानें तिचेंही समाधान केलें; पण मनांत मात्र त्यास पक्कें कळून चुकलें कीं, आतां तें रहस्य फार वेळ टिकणें शक्य नाहीं ! आपली माया आवरती घ्यावी हेंच बरें ।

त्याच दिवशींच्या रात्रींची गोष्ट ! जयचंद महाराण्यास भेटण्याकरितां उदेपुरीं गेला होता. जयश्री आपलें कामधाम आवरून लौकरच शय्यागत झाली; पण तिला झोंप येईना. आपल्या स्वप्नसृष्टीचें तिला स्मरण झालें ! विचारानें विचार वाढून तिचें मन मोठें अस्वस्थ झालें. मध्यरात्रींचा प्रसंग आला तरी झोपेचें नांव नाहीं. ती बिछान्यावरून उठून इकडे तिकडे फिरूं लागली; तोंच झोंपडी बाहेर तिला मोठा जाळ झालेला पाहिला ! एका उघडया खिडकीतून चांगला प्रकाश आंत आला व पुनः नाहींसा झाला !

" अगबाई !—पुनः भुताटकी ! ! " जयश्री जागच्याजागीं खिळून चित्कारली ! प्रथम तर भीतीनें तिला ग्रासलें !

वाचकांना स्मरत असेल, असा चमत्कार कांहीं काळापूर्वी त्याचस्थानीं घडला होता. मध्यंतरी जयश्रीला भासवली जाणारी स्वप्नलीला सुरू असतां ही भुताटकी बंद होती, म्हणून म्हणा अथवा जयश्रीच्या ती नजरेस पडली नाहीं म्हणून समजा, तिला त्या गोष्टीचें विस्मरण पडलें होतें खरें ! आज पुनः तिची ती स्मृति जाग्रत झाली. कांहीं वेळानें तिच्या मनाला धीर आला आणि ती कांहीं विचार करीत, हातांत भाला घेऊन आपल्या कुटिकेबाहेर आली ! सुमारें पंधरा हातावर जाळाची भपक उठली ! त्याबरोबर जयश्रीनें ' जय एक लिंगजी ! ' म्हणून भाल्याची फेंक केली ! जाळ तर नाहींसा झाला होता; पण क्षणार्धानंतरच तिच्या पाठिमागें कोणीतरी ' जयश्री–जयश्री ! ' असें अत्यंत केविलवाणें म्हणत विवळल्याचें तिला ऐकूं आलें !–तिला तसा भास झाला !

जयश्रीनें चटकन् मागें मुरडून अंधारांत डोळे फाडून पाहिलें !—तोंच मागून जाळाचा प्रकाश आला ! जयश्री भांबावली ! भ्याली ! थिजली !

पुनः जिकडे तिकडे दाट अंधकार !!–जयश्री ! जयश्री !! म्हणून कोणीतरी कण्हत होतेंच ! तो स्वर कानांत शिरतांच जयश्रीच्या हृदयाचा असा थरकांप होत होता ! तो आवाज ओळखीचा वाटे; पण अत्यंत केविलवाणा !, अत्यंत अमानुष ! अत्यंत भयभद !!! अत्यंत गार–गार पाण्यांत आपण वाहतं आहोंत असा तिला भास झाला ! पुढें काय झालें हें तिला कळलें नाहीं ! ती जागृत झाली त्यावेळीं ती आपल्या बिछान्यावर निजली होती ! दिवसाचा प्रकाश जिकडे तिकडे पडला होता, आणि चंबेली जागी होऊन रडत होती ! तिला त्या गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटलें ! रात्रीचा घडलेला प्रकार खरा कीं स्वप्नांतील याचा तिला उलगडा होईना ! आपण बेशुद्ध झाल्याचें तिला स्मरलें; पण आपण आंत कशा आलों, हें कांहीं तिच्या लक्ष्यांत येईना ! खरा प्रकार असा कीं, ती चेतना रहितमनानें आपण होऊनच आंत येऊन बिछान्यावर पडली होती आणि पूर्ण बेशुद्ध झाली होती !

दुसरे दिवशीं जयचंद भोजनाचे वेळीं घरीं आला. जयश्री त्याची मार्गप्रतिक्षा करीत बसलीच होती. भोजनोत्तर स्वस्थपणें रात्रीच्या गोष्टीचा खुलासा करावा, असा तिचा विचार होता; पण तिनें आपल्या पतीच्या मुखाकडे पाहिलें तर तें तिला फार उदास आणि विचारी दिसलें. त्याबरोबर तिनें त्याचें कारण त्यास विचारिलें.

जयचंदानें भोजनास बसल्या बसल्या म्हटलें, " श्री, तुला काय सांगावें आणि कसें सांगावें याचाच मी विचार करितों आहे. आपलें एखादें भाग्य उदयाला येणार आहे कीं, एखादें मोठें संकट आपल्यावर कोसळणार आहे, कांहीं सांगवत नाहीं. "

जयश्रीचें भय, चिंता, उत्सुकता इत्यादि सर्व विकार एकावेळीं जागृत झाले. त्यांचे समाधानार्थ जयचंदानें खुलासा तो केला असा तो म्हणाला, " काल उदेपुरीं मी निजलों असतां, रात्रीं एकाएकीं मला कोणी तरी हालवून जागें केल्याचा भास झाला ! मी जागा झालों. अगदीं दचकून जागा झालों ! अंधारांत मला कोणी दिसलें नाहीं; पण कोणीतरी अत्यंत त्रासून चांडाळा ! मी पिशाच योनींत खितपत असतां, तुम्हा दोघांही नवरा बायकोला चैन सुचतें अं ! " असें माझ्या कानांत बोलल्याचा मला भास

झाला ! मी चटकन् उठून बसलों. अंधेरांत डोळे फाडून पाहिलें, कोणी नाहीं. मी दरडावून कोण आहे ? म्हणून म्हटलेंही; पण कांहीं नाहीं जिकडे तिकडे सामसूम ! मला आश्चर्य वाटलें ! थोडी भीतीही वाटली ! कांहीं वेळानें मी देवाचें नांव घेऊन निजणार तों पुनः माझ्या खवाटयाला कोणी तरी धरून हालविलें आणि कर्कश स्वरांत म्हटलें, नीज ! नीज !! नरकांत पिचतों न् तूं नीज अं ! तूं माझा जांवई !—पण तुला कशाला मी बोल लावूं ? माझ्या कारटीनें कुठं माझी वास्तपुस्त घेतली ? उलट तिनें मला भालाच फेंकून मारिला ! जयचंद, जयश्रीनें मला भाला फेंकून मारिला !--जयचंद, मला या योनीचा फार त्रास होतो आहे रे चांडाळा !"

" अगबाई !--बाबा का होते तें ! देवा ! देवा !! "

" मला मूर्ति कांहीं दिसली नाहीं. बोलणें ऐकूं आलें तें असें. त्यामुळें पुढें मला रात्रभर कांहीं झोंप आली नाहीं."

यावर जयश्रीनें रात्रीचा घडलेला प्रकार सांगितला व म्हटलें, " मी असा भाला अविचारानें मारला खरा ! सकाळीं मला तो आपल्या त्या भानसिंगानें आणून दाखवितें. " असें म्हणून तिनें तो भाला आणून त्याचें रक्तयुक्त फळ त्यास दाखविलें.

पुढें दिवसभर दोघांनींही त्यास विषयाची भवति न भवति केली ! त्याच रात्रीं दोघें पतिपत्नी आपलीं चमत्कारिक स्वप्नें आणि होणारी भुताटकी याचीं चर्चा करित बसली असतां,अढयावरून कोणी तरी बोलल्याचा त्यांना भास झाला ! त्याचा आशय ' तुमचें कल्याण व्हावें अशी तुमची इच्छा असेल तर तुम्ही दोघें मिळून परवांचे दिवशीं अमावस्या आहे. रात्रीं बाराचे सुमारास अमक्या एका वडाचे झाडाखालीं या, असा होता !

पत्थरलेल्या दृष्टीनें एकमेकाकडे पहात दोघांनींही हा संदेश ऐकला होता ! आपल्या पित्यास पिशाचयोनी प्राप्त झाली आहे, या गोष्टीची कोणी साक्ष न देतांही जयश्रीला ती पूर्ण पटली !

आपल्या पित्याला योनी प्राप्त झाली आहे, ही गोष्ट ऐकतांच कोणत्या अपत्यास बरें वाटेल ? जयश्रीला तर त्या गोष्टीची साक्ष पटली होती.

जयचंदानें गंभीरपणें म्हटलें, " श्री, तुझ्या पित्याचा उद्धार आपण केलाच पाहिजे. त्यांची काय इच्छा राहून गेली आहे, कोण जाणे ?

" कांहीं ही असो. आपण ती पूर्ण करण्याची पराकाष्ठा केली पाहिजे. जयश्रीनें निश्चयानें उत्तर दिलें.

" मग त्यांची इच्छा —" जयचंदानें शंका घेतली, " आपल्या मतां-विरुद्ध असो अगर नसो ?

" त्यांची काय इच्छा असेल बरं ?

" तें काय सांगतां येणार ? अमावस्येदिवशीं काय उलगडा होईल तो खरा." जयचंदानें तिचें समाधान केलें.

शेवटीं अमावस्येची रात्र उपस्थित झाली ! चंबेलीला एका वृद्ध बाईच्या स्वाधीन करून जयश्री आपल्या पतीसह मध्यान्हीचे सुमारास आपल्या गढीबाहेर पडली !

अमावस्येची रात्र फार भयंकर असते असें म्हणतात; पण खरें पाहिलें तर त्या दिवशीं तारामंडळाची खरी शोभा उमटून येतें आणि ऐन अंधेरां-तही मनुष्याला चक्क दिसतें ! जनरूढीमुळें व अनेक बऱ्या वाईट सम-जुतीच्या भेसळ संस्कारानें त्या रात्रीं मनाला सर्वत्र भीतीचें चित्र दिसूं लागतें ! वास्तविक पौर्णिमा आपल्या एका विशिष्ट शोभेनें जशी मनाला मोहणारी आहे, त्याचप्रमाणें अमावस्याही आपल्या गंभीर शोभेनें मनाला थक्क करण्यास समर्थ आहे ! जयश्री जयचंदाच्या मनाची स्थिति मात्र ती शोभा पाहण्यासारखी नव्हती. दोघेंहीं निडर स्वभावाचीं असल्यामुळें आणि संकटांत उडी घ्यावयाचीच असा त्यांचा निश्चय असल्यामुळें, त्यांच्या मनांत आज भीतीचा लवलेश नव्हता ! दोघेंही सशस्त्र असल्यामुळें अवां-तर कांहीं संकट आल्यास त्याचीही त्यांस धास्ती नव्हती; तरी पण त्यांचीं मनें मात्र मोठी खिन्न होती ! आपणांस आतां काय प्रकार दिसेल आणि काय शब्द ऐकावें लागतील कोण जाणे ! या संदेहानें दोघांच्याही हृदयास विलक्षण व्याकुलता आली होती ! आज त्यांना आपल्या इतर सर्व आयु-ष्याचा पूर्ण विसर पडला होता !

घटकेतच तें आपल्या अपेक्षित स्थानीं येऊन पोंचलें ! तें वडाचें झाड उंचच उंच होतें. त्याला पारंब्या होत्या थोड्या, पण गोसाव्याच्या जटे-

प्रमाणें वरपासून खालपर्यंत सडक सुटल्या होत्या ! आजूबाजूला सपाट जागा पसरली होती !

भयचकित नेत्रांनीं इकडे तिकडे पाहत जयश्री पतीला बिलगून उभी असतांच झाडाच्या एका टोंकाशीं–एका पारंबीच्या मूळस्थानीं–एक ज्वाला झळकली !

" अग बाई ! तो पाहयचा काय चमत्कार ? " जयश्रीनें पतीच्या कानांत म्हटलें ! दोघंही अनिमिष नेत्रांनीं तिकडे पाहात राहिलीं !

खाली डोकें लोंबत आहे असें कांहीं तरी पारंबीला लागून खालीं खालीं येऊं लागलें ! याच वेळीं चोंहीकडून कांहीं चमत्कारिक आवाज ऐकूं येऊं लागले ! दोघांच्या दृष्टी आजूबाजूला वळल्या !–कांहीं नव्हतें ! वर तारांकित आकाश, खालीं चोंहीकडे आंधार, त्यांतच भुताप्रमाणें भासणारी कांहीं झुडपें आणि दीर्घकाळ राक्षसाप्रमाणें वाटणारा तो वटवृक्ष ! ! !

जयश्रीच्या मनावर हळू हळू भीतीचा प्रादुर्भाव होऊं लागला ! ती आपल्या पतीला जास्तच बिलगली आणि थिजलेल्या डोळ्यांनीं पारंबीवरून खालीं येणाऱ्या व्यक्तीकडे पाहूं लागली ! त्या व्यक्तीचें लोंबतें डोकें जमिनीपर्यंत आलें. खालपासून वरपर्यंत एक धवधवीत रंगाचा भेसूर पट्टा दिसत होता !- मध्येच भक्कन जाळ झाला ! त्या वेळीं त्या उलट्या टांगलेल्या व्यक्तीचें मुख पाहतांच जयश्रीनें किंचाळी फोडून आपले नेत्र मिटून घेतले !

तें मुख म्हणजे निव्वळ हाडांचा सांपळा ! डोळ्याचे खांचांतून इंगल जळत होते ! दातांचा जबडा एकमेकांवर रगडला जात होता !

नेत्र मिटल्यावरही जयश्रीला तो भेसूर देखावा दिसत होता. जयचंदानें तिला सांवरून धीर दिला. याच वेळीं तें पिशाच तिला उद्देशून म्हणालें, " जयश्री, जयश्री तू मला मारलास ?–तू माझी मुलगी अं ?–जयश्री तू मला भाला मारणास ?–तू माझी मुलगी अं ?" बोलतां बोलतां तें विवळू लागलें ! मोठें भेसूर विवळणें ! कुत्र्यांच्या कर्णकटू रूदनाप्रमाणें तें होतें कीं, मार्जाराच्या कामोत्सुक क्रंदनाप्रमाणें तें होतें, जयश्रीला कांहीं सांगतां आलें नसतें !

" बस्स् बस्स करा !" असें जयचंदानें ओरडन म्हटल्याचा तिला भास झाला व ती त्याच्या बाहूंत बेशुद्ध झाली !

# परिच्छेद २५ वा.

## पिशाचानें काय सांगितलें ?

पिशाच दर्शनामुळें जयश्रीच्या प्रकृतीवर परिणाम झाला व ती आजारी पडली ! पूर्ण शुद्धीवर येण्यास तीला दोन तीन दिवस लागले. पण शुद्धीवर आल्यावर तिचा आपल्या पतीस पहिला प्रश्न हा होता, " पुढें काय झालें ? आणि त्यांनीं ( पिशाचानें )कांहीं सांगितलें कीं कसें ? "

" तूं पुरती बरी हो. मग आपण बोलूं त्याविषयीं. " असें जयचंदानें तिला परोपरीनें सांगितलें; पण तिनें आपला हट्ट सोडिला नाहीं. ती म्हणाली " पिशाचयोनींतून बाबांचा उद्धार झाल्याखेरीज मला आतां स्वस्थ बसवणार नाहीं. तर त्या रात्रीं मी बेशुद्ध झाल्यानंतर पुढें काय काय झालें ? तें तुमच्याशीं कांहीं बोललें का ? तें मला सांगा म्हणजे मी त्याप्रमाणें करीन. मग तें काम कितीही अवघड असो. "

जयचंदानें शांतपणें म्हटलें, " तुझे वडील माझ्याशीं पुष्कळ बोलले; पण तें तुला पटण्यासारखें नाहीं. तूं स्वतः एकवार धाडस करून त्यांचें बोलणें ऐकून घेण्यास तयार झालें पाहिजे. तुझी तयारी असल्यास ते अगदीं सौम्य स्वरूप धारण करून या आपल्या झोंपडींतच येतील. सध्यां ते पिशाच देह धरून आपल्या या गढींतच वावरत आहेत. आपण मनानें त्यांचें चिंतन केल्यास ते आज रात्रीं सुद्धां येतील. ते येण्यापूर्वी वाटल्यास तूं डोळे बांधून बैस. "

जयश्रीला त्यांचें हें बोलणें पटलें ! तिची प्रकृति बरोबर नसतांही तिनें त्याच रात्रीं आपल्या पिशाचपित्याची भेट घेण्याचा निश्चय केला. मध्यान्हींच्या सुमारास एकाग्र मनानें त्याचें चिंतन करून त्यास आव्हान करण्याचें ठरलें !

रात्र पडली! मध्यरात्रींचा सुमार झाला. जयश्री डोळे बांधून बसली! जयचंदानें रसरसलेल्या आंगारांवर धूप घालून पिशाचास आव्हान केलें! कांहीं वेळानें कोणीतरी आंत आल्याचा जयश्रीस भास झाला!

जयचंदानें तिच्या कानांत तें आल्याचें वर्तमान सांगितलें.

अल्पवेळानें गंभीरस्वरानें पिशाच बोलत असल्याचें जयश्रीस ऐकूं येऊं लागलें.

" जयश्री! माझें हिडीस स्वरूप पाहून तुला भीति वाटते, हें पाहून मला फार खेद होतो! बाळे, यांतून माझा उद्धार कर! मला आतां याच योनीची अगदीं किळस आली आहे! श्री, तेव्हांपासून माझा आत्मा कसा तडफडतो आहे, हें मी तुला काय सांगूं?–बाळे, मी आतां काय सांगतों तें लक्ष्यपूर्वक ऐक आणि त्यावर विश्वास ठेव. श्री, तूं माझी कन्या आहेस! तूं रजपुताणी आहेस! वीराची पत्नी आहेस. आपल्या पित्याशीं झालेल्या अन्यायाचा सूड घेणें तुझें कर्तव्य आहे. आणि तें तूं वाटेल तो मार्ग पत्करून बजावलें पाहिजे! जयश्री, मेलेल्या प्रतापसिंगाविषयीं तुला मोठी आदरबुद्धि आहे; पण त्याच्या इतका नीच, स्वार्थबुद्धीचा कपटी, ढोंगी, विश्वासघातकी कोणी नसेल. स्वाभिमानाचें सोंग आणून देशनिष्ठेचा तोरा मिरवून त्यानें सगळ्या जगाला फसविलें आहे! बाळे, तूं लहान होतीस, तुला ही राजनीति कळली नाहीं. त्यामुळें तो पाजी प्रताप तुला देवाचा अवतार वाटतो; परंतु अंतःकरणानें तो पिशाच्च होता. हें मी अनुभवानें सांगतों! त्यानें प्रत्यक्ष भावांचा विश्वासघात केला म्हणूनच सुक्ताजी अकबरशहाला जाऊन मिळाला! सुग्राजीशींही त्यानें अशीच निमकहरामी केली म्हणून तोही बिचारा कंटाळून दिल्लीला गेला! तुझ्या सख्ख्या सासऱ्याशींही त्यानें अशीच दगलबाजी केली! वास्तविक मेवाडच्या गादीवर श्री, तुझ्या नवऱ्याचा हक्क आहे आणि प्रतापाच्या मागें तरी तो शाबीत व्हावा, जयचंद गादीवर बसून माझी बाळी मेवाडची राणी व्हावी, या हेतूनें मी खटपट चालविली होती. आपल्या मुलीच्या कल्याणाकरितां झटणें माझें कर्तव्य असतां त्या नीचानें माझे बेत ओळखून माझा खून केला! जयश्री,

नीट ऐक ! प्रतापसिंगानें कपटानें व आकस धरून माझा खून केला आहे आणि त्याचा सूड तूं घेतला पाहिजेस ! मेवाडचें राज्य तुमचें आहे, तें परत मिळवा, प्रतापाचा निर्वंश करा. तरच माझा आत्मा शांत होईल आणि मला मुक्ति मिळेल ! ”

पिशाच थोडा वेळ थांबलें व पुन: बोलूं लागलें; पण त्याच्या येवढ्याशा बोलण्यानेंच जयश्रीच्या मनाची कांहीं चमत्कारिक स्थिति होऊन गेली ! तिच्या मनाचा हा फरक जाणूनच कीं, काय कोण जाणे, तें पिशाच म्हणालें, “ माझें बोलणें तुला खोटें वाटत असेल, तर तुला धिःकार असो ! प्रत्यक्ष पित्याच्या बोलण्यावर तुझा विश्वास नसेल, तर तुझें अकल्याण होवो ! जयश्री ! मी सांगतों त्याप्रमाणें तूं वागली नाहींस तर मी तुला शाप देईन ! तुमचा निर्वंश करीन ! एक वर्षाच्या आंत मी सांगतों त्याप्रमाणें तुह्मी दोघा नवराबायकोनीं वागलें पाहिजे. मी सांगतो त्या मार्गानें मुकाट्यानें गेलें पाहिजे ! मोंगलांचें सहाय्य तुह्मी घेतलें पाहिजे. मोंगल दरबारांतील प्रमुख सरदार अबदुलखान याच्या मनाला जयचंदाविषयीं श्रम पाडून त्या दोघांची मैत्री मीच घडवून आणिली. त्याच्या करवीं मी तुह्माला भरपूर सहाय्य करवीन ! सध्यांचा तख्तनशीन बादशाहा जहांगीर मोठ्या उमद्या मनाचा आहे. तो तुझ्या पतीला मनापासून मदत करील ! तुला किंवा तुझ्या नवऱ्याला जीं राजवैभवाचीं स्वप्नें पडलीं तीं माझ्याच प्रेरणेनें ! तें वैभव तुमच्या दोघांकरितां वाढून ठेविलेलें आहे ! तुह्मी मोंगलांना जाऊन मिळा; आपलें हक्काचें राज्य मिळविण्याकरितां त्यांचें सहाय्य मागा ! तुह्माला तसें सहाय्य मिळण्याबद्दल मी त्यांना प्रेरणा करीन ! यांत पाप कांहीं नाहीं. एवढा मोठा मेवाडनिष्ठ ठाकुर ईसरसिंग तो सुद्धां मोंगलांना जाऊन मिळाला; मग तुह्मांलाच ही मूर्ख निष्ठा पाहिजे कशाला ? तेव्हां मी पुन्हा: पुन: तुह्माला सांगतों, माझें ऐका. प्रतापानें केलेला दुष्टपणा दृष्टीआड करूं नका. माझ्याशीं झालेल्या अन्यायाचा आणि तुमच्याशीं होत असलेल्या बदमाषीचा सूड ध्या ! तरच माझी पिशाच योनींतून मुक्तता होईल ! माझा आशीर्वाद तुमचें रक्षण करील आणि तुमचें यश वाढवील !—

एक वर्षाचें आंत हें घडून आलें नाहीं तर जयश्री, मी तुला क्षमा करणार नाहीं ! ध्यानांत ठेव ! ध्यानांत ठेव ! ! ध्यानांत ठेव ! ! ! ''

जिकडे तिकडे शांत झालें ! कोणी तरी हलक्या पावलांनीं खोलीच्या बाहेर गेल्याचा जयश्रीस भास झाला ! थोड्या वेळानें जयचंदानें तिचें नेत्र बंधन सोडलें ! त्यानें पाहिलें, भीतीनें तिचें मुख पांढरें फटफटीत झालें होतें ! पिशाचाच्या सांगण्याचा तिच्या मनावर विलक्षण परिणाम झाला होता !

या नंतर किती दिवसांनीं तरी तिला सरळ विचार करण्याची शक्ति प्राप्त झाली ! तोंपर्यंत ती अर्धवट आजारी अर्धवट भ्रमिष्ट स्थितींतच होती. हा परिणाम जयचंदास इष्ट वाटला नाहीं. तिची अशी स्थिति व्हावी, अशी त्याची इच्छा नव्हती. आपण पूर्ण विचार करून ही पिशाच वृत्तीची पिशाच माया योजावयास पाहिजे होती. असा त्यास पश्चात्ताप झाला. पण आतां त्याचा काय उपयोग ? धनुष्यावरचा बाण सुटून गेला ! तोंडचा शब्द बाहेर पडला ! चलती घडी भूतकाळांत समाविष्ट झाली ! कधींही परत न फिरणारी गोष्ट घडून चुकली ! कांहीं केलें तरीं जयश्रीच्या नाजूक हृदयावर मारलेला घण आतां परत येणें शक्य नव्हतें ! हां, एक उपाय होता. जयश्रीजवळ आपलें सर्व पाप कबूल करण्या इतकें मनोधैर्य जयचंदास पाहिजे होतें. अगदीं मोकळ्या मनानें आपली सर्व माया त्या नारीला उलगडून सांगण्याचें आत्मसामर्थ्य त्याच्यामध्यें पाहिजे होतें. पण हें कसें होणार ? मनुष्याच्या मनाची तशी रचना देवानें केली आहे कुठें ? पाप्याला काय आपल्या पापाची खंत वाटत नाहीं ? अगदीं वरचेवर वाटते ! पण आपलेंच खोटें स्वरूप उघडें करून सांगण्याचें त्यास मनोधैर्य नसतें, म्हणून तो आपल्याच कृतीनें निर्माण झालेल्या नरकांत पिचत राहातो ! जयचंद या नियमाला अपवाद नव्हता ! आपल्या कुटुंबसौख्याचा नाश झाला, आपल्या प्रेमळ पत्नीच्या चित्तशांतीला आपण आग लाविली, आतां पुढें काय प्रसंग ओढवेल, कोणास माहीत ? हें त्यास कळत असतांही आपलें पाप उघड करून सांगण्याचें त्यास मनोधैर्य झालें नाहीं. मागें एकेकाळीं—जयश्रीवर कपटविद्येचा प्रयोग करण्याचे अगोदर—त्यास आजचें भेसूर भविष्य भयंकर भासचित्राचें दिसलें होतें; पण त्या वेळीं त्यास तो पापमोह आवरला नाहीं; अर्थात् त्याचें कडु फळ आतां भोगणें त्यास अपरिहार्य होतें ! त्याच्या पापाचें पारितोषिक असेंच होतें !

# परिच्छेद २६ वा.

---

## आग्र्यास जाण्याचें ठरलें !

कुनीतीच्या डावपेंचाशीं अगदींच अपरिचित असलेलें जयश्रीचें सरळ हृदय पतींच्या पिशाचीमायेंत सांपडून, आगींत कोंडलेल्या विहंगाप्रमाणें होरपळून गेलें. अगदीं लोळागोळा बनलें ! त्याच्या स्वतंत्र भरान्या एकदम थांबल्या ! आनंदोच्छ्वासांत सहजीं सुटणाऱ्या गानलकेरी जागच्याजागीं नाहींशा झाल्या ! त्याची सहज सुंदरता अगदीं बेडोल झाली ! दुःखाधिक्यामुळें त्यास कसलेंही भान राहिलें नाहीं, आणि छिन्नभिन्नतेमुळें तें सर्वस्वीं हीनदीन व पंगू झालें !

चमत्कारिक संकटप्रसंगीं कोणत्याही नारीहृदयाची अशीच स्थिति होते ! कांचनमृगवधाचे वेळीं सीतादेवीवर असाच प्रसंग आला ! लक्ष्मणाला गैरसमजानें वाक्ताडन करून आपल्यापासून दूर केल्यानंतर, ज्यावेळीं मायावी रावणाच्या तडाक्यांत ती सांपडली, त्यावेळीं तिची स्थिति जयश्रीच्या आतांच्या स्थितीप्रमाणें झाली असली पाहिजे ! द्रौपदीची तीच गोष्ट ! भर राजसभेंत पतींसमोर दुःशासनानें वस्त्रास हात घातल्यावर त्या माऊलीची काय स्थिति झाली असेल, याची कल्पना कोणाला करितां येईल ! नळानें त्यागिलेली दमयंती, दुष्यंतानें परिहास करून दूर केलेली शकुंतला, सत्व परीक्षेच्या कठोरतेंत सांपडून रोहिदासाचा मृत्यु पाहणारी तारामती, अतिथीसत्कारार्थ अपत्याचें कांडण कांडणारी चांगुणा,–अहाहा ! आणखी किती जणींचीं नांवें म्हणून सांगावीं ?–सर्वांची स्थिति आमच्या जयश्रीप्रमाणें होती ! त्या त्या प्रसंगीं प्रत्येकीचें हृदय असेंच जळून गेलें ! सीता स्वतःच्या मूर्खपणाला बळी पडली ! द्रौपदी पतींच्या द्यूतकर्मामुळें होरपळून निघाली ! दमयंतीला भाग्यचक्रानें गोता दिला ! शकुंतलेला ऋषिशाप भोंवला ! तारामती विश्वामित्राच्या क्रोधांत सांपडली आणि

चांगुणा पुण्यकर्मात दिव्य पावली ! प्रत्येकीचा प्रसंग भिन्न ! पण सर्वांच्या मनःस्थितीचा पर्याय एकच ! जयश्रीचा प्रसंग मात्र अपूर्व होता ! ज्यांत कोणाचेंच कल्याण, प्रारंभीं अगर शेवटीं नव्हतें; अशा एका नीच पतिकृतीला ती अचानक बळी पडली होती ! बिचारी पतिव्रता !

सर्वतोपरी सुखांत असतांही जयश्रीच्या कपाळी रोदन आलें ! आतां-पर्यंतच्या आयुष्यांत सतत हास्याची छटा दिसत होती; त्याच ठिकाणीं आतां कृष्णवर्ण दुःख मिरवूं लागलें ! ज्या नेत्रांत प्रसन्नतेखेरीज दुसरा विकार नव्हता, तेथेंच अश्रूंनीं स्थान घेतलें ! स्त्रीहृदयांत कोणत्याही विकाराचा उद्रेक रडण्यांत होतो ! अति आनंदामुळें सुद्धां तें रडतें ! मग दुःखाच्या प्रसंगीं त्याची काय स्थिति होत असेल ? आपल्या आंतरिक आवेगाला जयश्रीनें रोदनावाटें वाट दिली ! हेंच तिला यावेळीं पथ्यकर होतें ! तिचे अश्रु तिचे गाल लाल करीत होते तर जयचंदाचा पश्चात्ताप दग्ध हृदयास जास्त चटके देत होता!

एके दिवशीं जयचंदानें तिची समजूत करण्याकरितां म्हटलें, "जयश्री, तुला इतकें दुःख कां व्हावें, हें मला नाहीं समजत !"

"घडलेला प्रकार खेद करण्यासारखाच नाहीं का ?" जयश्रीनें प्रश्न केला

"असला तरी विवेकानें आपलें मन आवरलें पाहिजे आणि त्यांतूनही मार्ग काढिला पाहिजे! तुझी इच्छा असली तर पिशाचानें सांगितलेला मार्ग पत्कर; मी तुझ्या मागोमाग येण्यास तयार आहें. तशी इच्छा नसल्यास पिशाचानें म्हटल्याप्रमाणें येईल तें संकट सहन करण्यास तयार असूं या." जयचंदानें म्हटलें.

जयश्रीनें उद्वेगानें म्हटलें, "नाथ , माझें हृदय पोळतें आहे तें या विचारानें नव्हे. कोणता मार्ग धरावयाचा हा मागचा प्रश्न आहे; पण आज माझ्या मनाला कोडें पडलें आहे तें खरें कोण याचें आहे ! या विचारानें माझें हृदय अगदीं व्याकुळ झालें आहे ! प्रताप मामंजींना खोटें म्हणूं कीं, प्रत्यक्ष बाबाच्या बोलण्याचा अविश्वास धरूं, याचा मला संदेह पडला आहे ! दोघेही माझे जवळचे आप्त आहेत. दोघेही मला पूज्य

आहेत. सांगायचं नाथ, कुणाचं आप्तवाक्य मी प्रमाण मानूं ?–बाबांच्या पिशाचानें मामंजीवर नाहीं तसले वेडेविद्रे आरोप केले, ते मी काय सगळेच्या सगळे खरें मानूं ? मामंजीचें चरित्र मी पाहिलें आहे ! त्याकडे पाहिल्यावर ते स्वार्थी होते, असं ह्मणतां येईल का ? मनुष्य स्वार्थ स्वतःला स्वतःच्या कुटुंबाला सौख्य लागावं ह्मणूनच करतो ना ? तसं सौख्य मामंजींना उभ्या आयुष्यांत तरी मिळालं का ?–बंधुद्रोहाचा त्यांचेवर आरोप आहे, आणि तो खराही आहे. पण तो त्यांनीं स्वसुखार्थ आणि केवळ मौजेनं तर केला नाहीं ? त्यांचा कुलाभिमान, त्यांचा स्वतंत्र बाणा, मेवाड विषयींचें त्यांचें प्रेम, त्यांच्या इतर भाईबंदांना सहन झालें नाहीं, त्याला मामंजींचा काय उपाय ? नाथ, आपल्याला सर्व माहीतच आहे. मी जास्त वर्णन कशाला करूं ? पण स्मरण करून पाहयचं बरं, त्या महापुरुषाला कित्येक वेळां अगदीं निराहारीं राहावं लागलं नाहीं, कां ?- त्यांचीं आर्झी मुलेबाळें भुकेनं तडफडत असतां आणि अकबरशहा साधि करण्यास तयार असतां ज्यांचा मान लवला नाहीं, ज्यांनीं आपलें ब्रीद सोडिलें नाहीं, तें कोणत्या स्वार्थाकरितां ? स्वदेशाकरितां सुखोपभोग सोडणं सोपं नाहीं, नाथ ! आपलं ब्रीद कायम ठेवण्याकरितां वाटेल तीं संकटं पचविण्याचं सामर्थ्य फक्त माझ्या मामंजीमध्येंच होतं. ही सांगीवांगीची गोष्ट नाहीं. असं असतां मी या पिशाच वचनांचा विश्वास धरून त्यांना अधम समजूं ? पुण्यकर्मावर पापकर्माचा आरोप करूं ? जें अंतरात्म्याला पटत नाहीं, तें सत्य मानूं ? सांगायचं नाथ, मी काय करूं ?" असें गहिंवरलेल्या कंठानें विचारून ती अश्रुभरित नेत्रांनीं आपल्या पतीकडे पाहूं लागली. तेवढ्या वेळा पुरता तरी जयचंद त्या शुद्ध सात्विक प्रेममूर्तीकडे पाहून स्तंभित झाला ! अनिमिष नेत्रांनीं तिच्या मुद्रेकडे पाहात राहिला.

अल्प वेळानें त्यानें म्हटलें, " जयश्री, तुझें बोलणें मला पटलें आहे व पटतें आहे. थोरले महाराणाजी तुझे मांमंजी व माझे चुलते अद्वितीय पुरुष होते यांत शंका नाहीं. त्यांच्या विवेक बुद्धीला जें पटलें, तें पूर्णत्वानें

अंमलांत आणण्याची त्यांनीं पराकाष्ठा केली, यांत तिळमात्र शंका नाहीं. ते स्वार्थी होते; असें म्हणणें म्हणजे दुष्टपणाच आहे; पण हा आरोप ज्यांनीं केला, ते तुझे वडीलही त्यांच्या इतकेंच आपणां दोघांना पूज्य आहेत."

जयश्री आपले अश्रु पुसून म्हणाली, "पंचाईत आहे ती तीच. खरं कुणाला समजायचं आणि कोणता मार्ग धरायचा ?–मघांशीं आपण म्हटलं, तूं वाटेल तो रस्ता धर मी तुझ्या मागोमाग येण्यास तयार आहे. नाथ, आपलं माझ्यावर प्रेम आहे म्हणून माझ्या मनाच्या समाधानार्थ आपण तसं म्हटलं, पण त्यामुळं माझ्यावरची जबाबदारी वाढली नाहीं कां ? कोणताही मार्ग धरिला तरी तो पापाचा आहे कीं, पुण्याचा आहे, हें कसं निश्चित करायचं ?–मामंजींचा निर्वाणदिवस आपणांस आठवत असेल. त्यादिवशीं त्यांनीं आपणा दोघांला काय बरं सांगितलं, आठवतं ना आपल्याला ? मेवाडशीं एकनिष्ठ राहाण्याविषयीं त्यांनीं आपणास किती कळवळून सांगितलं बरं ? द्रोहच करायचा झाला तर उमरावाशीं करा; मेवाडशीं नको. असंच त्यांनीं निक्षून नाहीं कां सांगितलं ? आणि त्यावेळीं आपण दोघांनीं तें शपथ घेऊन मान्य केलं ! त्याची वाट कशी लावायची बरं ? बाबांचं पिशाच म्हणतं स्वार्थ साधण्याकरितां वाटेल तो वाममार्ग धरा ! मोंगलांतच जाऊन मिळा असा त्यांचा आग्रह. मामंजींची सक्त ताकीद कीं, मोंगलांशीं बांकून राहा म्हणून ? तेव्हां ऐकायचं कुणाचं ? बाबांची गोष्ट ऐकून नवा मार्ग धरावा; तर माझी सासरघरची सबंध अब्रू मातीला मिळेल आणि आपल्या सर्व पूर्वजांना निरयगति प्राप्त होईल ! बरं, तसं न करावं तर प्रत्यक्ष माझे जन्मदाते पिशाचयोनींत खितपत राहणार आणि त्यामुळं माहेरच्या कुलाविषयींचं योग्य कर्तव्य मी बजावलं नाहीं असें होणार ! प्रत्यक्ष बापाचाच शाप मला भोगावा लागणार ! त्या शापानं माझ्यावर, माझ्यामुळें आपल्यावर आणि आपणा दोघांमुळें आपल्या मुलांबाळांवर काय प्रसंग ओढवेल हें कुणी सांगावं ?–नाथ मी रडतें ती यामुळं ! यावेळीं माझ्या शहाणपणास किंवा चुकीवर दोन कुळांच्या पापपुण्याची जबाबदारी

अवलंबून आहे. आपली गृहदेवता या नात्यानं मला आपल्या सुखासंबंधीं विचार केला पाहिजे ! आपल्या सर्व सुखांचा, सर्व मनोरथांचा, सर्व वैभवांचा किंबहुना प्राणांचाही होम करून पतीनें आपल्या उभय कुलांचा उद्धार करायचा असतो ! साध्वीचा धर्म हाच आहे ! पतिव्रतांच्या कुलांची परंपरा मला सांभाळली पाहिजे. तेव्हां सांगा नाथ, या वेळीं कशी वागूं ? कुणाचं ह्मणणं खरं धरून चालूं ?–प्राणनाथ, पतीचं नातं बाजूला ठेवून, मी हा प्रश्न आपणास विचारीत आहें ! गुरुरूपानें आपल्याकडे पाहून मीं हें कोडें सोडविण्यास आपलें सहाय्य मागत आहें. वडील मनुष्य या नात्यानें असा सल्ला विचारण्याचा मला अधिकार आहे. तेव्हां सांगायचं मी काय करूं ?"

जयचंद काय बोलणार ? त्यानें निर्माण केलेल्या मायाजालांत तो स्वतःच मोठ्या चमत्कारिक तऱ्हेनें फसत जाण्याचा प्रसंग आतां आला होता ! कांहीं एका मोठ्या स्वार्थाकरितां–किंवा मोहवशतेमुळें म्हणा–अबदूलखानाच्या नादानें त्यानें स्वपत्नीस पेंचांत आणण्याचा प्रयत्न केला होता. त्याप्रमाणें जयश्री त्यांत सांपडली; पण तिनें शंकाकुल होऊन उलट त्याच्याच गळ्याला मिठी मारिली ! म्हणजे ही गोष्ट पोहण्याच्या व्यवहाराप्रमाणें झाली. एकादेवेळीं कोणी मनुष्य आपलें कसब दाखविण्याकरितां किंवा सहज थट्टेची भीति दाखविण्याकरितां आपल्या इष्टमित्राला पाण्यांत ढकलून देतो. तो बुडूं लागल्यास आपण त्यास सहज काढू, अशी त्याची खात्री असते, म्हणूनच तो ही थट्टा करितो; पण एकादेवेळीं या विनोदाचा परिणाम काय होतो ? पाण्यांत पडलेला अजाण मनुष्य गटंगळ्या खाऊं लागतो; म्हणून त्याला हा शहाणा सोडविण्यास जातो; पण त्यावेळीं बुडता तारणाऱ्याच्याच गळ्यांत पडतो ! म्हणजे प्रसंगीं दोघांचीही गच्छंती होण्याचा संभव ! जयश्रीनें जयचंदाच्या गळ्याला मिठी मारली ती ही अशी!

जयचंद कांहीं बोलत नाहीं असें पाहून जयश्रीच पुढें म्हणाली," देवाला सुद्धां या प्रश्नाचा घोंटाळा पडेल नाहीं ?–आहेच तसं तें कोडं ! सासरीं अगर माहेरीं जर माझ्या जिव्हाळ्याचं असं कोणी वडील थोरं माणूस

असतं तर पहिल्यांदा मी त्याची सल्ला घेतली असती; परंतु तसं आपल्याला कोणीच नाहीं ! देवालाच प्रश्न टाकावा म्हटलं तर त्याच्याशीं बोलण्याइतकी मिराबाईप्रमाणं माझी पुण्याई नाहीं ! साऱ्या जगांत मला पूज्य, विश्वासाचें परमेश्वरस्वरूप स्थान म्हणजे आपण ! म्हणूनच मी आपल्यास हा प्रश्न विचारून संकटांत पाडलं आहे. आपण मला क्षमा करायची; पण माझ्या प्रश्नाचा निकाल आपणच करा ! वाटेल तो मार्ग सांगा. तो मुकाट्यानं धरीन. मग त्याच्याविषयीं मुळीं सुद्धां चिकित्सा करणार नाहीं ! ''

जयचंद जास्तच घोंटाळ्यांत पडला. वास्तविक जयश्री आपल्या मागोमाग यावी म्हणून तर त्यानें एवढा खटाटोप केला होता. आज ती त्याच्या सल्ल्याप्रमाणें वागण्यास सर्वस्वी कबूल होती. त्यानें अमकें एक श्रेयस्कर आहे, असें सांगितल्यावर ती त्याच्यासंबंधीं बरावाईट विचार सुद्धां करणार नव्हती. अगदीं आंधळेपणानें ती त्याचे मागोमाग जाण्यास तयार होती. तिची इतकी अनुकूलता असतांही जयचंदास या परिणामाचा संतोष झाला नाहीं. त्यानें इतकें कारस्थान रचून त्याचें फळ झालें असतांही तें पदरांत कसें घ्यावें, हा त्यास प्रश्न पडला.

तेवढ्या वेळेपुरतें त्यानें तिचे समाधान केलें व तो तिच्यापासून दूर झाला. विचार करून त्यानें आपली स्थिति पाहिली ! मोठ्या नाजूक पेंचांत तो सांपडला होता. जयश्रीला कोणता मार्ग सांगावयाचा हें त्याचें फार पूर्वीपासून ठरलें असूनही त्यास तिला तो मार्ग दाखविण्याचें धैर्य होईना. एकच वेळ त्यास वाटलें: आपलें सर्व कपट सांगून जयश्रीला संदेहमुक्त करावें. तिचे पाय धरून तिला सांगावें, जयश्री तुला स्वप्नें पडलीं तीं माझ्या कपटकारस्थानामुळें ! तुझ्या पित्याचें पिशाच दिसलें तें खरें नसून माझ्याच कमदानतीची भुताटकी !–तूं काळजी करूं नकोस. तुझ्यापुढें दोन मार्ग नाहींत; एकच आणि तो महाराणा प्रतापजीनें सांगितलेला. मग पुढें ती आपल्यावर संतापो कीं, आपणास क्षमा करो !–पण हा सुविचार अंमलांत आणण्याइतकें त्याचें मन बळकट नव्हतें !

मग पुढें करावयाचें काय ? त्यानें रात्रंदिवस विचार केला ! जयश्रीला संदेहांत पाडून दुःखी केल्याबद्दल त्यास अत्यंत खेद झाला ! अशा तऱ्हेनें

तिचा विश्वासघात व्हावयास नको होता. असें त्यास राहून राहून वाटलें; पण पश्चात्ताप करण्यापलीकडे आणि केलेलें नाटक शेवटास नेण्यापलीकडे त्यास दुसरी तोड नव्हती ! त्यास मागें फिरतांच येत नव्हतें. फिरला असता तरी जयश्रीचा झालेला मनोभंग भरून येणें शक्य नव्हतें. धरलेल्या मार्गाचा शेवट केलाच पाहिजे, एवढेंच उत्तर त्यास सुचलें !

निराश मनानें त्यानें जयश्रीस म्हटलें, " श्री, तुझ्या प्रश्नाचें उत्तर झटकन् सुटणार नाहीं. आपण कांहीं दिवस मुग्धपणांतच घालवूं या. तुझ्या पित्याचें पिशाच काय करतें तें तर पाहूं ?–आतां लौकरच मला आग्र्यास जाणें भाग आहे. त्यावेळीं तूंही माझ्याबरोबर चलावेंस अशी माझी इच्छा आहे. मी असें ऐकलें आहे कीं, त्या शहरीं कोणीएक मोठा अवलिया आला असून तो मंत्रतंत्र जाणतो. आपण तिथं गेल्यावर वाटल्यास त्याची भेट घेऊं. होतांहोईतों आपल्यावर कसलेंच संकट न येईल, असें आपण करूं. आग्र्यास गेल्यावर आपणास बऱ्याच गोष्टींचा उलगडा होईल. पिशाचानें सांगितलेल्या कांहीं गोष्टींचा प्रत्यक्ष कांहीं अनुभव येतो कीं काय, हें पाहण्यास मिळेल. आणि त्यामुळें कदाचित् पुढें कोणता मार्ग धरावा याचाही उलगडा होईल ! विचार करून पाहतां मलाही एक तोड सुचली. राजकार्याकरितां मला आग्र्यास जाणें भाग आहे.तेव्हां एकाच गोष्टींत दुसऱ्या गोष्टी सहज साधून जातील. कारण यापुढें आपण फारच जपून वागलें पाहिजे. "

जयश्रीला त्याचें हें बोलणें पटलें व त्यांचें आग्र्यास जाण्याचें ठरलें !

——:०:——

# परिच्छेद २७ वा.

## हृदयनिवेदन.

ठाकुर ईसरसिंग खूप संतापून बोलत होता. त्याच्या समोर गरीबीनें उभ्या असलेल्या अजबखानाचीं निंदा करीत तो म्हणाला, " खान, तूं इतका पाजी मनुष्य असशील अशी मला कल्पना नव्हती. तो असती

तर मी तुला इतकें साहय्य कधींही केलें नसतें!–हरामखोर! वरून तूं किती भोळा दिसतोस! आंतून तूं नीचांतला नीच आहेस, हें मला आतां कळलें. जा! आपलें काळें तोंड मला दाखवीत फार वेळ इथें उभा राहूं नकोस!–आतां मी तुझ्या म्हणण्याप्रमाणें कांहीं करणार नाहीं अन् कुठेंही येणार नाहीं! मी तुझ्या ताब्यांत बंदिवान आहें. याची मला जाणीव आहे. यापुढें मला तुला काय त्रास द्यावयाचा आहे तो खुशाल दे! पण आतां मी तुझें म्हणणें मुळींसुद्धां ऐकणार नाहीं! जाव! यापुढें तुझें तोंड पाहण्याची सुद्धां मला इच्छा नाहीं!" असें बोलून तो तोंड फिरवून बसला

अजबखानाला ही निर्भत्सना मुळींच सहन झाली नाहीं. ठाकुरसाहेबांनीं आपलें तोंड फिरवितांच त्यानें आपला ओंठ चावला. कांहीं क्षणक्षणीत उत्तर द्यावें, असेंही त्याच्या मनांत आलें असावें; परंतु त्यानें आपला आवेश आवरला. पुढें काय करावें याचा त्यास विचार पडलेला दिसला मनांत असलेला उद्देश साधण्याकरितां अपमान गिळून ठाकुरसाहेबांस चुचकारावें कीं, अपमानाचा सूड घ्यावा? आपल्या बंदिवानास यापुढें खिजवावें कीं रिझवावें? त्या कडव्या रजपुताचा क्रोध वाढविणें आपल्या पथ्यास होईल कीं, त्यास आपला अपमान करण्याची मोकळीक ठेऊन, त्याशी सलगी करावी? कठोरपणा बरा कीं कोडगेपणा बरा? इत्यादि अनेक प्रश्न त्याच्या मनांत आले व गेले!

बऱ्याच वेळानें तो म्हणाला, "ठाकुरसाहेब, आपल्यास संताप येण्यासारखी हलगरज मजकडून झाली आहे खरी!–आतां मी अगदीं कुराणाची कसर खाऊन सांगतों कीं, यापुढें आपल्या सुटकेचा प्रयत्न मी जरूर करीन! खात्री बाळगा!–पण परवांची गोष्ट एवढी नाहीं म्हणूं नका."

"शक्य नाहीं खान, तुझ्यावर आतां माझा काडीमात्रही विश्वास नाहीं! तूं लफंग्या आहेस, अशी माझी खात्री झाली आहे. गरज पडेल त्यावेळीं गोड बोलावें, वाटेल तसलीं मोठमोठीं वचनं द्यावीं, आणि तोंडावरून हात फिरवावा; परंतु तेंच तुमचें काम संपल्यावर तुम्ही निमकहरामी

करण्यास मुळींसुद्धां चुकत नाहीं. याचा मला पुरता अनुभव येऊन चुकला आहे. जा, मला तुझें कांहीं म्हणणें ऐकायचें नाहीं. ”

“ त्यावेळीं मी कुराणाची शपथ घेतली आहे ना पण ! ”

“ या पूर्वी तूं काय थोडथा शपथा वाहिल्यास ? धर्माची चाड असेल त्याला शपथेची किंमत ? तुझ्यासारख्या स्वार्थी मनुष्याला तिचें महत्व काय ? ”

ठाकुर साहेबांचा स्वर थोडा नरम आलेला पाहतांच अजबखान जास्त मुलायम होऊन म्हणाला, “ ठाकुर साहेब, असे एकदम बेहर होऊं नका. या वेळीं माझी परीक्षा तर पहा. परवां दिवशींची एवढी गोष्ट झाली कीं, मी तुमच्या सुटकेच्याच नादाला लागणार ! अगदीं अखेरचा म्हणून माझ्यावर एवढा विश्वास ठेवाच.”

“ आणि म्हटल्याप्रमाणें तूं नाहींच केलेंस तर ? ”

“ असें व्हायचेंच नाहीं; नाहीं झालें तर माझें वाटेल तें नुकसान करा ! ठाकुरसाहेब, तुमच्या मेहरबानीनें तर मी या योग्यतेला चडलों आहे ! तुमच्याशीं दगलबाजी करून चालेल कसं ? ”

“ अहाहा ! किती धर्मात्मा आहेस ! ” ठाकुरसाहेबांनीं तिरस्कार दर्शवून म्हटलें , “ खान, मी तुमचा बंदिवान आहे. अर्थात् तुमच्यावर मी कितीही जळफळलों तरी मला तुमचें कांहीं नुकसान करतां येणार नाहीं; ही साधी गोष्टही माझ्या लक्ष्यांत येत नाहीं, असें का तुला वाटतें ? बाबारे तुझीं गोड गोड वचनें तूं पदोपदीं मोडून माझा विश्वासघात केलास ! त्याचें मी तुला काय प्रायश्चित्त दिलें ? किंवा पुढें तरी देणार ? कैचींत सांपडलेल्या मनुष्याच्या तोंडावर कामाच्या वेळीं हात फिरविणें, हा अधम हृदयाचा स्वभावच आहे ! ”

“ मग माझ्यावर तुमचा विश्वास बसणार तरी कसा ? ”

“ तूं बोलतोस त्यापैकीं एक शतांश तरी खरें करून दाखीव. ” ठाकुरसाहेब खास स्वरांत म्हणाले, “ माझ्या ओळखीच्या त्या मानसिंगाचा तपास करून त्याला मजकडे घेऊन ये. असें मी तुला दातांच्या किरकिटचा

करून सांगितलें; पण त्याचा कांहीं उपयोग झाला का ? निव्वळ थापावारीच आज तूं मला झुलविलेंस ना ? मग यापुढें तरी तुझ्या वचनानंतर विश्वास ठेऊन माझ्या मनाची फसवणून कशाला करूं ? जा बाबा, तुझ्या हातून माझें कांहीं कल्याण होणार नाहीं समजलास ! "

" बरें त्या मानसिंगाची न् तुमची लौकरच गांठ घालून दिली तर ? " अजबखानानें प्रश्न केला.

" मानसिंग माझ्यापुढें येऊन उभा राहीपर्यंत, मला तुझ्या बोलण्यांत कांहीं अर्थ वाटणार नाहीं. बाकी त्याच्या भेटीला तरी आतां मला काय करायचें आहे म्हणा ! "

यावर अजबखान विशेष कांहीं न बोलतां तेथून निघून गेला. बाहेर आल्यावर त्यास मानसिंगाची चौकशी करण्याकरितां धावपळ करण्याचें कारण पडलें नाहीं. कारण खुद्द मानसिंगच ठाकुरसाहेबांची भेट घेण्याकरितां म्हणून त्यावेळीं तेथें आला होता.

सहजीं घडलेल्या मानसिंगाच्या आगमनाचा फायदा घेऊन आपला मोठेपणा ठाकुरसाहेबापुढें मिरविण्याची अजबखानास अनिवार इच्छा झाली. परंतु मानसिंग सरदार अबदूलखानाकडून हुकूमवजा चिठ्ठी घेऊन आला असल्यामुळें त्यास तेव्हां ओळखतां आला नाहीं अणि त्यानें मुकाट्यानें मायसिंगाची वठाकुरसाहेबाची गांठ घालून दिली !

ठाकुरसाहेबापुढें येतांच मानसिंगानें त्यांस आदरानें प्रमाण केला. त्यांनींही तो स्वीकारून त्यास बसण्याची खुण केली. दोघेही आसनस्थ झाले.

त्या दोघांची ही भेट दोन अडीज महिन्यांनीं घडून आली होती. उभयपक्षीं पुष्कळ बोलावयाचें असूनही दोघांनाही बोलण्याचा उमज पडेना ! ठाकुरसाहेबांना आपण होऊन फारसें बोलण्यास नको असे. मानसिंग एखाद्या नववधूप्रमाणें त्यांच्यापुढें बसून राहिला. ठाकुरसाहेबांनीं पाहिलें. त्याची मुद्रा मोठी उदास व दुःखानें काळवंडलेली होती ! त्याबद्दल त्यांना कांहींसें आश्चर्यही वाटलें. कारण, यापूर्वी त्यांनीं त्यास तसें दुःखी व उदास कधींच पाहिलें नव्हतें !

बराच वेळ मानसिंग खालीं मान घालून बसला होता आणि ठाकुरसाहेब त्याचेकडे पाहात होते. इतक्यांत त्या कोमलस्वभावी बायकी तरुणास कसला उमंग असेल, तो असो. त्याला एक जोराचा हुंदका आला आणि स्फुंदत स्फुंदत तो म्हणाला, "ठाकुरसाहेब, तुम्ही माझे गुरु आहां ! माझ्या हृदयाची आग शांत होईल, असा कांहीं उपाय मला सांगा ! हें पहा, मी तुमचे पाय धरतो ! हा अतिप्रसंग मानूं नका ! मला कांहीं तरी मार्ग दाखवा !–ठाकुरसाहेब, मला कांहीं तरी मार्ग दाखवा !" असें म्हणत तो खरोखरीच त्यांचेपुढें पालथा पडला व स्फुंदून स्फुंदून रडूं लागला !

ठाकुरसाहेब आश्चर्यचकित झाले ! त्यांना त्याची कींवही आली ! कांहीं तिरस्कारही वाटला !–किती वेळ ते दोघेही एकाच स्थितींत राहिले. शेवटीं ठाकुरसाहेबांनीं त्यांस उठवलें आणि कांहीं सौम्य शब्दांनीं त्यांनीं त्याचें शांतवनही केलें !

कांहीं काळानें मानसिंगाचा उमाळा शमला. त्यानें आपले अश्रु पुसले. गळाही साफ केला. नंतर तो म्हणाला, "माझें हें अचानक दुःख पाहून तुम्हाला फार आश्चर्य वाटलं असेल; पण मी तरी काय करूं ? माझ्या हृदयांत इतकें दुःखच दुःख सांचलें आहे ! तें कोणाजवळ ओकीन म्हटलें तरी सुद्धां सोय नाहीं ! ठाकुरसाहेब, गेल्या दोन महिन्यांत मी जगाचें इतकें कांहीं भयंकर स्वरूप पाहिलें आहे कीं, वाटतें नको हें जग ! जीव देण्याची कल्पना तर माझ्या मनांत सारखी येते आहे. परंतु माझ्यासारख्या रडयाला तें धैर्य कोठून असणार?–तोंडाला काळोखी आणण्यासारखीं कृत्यें मला समजलीं असतांही जगण्याचा मोह मला सुटत नाहीं ! मी आहेच तितका चेंचवट ! आज आग्र्यांत नाहींतर केवढी धामधूम चालली आहे. जिकडे तिकडे आनंदी आनंद उसळला आहे ! पण माझ्या हृदयाला सुख नाहीं,–शांती नाहीं आणि पुढें काय करावें याचाची मला उमज पडत नाहीं ! ठाकुरसाहेब, माझें हें दुःख तुम्ही निवारण कराल का ? मला कांहीं तोड सांगाल का ?"

ठाकुर साहेब शांतपणें म्हणाले, " तुझें दुःख कांहीं तरी जबर असेल एवढें मला पटलें; पण तें काय आहे, हें मला कळल्याखेरीज मी तुला मार्ग काय सांगूं ? शिवाय मी आहे बंदिवान ! माझ्या कट्या शत्रूच्या कडक कैदेंत मी आहें. मी तुला प्रत्यक्ष अशी मदत काय करूं शकणार ? दुःखी मनुष्य दुसऱ्या दुःखी मनुष्याचें दुःख कसें निवारण करणार बाबा? "

मानसिंग एकदम म्हणाला, " ठाकुरसाहेब, तुम्ही शत्रूच्या कैदेंत असल्यामुळें दुःखांत आहांत, हें मला मान्य आहे; पण माझ्यान् तुमच्या चरित्राची व दुःखाची तुलना केली तर तुमचें दुःख सौम्य ठरून चरित्र उज्वलतर ठरेल, अशी माझी खात्री आहे ! ठाकुरसाहेब, तुमच्यांत न् माझ्यांत जमीन अस्मानचें अंतर आहे ! मी तुमचें सर्व चरित्र ऐकलें आहे ! आपल्या सद्धर्माचरणानें तुम्ही देव कोटींत गेला आहां! पण मी ? पिशाचें सुद्धां मला आपल्यांत सामील करून घेणार नाहींत ! "

त्यांचें हें शेवटचें उद्वेगपूर्ण वाक्य ऐकून ठाकुरसाहेबांस भारीच नवल वाटलें. ते म्हणाले, " मानसिंग, इतक्या अल्पवयांत तूं आपल्या जिण्याला इतका वैतागलास, कारण तरी काय घडलें असें ? इतकें जालीम दुःख कसलें ? तुझी मला जेवढी माहिती आहे, तेवढयावरून तूं इतका दुःखी कष्टी असशील, असें मला वाटलें नव्हतें ! "

" ठाकुर साहेब, मीही त्याच घमेंडींत होतों. मी दुःखी नाहीं, अशी माझी समजूत होती ! मी भाग्यवान् आहें, अशाच भरंवशांत मी होतों; परंतु तुमची भेट झाली आणि माझा भ्रमाचा भोंपळा फुटला ! "

" माझ्या भेटीमुळें ? " ठाकुरसाहेबांनीं आश्चर्यानें प्रश्न केला.

" होय. तुमच्या भेटीनें मला मनुष्याची दृष्टी दिली आणि त्या दृष्टीनें मी मनुष्य देहधारी पशु आहें असें मला समजून आलें ! "

" म्हणजे काय ? "

" म्हणजे काय ?–ठाकुरसाहेब, मी आपल्या तोंडानें काय काय सांगूं ?–पण सांगतोंच. तुम्ही माझे गुरु आहांत , माझ्या मनाचा रोग घालविणारे धन्वंतरी आहांत. तुमच्यापासून कोणतीही गोष्ट लपवून

ठेवणें इष्ट नाहीं आणि तसें करण्याची माझी इच्छाही पण नाहीं. जीं कृष्णकृत्यें करतांना करणाऱ्यांना खेद झाला नाहीं, जीं चंद्रसूर्य समोर बेधडक आचरिलीं गेलीं आणि ज्यांची माहिती अनेक दुष्टांनांही असेल; त्या पापांचा पाढा तुमच्या सारख्या देवपुरुषापुढें वाचला तर काय बिघडलें ?" एवढें बोलून तो थोडा वेळ थांबला व नंतर म्हणाला, "पण ठाकुरसाहेब, पुढील हकीगत सांगण्यापूर्वी मला आपणास एक विनंती करावयाचीआहे. माझें चरित्र ऐकल्यावर तुम्ही माझा तिरस्कार करूं नका!–नाहीं ना करणार ?"

ठाकुरसाहेबांनीं त्यास धीर देऊन पुढें बोलण्यास सांगितलें.

मानसिंगानें उद्वेगानें म्हटलें "मग ऐका तर. ठाकुरसाहेब, तुमच्यापुढें बसलेला हा मनुष्य देहधारी प्राणी, एका व्यभिचारिणी स्त्रीचा पुत्र, नेभळट बापाचा मुलगा, बाटग्या बंधूचा भाऊ आणि एका तरुण यवनीवर लुब्ध झालेला मूर्ख आहे!–माझ्याकडे असें आश्चर्यानें पाहूं नका. आमच्या कुळाची कीर्ति अशाच गुणावर रचली गेली आहे!" असें प्रथमारंभींच सांगून मागून त्यानें आपली सर्व हकीगत मोकळ्यामनाने ठाकुरसाहेबांचे जवळ निवेदन केली!

सुमारें दोन तास ठाकुरसाहेब त्याची हकीगत ऐकत होते आणि तोही अत्यंत त्रस्त मनानें ती सविस्तर सांगत होता. शेवटीं तो म्हणाला, "ठाकुरसाहेब, माझ्या आईनें असें वर्तन केलें, बाप तो तसा आहे, भाऊ मुसलमान झाला आहे. मी स्वतः एका तरुणीच्या प्रेमपाशांत सांपडलों आहें. आतां मी काय करूं सांगा? आम्ही सर्वच आपआपल्या परी पापी आहोंत. अर्थात् कोणी कोणाला हंसण्याचें कारण नाहीं, हें खरें; पण यापुढें मला हा नरकवास रुचणार नाहीं! मी मनुष्याप्रमाणें कसा वागूं तें सांगा! कांहींच उपाय नसला तर मी मुकाट्यानें मरून जाणार!–पण सर्वांच्या उद्धाराचा जर कांहीं मार्ग असेल, माझ्या एकट्याच्या प्रयत्नानें आमच्या कुळाचें मातीमोल झालेलें नांव तरणार असेल, तर सांगा. मी प्रयत्न

तुला अत्यंत लांच्छनास्पद आहे बुवा !" ठाकुरसाहेबांनीं कांहींसें तिरस्कारानें म्हटलें.

" ठाकुरसाहेब, हा दोष माझा मला दिसत नाहीं, असें कां आपणास वाटतें ?" मानसिंग निराशेनें म्हणाला, " पण करणार काय ? तो माझा उपजत गुण आहे !"

ठाकुरसाहेबांनीं त्यास उत्तेजन देण्याकरितां म्हटलें, ' छीः! तूं असा निराश होऊं नकोस. अभ्यासानें मनुष्याचा उपजत गुण पालटणेंही शक्य आहे."

" खरें म्हणतां हें !" मानसिंगानें आशेनें विचारिलें.

" त्यांत खोटें काय आहे ?" ठाकुरसाहेब म्हणाले, " आस्वल, माकड शेळ्या यांचे खेळ नाहीं पाहिलेस तूं कधीं ?–शिवाय, आपल्या भोंवतालीं पहाना ? कडव्या रजपूत जातीला मोंगलांनीं कसें गोगल गाय करून ठेविलें आहे तें ! जयपुरचा राजा मान काय थोडा पराक्रमी आहे ? बिरबल, तोडरमल हेही बुद्धिमत्तेंत काय कमी प्रतीचे होते; पण या सर्वांचा पराक्रम आणि बुद्धिमत्ता मोंगलांच्या नांवावरच विकली गेली ना ?"

" आपल्यापुढें मला कांहीं बोलतां येत नाहीं." मानसिंग म्हणाला, " आपलें सांगणें असें कांहीं हृदयभेदक असतें कीं, तें कडू असलें तरी बुद्धीला पटतें !–मी काय करूं तें सांगा. मी तें करण्यास तयार आहें."

" तुला स्वतःला कांहीं मार्ग सुचला नाहीं ?"

" नाहीं !–जो सुचला आहे, तो आपणास पसंत नाहीं !"

" आत्महत्येचा ना ?–मुळींच नाहीं. आपल्या देशाधर्माचे शत्रु जिवंत असतां आणि मनगटांत बळ असतां, आपण सुखासुखी मरणाची इच्छा धरावी !–हें कांहीं माणुसकीचें लक्षण नाहीं ! मान, आपला मृत्यु समोर दिसत असला तरी चावा घेऊन शत्रूला मारीत मरावें, हा मर्दाचा मार्ग आहे."

" आमचे बादशाहा जहांगीर, हें सुद्धां नेहमीं असेंच म्हणतांना मी ऐकलें आहे." मानसिंगानें मोठ्या फुशारकीनें म्हटलें.

ठाकुरसाहेब तिरस्कारानें एकदम हंसले व म्हणाले, "आमचे बादशाहा जहांगीर !—मान, जहांगीर आमचे बादशाह अं ? वाह ! मोंगली राजनिष्ठेच्या पाकांत तुझ्या मनाचा मुरंबा अगदीं अंतर्बाह्य तयार झाला आहे रे ! वाहवा ! आमचे जहांगीर बादशाहा !—आमचे बादशाहा !!! वाहवा !!!"

त्यांच्या बोलण्यांतील तिरस्काराची छटा मानसिंगास तेव्हांच उमगली; परंतु ' आमचे बादशाह ' या शब्दोच्चारांत काय चुकलें, हें कांहीं त्यास समजलें नाहीं. तो ओशाळून खुळ्याप्रमाणें त्यांच्या मुद्रेकडे पहात राहिला !

त्याची कींव न करितां ठाकुरसाहेबांनीं पुनः त्यास कुचेष्टेनें म्हटलें, " कसें म्हणालास ?-आमचे बादशाहा ! खुळ्या पोरा, आपल्या बादशाहांची आणखी कोण कोणतीं वेदवाक्यें तूं ध्यानांत ठेवलीं आहेस ? शिव ! शिव ! ! काय ही आमच्या तरुणांची स्थिति ! खाण्यांत, पिण्यांत, उठण्यांत, बसण्यांत, जाण्या येण्यांत जिकडे तिकडे या मोंगली राजनिष्ठेची प्रतिष्ठा अं ! या बुझगावण्याप्रमाणें आम्ही आपलीं आयुष्यें चालविलीं पाहिजेत ! मनुष्यपदापासून खालीं ढकलून पशुपदाला नेणारी ही निष्ठा आमच्या सर्व वल्गनांचें केंद्र असावें आणि याच मेरूमण्या भोंवतीं आमचीं मनें गुटमळावींत ! तरच आम्ही माणसें-नाहीं तर पशु ! वाहवा, केवढें हें तत्वज्ञान ? आणि या असल्या निलाजऱ्या स्थितींत आम्ही आनंद मानायचा ! "

चित्तक्षोभानें ठाकुर साहेब मध्येंच उठले आणि इकडे तिकडे फिरूं लागले. मानसिंगाला त्याचा अर्थ समजेना. तोही उठून त्यांच्या मागोमाग फिरूं लागला.

कांहीं वेळानें तो नम्रपणानें म्हणाला, " गुरुजी, मी कांहीं चुकलों असेन तर मला क्षमा करा. "

ठाकुरसाहेब मध्येंच थांबून म्हणाले, " तुला मी क्षमा करूं ? काय म्हणून बाबा ? माझा तूं अपराधी थोडाच आहेस ?-तुझ्या मनाची रचना पाहून मला नवल वाटतें आहे. नवल कसलें, खेद वाटतो आहे !-बराबर !

तुला आत्मोद्धाराचा मार्ग सुचला नाहीं, तें मनोधर्माला धरूनच आहे ! तुझ्या मनाच्या आजुबाजूला आणि खालींवर जर या मोंगली निष्ठेचा थर आहे तर तो तुला बाहेरच्या स्वतंत्र विचारांचा गंध कसा लागूं देईल ! मेवाडविषयीं तुमच्या मनांत प्रेमादर बुद्धि कोठून निर्माण होईल ? त्या अभागी देशाच्या मागच्या इतिहासाविषयीं तुमच्या मनांत कौतुक कोठून उत्पन्न होईल ? मान, जहांगिराची माशुका मोहरुन्निसा हिची आजी कोण होती हें नांवानिशीं तुला सांगतां येईल. परंतु पंधरा वर्षांखालीं आपल्या पराक्रमानें मोंगलांना चीं चीं करावयास लावणारा महाराणा प्रताप कोणत्या तत्त्वाकरितां धडपला ? हें कांहीं तुला सांगतां येणार नाहीं. जहांगिरानें कोणत्या सालीं किती कबुतरें पाळलीं, कोणत्या शिकारींत किती जनावरें मारून आणिलीं ? याचा हिशेब तुमच्या जिभेवर असेल; परंतु एकेकाळीं आपण रजपूत गरुड होतों आणि आज तेच आम्ही मोंगलांचीं पाळींव कबुतरें होऊन राहिलों आहों, हें कांहीं तुमच्या डोक्यांत भरणार नाहीं ! मग मोंगलांच्या छापेंत असणें म्हणजे निखालस जनावराचें वर्तन करणें आहे, हें तुम्हाला कसें उमजणार ? मेवाडचा नाश झाला तो असा ! सर्व राजस्थानाचा नाश झाला तो असा ! बलिष्ठ रजपूत जात नामोहरम झाली ती या प्रकारानें ! कोणाला माहीत आमचें पुढें काय होणार आहे तें ! ”

या नंतर त्या दिवशींच्या बैठकींत कांहीं विशेष बोलणें झालें नाहींच.

दुसऱ्यावेळीं भेट होतांच मानसिंगानें म्हटलें, “ ठाकुरसाहेब, बाळपणा-पासून माझें सर्व आयुष्य चुकतच गेलें आहे. तेव्हां तुमच्याच म्हणण्या-प्रमाणें त्याचा खेद न करितां पुढें काय करतां येईल तें पाहायचें ! ”

ठाकुरसाहेबांनीं निश्चयानें म्हटलें, “ मग बाबारे, तुला ही मोंगली राज-निष्ठेची कोंडी फोडलीच पाहिजे ! मोंगलांचें आणि मेवाडकरांचें हितें केव्हां ही एक नव्हतें. आणि आजही नाहीं. मोंगलांशीं द्रोह करायला सुरुवात केलीस तरच मेवाडाविषयीं तुझ्या मनांत प्रेम निर्माण होईल ! दिल्लीच्या सलतनतीला शेवटचा मुजरा केलास तरच तुझ्या हातून कांहीं कार्य होईल ! ”

मानसिंगानें घाबरून विचारलें, " या खेरीज दुसरा कांहीं सोपा मार्ग नाहीं का ? आपल्या बादशाहाशीं द्रोह करणें इष्ट नाहीं होणार ! "

" मग त्यानें खुशाल यमुनेंत जाऊन जीव द्यावा ! " ठाकुरसाहेबांनीं कर्कश स्वरांत म्हटलें, " ऊठ मानसिंग, तुझ्या हातून कांहीं होणार नाहीं. तुझ्या कल्पनेप्रमाणें तुला आत्महत्येचा जो मार्ग सुचला होता, तोच योग्य होता. मुकाट्यानें जाऊन तूं मर कसा ! सर्पानें नुसत्या संशयानें दंश फोडून आपल्या शत्रुचा निःपात करण्याची हाव धरावी आणि दानव्यांनीं खातेऱ्यांत लिबलिबून कोणाच्याही पायांखालीं सहज चिरडून मरावें असा सृष्टीचा धर्मच आहे ! जा, सुभ्राजीच्या पुत्रा ! यमुनेंत जाऊन जीव दे बरं ! "

ही बैठक एवढ्यावरच संपली. या नंतर मानसिंग आपणाकडे येणार नाहीं, असें ठाकुरसाहेबांना वाटलें; परंतु तसें झालें नाहीं. तो आला तर खराच पण पालटलेल्या मनानें आला. येतांच त्यानें म्हटलें, " ठाकुरसाहेब मला तुमचें म्हणणें पटलें आहे ! मरायला मी तयार आहें पण तें मरण दानव्याचें नको. सर्पाचें पाहिजे ! त्या तडाक्यांत मीं झटक्यासरशीं मेलों तरी हरकत नाहीं. पण मला मरणाचें श्रेय पाहिजे. मला माझ्या कुळाचा उद्धार करावयाचा आहे. आईनें, बापानें, भावानें व स्वतः आचरिलेल्या पापाचें क्षालन मला करावयाचें आहे; तेव्हां कांहीं कठोर मार्ग मला धरला पाहिजे. कांहीं कडक तपस्या केली पाहिजे आणि त्या करितां प्राणांचें मोल देण्यासही तयार असलें पाहिजे; हेंच खरें ! सांगा गुरुजी, मोंगलांशीं मी द्रोह करूं म्हणजे काय करूं तें सांगा. मेवाड विषयीं माझ्या मनांत निर्माण झालेलें प्रेम मी कसें वाढवूं तें सांगा ! मात्र चटकन् मरण्यापेक्षां हातून कांहीं कार्य होऊन मेलों तर मला आनंद वाटेल ! मोंगल प्रबळ आहेत. आमचेच जातभाई त्यांना अनुकूल आहेत. तेव्हां फरशीवर डोकें आपटून घेण्याची युक्ति इष्ट नाहीं असें मला वाटतें. "

मानसिंगाचें हें बोलणें मनापासून होतें. तें पाहून ठाकुरसाहेबांना आनंद झाला. ते प्रसन्नतेनें त्याच्या पाठीवर थाप मारून म्हणाले, " शाबास मान,

अशी हिंमत धर! तुझ्या हातून मेवाडचें कल्याण झाल्यावांचून राहाणार नाहीं. मोंगलांशीं झगडतांना आततायीपणा उपयोगाचा नाहीं, हें या बंदिवासानें मला शिकवलें आहे. घरभेदेपणानें घरांत घुसलेला आणि प्रत्यक्ष भावाच्याच मदतीनें प्रबल झालेल हा परका चोर कांहीं कारस्थानानेंच उखडून काढला पाहिजे! कपटाचरण हाच त्याला एक उपाय आहे!"

यानंतर दोघांचेही अनेक गोष्टीविषयीं बोलणें झालें. त्यांत पहिली गोष्ट म्हणजे कांहीं प्रयत्नानें ठाकुरसाहेबांची बंधमुक्तता करण्याची होती. उभयतांनीं ही आपआपल्यापरी कांहीं युक्ति ठरवावी व त्यांत जो विशेष सुलभ व परिणामी दिसेल, तिचा अवलंब करावा, असें ठरलें.

पुढच्या बैठकींत मानसिंग येतांच ठाकुरसाहेब म्हणाले, "मान, तुझ्या हातून मेवाडची कांहींतरी सेवा होणार असा योग दिसतो. मला अशी एक नामी युक्ति सुचली आहे!"—

"ती कोणती?" मानसिंगानें उत्सुकतेनें विचारिलें.

"मान, आणि ती इतकी सोपी आहे." असें बोलून ते आपला सूर खालीं करून म्हणालें. "मान, चितोर स्वतंत्र करणें हें आपणा मेवाडकरांचे कर्तव्य आहे! आज त्यावर तुझ्या बापाची सत्ता आहे. त्यालाही आपल्या वर्तनाचा पूर्ण पश्चात्ताप झाला आहे, असें तूं सांगतोस. मग गड्या "सुग्राजीला चार हिताच्या गोष्टी सांगून, त्याला महाराणा अमरसिंगाकडे वळवीनास! कोणाला नकळत या गोष्टी कशा सहज शक्य आहेत?"

मानसिंगाला ही युक्ति पटली. पण तिच्या साध्यासाध्यतेविषयीं तो विचार करूं लागला.

ठाकुरसाहेब म्हणाले, "तूं आपल्या पित्याच्या कानाशीं सारखा हेंच घोकत बसलाल तर मला वाटतें, तो तुझें ऐकेल. प्रयत्न करून पहा. नाहींच जमणारसें दिसेलें, तर मग तुला आपल्या पित्याशीं सुद्धां द्रोह केला पाहिजे."

मानसिंगानें विचार करित म्हटलें, " युक्ति वाईट नाहीं. कांहीं अंशीं शक्यही वाटतें. नक्की नाहीं सांगूं शकत. आतां असें करूं या. तुमच्या सुटकेची खटपट चालूं ठेवूं याच. त्यांतच याही युक्तिचा सूत्रपात करतां येईल. बादशाहाचा वाढदिवस जवळच आला आहे. आमचे पिताजी बहुतेक येतील. निदान त्यांना बोलावून घेण्याची मी व्यवस्था करिन. त्याच वेळीं पाहूं कांहीं जम बसतो का ! "

यानंतर दोघांचे आणखीही कांहीं खुलासे झाले व मानसिंग वाढदिवसाच्या उत्सावांत मिसळण्यास गेला व ठाकुरसाहेब सुटकेची संधि केव्हां मिळते ? या विवंचनेंत दिवस कंठूं लागले !

~~~:-०-:~~~

# परिच्छेद २९ वा.

## बाढदिवसाची धामधूम !

नूर महंमद सेलीम ऊर्फ जहांगीर यांची कारकीर्द म्हणजे मोंगल पातशाहतीचा प्रातःकाळ होय ! बाबरशहानें स्थापिलेल्या या नव्या दौलतीचा आफताफ अस्मानांत बराच वर येऊन तळपूं लागला होता ! राजनीतिकुशल व पराक्रमी अकबरशहास चांगल्या चांगल्या वीरावतंसांचें व धीमन्तांचें सहाय्य मिळाल्यामुळें मोंगलसत्ता चांगल्या पायावरच रचली गेली ! तिच्या भक्कमपणाविषयीं शंका घेण्यास जहांगिरास कांहींच कारण नसल्यामुळें, त्यानें आपलें सर्व आयुष्य मद्य, विलास आणि नूरजहान यांनाच अर्पण केलें !

जहांगिरानें जवळ जवळ दोन तपें राज्य केलें; पण त्यांत वर सांगितलेल्या तीन गोष्टींखेरीज इतर कांहीं आढळत नाहीं ! त्यावेळच्या शिरस्त्याप्रमाणें या चैनी बादशाहानें आत्मचरित्रही लिहून ठेविलें आहे. त्याचें सार काढिलें तरी हेंच. " मी वीस वीस पेले मद्य पीत असें; शिकारींत मी इतकीं हजार जनावरें ठार केलीं आणि नूरजहान मला मिळेपर्यंत मला
~~~

बायकोची योग्यता कळत नव्हती. पण तिच्या संगतीनें मला ती कळली ! मी सर्व कारभार तिच्याच हवालीं केला आहे. एक शेर दारू आणि अर्धा-शेर मांस रोज मला मिळालें म्हणजे झालें ! मला दुसरें कांहीं नको ! "

जहांगिराच्या वेळीं राज्याचा वसूल पन्नास कोटी होता ! बादशाहाचा व त्याचा जनानखान्याचा रोजचा खर्च ऐशीं हजार रुपये असे ! त्याच्या खजिन्यांत वीस कोटी रुपये नेहमीं शिल्लक असत. आणि या मानानेंच राज्याचें इतर वैभव होतें ! त्या वेळच्या मोंगली राजवैभवास सबंध दुनियेंत तोड नव्हती ! असो.

अशा या भाग्यशाली व विलासी बादशाहाचा वाढदिवस जवळ आल्या-मुळें आग्र्यात फारच धामधूम सुरू झाली ! वाढदिवसाचा दर वर्षींचाच समारंभ मोठ्या थाटांत होत असे. यंदा त्यांतही विशेष थाट होणार होता यावर्षीं सरदार अबदुलखानानें वनांतील मेजवानी देण्याचें ठरविलें होतें; त्याच प्रमाणें नवीनच मुसलमानी धर्म स्वीकारून सिंगाचे खान झालेले मोहनसिंग उर्फ मोहबत खान यांचीही खास नजरभेट होणार होती. त्या-मुळें यंदा फार दिवसांपूर्वीपासून उत्सवाची तयारी चालू होती. दूर दूरच्या सर्व राजांमहाराजांना व सरदार अंमलदारांना आमंत्रणें देण्यांत आलीं असून कांहीं ठिकाणीं तर बोलावणें करण्यास दरबारी इतमाम पाठविला होता. उदेपुरच्या महाराणाजींना हा बहुमान देण्यांत आला होता ! महा-राणाजींनीं तो सहर्ष स्वीकारून आपल्या तर्फे जयचंदास पाठविण्याचें ठर-विलें-एके दिवशीं मोठ्या थाटानें जयचंद आपल्या पत्नीसह आग्र्याकडे रवाना झाला. याच सुमारास चितोडचे महाराजाधिराज सुम्राजीही आपल्या धर्मपत्नीसह आग्र्याच्या मार्गाला लागले. चारी दिशेकडून मोठमोठे सरदार मानकरी व थोर लोक राजधानीकडे येऊं लागले !

आग्र्याचें वैभव दिवसांगणिक वाढूं लागलें ! अष्ट दिशांहून लोक समुदा-याचे अनेक प्रवाह त्या वैभवशाली स्थानास येऊन मिळत होते ! त्यामध्यें अनक जातीचे, अनेक पंथाचे आणि अनेक दर्जाचे लोक होते. राजापासून रंकांपर्यंत आणि गुलहाद्यापासून बुभुक्षितांपर्यंत सर्वांचा भरणा त्यांत होता.

विशेषच केला असतां तर आग्र्याची लोकसंख्या दुप्पट तिप्पट वाढल्याचें दिसून आलें असतें. प्रजेचा उत्साह अनेक पटींनीं उच्छृंखल झाला होता. वैभवाला तर सीमाच नव्हती ! जिकडे पहावें तिकडे लोकांची धांवपळ उत्सवाची शोभा वृद्धिंगत करण्याकरितां चालली होती, ज्याच्या त्याच्या तोंडीं तोच विषय होता, आणि प्रत्येकजण त्यांतच रंगलेला दिसत होता. अगदीं निर्जीव असा बादशाही किल्ला आणि लहान मोठीं जनमंदिरेंही सजीव होऊन आपल्या चित्रविचित्र शृंगारांनीं उत्सवाच्या शोभेंत भर घालण्याचें कार्य मोठ्या दिमाखानें करीत असल्याचा भास होत होता !

शेवटीं मुख्य दिवस प्राप्त झाला ! प्रहर रात्र शिल्लक आहे तोंच नौबतखान्यांतील डंका दुमदुमूं लागला ! क्षणार्धांत सबंध नगर जागृत झाल्याचें दिसलें ! हिंदूंची दिवाळी आणि मुसलमानांचा मोहरम एकाच मुहूर्तावर आल्याचें भासलें ! अकबर शहाचे कारकीर्दींत दरबारांत हिंदूंचें प्राबल्य असल्यामुळें आणि आजलाही जहांगिरच्या जनानखान्यांत हिंदू रमणींचाच भरणा असल्यामुळें चालू उत्सव हिंदूंचा आहे कीं मुसलमानांचा आहे हें ओळखूं येत नव्हतें. दोन्ही वळणांची छाप इतकी बेमालूम होती कीं, विरुद्ध आचारांविचारांच्या व स्वभावांच्या दोन्ही जातींना-हिंदूंना व मुसलमानांना त्या समारंभांत आत्मीयता वाटत होती. खरोखरीच जहांगीराचें भाग्य हेवा करण्यासारखें होतें.

सूर्योदयाचे पूर्वीं दोन घटका बादशाहास जागें करण्यांत आलें ! प्रातर्विधि आटपतांच जहांगिरानें आपली माळ घेऊन कांहीं वेळ जप केला. ही माळ सोन्याच्या तारेंत गुंफलेली आठपदरीं असून त्यांत मोत्यांचे व हिरेमाणकाचे चारशें मणी होते. हें छोटें प्रातःस्मरण आटोपल्यावर त्यानें मक्केकडे तोंड करून थोडा वेळ कुराणाचा पाठ पढला आणि नंतर तो राजवाड्यांतील मशिदींत फज्र ( मुसलमानी धर्माप्रमाणें दिवसाचा पहिला नमाज ) करण्यास गेला. हें कार्य उरकून तो बाहेर आल्यावर राजप्रासादाच्या भव्य चौकांत त्याच्या तुलेची व्यवस्था केली होती तेथें तो गेला.

बादशाहे गाजी' या पदवीनें भूषित केलें आणि त्याच्याकडे उदेपुर दरबारीं मोंगलाच्या वकीलीचें कार्य देण्यांत आलें ! जयचंद कणावत-उदेपुरचा प्रधान व महाराणा प्रतापाचा पुतण्या-बहिराम गडचा शिलेदार झाला ! तात्पर्य, अनेकांच्या गळयांत बादशाही कृपेची मोहनमाळ पडली ! त्यावेळीं मुसलमानापेक्षां हिंदूच फाजील खूष झालेले दिसले ! बरोबरच आहे ! कारण, त्यांच्या मूर्खपणावर तर असले दरबार होत होते !

मध्यान्हींचे सुमारास दरबार खलास झाला ! बादशाहाची थकली भागलेली स्वारी जनानखान्यांत गेली व इतर लोक आपआपल्या स्थानीं निघून गेले.

यानंतर जनानखान्यांत काय गंमत होत असेल ती खरी. तिसरा प्रहर पर्यंत सार्वजनिक असें कांहीं एक नव्हतें. असो.

तिसरा प्रहर नंतरचा समारंभ नगराच्या बाहेर असलेल्या अबदुलखानाच्या बगीच्यांत होणार होता. खुद्द सरदार अबदुलखानानें मेजवानी देण्याचें ठरविलें होतें. मेवाडकरांना आणण्यांत या मिठ्या सरदारानें जें कांहीं कसब दाखविलें होतें, त्याचें बक्षीस अन्य तऱ्हेनें तर त्यास मिळणार होतेंच, शिवाय ही मेजवानीं आपल्या दरबारासह व जनानखान्यासह स्वीकारण्याचें बादशाहानें कबूल केलें होतें ! राजाचें उष्टें आपल्या घरीं पडणें हें त्या वेळीं अत्यंत मानाचें व राजकृपेचें चिन्ह समजत ! सरदार अबदुलखानानें ती बाजी आज जिंकली होती !

अडीच तीनचे सुमाराचा जोहर नमाज पढून बादशाहा बाहेर पडला तों स्वारीचा थाट तयारीनें थोपला होता ! ताबडतोब त्यांचे अंगावर बाहेरचा पोषाख चढविण्यांत आला ! रत्नखचित भरजरीचा अंगरखा, त्याला शोभणारी तुमान, शिरपेंचानें शोभणारें उंची पागोटें इत्यादि नेत्र दिपवून टाकणारा पोषाख करून व तलवार लटकावून बादशाहा सिंहद्वारा बाहेर आला. तेथें त्याची दृष्ट उतरण्यांत आली आणि हिंदुपद्धतीचे कांहीं शुभसंस्कारही करण्यांत आलें. पुढें पायदळ, वाद्यें वाजविणारे लोक, त्यांचे मागें शृंगारलेले हत्ती घोडे, त्याच्या मागें बादशाहाचा सुंदर रथ, त्याच्या

मागें जनानखाना आणि त्याचे मागें सर्व अमीर उमराव अशा थाटानें जयजयकार करीत स्वारी निघाली !

अबदुलखानाचा बगीचा नगरापासून लांब होता तरी सर्व रस्ताभर गुलाबपाणी शिंपडून त्यावर रेशमी वस्त्राच्या पायघड्या घातल्या होत्या ! ठिकठिकाणीं बादशाहावर सोनें नाणें व फुलें उधळण्याची व्यवस्था ठेवण्यांत आली होती ! अनेक ठिकाणीं कोणतीही बाधा होऊं नये म्हणून तऱ्हतऱ्हेचे उतारे उतरण्यांत आले. अशा थाटांत स्वारी मंदगतीनें सुमारें तासा दीड तासांत बगीच्यांत जाऊन पोंचली. तेथील व्यवस्था ठेवण्यांतही अबदुलखानानें पैशाकडे पाहिलें नव्हतें.

दिवस अगदीं निरभ्र असल्यामुळें नील नभोवितानाखालीं अबदुल खानानें तंबू राहुण्यांचें एक टुमदार नगरच वसविलें होतें ! लक्ष्मीच्या कृपेनें जें कांहीं म्हणून शक्य आहे ते शृंगाराचे, विलासाचे, हौसेचे, मनोरंजनाचे आणि खाद्य पेयांचे वैभवाला तूट नव्हती, श्रमाला तूट नव्हती. हौसेला तूट नव्हती आणि कसबालाही पण तूट नव्हती ! कित्येक वेळां तर या सर्व गोष्टींचा वीट येण्याइतका अतिरेक होत होता ! अबदुलखानाच्या खजानजीनें या मेजवानीच्या खर्चाचा आंकडा दहापासून पंधरा लाख रुपयांपर्यंत टाकला असावा !

सरदार अबदुलखानाला वधाई देत बादशाहानें आपल्या तमाम इतमामासह खूपच मौज उडविली. याच वेळीं अबदुलखानानें आपला मित्र जयचंद याची व बादशहाची खास गांठ घालून दिली ! उभयपक्षीं मित्रत्वाच्या आणाभाका झाल्या ! या प्रसंगीं बादशहानें कृपाळू होऊन जयचंदास एक बहुमुल्य हिऱ्याची आंगठी बहाल केली ! त्यावेळीं जयचंदास आतां काय पादशहाचे पाय धरूं कीं, त्याला डोक्यावर घेऊन नाचूं इतका आनंद झाला!

मगरिब नमाजाचा ( सूर्यास्ताचे वेळाचा ) काळ प्राप्त होईपर्यंत वेळेचा होष कोणालाच राहिला नाहीं ! नंतर ती प्रार्थना तेथेंच आटोपून स्वारी परत फिरली !

सायंकाळीं बादशाहातर्फे सर्वांना मेजवानी होती. हिचा थाटही अपूर्व होता. आमचा जयचंद तर वेडावूनच गेला. या मेजवानींत खाण्यापिण्याचा कांहीं ताळमेळ ठेवावयाचा नाहीं, असा खुद्द जहांगिराचा सक्त हुकूम होता. जयचंदासारख्या नव्या मित्रांना तर त्यानें स्वत: दारूचे पेले भरून दिले! खाण्यापिण्याचा ताळमेळा नसल्यामुळें वेळेचीही पर्वा करण्याचें कारण नव्हतें रात्रीं बारा वाजून गेले तरी मेजवानीचा रंग वाढत चालला होता! गाणारणी व नाचणारणींचा तर इतका सुळसुळाट झाला होता कीं, त्यांच्या मुळें उडालेल्या गोंधळाला माणुसकींत उपमा सांपडणें शक्य नाहीं. बादशाहाच्या नजरेखालींच सर्व प्रकार चालल्यामुळें त्याच्याबद्दल कोणालाच भीति नव्हती!

\+ \+ \+ \+ \+ \+ \+

दुसरे दिवशीं जयचंद जयश्रीची भेट झाली!

जयचंदानें सहास्य विचारिलें, "वाढदिवसाची मौज कशी काय वाटली? आपण तर बुवा अगदीं खूष होऊन गेलों! बादशाहांचें वैभव कसें डोळे दिपून जाण्यासारखें आहे!"

जयश्रीचें मुख मात्र उदास दिसत होतें. ती म्हणाली, "वैभव कुणाचें? उपभोगणार कोण? आणि आनंदानें हुरळून कुणी जायचें? उघड्या डोळ्यांनीं मला कांहीं हें पाहवलें नाहीं!" तिचें हें उत्तर जयचंदास कसें काय रुचलें असेल तें असो; पण वाचकांनो, तुम्हाला हें कसें काय रुचलें, सांगा पाहूं!





# परिच्छेद ३० वा.

## ओसाड देवळांतील मसलत.

कांहीं मनांची रचनाच अशी असते कीं, त्यांचें नियोजित कार्य त्यांना गवसेपर्यंतच काय तीं चंचल असतात! आपल्या हातून अमकें एक होईल कीं नाहीं आणि कोणता मार्ग आपणास श्रेयस्कर होईल; हा संदेह त्यांच्या मनांत कोठवर? त्यांना आपल्या खऱ्या कर्तव्याची जाणीव झाली नाहीं तोंपर्यंत! एकदां ती जाणीव त्यांना झाली, अगर सुचविण्यांत आली कीं, मग तीं लागलीं आपल्या मार्गाला! कांहीं कांहीं माणसांचीं पूर्वचरित्रें पाहावीं तर अगदींच मंद भासतात! तींच त्यांचीं उत्तर चरित्रें पाहावी तर अत्यंत उज्वल! याचें कारण हेंच होय! एका काळांत नालायख ठरलेली व्यक्ति पुढच्या काळांत विलक्षण कर्तबगारीची निघावी? याचा अर्थ तिचा खरा मार्ग तिला हा काळपर्यंत सांपडला नव्हता; असेंच नाहीं काय? श्रीमारुतीरायाची अशी एक गोष्ट सांगतात कीं, समुद्रोड्डाण प्रसंगीं त्यांना त्यांच्या पराक्रमाची जाणीव द्यावी लागली! या गोष्टींतील रहस्यही हेंच आहे, पुष्कळ वेळां स्त्रियांचे बाबतींत हा अनुभव आपणास फारच चमत्कारिक तऱ्हेनें येतो. ज्या प्रसंगांत निधड्या छातीच्या पुरुषाचीही लटपट उडेल, त्याच प्रसंगीं एखादी अबला आपल्या छातीचा कोट करून स्वतःचीच नव्हे तर आपल्या अनेक आत्मीयांचा निभाव लावून नेल्याचे दाखले इतिहासांतरीं आहेत! लक्षपूर्वक पाहिल्यास तसे चमत्कार आजही दिसतील! तात्पर्य, कांहीं कांहीं मनुष्यांना त्यांच्या कर्तव्याची जाणीव व्हावी लागते. आमच्या मानसिंगाचें मन अशाच रचनेचें होतें. ठाकुर ईसरसिंगाशीं साक्षात् होईपर्यंत त्याचें जग निराळें होतें, त्याचे आचार विचार

निराळे होते, त्याचें मन निराळें होतें; पण त्या कडव्या विराची गांठ पडतांच त्याची दृष्टी निवळली! पुढें त्यास आपल्या कुळाचें चरित्र कळून आलें. त्याची त्यास मोठी खंत वाटली. आपला मार्ग भिन्न आहे एवढें त्यास समजलें. पण तो कोणता हें त्यास परवां पर्यंत कोडें होतें; पुढें तेंही सुटलें! आपल्या मातृभूमीच्या उद्धाराकरितां आपण मेल्यास आपला देह सार्थकीं लागेल, एवढेंच नव्हे तर आपल्या कुळाला लागलेला कलंकही धुतला जाईल अशी त्यास खात्री वाटली! त्याचा मार्ग त्याला बरोबर सांपडला! आतां त्याच्या मनाची चंचळता थांबली! आतां त्यास आपलें सर्व चरित्र आठवून इतकी व्याकुळता वाटेनाशी झाली! आतां तो थोडा तरी वेदांती बनला! पूर्वी प्रमाणें आतांही त्याच्या अंतःचक्षूपुढें मैनलदेवी, सुम्राज्ञी, मोहनसिंग व हसीना यांच्या मूर्ति येत जात होत्या; पण त्यांच्या दर्शनानें त्याचे मनोविकार इतके खवळेनासे झाले. आपल्याला उमजलेलें कर्तव्य आपण जितक्या लौकर पार पाडूं, तितक्या लौकर आपल्या मनाला शांतता मिळत जाईल, हें त्यास कळून आलें आणि म्हणूनच तो धिम्या मनानें वाढदिवसाच्या उत्सवांत सामील झाला! वाढदिवसाचें वैभव पाहून आतां त्यास फाजील कौतुक वाटलें, अथवा उगीच चेवहि आला नाहीं. वाढदिवसाच्या धामधूमींत त्याचा ज्याच्या ज्याच्याशीं म्हणून संबंध आला त्या सर्वांशीं तो नीटपणें बोलला व वागला. खुद्द मातेशीं, पित्याशीं व भावाशींही त्याचा संबंध आला पण त्यावेळींही त्यानें आपल्या मनावर ताबा ठेविला! त्याचा हा गंभीरपणा पुष्कळांच्या नजरेंत आला; पण त्याच्या अंतरंगांत एखादी निराळी ज्योत तेवूं लागली आहे, याचा संशय कोणासच आला नाहीं. असो.

वाढ दिवसाचा समारंभ सुरळीतपणें संपून दोन तीन दिवस होतांच राजापासून रंकापर्यंत जमलेले पाहुणे हळू हळू परत फिरूं लागले. मैनलदेवीही आपल्या सुम्राज्ञीसह परत फिरणार होती; परंतु बादशाही जनानखान्यांतून परवानगी मिळेना म्हणून तें जोडपें राहिलें. त्याचप्रमाणें जयचंदास खुद्द बादशाहानेंच चार दिवस राहाण्याचा आग्रह केल्यामुळें तोही

आपल्या पत्नीसह परत फिरूं शकला नाहीं. सुम्राजी व मैनलदेवी जयपुरकर मानसिंग राजाकडे उतरलीं असून जयचंदास अबदुलखानाचे जवळचा एक स्वतंत्र वाडा खालीं करून दिला होता. इकडे सुम्राजीला आग्र्यांत राहणें नको होतें, तर तिकडे जयश्रीस तो मुक्काम नापसंत होता. परंतु तो ज्याप्रमाणें आपल्या बायकोकरितां रहाण्यास राजी होता, त्याचप्रमाणेंही आपल्या पतीकरितां राहाण्यास कबूल झाली होती, सुम्राजीच्या मनांत मोंगलांच्या मैत्रीविषयीं तेढ येत चालली होती, तर इकडे जयचंदास तिचा अभिलाष उत्पन्न झाला होता. तिकडे मैनल पतीस विसरत चालली होती; तर इकडे जयचंद स्वत्वास विसरत चालला होता. तात्पर्य, मोंगलांच्या पंखाखालीं आलेल्या या दोनी जोडप्यांचे संसारचाळे कांहीं निराळेच भासूं लागले, होते. असो.

× × + + + + +

दोघेही पितापुत्र एका महालांत भेटले. सुम्राजी मानसिंगाला हुडकीत तिकडून आला आणि मानसिंगही पित्याला हुडकीत इकडून गेला ! दोघां-चीही हवीतशी एकातांत भेट झाली.

सुम्राजीला पाहतांच मानसिंग मागें पुढें पाहात हलक्या स्वरांत पित्यास म्हणाला, " मला तुमच्याशीं कांहीं महत्वाचें बोलणें बोलावयाचें आहे ! "

सुम्रीजीनें म्हटलें, " अगदीं माझ्या मनांतली गोष्ट बोललास. माझ्याही मनांत तुझ्याशीं असेंच कांहीं गुप्त बोलावयाचें आहे. मी तुला तेवढ्या करितां तर हुडकीत होतों. "

" मग आपल्या संभाषणास अगदीं निवांत स्थळ हवें."

" या बाबतींतही तुझें माझें मत अगदीं जुळलें ! बराबर ! आपल्या भाषणास चांगलाच एकान्त हवा. "

" आज चांदणें आहे. यमुनेंत नौकाविहार करण्यास म्हणून जाऊं. पलिकडच्या तीराला जाऊन कोठें तरी शांत जागीं बोलत बसूं ! "

" अगदीं योग्य. सर्वस्वीं कबूल ! आजच रात्रीं ! त्या गोष्टीचा कायम निकाल लागेल तेवढें बरेंच आहे.

असें पहा मान, कांहीं गोष्टी अशा असतात कीं, त्या पुरुषांनीं शक्य तितक्या लौकरच उरकाव्या. होय कीं नाहीं ?--मी तरी काय ? ही गोष्ट तुझ्यापर्यंत येऊंच दिली नसती. मान, मला तितकें धैर्य नाहीं रे !-अगो, पण आपण आतां रात्रींच बोलूं या गोष्टी. कोणी ऐकलं नाहींना आपलं बोलणं ?-ऐकेनात का ? आपल्याला काय कुणाची भीति आहे ?--साऱ्या जगांत मला एकाच गोष्टीची भीती--पण जाऊंदे. आपण तें रात्रींच बोलूं. मग आजच्या रात्रींच पक्कं टरलं अं ! तूं नावेची व्यवस्था करून टेव. जेवण होतांच—हूं ! " सुम्राजी एवढें बोलून संशयित मुद्रेनें इकडे तिकडे पाहात तेथून निघून गेला. अलीकडे त्याच्या बोलण्यांत व पाहण्यांत, आचारविचारांत आणि वागण्यांत कांहींशी अभिष्टपणाची छटा मारत असे. आतांही मानसिंगास तोच भास झाला व त्यास क्षणभर आपल्या पित्याच्या प्रकृतीबद्दल वाईटही वाटलें. दुसऱ्या क्षणीं तो खिन्न मनानें रात्रींच्या नौकाविहाराची व्यवस्था ठरविण्यास गेला. अर्ध्या घंटयाच्या आंतच त्याच्या मनाप्रमाणें सर्व व्यवस्था झाली.

मध्यंतरीं मानसिंगाच्या मनांत एक विचार सहज आला, आपल्या पित्याचें गुप्त कार्य काय असेल आणि तें आपल्या योजनेस अनुकूल असेल का ? पण पुढच्याच क्षणीं त्यास हा संभव अशक्य वाटला ! आपल्या पित्यास आपल्या एकंदर आयुष्यक्रमाचा खेद वाटत असला, तरी त्याचे मन म्हणजे एकदम मेवाडच्या प्रेमभक्तीकडे वळेल, हें शक्य नाहीं. त्याचे कार्य आपल्या मार्गाहून कांहींतरी भिन्न आहे; मग तें-पण येथेंच तो स्वतःशींच चपापून थांबला. सुम्राजीच्या गुप्तकार्याचा धागा त्यास सांपडला व त्याचें काळीज थरारलें ! गेल्या चितोडच्या सफरींत, त्या रात्री त्यानें जें कांहीं सांगितलें; तेंच तो पुनः आपल्यास सांगणार असें त्यास वाटलें ! या विचारानें त्याचें अंतःकरण जड झालें.

पुष्कळ विवेक केलेला असूनही, या विचारानें मानसिंगाचें चित्त विचलित झालें. रात्रींच्या संभाषणांत आपल्या पित्याला आपण आपल्याकडे वळवूं शकूं का, अशीही त्यास शंका आली. सबंध दिवस त्याचा या विवंचनेंत व पुढील अडाखे बसविण्यांत गेला. कांहीं करून पित्याच्या हृदयाला शांति देणें, आपलें कर्तव्य आहे असेंही त्यास वाटलें.

रात्र पडली ! आकाशरूपी धर्मशाळेंत दिवसा आलेला पांथ निघून गेला व त्याच्यापुढें फिक्का पडलेला चांदोबा आतां आपला दिमाख दाखवूं लागला ! सूर्यानें आपल्या आमदानींत एकाही ताऱ्याला आकाशांत फिरकूं दिलें नव्हतें ! चंद्रानेंही तसें करण्याचा खूप अट्टाहास केला; पण बोलून चालून त्याचें तें चंद्रबळ ! त्याचे हातून चांदण्यांचेंही निवारण झालें नाहीं आणि खालचा अंधकारही शमला नाहीं ! त्याच्या अगदीं जवळ जाऊन सुद्धां त्यास कांहीं तारका वाकुल्या दाखवूं लागल्या ! अंधकार तर काय पुष्कळ ठिकाणीं आपला अधिकार गाजवून मिरवत होता. झाडांच्या पानांतून आणि घरांच्या गवाक्षांतून चंद्रमा आपले कोमल किरणभाले फेंकून त्यास हाकलून देण्याचा प्रयत्न करीत होता; पण कमलतंतूंनीं एखाद्या अजस्त्र वारणाचें निवारण करण्यासारखेंच चांदोबाचें तें कार्य हास्यास्पद होतें ! बिचारा आकाशांतील सुभानीच म्हणायचा !

निर्मळ व धवळ पुष्पराशीप्रमाणें सर्वत्र पसरलेल्या चंद्रप्रकाशांत यमुनेचें विस्तृत पात्र एखाद्या स्वच्छ सुंदर रेशमी वस्त्राप्रमाणें लहरत होतें ! त्याच्यावर नाचणाऱ्या अनेक नावा त्याच्यावरील फुलनक्शीप्रमाणें शोभत होत्या ! त्याच्या आजूबाजूस उठणाऱ्या मंद मंद पाण्याच्या दुमडी व त्यांतच मधून मधून झळाळणारीं चंद्रकिरणें सोनसळीप्रमाणें भासत होतीं ! या जलवस्त्राचे दोनी कांठ वृक्षवेलींनीं सजविले होते ! देखावा खरोखरीच मोठा मनमोहक होता ! बहुतेक सर्व नौकेंतील मानवहृदयें आनंदानें बेहोश झालीं होतीं. फक्त एकच नांव या गर्दीतून आपला मार्ग काढून पैलतीरानें कोठेंतरी दूर गेली !

त्यावेळीं आग्र्यानजीक यमुनेमध्यें वाटेल त्यास वाटेल तेथें नौकाविहार करण्याची परवानगी नव्हती. सर्वांच्या सोईकरितां यमुनेचे तीन भाग कल्पण्यांत आले होते. किल्ल्यानजीकचा भाग बादशाहा व त्याचा जनानखाना याकरितां होता. इकडे फिरकण्याची सर्वांस सक्त मनाई असे; आणि कांहीं कांहीं प्रसंगीं तर आगाऊ जाहीर करून सर्वच पात्र बादशाही जलक्रीडेकरितां ' राखून ठेवण्यांत येत असे. दुसरा भाग सरदार दरकदार यांचेकरितां. त्याच्या लगतच तिसरा भाग खानदानीच्या सर्व स्त्रियांकरितां. इकडेही कोणीही पुरुषानें आपली नाव नेऊं नये, असा कडक नियम होता. तात्पर्य इतक्या अडचणींतून आपली नाव पैलतीरास नेऊन मानसिंग व सुभ्राजी यांना आपली मसलत करावयाची होती. परंतु त्यांना त्याकरितां फारशी अडचण झाली नाहीं. मानसिंगानें नावाड्यास चांगलें बक्षीस देऊन अमक्या एका स्थळीं आम्हांस मुकाट्यानें जावयाचें आहे, असें सांगून ठेविलें होतें. नावाडीही हुशार होता. असलीं रहस्यमय जाणीं येणीं त्याच्या परिचयांतील होतीं. त्यानें त्या दोघा पितापुत्रांना मोठ्या शिताफीनें त्यांच्या अपेक्षित स्थळीं नेऊन सोडलें.

हें स्थान म्हणजे आग्र्यापासून दीड कोसावर यमुनेच्या पैलतीरावर एक असलेलें पडकें देऊळ होय. नाव तीराला लागतांच मानसिंग व सुभ्राजी खालीं उतरले. " तासा दीड तासांत आम्हीं परत येतों. " असें त्या नावाड्यास सांगून दोघेही त्या देवळाकडे वळले !

किनाऱ्याच्या टेंकाडावर एका मोठया देहाच्या अस्थिपंजराप्रमाणें तें देवालय दीनतेनें तिष्ठत होतें ! त्याच्या आजूबाजूस विलक्षण रान माजलें असून, त्याच्या पडक्या भिंताडावरूनही गवताड वाढलें असून, वेलीच्या जाळ्या पसरल्या होत्या. त्याचें शिखर पडलें होतें व आजूबाजूच्या दोनतीन ओऱ्या सोडून बाकीच्या सर्व ढासळल्या होत्या ! जणू काय दुर्दैवानें मारलेल्या विरूपतेचा घाव त्या देवळास सहन झाल्यामुळें त्यानें आपण होऊन जमिनीवर घालून घेतलें होतें. तात्पर्य तें देऊळ नसून, त्याचें प्रेत होतें !

दोघांनीही त्या निर्जीव देहाच्या निर्जीव प्रेताकडे विषण्णतेनें पाहिलें. व एकमेकांकड पाहून सभय सुस्कारे टाकले! हळू हळू त्यांनीं तिकडे गमन केलें.

मानसिंगानें गंभीरपणें म्हटलें, " या समोर तीन ओऱ्या धड आहत. त्यांच्यावर चांगली गच्ची आहे, आणि ती स्वच्छही आहे. वर जाण्यासही वाटही बरी आहे. माझ्या मागून बेतानें या म्हणजे झालें. " असें बोलून तो पुढें झाला. पण सुभ्राजीनें त्यास मध्येंच थांबवून घोगऱ्या स्वरांत म्हटलें, " मान, जागा फारच चांगली शोधून काढली याबद्दल मी तुला बधाई देतों !-आतां मग मोकळें करून बोलूं. पण तुझें माझें नातें लक्षांत आहे ना ?-तूं मी मित्र मित्र बरं का ? अगदीं जिवाचे सोबती ! चल माझ्या जानी दोस्ता, हो पुढें ! "

मानसिंगास पित्याचें तें बोलणें रुचलें नाहीं. तरी तो कांहीं न बोलतां पुढें झाला. सुभ्राजी त्याच्या मागोमाग गेला ! दोघेही आपआपल्या विचारांत असल्यामुळें झाडाझुडुपांतून जातांना दोघांनाही सापा किरडाची भीती वाटली नाहीं.

थोडयाशा सायासानें दोघेही ओऱ्यांच्या वरच्या उघडया भागावर गेले ! तो भाग बराच उंच होता ! चांदणें सर्वत्र पडलें होतें आणि स्मशानवत् शांतता दूर पर्यंत पसरलेली दिसत होती !

सुभ्राजी त्या गच्चीवर जितकें फिरतां येईल, तितकें फिरून, नीट पाहून, खांकरून खोकरून आणि सर्व भाग निर्जन आशा अशी खात्रीकरून घेऊन, परत मानसिंगाजवळ आला. हा वेळपर्यंत मानसिंग यमुनेच्या पात्राकडे शून्यदृष्टीनें पाहात उभा होता. त्याच्या स्थानापासून जरा तिरक्या रेषेंत नदीच्या पलीकडे ठाकुर ईसरसिंगाचा बंदिखाना अस्पष्ट दिसत होता.

सुभ्राजीनें त्याच्याजवळ येऊन खांद्यावर हात ठेवून म्हटलें, " बस्स् ! मान. स्थान असेंच पाहिजे पहा-"

" कशाला ? " मानसिंगानें सहज प्रश्न केला.

सुग्राजी क्रूरतेनें हंसून म्हणाला, " खून करायला !—एखाद्याचा बेमालूम प्राण घ्यायला ! ! मान, खरोखरीच हें स्थान फार चांगले आहे. पाहिलेंस गड्या, दूरपर्यंत पहा ! आहे कुठें माणसाची चाहूल ?—फार झालं तर खालच्या गाभाऱ्यांत चार पाकोळ्या असतील ! कदाचित् एखादं घुबड असलें ! पण त्यांचें अस्तित्व कांहीं बाधक नाहीं ! उलट पाकोळीच्या पंखाचा फड फडाट होत असतां आणि घुबडाचा घुत्कार होत असतां, तिच्या मानेवर हा असा हात ठेवून तिला तिची पापें सांगत, ती सुटकेकरितां धडपडत असतांही, तिला खालीं पाडून तिच्या नरडीवर हात ठेवण्यांतच गमत आहे !-भीतीनें पांढरा फटफटीत झालास तूं ! वेडारे वेडा !-" असें म्हणून सुग्राजी मोठ्यांदा हंसला ! अगदीं भेसूरपणें हंसला. ! तो ध्वनि ऐकून जवळच्या झुडपावरून स्वस्थपणें निद्रासुख अनुभविणाऱ्या पांखरांनींही भीतीनें दचकून आपले पंख फडफडाविले !

सुग्राजी पुढें ह्मणाला, "मान, नुसत्या कल्पनेला तूं इतका भ्यालास. मग माझ्या आज्ञेप्रमाणें त्या सर्पिणीला तूं ठेंचणार कशी ? सोड बेटा, भीति सोड ! आज ना उद्यां आपणास तिला चेंचायची आहे ! हें काम मी तुझ्याकडून करविणार ! ! मान तूं जवानमर्द आहेस ! तुला हें काम सफाईनें केलें पाहिजे !-सगळी तयारी आहे पहा ! फक्त कसेंही करून तिला धुलवून धुलवून इथं आणावयाची आणि तलवारीच्या एका फटकाऱ्यानें-नाहीं मान,गळा दाबूनच तिचा प्राण घ्यावा नाहीं !-मान,मी म्हातारा झालों रे ! दांत पडलेल्या कुत्र्याच्या तोंडांतून ससा जसा निसटून जातो. तशी ती दंगामस्ती करून माझ्या हातून निसटून जाईल म्हणून भीति वाटते. ! दहापांच ठोल्यांची मदत घेऊन मारावें तर तें आपल्या कुलाला इष्ट नाहीं ! हें वध मान, हें काम तुझ्या माझ्यांतच उरकलें पाहिजे !

" तिला कांहीं युक्तीनें पोत्यांत घालून मारली तर ?—अशी युक्ती पाहिजे, तिला खूप यातना झाल्या पाहिजेत !-तूं गप्प कां ? तिला कशी मारावी याची युक्ति का शोधतो आहेस ? शोध, चांगलीशी शोध ! तुझें

डोकें हुशार आहे. ही जागा नाहीं शोधून काढलीस एकान्ताची!–तिला मारल्यानंतर पुरायची नाहीं किंवा इथं तशीच टाकायची नाहीं बरं का? अर्धवट मेलेल्या स्थितींत तिला पोतडींत घालून नदींत फेंकून द्यायची! तडफडून मेली पाहिजे रांड!! ''

विलक्षण मनोधैर्यानें मानसिंगानें आपल्या मनाचा आवेग आवरून तो कांहीं निश्चयानें आपल्या पित्यास म्हणाला, '' थांबा, जरा थांबा आणि मी काय ह्मणतों तें ऐका! तुम्हाला मन जितकें शांत करवेल, तितकें करून मी काय म्हणतों ते लक्षांत घ्या! माझ्या बोलण्याचा राग मानूं नका. तुम्ही मला मित्र म्हणतां पण मी तें नातें न समजतां आज्ञाधारक पुत्राप्रमाणेंच मी तुमच्याशीं बोलणार आहें आणि वागणार आहें! प्रसंग मोठा चमत्कारिक असल्यामुळें मला थोडें स्पष्ट बोलावें लागेल.'' असें मोठ्या तडफेनें तो चटकन् त्याच्या पायांशीं बसला आणि म्हणाला, '' बाबा, तुमचे पाय साक्षी आहेत. तुमच्या मनाला शांतता मिळावी, आपल्या कुळाचा कलंक धुवून जावा, आपणा सर्वांचा उद्धार व्हावा; असाच प्रयत्न मी यापुढें करणार आहें. मात्र तुम्ही योजला आहेत, तो मार्ग माझा नव्हे! ''

सुभ्राजी चकित मुद्रेनें त्याच्याकडे पाहात राहिला!

मानसिंग पुढें म्हणाला, '' माझ्या आईनें भयंकर पाप केलें आहे, आणि त्याचें भरपूर प्रायश्चित तिला मिळायला पाहिजे, हेंही खरें; पण तो काळ आजचा नव्हे! प्रायश्चित्ताची वेळ केव्हांच निघून गेली! पिताजी, ज्यावेळीं तुम्हाला तिच्या दुर्वर्तनाची बळकट शंका आली; त्याचवेळीं, त्याचक्षणीं तिचें मस्तक धडा पासून वेगळें करावयास पाहिजे होतें! तो खरा पुरुषार्थक होता! तो खरा सूड होता आणि तो योग्यवेळीं योग्य दंड होता! आतां त्याचें काय? माझी आई वृद्ध झाली! तुम्ही इतके दिवस तिच्या संगतींत सूख मानून वृद्ध झालां! अकबरशहा मरूनही कित्येक वर्षें झालीं? आतां तुम्ही मेलेलीं मडीं उकरणार?–आपल्या अपमानाचा तात्काळ सूड घेणें हें मर्दाचें काम आहे! असाकेव्हांतरी डाव धरून मागचा

नरक उपसण्याचें काम पिशाचें करतात! बाबा, आपण तो विचार सोडून देऊं या! तिच्या पापानें तिला मरूं द्या इतके दिवस आपण सर्वत्र पिशाच्चा प्रमाणें वागलों. आतां तरी मनुष्याप्रमाणें वागून देवपदाला जाण्याची हाव धरूं या! बाबा, मी पदर पसरून ही भिक्षा तुमच्या जवळ मागतों तुम्ही ती नाकारूं नका!"

सुम्राजी कांहींसा भानावर येऊन म्हणाला, "मान, वयानें तूं माझ्या-पेक्षां इतका लहान असून बुद्धीनें इतका पोक्त आहेस तर? तुझें रक्त सळसळणारें असूनही तुला शांतपणें विचार करितां येतो! खरेंच! तूं माझ्यापेक्षां प्रौढ आहेस! ज्ञानवृद्ध आहेत. ऊठ मानसिंगा ऊठ! मी तुला कसली भिक्षा घालणार! तूंच मला कांहीं तरी ज्ञान दे!"

मानसिंगानें पित्यासही आपल्या जवळ बसण्यास सांगितलें, नंतर तो शांतपणें म्हणाला, "बाबा, आपलें मन आणखी थोडें शांत करा. अन् मीं विचारतों, त्या प्रश्नाचें उत्तर द्या! बाबा, आपले पुण्यप्रतापी महाराणी प्रतापसिंग बरोबर वागले कीं, आपण बरोबर वागलों? कांहीं सांगतां येईल कां तुम्हाला?"

सुम्राजी उदास होऊन म्हणाला, "त्या महत्म्याची बरोबरी आपल्या-कडून नाहीं होणार मान!—आम्ही या मार्गाला आलों म्हणून तर निर्लज्ज-पणानें प्राप्त होणारीं सर्व दुःखें भोगलीं आणि अपमान सहन केले."

"मग त्याची निष्कृती पुनः त्या महात्म्याप्रमाणें वागल्यानें नाही का होणार? प्रतापजींची बरोबरी आपणास नाहीं करवणार हें खरें; पण त्यांना पाडलेल्या पाय वाटेनें आपणास जातां येईल! मेवाडची सेवा, मेवाडचें स्वातंत्र्य, सनातन धर्माचें रक्षण हें त्यांचें ध्येय होतें. तेंच आपण स्वीकारलें तर?"

"म्हणजे काय?" सुम्राजीनें प्रश्न केला.

"बाबा, चितोड आपल्या ताब्यांत आहे. मेवाडकर त्याच्या उद्धारा-करितां तळमळत आहेत! गत महारणाजींचा आत्माही त्याच आशेनें

स्वर्गातून खालीं पाहात आहे. अशा स्थितींत आपण हिय्या करून जर मोंगलांचें स्वामीत्व झुगारून दिलें आणि उदेपुरास जाऊन महाराणा उमरावजींचें मांडलीकत्व पत्करलें तर गैर होईल का ? मोंगलाशीं राजनिष्ठ राहिल्यानें आपल्यास काय बक्षीस मिळालें तें आपण अनुभवलेंच. आतां परत स्वराज्यांत जाऊन, त्याच्या वाढीकरितां मरण्यास कोणती हरकत आहे ! "

सुभाजीनें म्हटलें, " तुझा प्रश्न विचारांत घेण्यासारखा आहे. पण मान हें असलें तत्वज्ञान तुला शिकविलें कोणी ? तुझा वस्ताद कोण ? "

मानसिंगानें ठाकुर ईसरसिंगजीच्या अस्पष्ट दिसणाऱ्या बंदिखान्याकडे बोट दाखवून म्हटलें, " ती इमारत पहा ! त्या इमारतींत एक पुण्य पुरुष कैद आहे. प्रतापजींचा तो उजवा हात होता ! मेवाडचा तो कडवा वीर आहे ! "

" तो कोण ? "

" साळुब्रयांचा ठाकुरसिंग ! "



# परिच्छेद ३१ वा.



## कंटकेनैव कंटकम् !

ती वार्ता ऐकतांच सुभाजीस अत्यंत आश्चर्य वाटलें. त्यानें एकदम म्हटलें, "ठाकूर ईसरसिंग मोंगलांच्या कैदेंत ? साळुंब्रयाचे ठाकूर ईसरजी मोगलांच्या कैदेंत आहेत म्हणतोस ?—आश्चर्य आहे ! "

" त्यांत आश्चर्य करण्यासारखें काय आहे एवढें ? "

" ठाकुर ईसरजीसारख्या वीरास पकडणें साधें काम नव्हे. " सुम्राजी पुढें म्हणाला, " यावरून आपले सत्ताधीश धूर्त आहेत तें पहा म्हणजे झालें ! "

मानसिंग तिरस्कारानें म्हणाला, " मला त्याचें नाहीं कौतुक वाटत. दगलबाजीनें प्रत्यक्ष चाणाक्यासारख्या राजकारण पटूसही पकडतां येईल ! घरभेदेपणानें काय शक्य नाहीं ? रामाच्या बलापेक्षां बिभीषणाचा घरभेदेपणाच रावणाला विशेष कारणभूत झाला ! त्यांतलीच ही गोष्ट ! "

मानसिंग ही गोष्ट सहज बोलून गेला. ती बोलतांना त्याचे मनांत आपल्या पित्याचें चरित्र खास नव्हतें; पण सुम्राजीला मात्र तसें वाटलें आणि महाराणा प्रतापाशीं जी प्रतारणा केली, त्यास उद्देशूनच मानसिंगानें हा दाखला दिला असावा, असें त्यास वाटलें ! आपल्या व्यथित अंतःकरणास लज्जित सुम्राजीनें प्रश्न केला, " पण ठाकुरसाहेबाशीं ही दगलबाजी केली कुणी ? "

मानसिंगानें म्हटलें ' तें अद्याप उमगून आलें नाहीं. पण लौकरच येईल. कांहीं तरी कारस्थान करून ठाकुर साहेबांची सुटका करण्याच्या खटपटींत आहे, त्यांत यश येऊन ठाकुरसाहेब मेवाडांत जातांच, त्या निमकहरामाचा सुगावा लागल्यावांचून राहणार नाहीं.' चटकन् ठाकुर साहेबांची सुटका मात्र घडून आली पाहिजे. "

" आणि त्याचा प्रयत्न तूं करणार ? " सुम्राजीनें एकदम विचारिलें, " मान या गोष्टीचा तूं पूर्ण विचार केला आहेस का ? "

मानसिंगानें निश्चयानें म्हटलें, " त्या वीर पुरुषाची सुटका करण्याचा माझा दृढ निश्चय झाला; फक्त ती कशी करावयाची, याचा मात्र मी चांगला विचार करणार नाहीं. कारण, प्रयत्न निष्फळ ठरू नयेत, अशी माझी इच्छा आहे ! "

आणि यांत तूं फसलास न् उघडकीला आलास तर ?" सुम्राजीनें भयभीत होऊन विचारिलें. त्याच्या चित्तचक्षुपुढें अनेक काळींवेरी चित्रें दिसूं लागलीं !

प्राणांची किंमत द्यावी लागेल हें मी जाणून आहे. परंतु त्याला काय इलाज ? आपल्या मेवाडच्या कल्याणाकरितां वाटेल तें धाडस करण्याकरितां प्रत्येक तरुण वीरानें आपले प्राण तळ हातावर घेऊन धाडस हें केलेंच पाहिजे. सर्व गुणांत पुरुषाला धाडस हा गुण अत्यंत शोभा देणारा आहे."

तरुणांचें हें ताजें तत्वज्ञान कोणत्याही काळीं जीर्ण मनाच्या जुन्या जंबुकांना मुळींच पटत नाहीं, असा इतिहासाचा निर्णय आहे ! तो तेथेंही सिद्ध

मानसिंगाचे हे विचार ऐकून मोंगलांनीं दिलेला तुकडा चघळून आनंद मानणारा तो वृद्ध सुम्राजी अगदीं गांगरून गेला ! त्यास कसेसेंच झालें त्यानें भयभीत होऊन एकवार सभोंवतीं नजर टाकाली. जणूं काय, मोंगलांचें गुप्त खबरनवीस आपल्या पाठीशीं आहेत, असा त्यास भास झाला ? आपलें राज्य करें टिकतें ? आपली सुरक्षितता कशी कायम राहाते ? आपण केवढें घोर कर्म करण्यास उपयुक्त झालों आहोंत ? इत्यादि भयंकर ( १ ) विचार त्याचे मनांत येऊन तो खूपच घाबरला !

त्यानें आपल्या मुलाचा हात दाबून धरून एकदम म्हटलें, " मान ! मान !! काय बोलतो आहेस तूं हें ! मोंगलांच्या विरुद्ध कारस्थान ? बाबारे हें अत्याचाराचें खूळ कोठून तुझ्या डोक्यांत शिरलें ?-छे बाबा, हें अगदीं उपयोगाचें नाहीं हो ! मोंगलांच्या विरुद्ध कट ? आपल्या सत्ताधीशांच्या विरुद्ध असले घाणेरडे विचार ? नको मान, माझ्या गळ्याची शपथ आहे, तुला ! हे विचार तूं आपल्या डोक्यांतून अगदीं काढून टाक ! छे छे, हेंच का तुला सांगायचें होतें: त्या थेरड्या ठाकुरानें तुझ्या तापलेल्या डोक्यांत हें विष ओतलें अं ?— "

" हां बाबा, तुम्ही पायरी सोडूं नका.-माझ्या समोर मी तुम्हाला त्या महापुरुषाची निंदा करूं देणार नाहीं !-" मानसिंग त्वेषानें म्हणाला,

"तुम्ही एवढें घाबरलांत का ? जो आम्हाला लाथा मारतो, त्याला उलटून टांग मारून चीत करण्यांत गैर काय आहे; यांत अत्याचार कसा होतो, हें मला नाहीं समजत ?"

" कारट्या ! हळू तरी बोल अंमळ ! " सुभाजी त्रासून खेकसला, " तूं कोणाशीं वैर करण्याचा घाट घालतो आहेस, माहीत आहे ! मोंगल हे कोण वाटतात तुला !–तुझी किंमत काय ! त्यांची शक्ती केवढी ! कांहीं विचार आहे कीं नाहीं : तुझ्या तोंडांतलें एक अवाक्षर बादशाहांच्या कानीं जाईल तर काय होईल, माहीत आहे. केवढा अनर्थ उडेल. तुझी, तुझ्या कुटुंबाची तुझ्या आप्तेष्टांची काय स्थिति होईल, याची तुला कल्पना तरी आहे.– एवढा मोठा महाराणा संग पण त्याला सुद्धां ज्या बाबरशहांनीं चीत केला, त्यांच्या वंशजाशीं ही धिटाई. गेल्या पिढीची गोष्ट घे. महाराणा प्रताप कांहीं कमी शूर नव्हता. परंतु शहान् शहा अकबरशहाशीं द्रोह केला. झालें काय. जन्मभर अन्नाला मोताद झाला. त्यांच्या पुत्राशीं आतां तूं द्रोह करणार. मान, हा कृतघ्नपणा आहे. आपल्या अन्नदात्याशीं आपण बेइमान होणें

" मोंगल आमचे अन्नदाते.–आमच्या पोरींवरून पापी नजर ठेवणारे पाजी आमचे अन्नदाते. प्रत्येक मूर्ती मूर्ती गणिक त्यांचीं नाकें फोडून त्यांचीं व आमचीं नाकें नकटीं करणारे क्रूर पशु आमचे अन्नदाते.–देवळांच्या प्रेतावर मशिदीची उठावणी करणारे राक्षस आमचे अन्नदाते.–बाबा, या मनाच्या मिंधेपणाला मी काय नांव देऊं.–मला तुमची कींव येते. बाबा, मला तुमची कींव येते. "

मानसिंग खेद पावून म्हणाला, "पिताजी, होतां होई तो पुत्रत्वाची पायरी सोडायची नाहीं, असा माझा पण होता; परंतु तुमच्या मनाला झणझणीत अंजन देण्याकरितां मला ती पायरी सोडून कांहीं निराळ्या नात्यानेंच तुमच्याशीं वागलें पाहिजे व बोललें पाहिजे. या अतिक्रमाबद्दल मी तुमची क्षमा मागतों. " असें बोलून त्यानें पित्याच्या पायास हस्तस्पर्श करून त्यास वंदन केलें आणि नंतर तो म्हणाला, " पिताजी, आपण जिवंत अन्न खात असतों, तर असे खुळे विचार आपल्या डोक्यांत आलेच नसते. अन्नाप्रमाणें

मन, मनाप्रमाणें विचार, विचाराप्रमाणें आचार, आचाराप्रमाणें क्रिया आणि क्रियेप्रमाणें फळ अशीं परंपरा आहे. जंगलांतील वाघ स्वतःच्या पंज्याच्या पराक्रमावर भक्ष्य मिळवितो म्हणून तो वाघ, आणि कुत्रा !— धनी टाकील तो तुकडा शेंपुट हलवींत खाण्यानें जन्माचा बंदा असतो, त्याचा सर्व प्रमाणिकपणा, त्याची सर्व चपलाई, त्याचा सर्व धीटपणा त्याच्या गळ्यांत पट्टा अडकविणाऱ्या मालकाकरितां, गुलामगिरीचा गळ्याला पडलेला वण अनुभवास येत असतांही मालकाकरितां आयुष्य कंठणाऱ्या या कुत्र्यास जीवंतपणीं सुद्धां शुद्ध समजत नाहींत. तेंच वाघाकडे पहा, जन्मभर मांसाहारावर बेगुमान फिरणाऱ्या ह्या पशूचें कातडेंही अत्यंत पवित्र मानलें जातें.—महादेवानें श्रीएकलिंगजीनें—त्याचा स्वीकार केला आहे, पिताजी, स्वतंत्रता आणि परवशता यामध्यें एवढा फरक आहे मग कोणत्या खऱ्या मनाला श्वत्व आवडेल, काजवा होऊन लंबलचक आयुष्य कंठण्यापेक्षां चिमुकल्या अग्निस्फुलिंगाच्या जन्म-मग तो क्षणाचा असला तरी—हजार पटीनें श्रेष्ठ आहे,—बिचारा खद्योत आपल्या जवळच्या किंचिन्मात्र प्रकाशानेंच एखाद्या रात्रिचर पक्ष्याच्या अगर मोठ्या किड्याच्या भक्ष्यस्थानीं पडेल आणि तोच अग्नी स्फुलिंग असेल तर, चटकन् मरेल कदाचित् पण चटका देऊन मरेल. पिताजी, जळत्या तेजांत हें सामर्थ्य आहे.

सुग्राजी भ्याड होता तरी रजपूत होता ! प्रतापाचा द्रोही होता तरी त्याचा भाऊ होता ! मोंगलांचा मिंधा होता तरी मनुष्य होता ! मानसिंगाची विचारसरणी त्यास रुचली नसली तरी पटली असली पाहिजे. कारण तो मुग्धपणें आपल्या पुत्राकडे पहात राहिला !

आपलें भाषण अगदींच वायां गेलें नाहीं, असें पाहून मानसिंग ठाकुर ईसरसिंगजीच्या शिकवणीनें व परिस्थितीनें शहाणा झालेला तो जवान पुढें म्हणाला, " भाकरी आमच्या देशांतलीच पण ती शत्रूची मिंधेगिरी पत्करून आम्ही खात असल्यामुळें आम्हाला आमच्यापेक्षां त्यांच्या पराक्रमाचें तेज जास्त ठळठळीत दिसतें आहे ! पिताजी, तुम्हाला बाबरशहाचा न् अकबरशहाचा पराक्रम आठवला पण पृथ्वीराज चव्हाणाची आठवण कांहीं

झाली नाहीं ! हा कशाचा प्रभाव ! शहाबुद्दीन घोरीस सतरा वेळ माती चारणाऱ्या पृथ्वराजाचें सिंहासन दुसऱ्यानें अगदीं परक्यानें–हिसकल्याबद्दल आम्हाला चीड का येऊं नये ?–सिसोदिया वंशाची प्रतिष्ठापना करणाऱ्या बाप्पा रावळनें–आमच्या पूर्व पुरुषानें आपल्या पराक्रमाचा झेंडा इराण तुराणापर्यंत नेल्याचा दाखला भाटाजवळ असतां त्याच्याच वंशजांनीं मोंगलांचे भाट व्हावें काय ? या नामर्दाईला जग काय म्हणेल ? आम्हाला स्वतःला काडीचीही किंमत नाहीं, याचें कारण आम्ही परकीयांच्या तेजानें उजळूं पाहतों, हेंच होय ! दुसऱ्यांच्या नावांवर विकणाऱ्या भाडेकरी तट्टांना कोण विचारणार ! मोंगलांच्या अवकृपेला भिऊन बृहन्नडेचा नाच नाचणाऱ्या हिजड्यांना कोण सन्मान देणार ? ”

सुग्राजी हताश होऊन म्हणाला, “ बाबारे, हा काळप्रभाव आहे ! परमेश्वराच्या इच्छेनेंच हा सर्व खेळ घडून आला आहे ! त्याला कोणाचा इलाज ? ”

मानसिंगानें तडफीनें म्हटलें, “ ज्या लोकांना काळाचा प्रभाव वळवितां येत नसेल त्यांनीं मग पुरुषत्वाचा टेंभा मिरवूं नये ! ज्यांना परमेश्वरेच्छा आपल्या इच्छेस जुळवून आणतां येत नसेल, त्यांनीं जगण्याची इच्छा धरूं नये ! ”

“ मग आम्ही आतां थकल्या भागल्या लोकांनीं काय करावें म्हणतोस? ”

“ आम्ही मनुष्याच्या जन्माला येऊन कीटकाचें आयुष्य कंठतों आहों ! तें धोरण बदललें पाहिजे. शत्रुबळ असला तरी कांट्यानें कांटा अगर शाठ्यानें शठ उखडण्याचा अट्टाहास केला पाहिजे ! काळ विपरीत भासत असला तरी प्रयत्नानें त्यास अनुकूल करून घेतलें पाहिजे. मेवाडला मुक्त करण्याकरितां, मोंगलांच्या छापेंतून सुटण्याकरितां प्राण हातावर घेतले पाहिजेत. आणि याचकरितां माझी तुम्हाला अशी विनंति आहे कीं, आपण चितोडसह महाराणा अमरसिंगजीकडे जाऊं. त्यांना सहाय्य करूं आणि मेवाड विरुद्ध दिल्ली या सामन्यांतील बाजी मेवाडसारखी करून दाखवूं !

" विचार केला पाहिजे. मान, या गोष्टीचा विचार केला पाहिजे! तुझा ताजा दम आहे. तुझी भरारी योग्य आहे! मला तुझ्या बरोबरीनें उडतां येणार नाहीं." सुर्जानें संदिग्ध मनानें ह्मटलें. मानसिंगाचें ह्मणणें त्यास पटलें; पण तें अंमलांत कसें आणावें, हाच काय तो त्यापुढें विचार होता!

मानसिंगानें त्यास उत्तेजन येण्याकरितां ह्मटलें, " तें सर्व तुह्मी मजकडे सोंपवा. सुदैवानें मला मेवाडच्या दरबारची मोंगलातर्फेची वकिलीची जागा मिळाली आहे! मी तिकडे जाण्याच्या आंतच ठाकुरसाहेबांच्या सुटकेची योजना करितों. मी त्या मार्गांतच आहे. बाण बहुतेक विफळ होणार नाहीं. त्यांची सुटका झाल्यास त्यांचें आपणास फार सहाय्य होणार आहे! तुह्मी या कार्याला अनुमती द्या! माझ्या मातेला ठार करण्याचा विचार सोडा आणि हा पुण्याचा मार्ग धरा. त्या विचारानें तुमच्या मनाला सतत त्रास होईल. या विचारानें तुमचें मन शांत होईल!"

दोघां पितापुत्रांचें आणखीही पुष्कळ बोलणें झालें व बारा वाजण्याचे सुमारास ते परत फिरले!

या नंतर दुसरेच दिवशीं मानसिंगानें ठाकुरसाहेबांची भेट घेतली. वाढदिवस झाल्यानंतर त्यांची ही पहिलीच भेट होती. दोघांनाही बोलण्याला पुष्कळच विषय होते.

ठाकुरसाहेबांच्या भेटीनें मानसिंगास पुष्कळच आनंद होई. आज त्यानें प्रथमतः पित्याचें व आपलें भाषण काय काय झालें व त्याची अनुमति अंशतः आपण कशी मिळविली आहे हें निवेदन केलें. नंतर आपणास मेवाडची वकिली मिळाल्यानें कोणता फायदा होणार आहे, याचें वर्णन केलें आणि नंतर केवळ माजे खातर वाढदिवसाच्या समारंभाची धामधूम सांगितली. त्या वर्णनांत अर्थातच मेवाडहून जयचंद काणावत महाराणातर्फे नजराणा घेऊन आल्याची हकीगत येऊन गेली! ती सांगतांना मानसिंगाला कांहीं तिचें एवढें महत्व वाटलें नाहीं पण ती ऐकतांना ठाकुरसाहेबांच्या मनाची मात्र अत्यंत चलबिचल झाली! मेवाडचा मुख्य मंत्री मोंगल पातशाहाला नजराणा घेऊन येतो, याचा

अर्थ काय ? हा प्रश्न त्यांच्या मनापुढें येतांच त्यांचें मस्तक खवळलें ! ते एकदम वरच्या जागचे उठले आणि इकडे तिकडे फिरूं लागले.

मन अस्वस्थ झालें ह्मणजे ठाकुरसाहेब उठून इकडे तिकडे फिरूं लागतात, ही गोष्ट मानसिंग ओळखून होता. पण आतां यावेळीं त्यांचें मन अस्वस्थ होण्यास कोणतें कारण घडलें असावें ? हें कांहीं त्याच्या लक्ष्यांत येईना. तेव्हां तो कांहींशा नवलानें त्यांच्या हालचालीकडे पाहात राहिला. पुढें त्यानें विचारिलें, " तुमच्या मनाला कांहीं तरी त्रास झालेला आहे. त्याला कारण मी तर नव्हे ना ? कारण, तुमच्या संगतीनें मी जें व्रत आचारिलें आहे, त्याला मी नवखा असल्यामुळें मजकडून कांहीं आगळिक होण्याचा संभव आहे, ह्मणून विचारतों. "

ठाकुरसाहेबांनीं स्वगत कांहीं विचार केला. जीं कांहीं चिन्हें दिसत आहेत, तीं पथ्यकर नाहींत. असें त्यांना तेव्हांच वाटलें; तरीपण प्रत्यक्ष प्रमाणावांचून आरोप करून या नव्या मनाच्या नव्या तरुणाला बिचकविणें इष्ट होणार नाहीं असेंही त्यांना समजून आलें व त्यांनीं मानसिंगास ह्मटलें, " मान, ज्या कांहीं गोष्टी सांगितल्यास त्यां पैकीं कांहीं गोष्टी चांगल्या असून कांहीं अगदीं वाईट आहेत. या सर्वांचें तात्पर्य एकच निघतें कीं माझी आतां इथून सुटका होणें अत्यंत जरूरीचें आहे. त्याशिवाय पुढचा कांहीं जम बसणार नाहीं."

मानसिंगानें अनुमति देत ह्मटलें, " माझें सुद्धां मत तेंच आहे. मी आतां त्याच मार्गाला लागणार आहे. तुह्माला कांहीं युक्ति सुचली असल्यास सांगा. पैशांचा पुरवठा आपणास होईल. विश्वासाच्या अभावामुळें जिवाभावाचीं माणसें मिळणें मात्र कठिण आहे. "

" तें तर खरेंच. कारस्थान म्हटलें कीं, तेथें विश्वास आलाच आणि हें तर राजकारण आहे. यांत आपण फारच जपून वागलें पाहिजे. नाहीं तर जयाऐवजीं नाशमात्र मस्तकावर येऊन आदळायचा. " ठाकुरसाहेब आपला स्वर खालीं करून म्हणाले, " मी एक युक्ति योजिली आहे. पण ती जरा नाजूक आणि चमत्कारिक आहे. "

" माझ्या हातून पार पडण्यासारखी असली म्हणजे झालें. " मान-सिंग त्यांस धीर देण्याचे हेतूनें म्हणाला, " ती कितीही विचित्र असो, सांगा तुम्ही बेशक ! "

ठाकुरसाहेब म्हणाले, " मग एक तर, शठाशीं शाठ्य तर आपल्यास केलेंच पाहिजे. शाठ्य हें एकाच धर्तीचें असूं शकणार नाहीं. ज्या शत्रूवर त्याचा प्रयोग करायचा, त्याच्या प्रकृतीप्रमाणेंच त्याचा प्रयोग केला पाहिजे. मान, परमेश्वरानें प्रत्येक मनुष्यांत अशी एक गोम ठेविली आहे कीं, ती दाबतांच तो हैराण होतो, मूर्ख बनतो ! कोणी कनकानें वश होईल तर कोणी कांतेनें ! कोणी मानानें तर कोणी लोभानें ! प्रत्येकाच्या मनाची ही शीर जर ओळखतां आली तर आपण त्याच्यावर मात करूं शकूं !— मग इतर अनेक बाजूनीं तो कितीही प्रबळ असेना ! त्या शिरेवर घाव घातला कीं तो नरम आलाच पाहिजे. या हिशेबीं आपण आपल्या शत्रूकडे पाहिलें पाहिजे. आज आपला मुख्य शत्रु अजबखान आहे. तो आपल्या मार्गांतील कांटा आहे. त्याचें टोंक धनानें मोडणार नाहीं, अशी माझी खात्री झाली आहे. "

" मग काय त्याला कामिनीच्या कटाक्षाचा कांटा पाहिजे ? " मान-सिगानें सहास्य विचारिलें.

" अगदीं बरोबर ओळखलेंस " ठाकुरसाहेबांनीं हलक्या स्वरांत म्हणलें, " त्या कांट्यानें हा कांटा काढतां येईल ! तेव्हां या मार्गानें आपण फास तयार केला पाहिजे. "

दोघेही विचारांत पडले. थोड्याच वेळांत मानसिंगाच्या डोक्यांत एक युक्ति आली. तो म्हणाला, " चालू कारस्थानांत दुसऱ्या एखाद्या व्यक्तीचें सहाय्य घेणं म्हणजे जाणूनबुजून संकटांत पडण्यासारखें आहे. आणि स्त्रियांचा संबंध तर यांत येतांच उपयोगी नाहीं. अगोदर अशी धूर्त व विश्वासू तरुणी मिळणें मुष्किल. त्यांतून मिळालीच तरी तिच्या हातून अजबखानास बनविण्याचें कार्य होईलच, असा भरंवसा कसा धरायचा ! तेव्हां तो नाद धरता येत नाहीं. यांत आतां मला एकच कल्पना सुचते आणि ती म्हणजे मी स्वतः स्त्रीवेश घेणें होय ! "

ठाकुरसाहेबांना त्याच्या या विचारसरणीचें मोठें कौतुक वाटलें. तें एकदम त्याची पाठ थोपटीत म्हणाले, " शाबास धूर्त आहेस! तुझें म्हणणें बरोबर आहे, पण ही युक्ती थो ी जास्त धाडसाची नाहीं का? "

" आहे पण त्या खेरीज दुसरा इलाज नाहीं. आपण ती सफाईनें अमलांत आणिल्यास अजबखानाला खु ा करणें कठीण आहे. "

पुन दोघेही विचारांत पडले!

" सु ली युक्ती! " मानसिंग एकदम म्हणाला, हो. असेंच करायचें ठाकुरसाहेब, अगदीं निश्चिंत असा! तुमची सुटका खास होणार! "

" ऐका—तुमच्या या वाड्या लगत नदीचा घाट आहे. अजब-खानाला एका नवीन माशुकाचें मी लौकरच वेड लावतों. तें लागल्यावर नदींतून नावेंतून ती अमक्या दिवशीं या वाड्याच्या घाटावर तुला भेटण्यास येणार आहे, असें त्यास भासविण्याचेंही कांहीं कठीण नाहीं. तो दिवस ठरल्यावर तुम्ही कांहीं निमित्तानें अजब खानास घेऊन नदीवर यावयाचें. वेळ अर्थात् रात्रींची. तेथें अजबखानाची मैत्रीण येऊन तिच्या प्रेमांत तो गुरफटतो. आहे तोच ज्या नावेंतून मी—अर्थात् अजबखानाची प्रेयसी आलों; त्यांतूनच तुम्ही पैलतीर गांठावयाचें. पलीकडच्या बाजूस एक पडकें देऊळ आहे. तेथें ताज्याघोड्याची, वेशांतराची व शस्त्रास्त्रांची सर्व व्यवस्था मी आगाऊच करून ठेवीन. पुढें अजबखानाकडून मी आपली सुटका वाटेल तशी करून घेऊन. या पेक्षां दुसरा सोपा मार्ग मलातर कांहीं दिसत नाहीं. "

विचारांतीं ठाकुरसाहेबानाही तोच इलाज योग्य वाटला व त्यास त्यांना संमति दिली!

यानंतर आणखी या संबंधीच सविस्तर बोलणें होऊन मानसिंग आपल्या कार्यास लागला व ठाकुरसाहेब अमुक एका काळापर्यंत आप ? मुक्त होऊन मेवाडांत जाऊं शकूं. असे आशाजनक अडाखे बसवीत काल कंठूं लागले.



# * परिच्छेद ३२ वा. *

## आग्र्यांतील चार दिवस.





सु सज्जीत महालांतील एका शोभिवंत आसनावर जयचंदाची गृहलक्ष्मी विराजमान झाली होती! भोंवतालच्या वैभवास शोभेल अशा वस्त्रालंकारांनीं ती सुशोभित होती! शेवालवेष्टित कमलाप्रमाणें चंबेलवाडीच्या झोपडींत शोभणारी ठाकुराणी जयश्री आग्र्यांतील मोंगलप्रदत्त वैभवांतही सुवर्णपात्रांत ठेविलेल्या सुमनसंभाराप्रमाणें विशेषच मनोहर वाटत होती. अशास्थितींतील तिची छबी पाहून पत्नी प्रेमासक्त जयचंद क्षणोक्षणी सुखस्तंभित होत होता! त्याचा त्यासच हेवा वाटत होता! दुसऱ्याक्षणी त्यास त्याचें मन विचारीत होतें. 'जयश्री शरीरानें या वैभवांत रुळली. मनानें ती तशीच रुळली आहे कां?' मोठा गहिरा सवाल! जयचंदास अद्यापीही त्यानें सोडिलें नव्हतें! आपली पत्नी आपल्यास अनुकूल होत चालली आहेकीं, मनानें ती आजही पूर्वस्थितींत आहे, याचा त्यास कांहींच अंदाज लागत नव्हता!

कारण होतें, वैभवांत येऊन पडल्यावर आणि मोंगलाचा उत्कर्ष पाहिल्यावरही जयश्री म्हणजे आनंदानें कधीं हुरळून गेल्याचें दिसलें नाहीं बरें, ती अगदीं उदास राहिली ह्मणावें तर तसेंही आढळून आलें नाहीं. एकाक्षणांत ती अत्यंत उल्हासित दिसे तर दुसऱ्याक्षणी तिची मुद्रा खिन्न वाटे! एकावेळीं तिला तेथील राहण्याचा कंटाळा आला असावा असें भासे तर दुसऱ्यावेळीं ती त्यांत मोठी रममाण झाल्याप्रमाणें दिसे. केव्हां केव्हां वस्त्राभूषणांची नखरेबाज आवड तिच्या मध्यें दिसून येई तर .केव्हां केव्हां

तिचा विरक्तपणाही आढळून येई; तात्पर्य, जयश्री सुखी आहे कीं दुःखी आहे, हें कळणेंच कठीण होतें!

खरी स्थिति अशी होतें कीं, ती सुखी होती आणि दुःखीही होती. तिच्या विश्वासाचा गैर वाजवी फायदा घेऊन जयचंदानें तिच्यावर जो कपटप्रयोग केला होता, त्यामुळें तिच्या मनाचा खराखुरा तजेला हरपला होता! तिच्या बुद्धीला रुग्णावस्था प्राप्त झाली होती! ती शरीरानें सुस्थ असली तरी मनानें अस्वस्थ होती.

ज्वरपीडेमुळें तोंडाला रुचि नाहीं आणि पोटांत क्षुधा नाहीं, अशा मनुष्यास पंचपक्वान्नाच्या प्रदर्शनात नेऊन बसविल्यास त्यास त्या विनोदानें आनंद वाटेलकीं दुःख होईल ?—सकृद्दर्शनीं असें वाटतें, कीं, तो चिडेल! त्याच्या मनाला त्रास होईल! पण समजा. तीं पक्वान्नें विविध असलीं, सरस असलीं, बहुत असली आणि अत्यंत कुशलतेनें मांडून ठेविलीं असलीं तर? काय, त्या राशीकडे पाहून त्या रुग्णाला खेदच होईल! त्याच्या मनाला त्याची आवड नाहीं, हें खरें; तरीपण सुंदर व मोहक वस्तुकडे पाहून मन रमणे मनाचा धर्म नाही का? मग त्या अक्षुधित मनुष्याचें मनही घडीभर त्या पक्वान्नराशीच्या दर्शनानें कां रमूं नये? अलबत रमेल! किंबहुना त्याची मृतक्षुधाही सजीव झाल्याचा त्यास भास होईल आणि त्याचे तोंडून उद्गार निघतील, अहाहा! मला भूक असती तर!! माझ्या तोंडाला रुचि असती तर!!!

कौतुकवश होऊन स्वस्थितीला कांहीं काल विसरणें हा मनाचा धर्मच आहे. रुग्णावस्थेनें जर्जर होऊन जीविताविषयीं निराश झालेल्या रोग्यालाही सृष्टींतील एखादा सुंदर देखावा पाहून ज्याप्रमाणें तावत्काल मोठा हुरूप वाटतो; त्याचप्रमाणें जयश्रीला त्या वैभवांत येऊन पडल्यांवर आले जहांगिराच्या आग्रहानें जयचंदानें आपला आग्र्यांतील मुक्काम वाढविलातरी तिनें विशेष कुरकुर केली नाहीं; त्याचेंही कारण पण तेंच! अस्तु.

तिसराप्रहरचा सुमार होता. जयचंद आपली दुपारची विश्रांति संपवून नुक्ताच बाहेर गेला होता. जयश्री प्रारंभीं सांगितल्या प्रमाणें चिमुकल्या

चंवेलीसह महालांत जाऊन बसली. आग्र्यांत आल्यापासून तिला जिगाच्या व कशिद्याच्या कामाचा नाद लागला होता. हसीनेची व तिची दाट मैत्री जमली होती व तिनेंच तिला फावल्यावेळीं मनाची करमणूक करण्यास हा नाजुक मार्ग दाखवून दिला होता.

पति बाहेर गेल्यावर तिनें कशीद्याचें काम पुढें घेतलें. चंबेलीनें त्रास देऊं नये ह्मणून तिनें तिला खालच्या जाग्यावर सोडलें होतें. कांहीं रंगित खेळणी तिच्यापुढें टाकलीं होतीं, रांगती खेळती चंबेली त्यांत दंग झाली व जयश्री आपलें कशिद्याच्या कामाचें जुगदान हाताशीं घेऊन आपलें काम करूं लागली.

सुमारें अर्धघटका हा बेत ठीक जमला! पण पुढें जयश्रीचें मन कामा-वरून उडालें! तिचा हात धिमा येऊं लागला. दृष्टी शून्य होऊं लागली. मन अंतर्भूत होऊन विचाराच्या वारूवर आरूढ झालें! इकडे चंबेलीलाही आपलीं खेळणीं रुचेनाशीं झालीं! तिनें तोंडानें कांहीं बालबोल बडबडत समोरचीं खेळणी कांहीं उजव्याबाजूस व कांहीं डाव्याबाजूस फेंकून पुढ्यां-तला प्रदेश लख्ख केला. कांहीं वेळ तिनें त्या रिकाम्या जागेवर आपल्या चिमकुल्या हातानें मारवीत व इतर चेष्टा करीत घालविला आणि नंतर ती आपल्या आईच्या कोचाकडे वळली.

मघापेक्षांही जयश्री आपल्या विचारांत जास्त गुंग झाली तिचा हात अगदीं थांबला! मनांत मात्र विचारावर विचार येऊं लागले. क्षणांत चंबेलवाडीचें तिला स्मरण झालें! इकडे येऊन आपल्याला बरेच दिवस झाले, तेथील सर्व मंडळी आपली फारफार आठवण करीत असतील आतां आपण लौकर परत फिरावें हें बरें. असे विचार तिच्या मनांत आले.

इकडे चंबेली आपल्या मातेच्या पायाशीं आली व वरउभें राहण्याचा प्रयास करूं लागली! आईच्या खालीं लोंबत्या वस्त्रास धरून वर उठण्याचा प्रयत्न करावा; पण त्यांत टणकपणा नसल्यामुळें जोर न सांपडून खालीं धसरावें. त्या अपयशाबद्दल थोडीशी कुरकुर करीत व त्याचेंच पर्यवसान कांहीं बोबड्या स्वरांत करीत पुनः उठूं लागावें असें तिचें सारखें चाललें होतें.

दुसऱ्याक्षणीं जयश्रीस आपल्या अद्‌भुत स्वप्नसृष्टीची आठवण झाली. आपल्याला वरचेवर दिसलेले चमत्कार स्वप्नांतीलच असतील का ? अशी तिला पुनः पुनः शंका आली व तिची बुद्धी त्यांतच गुंग झाली. तिनें नकळत आपली सुई आपल्या बुचड्यांत खोविली आणि हातांतील काम बाजूला टाकलें. तें अर्धवट कोचावर राहून बाकीचें खालीं लोंबू लागलें.

चंबेलीला हा नवीन विषय मिळाला. तिचें चित्त तिकडे आकर्षित झालें व ती एका झोंपेंतच तिकडे वळली ! तिनें तें काम खालीं ओढलें. त्या बरोबर तें तर खालीं आलेंच शिवाय रेशमाच्या लडी व कलावतूच्या गुंड्या असलेलें जुगदानही खालीं आलें. खोडकर चंबेलीची चैन झाली.

स्वप्न चमत्काराहून जयश्रीचें मन भुताटकीच्या प्रकरणाकडे वळलें ! आपल्या पित्याच्या पिशाचानें सांगितलेला मजकूर खरा धरायचा कीं नाहीं, हा प्रश्न तिच्या मनांत सारखा घोळूं लागला. पित्याचा उद्धार करावा तर मरणप्रसंगीं प्रतापानें सांगितलेल्या गोष्टींचें आणि केलेल्या प्रतिज्ञेचें काय करावयाचें ? बरें तिकडे लक्ष्य द्यावें तर प्रत्यक्षजन्मदाता पिशाच योनींत खितपणार ! काय करावें ?

इकडे चंबेलीनेंही आपल्या समोरच्या ठेव्याची अशीच गम्मत उडवून दिली ! तिनें रेशमाच्या गुंड्या आणि कलावतूच्या लडी बाहेर काढल्या सुटे शेवट तिला दिसतांच तिनें त्याचा विग्रह करण्यास सुरुवात केली. गुंडी सुटूं लागतांच तिला मोठी गंमत वाटली, व तिला सोडीत ती रांगत दूर गेली, मागेंपुढें झाली, तिनें तो गुंता हातांत असतांच टाळ्या वाजविल्या आणि सर्व गुंडीचा गोंधळ करून टाकला इकडे जयश्री ज्याप्रमाणें अनेक विचारावरून फिरत होती, त्याच प्रमाणें तिकडे चिमुकली चंबेलीही या गुंडीवरून त्या गुंडीवर आणि या लडीवरुन त्या लडीवर छापे घालून गम्मत करीत होती. ! लतेच्या गुंतागुंतीमध्यें शोभणाऱ्या फुलाप्रमाणें ती त्या गुंत्यांत शोभूं लागली. तरीही जयश्रीचें तिच्याकडे लक्ष्य गेलें नाहीं !

इतक्यांत हसीना तेथें आली ! आपल्या मैत्रीणीची कांहीं थट्टा करावी या हेतूनें ती अगदीं हलक्या पावलीं तेथें आली; पण दर्शनींच चंबेलीचा पराक्रम पाहतांच तिला अत्यंत कौतुक वाटलें व ती एकदम ह्मणाली,

† जुबेदी, देखो देखो तो बदमाष लडकीनें क्या क्या फिसाद कर डाला है ! " असें ह्मणत ती पुढें झाली व तिनें त्या चंचल फुलाला वर उचलून हृदयस्थ केलें ! एका मोठ्या कमलावर बसलेल्या चिमुकल्या फुलपाखरा प्रमाणें चंबेली हसीनेच्या वक्षःस्थलावर शोभूं लागली ! बाहूंचें बंधन घालीत आणि चुंबनाची शिक्षा देत हसीना जयश्रीस ह्मणाली, "देखो जुबेदी क्या तुम होषमें हो ! अहा ! क्याही बदमाष लडकी है !

जयश्रीनें भानावर येऊन आपल्या पुत्रीचा पराक्रम पाहिला तों नवलानें व कांहीं आनंदानें उद्गारली, " अगबाई ! चंबे, शर्थ झाली तुझ्या दांडगाई पुढें ! केलेंस एकदां सगळ्या गुंड्यांचं कल्याण ! च्‌--च्‌ !! कलावतूचाही गुंता करुन ठेवलास ! आतां काय बरं करावं तुझ्या दांडगाईला थांबहो, तुला एकदां चांगला ठोक देतें " असें वत्सलेनें ह्मणत ती हात उगारण्याचा आविर्भाव करीत पुढें झाली

हसीना तिला लपवीत ह्मणाली, " नको--नको--नको "

तिघीही मनमुराद हंसल्या.

अहाहा ! किती नयनमनोहर देखावा ! चंबेलीचें निर्मल हास्य ! जयश्रीची उत्कृष्ट वत्सलता आणि हसीनेचा मोकळा आनंद ! सर्वच गोड ! मुलांचा आनंद असाच मधुर आहे.

नंतर जयश्रीनें एका दासीला बोलावून घेतलें आणि तिच्या करवीं चंबेलीनें निर्माण केलेलें रणांगण साफ करून घेतलें. ती दासी चंबेलीला घेऊन गेली आणि त्या दोघी मैत्रीणी बोलत बसल्या.

लौकरच बोलण्याचा विषय आग्र्यांत सध्यां चालू असलेल्या नाजुकीच्या ख्यातीकडे वळला.

हसीनेनें ह्मटलें, " मोठा मशहूर आहे बरं का तो !--आज सकाळीं आमची मामी गेली होती. त्याच्या दर्शनाला ! जुबेदी, तुह्मी न्‌ आह्मी

---

† हसीनेला जयश्रीचें नांव बोलतां येईना ह्मणून तिनें आपल्या या रजपूत मैत्रणीस हें गोड व प्रेमळ यवनी नांव दिलें !

जाऊंया का एकदां त्याच्याकडे ?–जाऊंया गडे. तो हात पाहतो ह्मणे मंतरलेले ताईत दोरे देतो त्यामुळें पिशाचबाधा होत नाहीं. शरीराला सुख लागतं आणि मनाच्या सर्व काळज्या दूर होतात! मग येतां का त्याच्याकडे.

यावर जयश्रीनें त्या नाजुमी–फकिरासंबंधीं अनेक प्रश्न विचारले. आणि हसीनेनेंही तिला जेवढी ह्मणून त्याचे संबंधी माहिती होती, तेवढी सर्व निवेदन केली. अर्थात ती सर्व ऐकीव असल्यामुळें शक्य तितकी अतिशयोक्तीनें भरलेली होती. तो वाटेल त्यावेळीं गुप्त कसा होतो, त्यानें कोणाकोणाला रोगांतून उठवलें, त्याच्या मंत्रसिद्ध ताईत दोऱ्यांनीं कोणा कोणाच्या इच्छा सफल झाल्या, तो मनांतला प्रश्न कसा ओळखतो, त्याच्यावर अविश्वास ठेविल्यास नुकसान कसें होतें, त्याला भुतेंखेतें कशीं वश आहेत, बादशहालासुद्धां त्याच्या शक्तीची कशी खात्री पटली आहे, मेहरुन्निसा त्याच्याकडे कितीदां गेली, कोणते सरदार त्याच्या भजनीं लागले आहेत, इत्यादी कितीतरी माहिती हसीनेनें भोळयाभावानें निवेदन केली आणि जयश्रीनेंही अनेक प्रश्न करीत अत्यंत उत्सुकतेने ती ऐकून घेतली.

या संवादाचा परिणाम एवढा झाला कीं, जयश्रीनें त्या नाजुमिकडे दुसरे दिवशीं सकाळीं येण्याचें कबूल केलें. तिच्यामागेंतरी पिशाचबाधेचं शुक्लकाष्ट होतेंच कीं नाहीं ?

या नंतर त्याचे आणखीही कांहीं बेत झाले, अमक्या दिवशीं वन-भोजनाला ह्मणून अमक्या ठिकाणीं जावयाचें अमक्या रात्रीं चांदण्यांत नौकाविहार करण्यास जावयाचें अमक्या दिवशीं यमुनेंत जावयाचें इत्यादि.

आग्र्यांत आल्यावर जयश्रीच्या पुष्कळ ओळखी झाल्या. त्या सर्वांत तिला हसीनेचा स्वभाव विशेष उमदा वाटला आणि ह्मणूनच त्या तरुणीशीं तिनें स्नेह जोडला. एरव्हीं तिनें इतक्या मोकळया मनानें कोणाशींच संभाषण केलं. नसतें. असो.

हसीना गेल्या नंतर थोड्याच वेळानें जयचंद घरी येता झाला. जयश्रीनें त्याला आपल्या व हसीनेच्या संभाषणाचा सारांश सांगून,

नाजुमिकडे जाण्याची परवानगी मागितली. त्यानेंही कसलीच हरकत न घेतां ती एकदम दिली. नंतर तो ह्मणाला, " हें बरें झालें उद्या मला बादशहा बरोबर शिकारीला ह्मणून जावयाचें आहे. आठ दहा दिवस लागतील तिकडे. खुद्द बादशहानीं फारच आग्रह केला आहे. मीं बरोबर नसलों तर तेही जाणार नाहींत. त्यामुळें नाइलाजानें त्याचें ह्मणणें कबूल केलें आहे. तेव्हां आह्मी पहाटेच निघूं. मी परत येई पर्यंत तूं हसीने बरोबर काय मौजा उडवावयाच्या आहेत त्या उडवून घे. आह्मी शिकारीहून परत येतांच उदेपुराकडे कूच करायचें." इतकें बोलून त्यानें अवांतर बोलणें काढलें. हेतु हा कीं, मुक्काम वाढल्याची जयश्रीनें तक्रार करूं नये; पण खरें पाहिलें तर जयश्रीचें तिकडे ध्यानच नव्हतें. आपल्याला सगळ्या गोष्टींची परवानगी मिळालेली पाहून ती आनंदीत झाली व त्या भरांत ती बाकीच्या सर्व गोष्टी विसरली. असो.

प्रहर रात्र राहिली नाहीं तोंच जयचंदास बादशाहाकडील बोलावणें आलें व त्यानें लौकरच आपला जामानिमा आवरून जयश्रीचा निरोप घेतला.

तो गेल्यावर व अद्यापि रात्रही बरीच आहे असें पाहून जयश्री पुनः बिछान्यावर पडली. पण तिला झोंप येईना. नाजुमीकडे गेल्यानंतर काय करावें? त्याला काय विचारावें? तेथें गर्दी असेल. सर्व गर्दींत आपला पिता पिशाच झाला आहे आणि तो आपणास त्रास देतो आहे, ही लाजीरवाणी गोष्ट कशी सांगावी? इत्यादि विचार तिच्या मनांत आले व ती अस्वस्थही झाली. एकवार तिला त्या फकीराकडे जाऊं नये असेंही वाटलें; पण हा विचार फार वेळ टिकला नाहीं! होऊं पहाणाऱ्या पिशाच बाधेचें निवारण करणें इष्ट आहे. एका चांगल्या मशहूर मांत्रिकाशीं गांठ पडण्याचा सहजी संभव आहे. तेव्हां ही संधि गमावणें बरें नाहीं. असा विचार करून तिनें जाण्याचा विचार कायम केला.

विचार करितां तिला एक युक्ति सुचली. आपला हेतु तोंडानें न सांगतां चिठ्ठीनें कळविला तर? वा! फारच छान युक्ति! जयश्री तात्काळ लिहिण्याचें सामान घेऊन, दिव्या जवळ जाऊन बसली. विचार करून तिनें खालील मजकूर लिहिला.

" माझ्या मृत पित्याचें पिशाच मला दिसलें असून तें मला व माझ्या कुटुंबाला कांहीं पीडा करील कीं काय? अशी मला धास्ती वाटते तरी त्याचें निवारण होईल, असें कांहीं मंत्रसाधन मला करून यावें आज मी कांहीं दक्षिणा देत आहेच. एक वर्षाचे आंत गुण दिसला तर मी आणखीही सेवा करीन."

अशी चिठ्ठी लिहिल्यानंतर तिला क्षणमात्र बरें वाटलें; पण पुनः तिला अशी शंका आली. त्या फकीरास आपल्या भाषेंतील चिठ्ठी वाचतां येईल कीं नाहीं कोण जाणे?—पण लौकरच तिनें स्वतांचें समाधान करून घेतलें. तो महाज्ञानी पुरुष आहे. त्यास सर्व कांहीं कळत असेल.



# परिच्छेद ३३ वा.

## नाजुमीच्या गुहेंत.



हं हळूं हळूं सर्वप्रांतीं व सर्व तो मुखी होत चाललेल्या त्या नाजुमीच्या स्थानास 'नाजुमीची गुहा' ह्मण- ण्याचा लोक प्रवाद पडला होता आणि तें नांव त्यांच्या एकंदर वस्तु स्थितीला शोभतही होतें. मागील एका परिच्छेदांत या स्थानासंबंधीं थोडीशी माहिती दिलीच आहे. आज त्याचें अंतरंग पाहण्यास मिळेल.

तें स्थान बाहेरून जसें पडकें, जुनाट, उदास आणि कांहींसें भीतिप्रद वाटत होतें. कोणीही दर्शनोत्सुक व्यक्ति आंत गेली कीं, थोड्याच वेळांत

तिला सूर्यप्रकाशास मुकावें लागे. एका अंधेऱ्या बोळांतून मिण मिण दिव्यांच्या उजेडांत तिला एक जिना चढून कोठें तरी जावें लागे. नंतर या दालनांतून त्या दालनांत आणि त्या बोळकंडीतून त्या कोनपटांत अशा चक्रव्यूहांतून चांचपडत एका महालांत त्यांची रवानगी होई. हा सर्व प्रवास अल्पकालाचा असला तरी अंधेरांतून असल्यामुळें बराच दीर्घवाटे आणि मनही भयग्रस्त, कांहीं उदास व कांहीं गंभीर असें होत असे. या महालांत आलेल्या व्यक्तिस त्यानें देऊं केलेल्या दक्षिणे प्रमाणें थोडा—फार वेळ बसावें लागे. अलीकडे त्या फकीराची प्रसिद्धी बरीच झाल्यामुळें माणसांची रहदारी बरीच सुरू झाली होती. उपरोक्त महालांत बहात्तीस माणसें नाहींत, अशी वेळच नसे.

कोणत्याही गोष्टीचें महत्त्व वाढूं लागलें म्हणजे तिच्या संबंधी कायदे कानू बनूं लागतात आणि पुढें पुढें तर अशी गंमत होते कीं, त्या गोष्टीचें महत्त्व बाजूला राहून तिच्या रक्षणार्थ केलेल्या कायद्यांचेंच महत्त्व प्रबल होऊन बसतें. हाच नियम येथेंही लागू झाला. सामान्य जनतेला नाजुमीचें दर्शन हळू हळू दुष्कर होऊं लागलें. दुपारी पुरुष वर्ग सकाळीं स्त्रिया असा शिरस्ता पडला. दक्षिणेचें प्रमाण वाढूं लागलें. वशिल्याची गरज भासूं लागली. इतकें सर्व सांभाळून पुनः इच्छित फल प्राप्त होईलच असा भरंवसा मिळेनासा झाला. कांहीं श्रीमंत घराणीं मात्र या सर्व नियमांना अपवाद होतीं. त्यांतच सरदार अबदुलखानाची गणना होती. त्यामुळें हसीना व जयश्री याना विशेषसा त्रास झाला नाहीं. त्या वरील महालांत येऊन बसल्यावर नाजुमीची भेट लौकरच होईल, असें त्यांना सांगण्यांत आलें.

हसीना व जयश्री भयचकित अंतःकरणानें भोंवतालच्या अंधेरांत डोळे फाडून पहात व एकमेकींचा हात घट्ट धरून परस्परास मूक आश्वासन देत त्या महालांत येऊन पोंचल्या. बरोबर आलेल्या दासीनें त्यांना एका कट्टयावर नेऊन बसविलें. दिव्यांचा प्रकाश साधारणच होता. पुष्कळ वेळानें त्यांचें मन स्वस्थ झालें व त्यांनीं भोंवतालीं पाहीलें, थोर थोर

घरच्या दहा पंधरा बायका तेथें जमल्या होत्या. त्यापैकीं कांहीं त्या दोघींच्या परिचयाच्याही होत्या. परंतु मोठ्यानें बोलण्याची तेथें सक्त मनाई असल्यामुळें सर्व परिचय किंवा दृष्टीनेंच घडून येत. सर्व स्त्रियांत एक सुंदर तरुणी हसिनेला अगदीं ओळखीची वाटूनही तिला तिची ओळख पटेना. त्या तरुणीनें हिच्याकडे पाहून एकवार ओळखीचें स्मित केलें आणि तोंड बाजूला केलें. हसीनेला त्या हंसण्याचें मोठें नवल वाटलें. ओळख तर पटेना. चेहरा तर अगदीं पाहण्यांतील! अशी तिची स्थिति झाली. ती त्यावर कांहीं विशेष विचार करणार तोंच नाजुमी रिकामे झाल्याचें वर्तमान आलें. यावेळीं तिची व जयश्रीची पाळी होती. दोघीही एका नवीन स्त्रीच्या मागोमाग त्या महालांतून दुसऱ्या एका खोलींत गेल्या. खोलीच्या दाराशींच एक पोक्त वयाची वृद्धा बसली होती. तिनें दार उघडून दोघींना आंत जाण्यास सांगितलें. दोघींनींहि परस्पराकडे साशंकीत दृष्टीनें पाहिलें. त्या वृद्धेला त्यांचा हेतु कळला असावा. ती म्हणाली, "डरो मत!— डरो मत!!"

मग दोघींही धीट पणानें आंत गेल्या. समोरच एक जाड कापडाच्या व काळ्या रंगाचा पडदा या भिंतीपासून त्या भिंतीपर्यंत टांगला होता व त्याला वरच्या बाजूस एक लहानसें व त्याच्या खालीं हाताच्या अंतरावर मोठासा हात सहज जाईल अशीं दोन छिद्रें होतीं. त्या वरच्या छिद्रांतून पलीकडच्या व्यक्तीनें मग तो कोणी नाजुमी असो कीं नसो, या दोघींना अवलोकन केलें असावें. कारण, त्यानें गंभीर स्वरांत त्यास पडद्याजवळ येऊन बसण्यास सांगितलें. त्या दोघींनीं ती आज्ञा मुकाट्यानें मान्य केली.

आंतून प्रश्न आला "काय इच्छा आहे?"

हसीनेनें हलक्या स्वरांत म्हटलें, "मला हात दाखवावयाचा आहे!"

"ठीक आहे. नांव?—हसीना. ठीक. वय?—वीस—एकवीस?"

आंतून उद्गार आले, "हातावरून काय सांगितलें पाहिजे?—बहुतेक इष्काची बाबत असेल!" हसीना कांहीं बोलली नाहीं. तिनें एकवार लाजून

मार मुरडून जयश्रीकडे पाहिलें. जयश्रीही गालांतल्या गालांत हंसली नाजुमीनं खालच्या भोंकांतून हात पुढें करण्यास सांगितलें. हसीनेनें भीत लाजत आंत हात दिला.

दहा पांच पळांनीं आंतून उत्तर आलें, "तुझ्या हाताचें टिपण करून घेतलें आहे. आजपासून आठ दिवसांनीं ये म्हणजे तुला पाहिजे तो खुलासा मिळेल,"

हसीना कांहींशीं सचिंत होऊन मागें झाली. जयश्रीनें तिची जागा घेतली. नाजुमीनें तिलाही तिचें नांव गांव विचारिलें. तिनें तें सांगतांच आंतून शब्द आले, "एकूण तूं मेवाडची रजपुताणी आहेस! महाराणा प्रतापाची सून ना तूं? जयचंद मंत्र्याची पत्नी?—" जयश्रीनें आश्चर्य करीत रुकार दिला.

"काय इच्छा आहे?"

जयश्रीनें म्हटलें, "माझी इच्छा मी चिठ्ठीतून लिहून कळविली तर?"

"ठीक आहे. मीही माझें उत्तर चिठ्ठीनें देईन." त्याचे या सांगण्यांत कांहीं खाच होती कीं काय कोण जाणें!—जयश्रीनें रात्रीं लिहून ठेविलेली चिठ्ठी बरोबर आणिली होती. ती तिनें खालच्या भोंकांतून आंत दिली.

यानंतर बराच वेळ आंतल्या बाजूस अगदीं शांतता दिसली. या उशीरामुळें जयश्रीचा जीव व्याकुळ झाला. आपल्या प्रश्नाच्या उत्तरास ज्या अर्थीं इतका उशीर लगला आहे, त्या अर्थीं चिन्ह कांहीं ठीक नाहीं, असेंच तिला वाटलें.

"माझें संकट निवारण होण्यासारखें नाहीं कां?" तिनें प्रश्न केला.

याचेही उत्तर थोड्या वेळानेंच आलें. "तुझें संकट घरगुती असल्यामुळें थोडें विचार करण्यासारखें व भयंकर आहे. मी सांगतों त्याप्रमाणें करण्यास तूं कबूल असलीस तर कांहीं तजवीज होईल.

'माझ्या शक्तीप्रमाणें मी वाटेल तें करण्यांस तयार आहे."

"ठीक आहे. मी तुला एक मंत्र लिहून देतों. तो बरोबर घेऊन जा. आणि कोणलाही न दखवितां अगदीं एकांतांत त्याचें पठण कर. असें तीन दिवस कर ह्मणजे तुला खऱ्या गोष्टींचा उलघडा होईल आणि पुढें काय करवयाचें तें कळून येईल. घाबरू नकोस, शहाणपणानें वाग. मंत्र पाहिल्यावर भांबाऊं नकोस. शांत मनानें त्याचें पठण कर. देव तुझें कल्याण करील." असें ह्मणून त्यानें एक चिठ्ठी त्या भोंकांतून पुढें केली. जयश्रीनें ती घेऊन पडद्यापुढें नमस्कार केला. लागलीच त्या दोघींना जाण्याची परवानगी मिळाली.

दोघीही पूर्वीप्रमाणेंच त्या चक्रव्यूहांतून बाहेर पडल्या व गोषाच्या गाडींत बसून घरच्या रस्त्याला लागल्या. मार्गांत कोणीही कोणाशीं बोललें नाहीं

नाजुमीकडे जाण्यानें दोघींच्याही मनाला समाधान वाटलें. उलट दोघींच्याही मनाला नसती चिंता लागली. जयश्री विचारांत पडली, त्या मंत्रांत एवढें भांबावून जाण्यासारखें काय आहे, कुणास माहीत? हसीना मनांत ह्मणत होती, याच भेटींत त्यांनीं जें कांहीं सांगायचें होतें, तें कां सांगितलें नाहीं. नशीबांत काय आहे कोण जाणे? तात्पर्य दोघीही आप आपल्या चिंतेंत गढून गेल्या. गोषाची गाडी चहूंकडून झांकलेली असली तरी आंतील सुंदरींना बाहेरची मौज पहण्याकरितां डाव्या उजव्या बाजूस कापडाच्या जाळ्या लाविलेल्या असतात. त्यांपैकीं एका जाळींतून बाहेरची मौज पाहून आपल्या मनाला बहिलावण्याचा हसीनेनें प्रयत्न केला व ती संधी साधून त्या कागदांत एवढें काय लिहिलें आहे, हें पाहण्याच्या अनिवार उत्कंठेनें जयश्रीनें तो कागद पुढें घेतला. हसीनेच्या हालचालीवर नजर ठेवीत ती घडी ती उलगडणार तोंच हसीनेनें तिच्याकडे न पहातांच तिच्या मांडीवर हात ठेवून तिला हलवीत ह्मटलें, "देखो जुबैदी—इधर आवो! देखो तो— "

जयश्रीनें गडबडीनें ती चिठ्ठी पुनः पहिल्या जागीं ठेऊन दिली आणि हसीनेकडे झुकत ह्मटलें, "क्या है हसीन बी?"

"हमारे बाबा—" हसीना जयश्रीस जागा करून देत जाळींतून दाखवीत ह्मणाली, "ते पाहिलेत. ते माझे बाबा चालले आहेत. !"

जयश्रीनें नीट पाहण्याची पराकाष्ठा केली; पण त्या मनुष्याचा चेहरा तिला पाहण्यास मिळाला नाहीं. ती आपली निराशा हसीनेजवळ प्रगट करणार तोंच हर्षोत्फुल्ल हसीना तिला ह्मणतें, "पाहिलेत ना? माझे बाबा तेच. त्यांनीं सुफी पंथ धरला आहे, ह्मणून ते असे वागतात ! खरोखर जुबैदी, मी मोठ्या संकटांतून वाचलें बघा. माझे बाबा माझ्याकरितां धावून आले! खरं सुख आईबापापासूनच. नाहीं जुबैदी?"

जयश्री कांहीं बोलली नाहीं. मनांतल्या मनांत तिनें आपली व हसीनेची तुलना केली. तिचा पिता तिला संकटांतून मुक्त करण्याकरितां आला—अगदीं धावून आला आणि आपला पिता? मरूनही पिशाचरुपानें आपल्यास संकटांत ढकलण्याची त्याची तयारी! हसीनेचें संकट काय आहे? हें तिला माहीत नव्हतें; परंतु तिचें तें संकट तिच्या पित्याकडून परिहार होणार होतें! आणि जयश्रीचें संकट पित्याच्या पिशाचा कडून वाढणार होतें! हसीनेच्या वरील प्रश्नास ती अनुमति देणार कशी?

पण हसीनेचें लक्ष्य तिच्या मनःस्थितीकडे नव्हतेंच मुळीं. ती आपल्याच आनंदांत पुढें ह्मणाली, "आतां मी नाहीं भीत ! माझ्यावर माझे बाबा कांहीं जुलूम करणार नाहींत. हो, माझी इच्छा नसेल, त्याच्याशीं शादी कशी करूं? तुह्मीच सांगा बरं जुबैदी! जो पुरुष आपल्यास आवडत नाहीं, त्याला कसा मान्य करायचा?"

आपलें सचिंत मन दुसरीकडे घालण्याकरितां जयश्रीनें विचारिलें, "तुमची शादी काय बळजबरीनें होणार आहे?"

हसीनेनें उत्तरार्थ ह्मटलें, "हो, आमच्या मामांचा तसा विचार आहे. तुमचा तो बाटगा आहेना—काय त्याचं नांव?"

"बाटगा कोण?" जयश्रीनें आश्चर्यानें प्रश्न केला.

चितोडकरांचा मुलगा मोहनसिंग—" जयश्रीने तिरस्कारानें ह्मटलें, "तो झाला आहे मुसलमान. त्याचं नवीन नांव काय?—हो, मोहबतखान.

त्याला मंजूर कर, असं आमच्या मामाचं म्हणणं. पण मी नाहीं त्याला कबूल करणार! अगदीं नाहीं कबूल करणार! मी पाठविला निरोप आपल्या वडिलांना. मला येऊन घेऊन जा म्हणून. ते असतात मेवाडांत."

"मेवाडांत?" जयश्रीनें अत्यंत आश्चर्यानें विचारलें.

"होय. त्यांना तुमच्या लोकाविषयीं फार प्रेम आहे. तुमच्यांत कोणी परतापसिंग होऊन गेला आहेना, त्याच्यावर त्यांची फार भक्ति! त्यांच्या कबरीजवळ झोंपडी बांधून ते राहतात जुबैदी, तुमचं घर कुठंसं आहे तिथं? मी बहुतेक बाबांच्या बरोबर मेवाडांत येईन. तुमची आमची दोस्ती आतां कायमची होईल."

हसीनेच्या या बोलण्यानें जयश्रीच्या नजरेपुढें फर्जंदबेगाचीच मूर्ति आली. असा एक मुसलमानी फकीर मेवाडांत येऊन राहिल्याचें तिला स्मरलें. पण तिनें त्या विषयीं विचार केला तों, तो फकीर आपणास प्रत्यक्ष न दिसतां स्वप्नांत दिसला होता, असें तिला आठवलें. आणि यावेळीं आपण पाहिलेल्या त्या गोष्टी स्वप्नांतील कीं खऱ्या? अशी तिला पहिली शंका आली!

यानंतर दोघीनाही सहजच मुग्धता आली. कांहीं वेळानें त्या तशा निबोल्या स्थितींतच आपआपल्या घरीं जाऊन पोंचल्या

जयश्रीच्या मनांत तेच विचार घोळूं लागले. हसीनेचा बाप आपणास पाहण्यास मिळाला पाहिजे होता. याची तिला भारी चुटपुट लागली. निदान हसीनेला तरी तुझा बाप मला पाहावयाचा आहे, हें सांगून ठेवण्यास पाहिजे होतें असें तिला वाटलें ती त्या विषयीं .जों जों जास्त विचार करूं लागली तों तों तिला फर्जंदबेग आणि हसीनेचा बाप ही एकच व्यक्ती आहे, असें वाटूं लागलें. मग ती व्यक्ति आपणास स्वप्नांत भेटो कीं खरोखरीच भेटो! तिनें तो प्रसंग नीट आठवला स्वप्नांत वाटणाऱ्या फकीरानें सांगितलेला हेतु आणि हसिनेनें आतां दिलेली माहिती यामध्यें विलक्षण सौम्य असल्याचें तिला आढळून आलें. आणि त्या विचारानें तिचें मन बरेंच अस्वस्थ झालें.

इतक्यांत दासी घरीं पेहरण्याचीं वस्त्रें घेऊन आली. जयश्रीनें विमनस्क स्थितींतच पहिलीं वस्त्रें सोडून तीं परिधान केली. त्यावेळीं नाजुमीनें दिलेली चिठ्ठी खालीं पडून तिनें तिला नवीन स्मरण दिलें.

दासीनें ती चिठ्ठी उचलण्याचें आंत तिनें आपलें नेसतें वस्त्र सावरीत ती उचलून घेतली आणि दासीला तेथून जाण्यास सांगितलें. दासी त्या प्रमाणें सोडलेलीं वस्त्रें घेऊन निघून गेली.

जयश्रीनें आपलें वस्त्र कसें तरी गुंडाळलें. नंतर महालाचें किवाड बंद करून आपल्यास हवा तो एकांत करून घेतला आणि एका खिडकीशीं बसून चिठ्ठी पुढें घेतली. त्यावेळीं नाजुमीनें सांगितलेले शद्ब तिच्या कानांत घुमू लागले. "मंत्र पाहून घाबरूं नकोस. भांबाऊ नकोस—शांतमनानें त्याचें पठण कर." इत्यादि प्रकारें त्यानें बजावलें होतें. त्याचें तिला स्मरण झालें, तिचें मन संदेहानें अत्यंत व्याकुळ झालें. चिठ्ठी ऊलगडण्याचें सामर्थ्य-ही तिच्या हातांत राहिलें नाहीं. कितीवेळ तरी आपल्या समोर ती झांकलेली चिठ्ठी टाकून तिच्याकडे ती पहात राहिली.

शेवटीं तिनें मोठा हिय्या केला! आणि ती चिठ्ठी उलगडली. त्यांत पुढील मंत्र तिला आढळला!

जयश्री, भगवान एक लिंगजीची तुला शपथ आहे, हें रहस्य बाहेर न फोडतां, माझीसुटका करण्याचा प्रयत्न कर. मी साळूंब्यांचा ठाकूर ईसर-सिंग तुला प्रार्थना करीत आहें. मी मोंगलाच्या कैदेंत पडलों आहें! नाजुमीचें सोंग मी घेतलें आहे. तरी कडक पाहऱ्यांत आहे. या पेक्षां जास्त काय लिहूं? अस्सल रजपुताणी असशील तर याचा परिस्फोट न करितां माझी मुक्तता करशील!"

"अगबाई आणि!" असे उद्गार जयश्रीच्या तोंडांतून निघाले व ती त्या उघड्या कागदाकडे पाहात राहिली!



# परिच्छेद ३४ वा.

## भेटीमुळें संशयोद्भव!



जी व्यक्ति मृत आहे, असा आपला दृढ विश्वास, तीच व्यक्ति एखाद्या अनोळखी नगरांत आपल्या दृष्टीस पडल्यास, आपल्या मनाची जी चमत्कारीक स्थिती होईल, तिचाच अनुभव यावेळीं जयश्रीस येत होता. शुन्य दृष्टीनें कितीवेळ तरी ती त्या मंतरलेल्या कागदाकडे पहात राहिली त्यावेळीं तिला आनंद वाटत होता कीं, आश्चर्य वाटत होतें कीं आणखी कांहीं भावना होत होती कांहीं सांगतां येणार नाहीं. एवढें खरें कीं नाजुमीनें सांगितल्यांप्रमाणें त्या कागदांतील तो अजब मंत्र पाहून तिला आपलें मन मात्र शांत ठेवतां आलें नाहीं! आणि याच कल्पनेमुळें कीं काय कोण जाणें त्या धूर्त नाजुमीनें तिला त्या मंत्राचें पठण तीन दिवस करण्यास सांगितलें.

त्या तारवटलेल्या स्थितींत ती बसली आहे तोंच बाहेरून कोणी तरी दार खडकावलें. जयश्री भानावर आली. तिनें कान दिला. चंबेलीचें रुदन ऐकूं येत होतें झटकन तिनें तो कागद एका गुप्त जागीं ठेवून दिला आणि पुढें होऊन दार उघडून दासीच्या कडेवरून आपल्या कन्येला घेतलें सर्व गोष्टी यंत्राच्या चालीनें झाल्या!

सर्व दिवसभर ती त्या तारेंत होती. संवय नसलेल्या मनुष्यानें भांगेचा पदार्थ सौम्य प्रमाणांत घेतला असतांही, त्याच्या डोक्याची स्थिति होते, तशीच स्थिति जयश्रीची झाली. भांग घेतलेल्या मनुष्या प्रमाणेंच तिच्याही डोक्यांत विचारांचा एकच गोंधळ उडाला. आतां हा विचार मग तो विचार, पुनः तो पुनः तो अशा धर्तीनें एकाही विचारावर तिचें मन स्थिर न राहिल्यामुळें पुढें काय याचें उत्तरच तिला सुचेना. क्षणांत तिला

चंबेळवाडीचें स्मरण व्हावें, क्षणांत त्या अद्भुत स्वप्नसृष्टीचे विचार मनांत यावेत. पुनः फर्जंदबेगाच्या भेटीचा प्रकार आठवावा. क्षणांत पित्याच्या निशाणाचें कथन ध्यानांत यावें. पुनः नाजुमीकडे गेल्याचें प्रकरण लक्षांत यावें क्षणांत त्यानें दिलेल्या कागदाचें स्मरण व्हावें आणि तो नाजुमी कोण तर ईसरसिंग याचा उलगडा व्हावा—कीं पुनः मागाहून निराळ्या विचारावर जावें. असें सारखें सुरू होतें. सोनाराच्या मांडलेल्या मनुष्याप्रमाणेंच ही गोष्ट अगदीं भोंवरा तोडीत तोडीत कोठला जाण्याप्रमाणें वाटावें, तो पुनः त्याच्या घेराचा तडाखा बसून थांबला नसून विलुकले! जयश्री अशाच गिरक्या घेत होती! मधून मधून ती कागदाच्या कोठापर्यंत येत होती! त्यावेळीं ती त्याचें पठणही करीत होती आणि पुनः मागाहून अथांग विचारांत लोटली जात होती.

दिवस गेला रात्र आली. रात्रीनें तिला निद्रा दिली नाहीं; पण तिच्या मनाला थोडी सांत्वना दिली. तिच्या मनाची मादकता बरीच कमी झाली. रात्रीच्या चवथ्या प्रहरानें तिला निजविलें. पहांटेच्या शांत निद्रेनें तिला प्रफुल्लसें वाटलें. प्रातःकाळीं उठतांच तिच्या मनांत आलें: आग्र्यास येण्याची आपली वास्तविक इच्छा नसतां आपलें आगमन घडलें त्याअर्थी त्यांत देवाच्या इच्छा कीं दैवाच्या इच्छा कांहीं तरी हेतु आहे. आतां मात्र मागाहून न जातां आपलें निश्चित कार्य करण्यास तत्पर असलें पाहिजे.

शय्यात्याग केल्यावर तिनें आपले मुखमार्जनादि विधि उरकले आणि नंतर नित्यनियमाप्रमाणें ती मेण्यांत बसून श्री गोपालजीच्या दर्शनास गेली. परत येतांना तिला एका दुकानाचे बाहेरचे कट्ट्यावर फर्जंदबेग बसल्याचें आढळलें. त्याबरोबर ती चपापली. या मनुष्याची व आपली एकवार भेट झालीच पाहिजे. असें तिला वाटलें. क्षणभरांत तिनें कांहीं विचार केला आणि मेणा थांबविण्याबद्दल हुकूम सोडला. मेणा थांबतांच तिनें दार किलकिलें करून बाहेर सोबत चालणाऱ्या दासीला अगदीं जवळ बोलावून तिच्या कानांत कांहीं सांगून तिची रवानगी केली. दासी तिकडे निघून गेली व मेणा पुढें चालू झाला.

जयश्री घरीं आली व दासीच्या पुनरागमनाची वाट पाहूं लागली

तिला फार वेळ संदेहांत रहावें लागलें नाहीं. दासीनें येऊन ह्मटलें, "तिसरा प्रहर नंतर त्यांनीं इथं येण्याचं कबूल केल आहे!"

"त्याचं नांव फर्जंदबेगच ना?" जयश्रीनें विचार करीत प्रश्न केला, "तुझ्या विचारण्यानें त्यांना कांहीं नवल वाटलं का?–त्यांनीं कांहीं चौकशी केली का?"

दासीनें ह्मटलें, "चौकशी कांहीं केली नाहीं. थोडा विचार मात्र केला."

जयश्रीनें दासीला तेथून जाण्याची परवानगी दिली. दासी गेल्यावर ती स्वगत ह्मणाली, "त्या स्वप्नासंबंधीं आतां माझा भ्रम दूर होईल! त्यांची माझी स्वप्नसृष्टींत भेट झाली असली तर ते इथं आल्यावर मला ओळखूं शकणार नाहींत आणि जर मागें झालेला चमत्कार सत्यसृष्टींतील असेल तर ते मला ताबडतोब ओळखतील! आतांपर्यंत अशा कांहीं नवलाच्या गोष्टी घडल्या आहेत कीं, त्यांतील खऱ्या कोणत्या आणि खोट्या कोणत्या? अथवा जागेपणींच्या कोणत्या आणि स्वप्नांतील कोणत्या हेंच मला कळेनासं झालं आहे! आतां तरी मी स्वप्नांनात आहे कीं जागी आहे कोणास माहीत? आग्ऱ्यास येण्याचें माझ्या मनांत कुठें होतं; पण मी आलेंच कीं नाहीं? देवाची काय इच्छा आहे कांहीं कळत नाहीं! खऱ्या खोट्याचा कांहींच उलगडा होत नाहीं. त्या कागदांत लिहलं आहे. शांत मनानं विचार कर ह्मणून. पण तो शांत विचार करूं तरी कसा?—पुढचं भविष्य काय आहे, कोण जाणे!"

असे विचार करीत जयश्रीनें तिसरा प्रहरापर्यंतचा काळ कसा तरी काढला. रात्रीं जागरण झालें असूनही तिला त्या दुपारीं, झोंप आली नाहीं. असो.

सांगितलेल्या वेळीं फर्जंदबेग खालीं देवडीवर आल्याची वर्दी आली. जयश्रीनें त्यास एका उघड्या दालनांत बोलावून घेतलें. प्रथमदर्शनींच उभयतांनीं एकमेकांस ओळखलें. फर्जंदबेग आपणास सत्यसृष्टींत, आपण चांगल्या जागृतावस्थेमध्यें असतां भेटला होता. हें जयश्रीनें तेव्हांच

जाणलें. महिलामर्यादेचें उल्लंघन न होऊं देतां तिनें त्यांस बसण्याची विनंति केली आणि स्वतः जरा बाजूस आसन घेतलें. तिच्या पुढ्यांत तिची मुलगी होतीच.

"आपण मला ओळखलें?" तिनें सौम्यस्वरांत प्रश्न केला.

"आपल्या उपकार कर्त्रीला इतक्या लौकर मी कसा विसरेन! फर्जंदबेग वात्सल्य पूर्ण दृष्टीनें धाकट्या चंबेलीकडे पहात ह्मणाला, "तुमची व माझी पाहिली भेट बहिरामगडी झाली. ती एकवेळच झाली आणि अल्पवेळच झाली तरी मी ती विसरलों नाहीं. मला वाटतें, या गोष्टीला फार तर महिना लोटला असेल!"

जयश्रीच्या संशयाला जागा राहिली नाहीं. तिला एकंदर वस्तु स्थितीचें फारच नवल वाटलें; पण त्यावेळीं तें बाहेर न दर्शवितां ती ह्मणाली, "हो, इतकेच दिवस झाले असतील. त्यावेळीं आपला जो परिचय झाला होता, त्याची मला आजही आठवण आहे. त्यामुळें तेव्हांपासून मला आपल्या विषयीं पित्याप्रमाणें आदर वाटतो. आज सकाळीं आपल्याला पाहतांच, आपली भेट घ्यावी, अशी मला फारच इच्छा झाली. आपल्या मनांत कांहीं शंका न यावी ह्मणून मी हें सांगतें आहे."

फर्जंदबेग किंचित हंसून ह्मणाला, "बेटा, तुझें नांव मी जणत नाहीं तरी कृति जाणतों. त्यावेळा तूं तेथें नसतीस तर मला त्रासच झाला असता. तुझ्या मुळेंच त्या दिवशीं माझी सुखरूप सुटका झाली! मी वृद्ध आहे. मनानें सुद्धां फकीर झालों आहे. माझ्या मनांत कसलीही शंका आली नाहीं बरें. तुझ्या दासीला विचारः तुझा निरोप येतांच मी मुका-ट्यानें येण्याचें कबूल केलें. ज्या भावानें तूं माझ्याकडे पहाते आहेस. त्याच भावानें मी तुझ्याकडे पाहतों आहे. बोल [illegible] अगदीं मोकळ्या मनानें बोल. कांहीं विचारायचें असल्यास मन मोकळेपणानें विचार. माझ्याकडे तुझें कांहीं काम असल्यास तेंही सांग. माझ्या शक्तींत असल्यास मी तें आनंदानें करीन."

फर्जंदबेगच्या या आश्वासनानें जयश्रीचें मन थोडें हलके झालें. तिनें ह्मटलें, "माझ्याकडे आपलें काम असें कांहीं नाहीं. कदाचित देवानें कांहीं

योजून ठेवलें असल्यास न कळे, पण आज— तरी मला तें ठाऊक नाहीं. आपली व माझी कुठं भेट झाली होती ह्मणतां?—

"बहिरामगडीं—" फर्जंदबेगानें चटकन् स्मरण दिलें.

"हो, बहिरामगडीं. तेथून आपली सुटका झाल्यावर आपण कुठें गेलांत? उदेपूरीं—मेवाडांत गेलांत. होय ना?"

"होय. आज काल मी महाराणा प्रतापाच्या कबरीजवळच एका शेतांत झोंपडी घालून राहिलों आहे." फर्जंदबेगाने ह्मटले. "दोन दिवस झाले, इथें आलो माझी मुलगी इथें आहे. ती आपल्या मामाजवळ राहाते. तिचा निरोप आल्यावरून—

"गुले हसीन त्यांचं नांव ना?' जयश्रीनें कौतुकानें मध्येच विचारिलें

"तुला काय माहीत?" फर्जंदबेगानें आश्चर्यानें प्रश्न केला.

"माझा त्याचा परिचय आहे. त्या माझ्या मैत्रीण आहेत."

"असें? वा! मग काय तुझे नातें देवानेंच योजिलेलें आहे, ह्मणायचे". फर्जंदबेगानें ह्मटलें, "मी अद्याप तिच्याकडे गेलों नाहीं. ती सुखरुप आहे ना? तिचा तांतडीचा निरोप आला ह्मणून मी आलों. पण अबदुल-खान माझा मेहुणा व तिचा मामा इथं नाही, बादशाहा बरोबर कुठं शिकारीला गेला आहे, असं ऐकलं ह्मणून मी त्याचे वाड्यांत न जातां एका मित्राकडे उतरलों आहे. अबदुलखान लौकरच परत फिरणार आहे, असं [illegible] तेव्हां तो आल्यावर त्याला व मुलीला भेटून व तिचें काय ह्मणणं [illegible] ऐकून नंतर मी पुन: मेवाडांतच जाणार आहे.".

जयश्रीनें सहज विच्यारलें, "आमच्या लोकांकडून पुनः कांहीं त्रास झाला नाहींना?—[illegible]लें आयुष्य तेथें सुखांत व शांततेंत जातें आहे ना ?" "अगदीं आनंदांत!". फर्जंदबेगानें ह्मटलें, "मेवाड भूमीचा गुणच आहे आनंद देण्याचा!—मला त्रास कसलाच नाहीं. माझ्यावर नजर मात्र असावी: पण त्यांन कांहीं विशेष नाहीं. रजपुतांविषयीं मला प्रेम असलें

तरी मी मुसलमान असल्यामुळें मेवाडच्या महाराण्यांनी तितकें जागरूक राहणें इष्टच आहे."

जयश्रीनें आदरानें त्याच्याकडे पाहात म्हटलें, "खरोखर, आपल्या मना प्रमाणें सर्व मुसलमानांचीं मनें असतीं, तर किती चांगलें झालें असतें!"

"ही दुनिया आहे! ती बहुरुपी असायाचीच. आम्हां मुसलमानांचीं मनें सरळ असती, प्रतापाच्या भावांनीच त्यास फसविलें नसतें, त्या थोर पुरुषास वेळोवेळीं साहाय्य मिळालें असतें इत्यादि असें झालें असतें तर असें घडून आलें असतें इत्यादि आशा करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मनुष्याची किंमत व्हावयाला असे विजोड देखावे नेहमीं घडलेच पाहिजेत! प्रतापी प्रतापाचा इतिहास जसा घडला, तसा तो घडला म्हणूनच त्यास महापुरुषत्व आलें. नाहींतर सामान्य वीरांत आणि त्यांच्यांत कांहींच फरक राहिला नसता.

असें त्यांचें सामान्य संभाषण सुरू झालें व त्यांत फर्जंदबेगानें आपली हकीगत सांगितली, जयश्रीची विचारून घेतली आणि मेवाडकरांनीं पुढें कसें बाणेदारपणानें वागावें, याचाही खल झाला. जयचंद आग्र्यास आला हें कांहीं बरें झालें नाहीं, असें फर्जंदबेगानें दर्शविलें आणि तें जयश्रीलाही पटलें.

इतक्यांत जवळच्या मशिदींतून असरच्या नमाजाची बांगेची पुकार ऐकूं येऊं लागली. त्याबरोबर फर्जंदबेग जाण्याचे उद्देशानें उठला. जयश्रीनेंही त्यास कांहीं हरकत केली नाहीं. फर्जंदबेगनें आपल्या मुक्कामाचा पत्ता सांगीत जातां जातां म्हटलें, "मी फकीर असल्यामुळें व माझा स्वभाव एकांतप्रिय असल्यामुळें मी आतां निष्कारण इथें येण्याचें करणार नाहीं. तुझें महत्वाचें कामच उपस्थित झालें व त्यांत माझी गरज अवश्यक झाली तर मला निरोप पाठीव. मी रात्रीं अपरात्रींही धांवून येईन! अल्लाची तुझ्यावर मेहर नजर असो." असा आशीर्वाद देऊन तो निघून गेला.

जयश्री विचार करीत बसली. फर्जंदबेगाच्या भेटीनें तिच्या मनांत एक मोठा संशयोद्भव झाला ! आणि त्या गोंधळांत ती आग्र्यांतील सर्व परिस्थिति विसरली.नाजुमीकडे जाणें,त्यानें दिलेला कागद, त्यांतील तें रहस्य इत्यादि सर्व गोष्टी तिच्या मनांतून नाहींशा झाल्या! जयचंदाच्या कपटप्रयो-गाचें जें एक जाड आवरण तिच्या मनावर पडलें होतें व ज्याच्या भ्रमामुळें ती सत्याला असत्य, समजत होती, तें आवरण फर्जंदबेगाच्या या पुनर्भेटीमुळें विरविरीत झालें–खिळखिळें झालें ! आतां या नव्या दृष्टीनें ती भूतकालांत घडून गेलेल्या त्या जुन्या देखाव्याकडे पाहूं लागली! पण हें पाहाणें तिला सुखावह झालें नाहीं. सत्यान्वेषण हें मूलतः चांगलें असलें तरी तें सर्व प्रसंगीं आणि सर्वांचे ठायीं सारखेंच सुखावह होतें, असा नियम नाहीं.

आतषबाजींतील चक्रास दोन उलट सुलट गति असतात.तें पेटविल्यावर एकदां एका बाजूनें फिरतें आणि त्या बाजूची दारू संपल्यावर लागलीच विरुद्ध बाजूची गति घेऊन तितक्याच जोरानें पुनः फिरूं लागतें. मनुष्याच्या मनालाही अशा दोन परस्पर विरुद्ध गति आहेत व प्रसंगोप्रसंगीं तें या गतीनें नाहींतर त्या गतीनें सारखें फिरत राहातें. त्यास एक नियमित गति नाहीं. समतोल दृष्टि नाहीं. त्यामुळेंच मनानें एकदां प्रेमाची गति स्वीकारल्यास, प्रेम अगर द्वेषाची गति स्वीकारल्यास द्वेष मनुष्यामनुष्यांत दिसून येतो. एखाद्या व्यक्तिविषयीं आपल्या मनानें विश्वासाची गति घेतल्यास, त्यानें आपल्या डोक्यांत धोंडा घालण्याची तयारी केली तरीं ती आपणास उमगून येत नाहीं याचें कारण मनाची त्याबाजूची धांव होय. त्याच मनाला त्याच्या विरुद्ध संशयाची गति मिळूं द्या कीं, अगदीं सहज साध्या गोष्टींतही विपरितपणा भासूं लागतो ! सूचिकाग्राएवढ्या आशेवर मनुष्य मनोरथाचे मोठमोठे महाल बांधतो याचें कारण एका गतीनें जोरांत फिरण्याचा त्याचा धर्म होय आणि अल्पशा निराशेनें जागचे जागीं चक्कणा-चूर होऊन अगदीं मृत होणें यालाही कारण पण तेंच होय.

याच नियमास अनुसरून जयश्रीच्या मनाला आतां उलट गति मिळाली. त्याचा भ्रम नष्ट झाला. त्याची ती गति संपली. सत्याकडे आतां त्याची गति झुकली आणि तिकडेच आतां तें धांव घेऊं लागलें

ती स्वगत ह्मणाली, "मी अनुभविलेलें वैभव स्वप्नांतील नव्हे. तें सत्य होतें! मला तेथें जाणून* बुझून नेण्यांत येत होते! मादकपदार्थांच्या सहाय्यानें हें कार्य सफाईनें घडत होतें आणि तेंही आपल्या पतीच्या अनुमतीने यांत शंका नाहीं. पण हें असें रहस्य कां गुपण्यांत यावें?—माझ्याशीं विनोद करण्या करितां? बरें हा जर विनोद ह्मणायाचा तर भुताटकीचे जे चमत्कार घडले, त्यांचें उत्तर काय? स्वप्नें जर खरीं नव्हत, तर भुताटकी तरी खरी कां मानावयाची? आणि ती जर खोटी तर पित्याचें पिशाच खोटें आणि त्यानें सांगितलेली हकीगतही खोटी असाच कयास नाहीं का बांधायचा?"

हाच विचार करीत ती सत्य शोधीत होती.

दुसऱ्या वेळीं तिच्या मनानें ही ही वाटाघाट केली. घडलेला सर्व इतिहास सर्वस्वी असत्य ह्मणायाचा तर आपल्या पतीनं त्यांत जो भाग घेतला होता, तोही काय खोटा समजायचा? त्यालाही विचित्र स्वप्नें पडतात असें तो सांगे तें काय असत्य? भुताटकीचा प्रकार त्यालाही खरा वाटे, तें काय त्याचें ढोंग? पिशाचाच्या आगमनावर व कथनावर त्याचाही विश्वास होता, तें काय मग त्यानें सोंग केलें?

या वाटाघाटीवर पुष्कळ विचार करूनही जयश्रीचें मन पतीला असत्य ठरविण्यास तयार होईना. जयचंदावरील तिचा विश्वास डळमळीत झाला; पण अद्याप त्यानें आपलें स्थान सोडलें नव्हतें आणि तसा तो स्थान भ्रष्ट व्हावा, अशी जयश्रीचीही पण इच्छा नव्हती. उलट त्याचें स्थान दृढ व्हावें, असाच तिचा प्रयत्न होता.

परंतु उलट गति मिळालेल्या मनाला तिचा हा भोळेपणा सहन होईना. तें तिला अनेक शंका काढून भंडावूं लागलें. स्वप्नांचे प्रकार खोटे, भुताटकीचा चमत्कार लटका, पित्याचें पिशाच ह्मणजे कांहीं तरी पोर-खेळ, असें जर तुला वाटतें आणि जयचंदाच्या वर्तनावरही जर तुझा विश्वास आहे तर एवढें मोठें हें कपट निर्माण केलें कोणी आणि कशाकरितां? सर्व प्रकार आठव, प्रत्येक गोष्ट नीट लक्ष्यांत घे आणि पहा बरें त्यांत तुझ्या पतीचा प्रत्यक्ष भाग किती आहे? मिखालस त्याच्याच अनुमति शिवाय

एवढा मोठा कपट प्रयोग यशस्वी होणें शक्यच नाहीं! मग तो तुझ्याशीं खोटेपणानें वागला नाहीं, असें समजण्यांत काय अर्थ आहे ? सर्व सर्व—माया जयचंदानें निर्माण केली आणि त्यानें तुला फसविलें आहे, हेंच खरें! हेंच याचें उत्तर !

पतीनें आपल्यास फसविलें ! पतीनें आपल्याशीं कपट केलें ! नाना प्रकारच्या भेंडामी लढवून त्यानें आपल्यास मोहांत पाडलें !–देवा ! देवा ! ! जयश्रीच्या हृदयास हें कसें सहन होणार !

ती चित्कारून स्वगतच ह्मणाली, "नाहीं—नाहीं ! माझे पतिदेव असे दुष्ट नाहींत! माझ्याशीं कपट करण्याचें त्यांना कांहीं कारण नाहीं! मला दुःख दिल्यानें त्यांना सुख होणार नाहीं!–नव्हे–हें कार्य त्यांचें नव्हे! हें कपट त्यांचें नव्हे !! "

पण तेवढ्यानें संशयाचा उद्भव निभणार कसा? तो पुनः उठून खड्या स्वरांत ह्मणाला, "मग घडला, हा प्रकार काय घडला कोणाकडून घडला आणि कसा घडला ? हें सांग ! कारण, त्या उत्तरावर तर आतां तुझें पुढचें सुखदुःख अवलंबून आहे ! "

याच वेळीं दुसरा संशय जन्म घेऊन ह्मणाला, "हो, ती एक गोष्ट. जयचंदानें ठाकुर ईसरसिंगाबद्दल ती घाणेरडी वार्ता सांगितली होती. ठाकूर साहेब मोंगलाच्या कृपेंत शिरले आहेत असें तुझ्या पतीचें अगदीं गंभीर सांगणें आणि इकडे नाजुमीच्या चिठ्ठींत येतें कीं, ठाकुर ईसर मोंगलांच्या कैदेंत आहेत ! तेव्हां खरें कोण ?

या दुसऱ्या संशयानें तिच्या सर्व विचारांची एक सरळ शृंखला तयार केली. त्यांतील एकेक दुवा इतका बिनतोड होता! तो सबळ पुरावा पाहातांच जयश्री हतबळ झाली! ती कळवळून ह्मणाली, "मग काय ? मोंगलांच्या वैभवाची त्याना चटक लागली आणि माझेंही मन तसेंच व्हावें ह्मणून त्यांनीं एवढा खटाटोप केला?—देवा! देवा ! ! एवढ्याच करितां का ते आम्याला आले! मोंगलांच्या वैभवाला ते भुलले एकूण ?

या कळवळ्याच्या प्रश्नास अंतरात्म्याचा नकार यावा अशी तिची इच्छा; परंतु ती पूर्ण होईना! जयचंद नीच आहे असाच जवाब आला.

# परिच्छेद ३५ वा.

## पुनः एकवार नाजुमीच्या गुहेंत !




रीराला असुख असलें तरी सुगृहिणीस आपल्या गृहांतील अव्यवस्था बरी वाटत नाहीं. अंगांत शक्ती नसली तरी आपल्या अल्पशा सामर्थ्याप्रमाणें ती कण्हत कुंथत व मंदगतीनें आपलें गृह स्वच्छ व सुव्यवस्थित करील. त्यावांचून तिला बरें वाटणार नाहीं. कीं स्वस्थ बसणार नाहीं. सुविचारी व गंभीर प्रकृतीच्या मनुष्याच्या मनाची गोष्टही अशीच आहे. त्याच्या मनांत कांहीं विशेष प्रसंगानें अविचारानें गोंधळ उडवून दिला तरी थोडा काळ लोटल्यावर तो आपलें मन स्वस्थ सुव्यस्थित केल्यावाचून राहणार नाहीं. जयश्री सुगृहिणी होती. त्याप्रमाणें सुविचारीही होती. तिच्या मनांत उद्भवलेल्या संशयास अंतरात्म्याच्या रुकाराचा जोर मिळाल्यामुळें कांहीं वेळ जरी तिचें मन क्षुब्ध झालें तरी विवेकानें तिनें हळू हळू तें शांत केलें. आपल्या पतीनें कांहींतरी नीच हेतूनें आपल्याशी फार मोठें असें कांहींतरी कपट केलें आहे तर आपणही त्याचें रहस्य उकलण्याचें तसेंच कपट लढवून, त्याचें पाप त्याच्या पदरांत घालावें असें तिला पहिल्या इसाळ्यांत वाटलें; परंतु तो विचार फार वेळ टिकला नाही. कपटाशीं कपट ही नीति इतरांशीं योग्य असली तरी पत्नीनें पतींशी तिचा व्यहवार करणें इष्ट होणार नाहीं. त्यापेक्षां तो येतांच सरळ पणानें त्याच्यापुढें सर्व गोष्टी मांडून त्यास त्याचा खुलासा विचारावा; म्हणजे यदाकदाचित् तो निरपराधी असेल तर त्याच्यावर खोटा आळ घेतल्याचा पश्चात्ताप आपणास होणार नाहीं, असा तिनें पोक्त विचार केला. संशयाघातानें तिचें मन अत्यंत व्यथीत झाले असलें तरी अविचारांत ती पडली नाहीं. त्यांत हसिनेच्या गोड स्वभावानेंही तिला बरेंच सहाय्य झालें.

त्या दोघींची पुनः भेट झाल्यावर ज्यावेळीं हसीनेनें आपल्या जुबेदीच्या मुद्रेवर चिंतेची छटा अवलोकन केली, त्यावेळी ती तिला एकदम ह्मणते "देखो, जुबेदी, तुह्मी अशा सतत चिंतातूर कां दिसतां बरं ?—जुबेदी, हंसा गडे तुह्मी!—छे, हें मनापासून नाहीं हंसला!"

"मन दुःखी असल्यावर व काळजींत असल्यावर खरं हसूं कसं बरं येईल ? तें इतपतच यायचं—" जयश्रीनें खेद मिश्रीत स्वरानें ह्मटलें.

"तुह्मी आत्तां या वेळी दुःखी अहांत का ?—नाहीं !—कारण तुमची जेवढी हकीगत मला माहित आहे, त्यावरून आजतरी तुमच्यामागें काळजी लागण्यासारखं किंवा तुह्मी इतकं चिंतेंत पडण्यासारखं कांहीं शुक्र-काष्ट तुमच्यामागं नाहीं असं मला वाटतं! वरं मागचं कांहीं दुःख आठवून तुह्मी दुःखी असाल ह्मणावं तर तसं कांहीं भयंकर दुःख तुमच्यावर कोसळलं असेल, असं दिसत नाहीं. त्यातून असलंच एखादं तर गतसंकटाबद्दल शोक करीत बसण्या इतक्या तुह्मी अविचारी दिसत नाहीं."

"भावीकाळांतील एखादं संकट डोकावत असेल तर!" जयश्रीनें किंचित् मिस्त करीत प्रश्न केला.

हसीना प्रेमादरानें तिच्याकडे पाहात ह्मणाली,"तुमच्यासारख्या अश्राप माणसावर एखादं संकट देव आणील. असं मला नाहीं वाटतं."

"आणि अगदीं येणारच असेल तर ?"

"त्याची काळजी देवाला" हसीनेनें एकदम ह्मटलें. पुढच्या संकटाला अगोदरपासून भीत राहणें हें दुसऱ्या एखाद्या मनुष्याला शोभेल. माझ्या जुबेदीला मुळींच नाहीं शोभणार! आणि कुणाला माहित पुढं येणारं संकट कशा पंखी आहे तें? कदाचित तें सुख परिणामीं असेल तर ?—सर्व संकटें काय सदा दुःखच देणारीं असतात ?—मुळींच नाहीं. काहीं संकटें तर निव्वळ मनुष्याचं कल्याण व्हावं' या हेतुनेंच येतात. जुबेदी, अगोदर तुमच्यावर संकट येणार नाहीं आणि आलंतरी ते तुम्हाला दुःख देणार नाहीं खात्री बाळगा!"

हसीनेच्या या बोलण्याला कांहीं सबळ पुरावा होता, अशांतला भाग नाहीं; पण जयश्रीला तें पटलें. व ती गेल्यावर तिनें त्याच विचार सरणीवर आपल्या मनाचें शांतवन केलें. आपल्या पतीला सर्व हकीगत विचारून त्याचा खुलासा मिळेपर्यंत मनांत नाहीं मनांत नांहीं ते पिकल्प आणावयाचे नाहीत, असा तिने निश्चय केला आणि त्यामुळे तिला पुष्कळ बरेंही वाटले. असो.

असे तीन दिवस लोटले. उद्ईक नाजुमीकडे जावयाचें आहे. प्रातः-काळी लौकरच या असा हसीनेचा निरोप आला. त्याबरोबर बाकीचे विचार नाहीसे होऊन तिच्यामनत तिकडचे विचार घोळूं लागले. नाजुमीनें दिलेली चिठ्ठी तिनें पुनःएकवार वाचली व त्याविषयीं विचार त्यांतही तिला एक तोड सुचली. नाजुमी हा ईसरसिंगच आहे कशावरून ? अशी तिला शंका आली आणि ह्मणून तिने त्यास आणखी एक चिठ्ठी लिहिली ती अशीः—

" तुमचा मंत्र वाचला विचार केला. शंका आली तुमच्या ह्मणण्याला सत्यता काय ? तुमचे खरे रंगरूप कोणालाच माहीत नाही. तुह्मी त्याबद्दल खात्री करा मी पुनः विचार करीन. "

चिठ्ठी अशा मोघम होती कीं, कोणापरक्याच्या हातांत पडली तर त्याला त्याबद्दल कांही शंका येऊं नये आणि उमजही पडूं नये या युक्तीनेंही जयश्रीच्या मनाला थोडें समाधानच वाटलें.

दुसरे दिवशी प्रातःकाळीं ती मेण्यांत बसून हसीनेच्या गृहीं गेली व नंतर तेथून दोघी मैत्रिणी एका रथांत बसून नाजुमीकडे गेल्या.

शिरस्त्याप्रमाणें दर्शकांच्या महालापर्यंत त्यांची रवानगी झाली पहिल्या प्रसंगी त्यांचें अंतःकरण जितकें सभय होतें, तितकें यावेळी नव्हतें. आज ह्या मोकळया मनानें इकडे तिकडे उत्सुकतेने पाहूं लागल्या. हसीनेनें पहिल्यावेळी पाहिलेल्या स्त्रियांपैकीं ती एक ओळखीची वाटणारी सुंदर

तरुणी मात्र जमलेल्या स्त्रियांत दिसत होती. बाकीच्या सर्व नव्या व अनोळखी होत्या.

त्या सुंदर तरुणीला; आजही त्या मेळ्यांत पाहून हसीनेस बरेंच आश्चर्य वाटलें. अद्यापीही तिच्या चर्येची नक्की ओळख तिला पटली नव्हती. चेहरा अगदीं परिचयांतील वाटत होता. ती आपल्याकडे पाहात नाहीं, असें पाहून हिनें तिच्या मुद्रेकडे सारखें निरखून पाहून तिची ओळख पटविण्याची शिकस्त केली.

इकडे जयश्रीही स्वगत कांहीं विचार करीत सगळीकडे पाहात असतां तिचीही नजर त्या तरुणीवर गेली. तिलाही तो चेहरा ओळखीचा वाटला. तिनें हळूच हसीनेच्या कानांशीं लागून म्हटलं, "ती तरुणसुंदरी पाहिलीस का ?—कोण आहे बरं ती ?—अगदीं ओळखीतील वाटते!"

हसीनेनें आश्चर्य करीत उत्तर दिलें, मींही त्याचाच विचार करित्यें आहें पण लक्ष्यांत नाही येत."

जयश्री पुनः त्याच स्वरांत म्हणाली, "ती कांहीं फार सुंदर नाहीं दिसत पण तिच्याकडे सारखें पहावेंसें वाटतें नाहीं ?"

हसीनेलाही ही गोष्ट पटली. इतक्यांत त्या तरुणीचें या दोघींकडे लक्ष्य गेलें. आपल्या संबंधींच त्या दोघी कांही टिका करीत असाव्या असा तिला संशय आला असावा. त्याबरोबर पूर्वीप्रमाणेंच ती हसीनेकडे पाहून कांहीं खुणेने हंसली आणि त्यांच्या दृष्टींतून बाजूला झाली! याचवेळीं हसीनेच्या डोक्यांत एक कल्पना झळकली आणि तिच्या तोंडून 'वाः!' असा आश्चर्योद्गार सहजीं बाहेर पडला. जयश्रीनें तो ऐकला. तिनें त्याबद्दल तिला प्रश्न केला. पण हसीनेनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. तिची हंसती नजर मात्र त्या तरुणीच्या आगेमागें फिरूं लागली.

इतक्यांत नाजुमीकडून त्या दोघींना बोलावणें आलें. त्याप्रमाणें त्या तिकडे जाऊं लागल्या. वाट त्या तरुणीच्या अंगावरून होती. जयश्री झपाट्यानें पुढें गेली; पण हसीना तिच्याजवळून जायला आणि तिनें वळायला एकच गांठ पडली. अगदीं चांगली भेट झाली. ती

तरुणी गालांतल्या गालांत हंसत हसीनेच्या कानांत ह्मणाली· "देखो गिरोगी हो!" असें ह्मणत तिनें तिची करांगुली दाबली आणि बाजूला केलें! हसीना गोंधळलेल्या चित्तानें जयश्रीच्या मागोमाग गेली.

झालेला प्रकार इतका क्षुल्लक होता कीं, तो त्या दोघीखेरीज--हसीना व ती तरुणी यांचेखेरीज—कोणाचेंही लक्ष्यांत आला नाहीं; पण त्यामुळें हसीनेच्या मनावर फारच परिणाम झाला. तिचें मन त्या तरुणीच्या मागोमाग गेलें. असो.

दोघींही—हसीना व जयश्री—नाजुमीच्या खोलींत पडद्याजवळ जाऊन उभ्या राहिल्या. यावेळीं जयश्रीनें आपला हात चिठ्ठीसह पुढें केला.

कांहीं वेळानें तिच्या हातावर दुसरी चिठ्ठी पडली तिनें हात मागें घेतला· व ती उठली व मुकाट्यानें बाजूला झाली. आंतून कांहीं प्रश्न आले नाहींत. जयश्रीला कांहीं बोलावें लागलें नाहीं. तिनें हसीनेला पुढें सारून आपला हात दाखविण्यास सुचविलें. त्यावेळीं आंतून उत्तर आलें, " प्रेमाच्या बाबतींत हसीनेला प्रथम कांहीं होणार असलें तरी मागून सौख्य होणार आहे. अल्लावर विश्वास ठेऊन तिनें स्वस्थ असावें."

लागलीच त्याना जाण्याची आज्ञा झाली व त्या परत फिरल्या खोलीं तून बाहेर पडतांच हसीनेची नजर त्या तरुणीस शोधूं लागली पण ती तिला आढळली नाहीं, दोघींही चक्रव्यूहांतून बाहेर आल्या व रथांरूढ झाल्या.

जयश्री त्या नव्या चिठ्ठींत काय असेल, य. विचारांत होती. हसीनाही आपल्या विचरांत होती. बराचवेळ कोणी कांहीं बोललें नाहीं.

मध्येंच जयश्रीला त्या तरुणीचें स्मरण झालें तिनें हसीनेस प्रश्नकेला "हसीनबी, त्या तरुणीची मग ओळख पटली का तुह्माला?"

तो प्रश्न ऐकतांच हसीना समजून येण्याइतकी दचकली. ती एकदम चाचरत ह्मणाली, "त्या-त्या होय. ते-ते—काय नाहीं· बाई ओळख पटली." इतकें बोलून तिनें साशंकपणें जयश्रीच्या मुखाकडे पाहात प्रश्न केला. "तुह्माला पटली काहे ?--को[illegible]त्या त्या ?"

" छे, मला तिची चर्या ओळखीची वाटली. तिची माझी कुठं भेट झाली होती कांहीं लक्ष्यांत नाहीं येत." जयश्रीनें म्हटलें, " बाकी तिच्याकडे पाहण्यासारखं असं तिच्यांत कांहीं तरी होतं एवढं मात्र खरं ! "

" तें काय बरं ? "

" तें कांहीं सांगतां नाहीं येणार !

पुढें तो विषय तितकाच राहिला. कारण दोघींचे मुक्काम जवळ आले जयश्री नंतर अत्यंत त्वरेनें आपल्या घरीं आली. आणि तिनें त्याच घाईत एकांत गांठला व अत्यंत उत्कंठेनें ती चिठ्ठी उलगडून पाहिली त्यांत असा मजकूर निघाला.

> "––तुझी शंका बरोबर आहे माझी बरोबर ओळख पटविण्याचें साधन कांहीं योजून ठेवितों. बंधमुक्त होण्याचें आणखीही कांहीं उपाय मी आंखून ठेविले आहेत. देवानें त्यांपैकीं उद्यां ठरविलेल्या मार्गानें यशस्वी केलें तर तुझ्या सहाय्याची अपेक्षा राहणार नाहीं. बहुतेक उद्यां मी निसटून जाईन, अशी खात्री वाटते. नाहींच जमलें तर मर्जी प्रभूची. तूं मात्र मेवा-वाडांत गेल्यावर माझ्याविषयीं कोणी काळजींत असल्यास मी कोठें आहे तें त्यांना कळीव."

या मचकुरांत खात्रीलायक असें कांहीं नव्हतें. तरीपण त्यांत जयश्रीला सरळपणा दिसला. ठाकूरईसरसिंग नाजुमीच्या वेषांत आहे असें तिला वाटूं लागलें. व कदाचित् तो तोच आहे, असें सिद्ध झाल्यास व त्यास आपल्या मदतीची गरज लागल्यास, आपणास ती कोणत्या मार्गानें करतां येईल, याचा विचार ती करूं लागली. या विचारांत ती इतर सर्व विषय विसरून गेली व आपल्या पतीला ही बातमी कळली तर तो हरप्रयत्न करून ठाकुरसाहेबास सोडवून नेईल, असें तिला वाटलें.

# परिच्छेद ३६ वा.

## जमुनेच्या पात्रांत!





निशानाथाची सत्ता सुरू होऊन सुमारें प्रहर लोटला होता. त्याच्या शांत किरण वर्षावांत काळी जमुना संथपणें वाहात होती, तिच्या संथप्रवाहास विशेष अडथळा न करितां अनेक नौका तरंगत होत्या, त्यांच्या मंद मंद हालचालींनें अनंत लहरी निर्माण होऊन सर्पगतीनें वळवळत होत्या आणि त्यांच्या पाठीवर चंद्राकिरणें खेळत होतीं! चंद्रकिरणांतील सुधापिऊन निशेला गुंगी आली होती आणि वनश्री मुग्ध झाली होती. पण त्याचा परिणाम नौकाविहारास जमलेल्या मानवांमध्यें मुळींसुद्धां उमगून येत नव्हता. त्यांच्या विलासोन्मुख मनाला मद्याच्या मादकतेची मदत मिळाल्यामुळें चंद्रिकेतील शांततेचा परिणाम त्यांच्यावर अगदीं विपरित झालेला दिसत होता. एकमेकींशीं लाडक्या झोंबाझोंबी करण्यांत लहरींचा दिसणारा खुळेपणा आणि त्यांच्या पाठीच्या हिंदोळ्यावर बसून बागडणाऱ्या चंद्रकिरणांचा थिल्लरपणा पाहून रसिक मनाला जेवढा आनंद वाटला असता, • तितकाच नौकाविहार करणाऱ्या लोकांतील उच्छृंखलपणा पाहून तिरस्कार वाटला असता. ! नावेंत बसून मौजा उडविण्याचे जे जे कांहीं प्रकार होते, त्यांचे बहुतेक सर्व प्रकार लहानमोठ्या प्रमाणांत सर्वत्र दिसत होते. एका नौकेंत गाणें बजावणें सुरू होतें तर दुसऱ्या नौकेंत जुगाराचा अड्डा जमला होता. तिसऱ्या एका स्थानीं भांडाच्या नकला सुरू होत्या तर चवथ्या एका ठिकाणा नाचाचा रंग उडाला होता. मद्यप्राशन तर सर्रास चालू होतें! असो.

मागें सांगून ठेविलेंच आहे कीं, अमीर उमरावांच्या घरच्य स्त्री यांना नौकाविहार करण्याकरितां यमुनेचा कांहीं भाग आंखून ठेवण्यांत आला होता त्याच भागाच्या सीमेवर दहबारा पुरुष मंडळींची एक नौका इकडे तिकडे फिरत होती. येथून पंचविस हातांच्या अंतरावर जनान्याचें जलक्रीडांगण व त्याच्यापलीकडे एखाददुसरी स्त्रीमंडळाची नौका अस्पष्ट स्वरूपांत दिसत होती. पुरुष मंडळी तरुण असून विनोदाच्या गप्पाखेरीज नौकाविहाराचें दुसरें कोणतेंही साधन त्यांनीं आणल्याचें दिसत नव्हतें.

मध्येंच एका कविराजांनी खालील कविता ताल सुरावर ह्मणण्यास प्रारंभ केला.

कनक बरन बाल नगन लसतमाल
मोतिन के माल उर सोहैं भली भाँती है।
चन्दन चढाई चारु चंदमुखी मोहिनीसी
प्रात ही अन्हाई पगुधारे मुसुकाती है।
चुनरी विचित्र स्याम सजि कै मुबारकजू।
ढाँकि नख सिख तें निपट सकुचाति है।
चन्द्रमैं लपेटी कै समेटिके नखत मानो
दिनको प्रणाम किये राति चली जाति है॥ *

*—सोन्याप्रमाणें मनोहर वर्णाची आणि काळया नागिणीप्रमाणे शोभणाऱ्या कुरळ केशांची ही सुंदरी वक्षःस्थलीं मोत्यांची माळ धारण करून कोठेंवरें चालली आहे ? मोहिनीप्रमाणें सुंदर असणारी ही चंद्रमुखी अंगाला चंदन लावन संध्यारागास लाजविणारी तिची ती कोमल पावलें टाकीत व गालांतल्यागालांत सलज्ज हंसत कोणीकडे जाते आहे बरें ? टिकल्या टिकल्याची काळी चुनडी परिधान करून लाजत मुरकत जाणारी ही युवती कोण बरें ?—समजलों, मुबारक, ( कवीचें नांव ) चंद्राशीं एक-जीव झालेली निशाच जणूंकाय दिवसास नमस्कार करून ( आपल्या प्रियतमाकडे ) जात आहे.

हें सरस गीत ऐकतांच सर्वांचीं हृदयें हर्षोत्फुल्ल झालीं व त्यांनीं आनंदाचा जयजयकार करून हर्ष प्रकटही केला.

अगदीं याच वेळची गोष्ट,

त्या नावेपासून पलिकडच्या बाजूनें दहापंधरा हाताच्या अंतरावर एक लहान होडी स्त्रियांच्या भागाकडे झपाट्यानें जात होती. होडींत दोन व्यक्ती होत्या. एक होडी वल्हवणारा आणि दुसरी एक अवगुंठित तरुणी !

तरुणमंडळीची दृष्टी तिकडे वळण्यास अणुमात्र समय लागला नाहीं. दोघांतिघांनीं एकदम कल्लाकरून म्हटलें, "वो देखो ! वो देखो—"

**चंद्रमें लपेटी कै समेटीके नखत मानो**
**दिनको प्रणाम किये राति चली जाति है।**

आपल्यावर सर्वांची नजर पडलेली पाहतांच कदाचित् पाठलाग होईल या भीतीनें त्या तरुणीनें होडीवाल्यास नाव जलद चालविण्याविषयीं सुचविलें; पण याचवेळीं तरुणमंडळी कडून 'ये मल्लाह ! ए होडीवाला होडी खडी करो !" असा हुकूम सुटला. तरीहो तिकडे लक्ष्य न देतां त्या होडीवाल्यानें जोराजोरानें वल्हीं मारण्यास प्रारंभ केला. त्या बरोबर तरुण मंडळींनीं आपल्या वल्हीं मारणारांना जलदी चालविण्याचा हुकूम केला. पाठलागास सुरूवात झाली ! त्या दोघांचें होडगें पुढें व ह्या मंडळींची नाव तिच्यामागें अशी धांवपळ सुरूं झाली ! इतक्यांत होडीवाल्याचें एक वल्हें आपटून मोडलें !

"सरकार ! आतां काय करायचें ?" होडीवाल्यानें घाबरून त्या तरुणीस प्रश्न केला.

"जनानखान्याच्या हद्दींत होडगें घाल ! चल आपट—" आपल्या घुंगटांतून मागच्या नावेवर नजर टाकीत त्या तरुणीनें म्हटलें, "हं—चालव ! ती आली बघ !"

"सरकार—" होडीवाला समोर पहात म्हणाला, "तो पहा समोर. कुणाचातरी जनाना इकडचे यतो आहे. मला तिकडे आपली होडी नाहीं नेतां येणार.

त्या तरुणीनें समोर पाहिलें. खरेंच एक नांव मंदगतीनें तिकडेच येत होती. होडीवाल्यानें आपली होडी थांबविली. मागची नावही आली. त्या तरुणीनें इकडे तिकडे पाहिलें व अस्पष्ट स्वरांत स्वगत म्हटलें, "छे, सर्व मंडळी माझ्या परिचयांतील आहेत. त्यांच्या तडाक्यांत सांपडणें इष्ट नांहीं होणार! काय बरं करावं?—" पुन: तिनें इकडे तिकडे पाहिलें. दोनचार पळांचाच काय तो अवधि! तेवढ्यांत काय तें ठरविलें पाहिजे. नाहींतर सत्त्यानाश! तरुणीनें मागच्या नावेवर नजर टाकीत त्वरेने आपलीं वस्त्रें आवरलीं! काचा मारला!

"आपण उडी टाकणार?" होडीवाल्यानें घाबरून विचारलें, "पाणी इतकें खोल आहे! पोहण्याचा टिकाव धरवणार नाहीं.—"

इतक्यांत त्या नावेचा घोडा या होडक्यावर येऊन आदळला आणि त्या धक्क्यांतच त्या अवगुंठिता तरुणीने धाडस करून यमुनेच्या पाण्यांत सुळकांडी मारली! "अरे यार! ये तो गज़ब हुवा!!" तरुण मंडळीच्या तोंडून उद्गार निघाले आणि सर्वजण आश्चर्यचकित दृष्टीनें सपाट्यानें पोंहत जाणाऱ्या त्या तरुणीकडे पाहूं लागले!

एकदां वचन दिलें होतें ह्मणून आणि आजही हसनिेचा फारच आग्रह पडला म्हणून जयश्रीनें नौकाविहारास येण्याचें कबूल केलें. वास्तविक असले विहार उपभोगण्याइतकें तिचें मन प्रसन्न नव्हतें. ती आतां आली ह्मणजे केवळ हसनिेच्या खुशीकरितां. पण यमुनेच्या पात्रांत आल्यावर चांदण्याची मौज पाहून तिला बरेंच समाधान वाटलें.

त्यांची नाव चांगली प्रशस्त, शोभिवंत आणि मालकीची असल्यामुळें त्यांतील सुखसोई जयश्रीस साहजिकच आवडल्या. हसीनेनें आज आपल्याबरोबर मंडळीही अगदीं थोडी ह्मणजे दोन चारच घेतली होती. एक विश्वासू दासी आणि नांव चालविण्यास चार खोजे. गायनवादनाची सामुग्रीही घेण्यांत आली होती.

प्रथम कांहींवेळ हसीनाच गात होती. पुढें जयश्रीलाही लहर आली व तिने मीराबाईचें खालील प्रेमळ पद ह्मणण्यास प्रारंभ केला

बसो मेरे नैननमें नंदलाल ।
मोहन मूरति सांवारि सूरति, नैना बने विसाल ।
अधर सुधा रस मुरली राजत उर बैजन्ती माळ ॥
छुद्र घंटिका कटि तटि शोभित नूपुर शब्द रसाल ।
मीरा प्रभु संतन सुखदाई भक्त वछल गोपाल ॥
बसो मेरे नैननमें नंदवाले ।

गाण्याच्या शेवटच्या ओळीलाच तिच्या हातावर हात ठेऊन तिला एकदम थांबवीत म्हटलें, " जुबेदी, थांबा—थांबा ! तें पाहिलं का ? पाण्यांत कोणी पडलय अन् पोहत इकडंच येतंय " एवढं बोलून तिने आपल्या खोऱ्यांना नाव तिकडे नेण्यास सांगितले.

सर्वांनींच उत्सुकतेनें त्या तरुणीकडे नजरा लावल्या.

लौकरच त्या तरुणीचा व नावेचा समेट झाला. तात्काल तिला वर ओढून घेण्यांत आलं. सकृद्दर्शनींच ओळख पटली! नाजुमीच्या गुहेंत त्या तरुणीला त्या दोघींनी—जयश्री व हसीना यांनी—पाहिलें होतें. हसीनेला तर तिची चांगली ओळखही पटली होती. त्यामुळे ओळख पटतांच हसीनेला फारच आश्चर्य वाटले व ती एकदम उद्गारली, " तुम्ही ? इथं ? आशा स्थितींत ? "

पण जयश्रीने मध्येंच म्हटलें, " त्यांना कोरडें नेंसण्यास देण्याची अगोदर व्यवस्था करा. " आणि मग त्यांना काय विचारायचें आहे तें विचारा ! "

तोंपर्यंत इकडे ती तरुणी गारठली होती. व गोंधळीही होती.

इतक्यावेळांत हसीना भानावर आली व तिनें तिला वस्त्रें देण्याच्या गडबडींत तिच्या कानाशीं लागून अगदीं हलक्या स्वरांत म्हटलं " तुम्ही आतां बेशुद्ध होण्याचें सोंग घ्या. तरच दोघांची अब्रू बचावेल "

त्या तरुणीला ती सूचना पटली व तिनें ती अमलांतही आणिली.

त्याच्या नावेनें लौकरच ती गांठली.

# परिच्छेद ३७ वा.

## धिःक्कार!




तरुणीशीं आपल्या दासीचा अगर जयश्रीचा साक्षात संबंध मुळींच येऊं नये, याबद्दल हसीना फारच दक्ष दिसली. तिला नावेंत घेतल्यापासून आपल्या वाड्यांत जाईपर्यंत आणि पुढेंही जयश्री तेथून आपल्या गृही गमन करीपावेतों हसीनेनें त्या दोघींचा निकट संबंध येऊं दिला नाहीं. तिची शुश्रूषा करण्याकरितां अगर तिला आपल्या महालांत नेईपर्यंत तिनें आपल्या दासीचेंसुद्धां शक्य तितकें कमी सहाय्य घेतलें. अर्थात्‌च तिला या गोष्टीकरितां अनेक हिकमती लढवाव्या लागल्या! त्यापैकीं कित्येक गोष्टी जयश्रीच्या लक्ष्यांतही आल्या; पण तिनें त्यांचा अर्थ वांकडा तिकडा घेतला नाहीं. आपल्या मैत्रिणीची ती चमत्कारिक परिस्थिति पाहून हसीना गोंधळून गेली आहे; एवढीच एक साधी कल्पना मनांत आली. त्या तरुणीचा चेहरा तिला ओळखीचा वाटला व ती कोण असावी ? यमुनेच्या पात्रांत ती एकाएकीं कोठून आली.? इत्यादि विचार तिच्या मनांत आले; पण त्यावेळीं त्याची विशेष चौकशी अगर वाटाघाट न करितां ती आपल्या वाड्यांत निघून गेली.

जयश्री गेल्यावर हसीनेनें दासींचीही बोळवण केली आणि महालाचें द्वार बंद करून घेतलें. एकांत मिळताच त्या तरुणीची बेशुद्धीही संपली. हसीना तिच्या जवळ आली. दोघींची [illegible]ट झाली. [illegible]घींनाही हसूं आलें. दुसऱ्याक्षणी या तरुणीनें हसीनेस [illegible]कारानें [illegible]लिंगन देऊन, आपल्याजवळ बसवून घेतलें. हसीना लाजली, [illegible]न

बऱ्याच वेळानें हसीनेनें वर पाहात ह्मटलें, " आपण हें धाडस कां करावयाचं बरं !

त्या तरुणीला विचार पडलेला दिसला.

हसीना पुढें म्हणाली. " आपण हें असं कां सोंग घेतलं आहे पुन: ? हें कुणाला समजलं तर काय अनर्थ होईल माहित आहे ना ? आमच्या जुबैदीबाईची अन् आपली ओळख आहे वाटतं ? त्यांना ती पटली असती ह्मणजे काय झालं असतं बरं ? खरंच, हें धाडस आपण कां केलं ? "

" हसीने, तुझ्याकरितां—केवळ तुझ्याकरितां ! " त्या तरुणीनें ह्मटलें.

" माझ्याकरितां ?—" हसीनेनें आश्चर्यानें प्रश्न केला. प्रथमत: तिला हें उत्तर पटलें नाहीं तरी मागून तिला वाटलें, असेलही तसें ! आणि या विचारानें तिला आनंदही झाला. ती प्रेमानें आपल्या प्रियकराकडे ( ती तरुणी दुसरें कोणी नसून स्त्रीवेषधारी मानसिंग होता. हें चाणाक्ष वाचकांना ताडलें असेलच. ) पाहात ह्मणाली, " माझ्या भेटीकरितां आपण हें भयंकर धाडस केलं ? आणि याचा परिणाम भलताच कांहीं झाला असता तर ? जुबैदीनेंच आपल्याला ओळखलं असतं तर ? "

" जुबैदी ?—जुबैदी कोण ? " मानसिंगानें आश्चर्यानें विचारिलें. हसीनेनें त्याचा खुलासा केला. तेव्हां त्यानें ह्मटलें, " जयश्री होय ! हो, ती मजकडे रोखून रोखून पाहात होती खरी. तिचें आमचें थोडें नातेंही आहे.—पण त्याला कांहीं उपाय नाहीं. तुझी भेट घेण्याची मला इतकी अनावर उत्कंठा लागली कीं, वाटेल ती युक्ति करून तुझ्यापर्यंत येणं मला भागच होतें. "

अ[illegible]हीं खोटें [illegible]न हसीनेला फसविणें मानसिंगाला अगदीं भाग होतें. [illegible]ला त्याब[illegible] मोठें वाईट वाटलें; पण वाईट वाटून करणार काय ? आ[illegible] स्त्रीवेषा[illegible] खरा हेतू त्यास निदान यावेळीं तरी खुला करता ये[illegible]

पुढें त्यानें दुसरें कांहीं बोलणें काढून तो विषय अगदीं उडवून दिला. अल्प कालांत तें जोडपें आपल्या प्रेमालापांत दंग झालें !

* * * *

दोन दिवस झाले ! दोन दिवसाच्या सूर्योदय सूर्यास्तांत अनेक भ्रमर बंदींत पडले आणि मुक्तही झाले परंतु मानसिंग भ्रमर मात्र हसीनेच्या बाहुबंधनांतच जखडून पडला होता. या बंधनांत त्याला सुखही होतें व दुःखही होतें ! कांहीं अंशानें दुःखाची मात्राच जास्त होती. कारण हसीनेचा मामा परत आला होता व मामीही आपल्या भाचीच्या नव्या व संकटग्रस्त मैत्रिणीची गांठ घेण्यास भारी उत्सुक होत्या. दासी गणांत ही नेत्र पल्लवी सुरू झाली होती ! पाण्यांत पडून सांपडलेली ही तरुणी कोण व ताईसाहेबांचें व तिचें एवढें रहस्य कसलें ? ही समस्याही जास्त जटील होत चालली होती. तात्पर्य हसीनेच्या बाहुलतेच्या बाहेर संकटाच्या सुऱ्या पाजळत चालल्या आहेत, याची जाणीव कमळाला व भ्रमराला दोघांनांही असतां, कमळ प्रफुल्लित असूनही भ्रमर उडाला नाहीं आणि सुटकेच्या सूर्याकडे कमळानें पाहिलें नाहीं !

तिसरे दिवशीं प्रातःकाळींच हसीनेला एक काळजी करण्यासारखी इत्तला मिळाली. कांहीं महत्वाचें बोलणें बोलण्याकरितां तिचा मामा अबदुलखान तिच्याकडे येणार असल्याचें एका दासीनें येऊन कळविलें !

इष्काचा हवास उडून गेला ! कमलाचें तोंड क्षणांत सुकून गेलें आणि भ्रमर उडून जाण्याकरितां भडपडूं लागला.

आतां मानसिंगाच्या अंतःचक्षूपुढें अनेक आठवणी चमकूं लागल्या. आपण वेळींच न पोंचल्यामुळें ठाकुरसाहेबांची किती निराशा झाली असेल. आपल्या गैरहजेरीमुळें त्यांना किती कुशंका आल्या असतील; उदेपूरच्या दरबारीं आपली नेमणूक झाली आहे, तिकडे आपणास लौकरच हजर झालें पाहिजे; आपण दोनतीन दिवस गुप्त असलेले पाहून आपल्या घरच्या मंडळींना ( सुभ्राजी व मैनलदेवी अद्यापि आग्र्यांतच होती. ) काय वाटत असेल आणि अरे देवा ! आपण उघडकीला आलों तर ? बस्स ! शेवटच्या विचारानें त्यास वेड लागण्याची वेळ आली !

क्षणाचें स्वर्गसौख्य भोगलें ! लगेच निरय लोकांतील अग्निकुंडाच्या विषारी ज्वाला मनाला चाटूं लागल्या ! शिरीष कुसुमांच्या शय्येवर अल्पकाळ शयन केलें नाहीं तोंच, तीक्ष्ण कंटकांचा पंजर हाताच्या आटोक्यांत दिसूं लागला ! प्रेयसीच्या अधरामृताचे थोडेसे घोट घेतले असतील नसतील तोंच हाडवैऱ्याच्या तलवारीचें टोंक नरडीवर नाचूं लागलें ! केवढा हा दैवाचा विलक्षण दुर्विलास ! कोणत्या दुष्ट ग्रहांनीं हा असा सुखदुःखाचा रेशमी सरक फांस तयार केला होता !

हसीना घाबरून गेली. मानसिंग गोंधळून गेला. दोघांनाही वियोगाची इच्छा अनावर झाली. पण मार्ग सांपडेना !

अशा स्थितींतच अबदुलखान तेथें येऊन दाखल झाला ! लज्जेच्या लालींत हसीनेचा नूर विरघळून गेला ! मानसिंगाची छाती भयाचा नगारा वाजवूं लागली.

स्त्रीवेषधारी मानसिंग आपली ओढणी तोंडावर ओढून कोपऱ्यांत जाऊन बसला. हसीना लज्जावंत मुखानें आपल्या मामाशेजारीं उभी राहिली. अबदुलखान एका कोचावर बसून तिच्याशीं बातचीत करूं लागला. प्रथमतः त्यानें कांहीं कुशल प्रश्न विचारून फर्जंदबेग आल्याचें सांगितलें.

कांहीं न बोलतां हसीना त्याचें सांगणें ऐकत होती.

अबदुखानानें ह्मटलें, " हसीन, तुझे वडील यावेळीं येथें आले हें फारच चांगलें झालें. वास्तवीक मीच त्यांना बोलवाणार होतो, पण तेच आले हे बरें झालें. मग तुझ्या शादीचें जुळवायचें ना ?--आतां उगीच वेळ लावण्यांत कांहीं फायदा नाहीं. आज तिसरा प्रहरीं मोहबतखान आपल्याकडे येणार आहेत. त्यावेळीं माझ्या मनांत शादीचें बोलणें पक्कें करून टाकायचें आहे. "

आपल्या भाचीनें कांहीं बोलावें ह्मणून तो थांबला; पण हसीना कांहीं बोलली नाहीं. पण यावेळीं तिची तिरपी नजर मानसिंगाच्या घुंघुटांतून सरळ तिच्याकडे येणाऱ्या नजरेशीं अडखळली. !

अबदुलखान पुढें ह्मणाला, " मोहबतखान रूपानें सुंदर आहे.

ऐन जवानींत आहे. बादशहांनीं त्याला मोठा अखत्यार दिला आहे. पुढेंमागें तो मुख्यसेनापति होईल. तुला अगदीं योग्य स्थळ आहे. ”

हसीना यावर काय उत्तर देते हें ऐकण्याकरितां अबदुलखानापेक्षां मानसिंगाचे कान जास्त उत्सुक होते. लौकरच त्याची तृप्ति झाली व अबदुलखानाची निराशा झाली !

हसीनेनें तिरस्कारव्यंजक स्वरांत म्हटलें, “ पण–पण ते पूर्वी काफर होते ना ? अशा बाटलेल्या मनुष्यांशीं—नाहीं मामा, नाहीं माझी खुषी ! ”

“ म्हणजे ? तूं आजन्म अविवाहित राहणार ? ”

हसीनेनें उत्तर दिलें नाहीं. तिची मान मात्र जास्त लवली व लज्जेची लाली जास्त वाढली ! राजनीति निपूण अबदुलखानास हा नाजुक पालट उमगून आला नाहीं. तो तिची समजूत करण्याकरितां म्हणाला, छे बेटा, असा वेडा हट्ट धरूं नको. तूं चांगला विचार कर पुनः ! आजतुझ्या वडिलांनाही बोलावणें करितों. त्यांची या कार्याला तेव्हांच कबूली मिळेल. ” असें म्हणत तो उठला. त्यानें एकवार मानसिंगाकडे पाहिलें. त्याचें अंग घामाघूम झालें. अवदुलखानानें ‘ ही तुझी नवीन सहेली ना ? ’ म्हणून प्रश्न केला. नंतर मानसिंगाकडे वळून तो म्हणाला, “ तुमच्या सहेलीचें मन शादीकडे वळेल, अशी कोशिश करा. ”

इतकें बोलून तो निराश मनानें तेथून निघून गेला !

मामाची स्वारी जातांच मानसिंगानें दार लावून घेतलें व तों कांहींशा गंभीर मुद्रेनें हसीनेपुढें येऊन उभा राहिला तिला प्रथम काहो वेळ त्याचें अस्तित्व कळलें नाहीं. फार मोठ्या विचारांत तिचें मन गुंतलें होतें.

थोड्यावेळानें तिनें वर पाहिलें. नंतर ती मानसिंगाच्या अगदीं जवळ गेली आणि त्याच्या खांद्यावर हात टाकून म्हणाली, “ जिगर घबडाना नहीं. ! दिलका सौदा एकही दफा होता है, वो हो चुका ! मेरे दिलके सराईमें अब खाली जगह नहीं है !—होगा तो तुह्मारे साथ आऊँगी ! नहीं तो मर जाऊँगी– मगर उस काफिरके साथ, तुह्मारे भाईके साथ मेरी शादी न होगी न हो सकती है ! ”

तिच्या शब्दाशब्दांत निश्चय भरलेला दिसत होता. मानसिंगानें आपली मोहनमाळ आपल्या कंठीं धारण केली ! त्याचरात्रीं दोघांनीं गुप्त रीतीनें कुठें तरी नाहींसें होण्याचा बेत कायम केला.

* * *

अगदीं याचवेळीं जयश्रीही आपल्या अशाच कांहीं विचारांत होती. तीन प्रश्नाचीं तीन टोंकें तिच्या मनांत रुतत होतीं. १—पतीची भेट झाल्यावर काय करायचें ? २–ठाकुर ईसरसिंगाची सुटका होण्यास काय करावें ? ३–हसीनेकडे आलेली ती तरुणी कोण ?

तिन्ही प्रश्न भिन्न ! तिघेही जाचक !!—तिसरा इतका जाचक कां झाला, कांहीं सांगतां येणार नाहीं. जाचक झाला खरा !

त्याच दिवशीं तिला अबदुलखानाच्या आगमनाची वार्ता कळली कदाचित् आपला पति परत केव्हां येणार आहे, हें त्यास ठाउक असेल, तेव्हां हसीनेकडे जाऊन ती बातमी काढून आणावी, असा तिनें बेत केला आणि त्याप्रमाणें तिनें हसीनेकडे निरोपही पाठविला.

हसीनेकडे जाण्याची गोष्ट मनांत घोळूं लागतांच मानसिंगाचा स्त्रीवेषधारी चेहरा तिच्या नजरेपुढें नाचूं लागला व त्याचवेळीं आपण एखाद्या चमत्काराच्या सन्निध चाललों आहोंत, असें तिला वाटलें. हसीनेची धांदल व त्या स्त्रीची छपवाछपवी तिला आठवली आणि—आणि ती एकदम उठून ह्मणाली, " नाहीं–ती स्त्री नाहीं ! अगदीं खास नाहीं ! तो स्त्रीवेशधारी पुरुष आहे ! पण तो कोण ? हसीनेचा व त्याचा संबंध काय ? त्या दोघांचा पूर्वपरिचय आहे ! कांहीं तरी दृढ संबंध आहे ? तो कसला ? भोळीभाळी हसीना इतकी धूर्त–इतकी–इतकी नाहीं ! तसें वाटत नाहीं, मनाला ती कल्पना पटत नाहीं !–पण मग ती नव्हे तो कोण ? आज तिथें जातांच हें रहस्य उकलायचेंच ! " जयश्रीनें निश्चय केला.

याचसुमारास अबदुलखानाचा निरोप फर्जंद बेगास पोंचलाअसून तोही आपल्या मनाशीं अशाच कांहीं गोष्टी ठरवीत होता.

भवितव्यता सगळ्यांच्या हालचाली व बेत पाहून हंसत होती.!

तिसराप्रहरचे सुमारास फर्जंदबेग अबदुलखानाकडे येऊन दाखल झाला. थोड्याचवेळांत हसीनेस बोलावणें आलें व ती मानसिंगास पुनः धीर देऊन तेथून निघून गेला आणि तिच्या गमनानंतर सुमारें दहापांच पळांनी जयश्री त्या महालांत येऊन दाखल झाली!

जयश्रीच्या रोखींव नजरेंत मानसिंग अचूक सांपडला!

पांचदहा क्षण तरी त्यास किंकर्तव्यमूढता प्राप्त झाली! जयश्रीशीं आपला साक्षात् घडूं नये, अशी त्याची फारफार इच्छा; पण ती सर्वस्वी विफलहोण्याचा प्रसंग प्राप्त झाला! शिरस्त्याप्रमाणें आपली ओढणी पुढें ओढण्याचे, किंचित् विनयशील होण्याचें आणि बायकी चालीचें त्यानें सोंग केलें, पण पुढें कसें वागावयाचें याचा त्यास उमज पडेना! तिचें स्वागत करावें कीं मूकता स्वीकारावी? तिच्याजवळ वसावें कीं तिला अजिबात टाळावी? याचा त्यास पेंच पडला! बरें टाळायचें ह्मणावें तरी तें तरी कसें साधणार? त्यामहालाचें बाहेर त्याला सारा निवडुंगच दिसत होता.! त्या धाडसानें त्याचे तर प्राण धोक्यांत यायचेच. शिवाय हसीनेला चटका बसायचा! नाइलाजानें मानसिंग दैवाधीन झाला! तो कांहीं न बोलतां एका कोचावर जाऊन बसला व जणूंकाय शिरोवेदना होत आहेत, असा त्यानें बहाणा केला.

जयश्री हा त्याचा तमाशा मुकाट्यानें पाहात होती. त्याच्याविषयीं तिच्यामनांत उत्पन्न झालेला संशय त्याला पाहतांच दुणावला—नव्हे दृढ झाला! पण तिलाही पुढे काय करावें याची पंचाईत पडलीच. आपण येथून निघून जावें कीं काय? असाही तिला विचार पडला! कांहीं झालें तरी ती अबलाच होती ना!

पण पुनः तिला काय वाटलें कोण जाणे? ती धीटपणानें मानसिंगाच्या समोर जाऊन उभी राहिली! तो प्रकार पाहतांच मानसिंगाचें तोंड कोरडें पडलें!

तो आपली ओढणी तोंडावर ओढीत आहे, असें पाहतां व जयश्रीला

विशेष धैर्य चढलें ती एकदम ह्मणाली,"अहो, पुरे करा तें सोंग आतां ! मी तुह्माला पुरतें ओळखलें आहे !"

मानसिंगाचें सर्वांग ढिलें झालें. तो चाचरत ह्मणाला, "–म–ला !

"हो तुह्माला ! तुह्मी स्त्री नसून पुरुष अहां !! बोला !!–अहां ना ? पहा तुमचा चेहेरा काळवंडला ! तुह्मी ओठावरून जीभ फिरवूं लागलां ! बरोबर तुह्मी पुरुष अहांत ! भीतीनें तुमच्या सर्वांगाला कंप सुटला आहे आणि तुह्माला आवंडाही गिळतां येत नाहीं !–काय हें कपट काय हो बदमाषी !!" भाषेच्याजोराबरोबर जयश्रीचा स्वर चढूं लागला !

मानसिंग तिच्या निष्ठुर मुद्रेकडे पाहात कांहीतरी बरळला," मी–मी कोण असें तुह्माला वाटतं ?"

हाय ! जयश्रीला हा प्रश्न सुटला नव्हता. तिनें त्याच्याकडे निक्षून पाहिलें. स्मरणशक्तीची एक चपल चलाखी तिच्या नजेरपुढून लखालख गेली ! त्याच्या सर्वांगावर एक भलें मोठें ठळठळीत नांव तिला दिसूं लागलें. ती विजयश्रीनें ह्मणाली, "तेंही मी जाणतें ! तुमचें नांव तुमचें कुळ, तुमचें गोत्र, तुमचे आईबाप—मानसिंग ! ! !—सर्व कांहीं मी जाणतें !"

मानसिंगाचा देहवृक्ष या विद्युत्पातानें कोचावरून उन्मळून जयश्रीच्या पायाशीं पडला ! तो गहींवरून ह्मणाला, "जयश्री, तूं माझी माता आहेस. माझा सांभाळ कर ! माते–माते, या मूर्ख मानसिंगाला प्राणदान कर ! ! !"

मानसिंग खरोखरीच रडूं लागला !

चुटकीसरशीं जयश्रीचें रूप पालटून गेलें ! तिच्या स्त्रीत्वानें तिला हतबल केलें ! कांहीं कांहीं वेळीं स्त्रियांचें हृदय मोठें कठीण असतें, होतें ! पापीपुरुषाची निर्भर्त्सना करतांना, सवतीचा सूड उडवतांना, आपली एखादी अनावर इच्छा तडीस नेताना, त्या कठोर स्वरूपिणी होतात ! पण अशावेळींही त्या पुरुषाचें आंसू पाहूं शकत नाहींत ! पुरुषाचें रुदन त्यांच्या हृदयाचें कसलेंही कठोर काठिण्य घालवूं शकतें ! प्रसंगीं त्या सजातीय स्त्रियांचें आसूं खोटें मानतील पण पुरुषाचें मानभावी आसूं त्यांनां खोटें वाटणार नाहींत ! स्त्रीहृदयाचें हें एक चत्कारिक कोडें आहे !

कसें झालें तरी नारी जगन्माताच खरी ! त्या संबोधनानें पुकारतांच आह्माला वाटतें तिच्या सर्व हृदयकल्लोळांचें दमन होऊन फक्त एका वत्सल रसानेंच तें तुडुंब भरून जातें आणि हतभाग्याचें सहाय्यास धावून जातें !

आपल्या पहिल्याच फटकाऱ्याला मानसिंग घायाळ झालेला पाहून जयश्रीनें आपली कटुभाषणाची तलवार फेंकून दिली ! ती सौम्यस्वरांत पण लांच्छन देण्याचे हेतूनें ह्मणाली, " मानसिंग ! तुह्मी रजपूत ! बाप्पारावळचे वंशज ! प्रतापसिंगाचे पुतणे !–ऐनतारुण्यांत मेवाडच्या उद्धारार्थ कांहीं न करतां मोंगलांची नादान भाकरी खाऊन हे ढंग शिकलांत ?–मानसिंग मला तुह्मी माता ह्मणून पुकारलेंत. तेव्हां त्याच नात्यानें व अधिकारानें मी तुह्माला, विचारतें, काय, तुमच्या पुरुषत्वाला हें शोभतें ! मानसिंग प्रसंगीं वीरानें वाटेल तें करावें ! अर्जुनानें नाहीं का बृहन्नडेचा वेष घेऊन आपला कार्यभाग उरकला !–पण तुह्मी तसाच वेश घेऊन काय केलेंत ? अर्जुनाचा अवतार आणि विराटपुत्राचें–उत्तराचें अनुकरण–रडणें ! छीः छीः !! तुमच्या नांवाला सुद्धां हें किती कलंकभूत आहे ! "

मानसिंग उठून उभा राहिला. त्यानें हात जोडून ह्मटलें " जयश्री मी माझ्या या वेषांचही खरं कारण सांगितलं तर तूं शांत होशील का ? माते, माझी निर्भत्सना वाटल तेवढी कर ! ती मला हवीच आहे. पण गैरसमज फारसा करून घेऊं नको !–माझा बृहन्नडेचा वेष निष्कारण नव्हता सकारण होता ! सत्कारणाकारतां होता ! पण दैवानें घाला घातला व मी या संकटांत येऊन पडलों ! येथें येण्यांत माझ्या मनांत मोह खास होता; पण त्याकारितां मात्र मी बृहन्नडेचा वेश घेतला नाहीं, हें मी शपथेवर सांगतों. "

जयश्री कांहीं बोलली नाहीं. मात्र तिच्या मुद्रेवर आश्चर्य जरूर दिसलें !

मानसिंगानें आपलें सर्व रहस्य तिला सांगण्याचा निश्चय केला. तो हलक्यास्वरांत ह्मणाला, " जयश्री एक फार मोठें रहस्य तुला सांगत आहें. ध्यांनात ठेव त्यावर मेवाडचें भाग्य अवलंबून आहे. एक अक्षर बाहेर फुटतां उपयोगी नाहीं. "

जयश्री जास्तच विस्मित झाली ! तिच्या नेत्रांपुढें कारण नसतां ठाकुर इसरसिंगाची चिठ्ठी चमकली !

मानसिंग आणखी हळू स्वरांत ह्मणाला, " जयश्री, आपले ठाकुर इसरसिंग येथें कैदेंत पडले आहेत. त्यांच्या सुटकेची कांहीं योजना मी व त्यांनी ठरविली होती व त्याप्रमाणें मी हा वेष घेऊन त्यारात्रीं त्यांचे बंदिखान्याकडे निघालों होतों. परंतु मी हें वेषांतर करतांना थोडा मागचा पुढचा विचार न केल्यामुळें मध्यें आलेल्या क्षुल्लक अडथळ्यानें सर्व कार्यभाग फसला ! मला माझ्या मित्रमंडळींनीं त्यारात्रीं त्रावेषांतील पकडलें असतें तर कांहीं फारसें बिघडलें नसतें. परंतु त्यावेळीं मला त्यांची फार भीति वाटली व मी नदींत उडी टाकण्याचें धाडस केलें ! त्याचा परिणाम असा झाला !—खरी हकीगत ही अशी आहे. " असें ह्मणून त्यानें तिच्या अनेक शंकांचें निरसन केलें. तिलाही तें पटलें मगमात्र तिला त्याचेविषयीं थोडासा आदर वाटूं लागला.

तिनें सहज विचारिलें, " हसीनेची व तुमची ओळख कोठली ?

मानसिंगानें एकदम ह्मटलें, " जयश्री, तूं मी मातापुत्र आहोंत. त्या नाजुक प्रकाराविषयी तूं मला विचारूं नयेस आणि मी सांगूं नये हेंच इष्ट नाहीं का ? "

मानसिंगाचें ह्मणणें बरोबर होतें. ती म्हणाली " खरेंच मानसिंग माझें चुकलेंच तें !—बरं, आतां पुढें काय करणार तुम्ही ! "

मानसिंगानें सचिंत होऊन म्हटलें, " त्याचाच मी सरखा विचार करतों आहें. येथून माझी सुटका झाल्याखेरीज मला कांहीं सांगता येणार नाहीं; कांहीं ठरवतां येणार नाहीं. "

दोघेंही कांही वेळ विचारांत पडलीं.

थोड्यावेळानें जयश्री म्हणाली, " यावेशांत मी तुम्हाला आपल्या घरीं नेऊं शकेन तमची इच्छा आहेना ? "

"एका पायावर !" मानसिंगानें एकदम म्हटलें.

पुढें काय झालें आणि त्यावेळीं फर्जंदबेग, हसीना इत्यादि मंडळी काय अभिनय करीत होती, याचें वर्णन पुढच्या परिच्छेदांत ! ! !



# परिच्छेद ३८ वा.

## निर्भत्सना !



महत्वाकांक्षेच्या भरी पडलेला मनुष्य, एका काळीं त्यास स्वतःस अनुचित वाटणाऱ्या गोष्टीही वेळाशक करूं लागतो. तो आपली अशीच स्थिति करून घेतो कीं, त्याला त्या मार्गानें जावेंच लागतें. एरव्हीं अबदुलखानानें आपली भाची गुलेहसीन हिला मोबदखानास देण्याचा इतका अट्टाहास केलाच नसता.

त्याकाळीं मोंगलांना हिंदुच्या मुली खुषीनें अगर सक्तीनें आपल्या जनानखान्यांत ओढण्याची अनिवार हांव असली तरीं उलटपक्षीं आपल्या मुली हिंदूंना देण्यास–मगतो हिंदू कोणत्याहि दर्ज्याचा असो–ते सर्वस्वी नाखुश असत. या बाबतींत ते बाटून मुसलमान झालेल्या लोकांना सुद्धां कमीप्रतीचे लेखीत. मोहबतखानाची गोष्ट या नियमाला कांहींशी अपवादात्मक होती. तो रजपुत स्त्रीच्या पोटीं जन्माला आला होता, एवढाच काय तो त्याच्यावर हिंदुत्वाचा कलंक; बाकी त्याचें संगोपन, त्याचें बाळपण व त्याचें लालन-पालन सर्व कांहीं मोंगली पद्धतीनें झालें. पुढेंपुढेंही त्याचे आचार विचार, राहणी व भाषा मुसलमानींच होती. एका जन्मस्थानाखेरीज तो नखशिखान्त मुसलमान होता. आतां तर त्यानें आपलें हिंदू नांव बदलून

सुशात्र मुसलमानीं धर्म पत्करला होता. अर्थात त्याला आपली भाची देऊन त्याच्याशीं सोयरिक करण्यास अबदुलखानास कांहींच हरकत नव्हती, पण दुसरा एखादा मनुष्य असता तर अबदुलखानानानें एवढ्याच गुणावर त्यास आपली भाची देण्याची उदारता मुळींच दाखविली नसती. मोहबतखानाला गुलेहसीन देण्यांत अबदुलखानाचा अगदीं भिन्न हेतु होता. तो ह्मणजे बादशाही दरबारांत आपलें वजन वाढविणें हा होय. मोहबतखानाची व जहांगिरीची अगदीं जानी दोस्ती. तेव्हां जरका मोहबतखानावर कांहीं शह ठेवतां आला तर पर्यायानें बादशहावरही शह ठेवल्याप्रमाणें होईल व त्यामुळें आपलें महत्व सहज वाढत जाईल. अशी त्याला आशा होती. ह्मणून त्यानें मोहबत खानाच्या कच्छपीं लागून त्यास ' माझी भाची तुला देऊन तुझ्याशीं सोयरीक करतों. तूं मुसलमान हो. ' असा आग्रह केला. मोहनसिंग उर्फ मोहबतखान याला तसें कांहीं आमिष पाहिजेच होतें. गुलेहसीनच्या सौंदर्याची प्रख्याति त्यानें ऐकली होतीच. शिवाय खानखानन सारख्या उच्च दर्ज्याच्या कुलीन मोंगल घराण्याशीं आपली जावईपणाची सोयरीक होणार, ही गोष्टही त्याला अत्यंत अभिमानास्पद होती. कारण हा काळपर्यंत आपला हा अपूर्वमान कोणत्याही बाटलेल्या तरुणाला मिळालेला नव्हता. तेव्हां तो हस्तगत करून बादशाही कृपेनें आपल्या होत्या उत्कर्षाला विषेश शोभा आणावी, असा त्यानें विचार केला. तात्पर्य, सासऱ्या जावयानीं कमरा तर बांधल्या. त्या दोघांचीं आपसांत समजीहा झाला. परंतु बंधूपुढें तो प्रश्न येतांच त्यांनें स्पष्ट नकार देऊन मुळांतच घाव मारला ! अबदुलखानानें हसीनेची खूब समजूत केली. मामासाहेबांनींही भाचीच्या संसारसौख्याची टोलेजंग उठावणी केली. परंतु कांहीं उपयोग होण्याचें चिन्ह दिसेना. हसीनेच्या नकाराला ढिलाई येण्याऐवजीं बळकटीच येऊं लागली. हा तिचा नकार अबदुलखानानें मोहबतखानास न सांगतां, त्यानें आणखी एक प्रयत्न करून पाहण्याचें योजिलें.

आज त्यानें मोहबतखानास आपल्या घरीं बोलाविलें. आणि त्याच्या समोर हसीनेला बोलावून आणून, त्यानें मोहबतखानाच्या तारुण्याचें, सौंदर्याचें, गुणाचें, आजच्या वैभवाचें आणि उद्यांच्या उत्कर्षाचें गुणगान

केलें. या मुळें तरी तिच्या बुद्धीला मोह पडून तिचा नकार नाहींसा होईल-अशी त्याला आशा होती परंतु—तिच्याच वडील मामाच्या शब्दांत सांगावयाचें ह्मणजे—

**प्रीतम छबि नैन बसी पर छबि कहाँ समाय ।**
**भरी सराय रहीम लखि, आप पथिक फिरिजाय ॥***

अशी स्थिति असल्यामुळें तिला नकार देणें भागच होतें ! शिवाय आपल्या मामानें एका परक्या इसमाबरोबर, त्याच्या समोर आपल्याला बोलावून, दाखविलेला घरोबा तिला मुळींच रुचला नाहीं. प्रथम दर्शनींच तिनें मोहबत खानाकडे तिटकाऱ्यानें पाहून अबदुलखानाच्या ह्मणण्याला तुसडेपणाचीं उत्तरें दिलीं.

मग अबदुलखानालाही तिचा मोठा राग आला. तो गुरगुरत तिला ह्मणाला, " तूं इतकी बेमुर्वत असशील, असें मला नव्हतें वाटलें, थांब तुझा बाप आलाच आहे. आतां इतक्यांत तो इथं येईल. पाहूं मग तूं त्याला कसा नकार देतेस तो ! "

हसीना कांहीं बोलली नाहीं. आपल्या पित्यानेंही आपल्याला असाच वेडा आग्रह केला तर आपण काय करावयाचें, असा तिला विचार पडला.

इतक्यांत फर्जंदबेग आल्याची वर्दी आली. अबदुलखानानें पुढें होऊन त्यास वर बोलावून घेतलें. सलाम खुषखबरी झाल्यावर अबदुलखानानें, मुख्य विषय काढला. त्यानें गौरवपूर्ण भाषेनें मोहबतखानाची ओळख करून

---

* अबदुलखानाचा वडील भाऊ अबदुल रहीम खानखानाँ हा हिन्दी भाषेचा विख्यात कवि होऊन गेला. त्यानें ' रहीम सतसई ' नांवाचा काव्य ग्रंन्थ लिहिला असून त्यांतील हा दोहा आहे. अर्थ असा—" प्रियकराची मूर्ति नेत्रांचे ( हृदयाचे ) स्थानीं एकदां प्रस्थापित झाल्यानंतर दुसऱ्याला तेथें जागा कशी मिळेल. सराईतील भरलेली खोली पाहून दुसऱ्या प्रवाश्यानीं ( जागेकरितां ) दुसरीकडे गेलेंच पाहिजे. " महाराष्ट्रीय मनाला ही कल्पना थोडी चमत्कारिक वाटेल; पण आहे मार्मिक !

दिली. आणि जणूं काय त्याची अनुमति मिळेलच अशा भरवशानें हसीनेकडे मधून मधून पाहात पुढें ह्मटलें, " आतां आलाय तसें शादी उरकून जा ह्मणजे तुमच्या मागची एक फिकीर कमी झाली ! "

फर्जंदबेगानें आपल्या मेव्हण्याचें सर्व भाषण मुकाट्यानें ऐकून घेतलें नंतर त्यानें मोहबतखानाकडे पाहिलें. नंतर त्यानें आपल्या कन्येकडे पाहिलें. या त्याच्या पाहण्यानें तिघांचीहीं मनें व्याकूळ झालीं ! आतां त्याचें तोंडून अपल्यास अनुकूळ उत्तर येतें कीं नाहीं, या शंकेनें तिघांनींहीं त्याच्याकडे दृष्टी लाविली !

थोड्या वेळानें फर्जंदबेग ह्मणाला, " खानसाहेब, तुमचें इतर सर्व ठीक आहे ह्मणा, पण यांत एक गोष्ट मला अगदीं रुचली नाहीं. "

" ती कोणती ? "

" हसीनेला तुह्मी विक्रीची वस्तु तर समजत नाहीं ना ?"

" ह्मणजे काय ? मी आपल्या बोलण्याचा अर्थ नाहीं समजलों. "

" मग या परक्या इसमाबरोबर तिला आणून कां उभी केलीत ? " फर्जंदबेगानें सरोष ह्मटलें, " हें आपल्या खानदानीला अगदीं शोभत नाहीं."

यावर अबदुलखानाला चटकन् उत्तर देतां येइना, असें पाहून त्याची बाजू सांवरून धरण्याकरितां मोहबतखान ह्मणाला, " पण मीं परका नाहींच आहे मुळीं. खानसाहेबांचा व आमचा घरोबा कांहीं आजचा नाहीं. आपल्य खानदानीला कमीपणा आणणारें असें यांत काय घडलें. हें मला तर नाहीं समजत ! "

" सांगतों—काय घडलें तें, तुमची इच्छाच असेल तर स्पष्ट सांगतों " फर्जंदबेगानें निष्ठुरपणानें ह्मटलें, " त्या पूर्वी मला माझ्या बेटीला एक प्रश्न विचारुंद्या. " असें ह्मणून तो हसीनेंकडे पाहात ह्मणाला, " बेटा, तुला हा संबंध मान्य आहे का ?—सांग बेटा, मोकळ्या मनानें सांग. नीट विचार करून सांग, यावर तुझ्या जन्माचें सुख दुःख अवलंबून आहे, हें

ध्यानांत ठेव. तूं सुखी असावेंस अशी माझी इच्छा आहे. तेव्हां न लाजतां स्पष्ट पणानें काय तें उत्तर दे."

"पण तिला विचारण्यांत काय अर्थ आहे?" अबदुलखानानें त्रासून प्रश्न केला. बोलून चालून ती पोर. तिला काय समजणार यांत. आपणच काय तें ठरवायचें आहे."

फर्जंदबेगानें मध्येंच म्हटलें, "दुसरा एखादा प्रसंग असता तर मी हें तुमचें म्हणणें मान्य केलें असतें.शिवाय मी माझ्या मुलीची योग्यता ओळखतों. यावेळीं मला तिच्याच मतानें चाललें पाहिजे. सांग हसीनें, तुला हा संबंध मान्य आहे का ?"

"नाहीं बाबा, मुळींच नाहीं !" हसीनेनें एकदम म्हटलें आणि तेथून गमन केलें. आपला पिता आपल्यास अनुकूल आहे, असें पाहून तिचा जीव खालीं पडला.

फर्जंदबेगानें म्हटलें, "मग बोलणें संपलें ! आतां खानसाहेब माझें मत सांगतों. हा संबंध जुळावा, अशी माझीही पण इच्छा नाहीं."

अबदुलखान निराश झाला. मोहबतखानही ओशाळून गेला. दोघांनींही एकमेकांकडे प्रश्नार्थी पाहिलें.

थोड्या वेळानें खानानें म्हटलें, "पण मीं मोहबतखानांना वचन देऊन चुकलों आहें. आतां त्यानां नकार देणें बरें दिसेल का ?"

"एखाद्याची योग्यता पाहिल्यावांचून वचन दिलेंत कां ?"

मोहबतखानानें मध्येंच विचारिलें, "माझी योग्यता कमी आहे ?"

फर्जंदबेग तिरस्कारानें हंसला. तो म्हणाला, "तुमच्या विषयींचा माझा अभिप्राय विचारूं नका, तो तुम्हाला मुळींच रुचणार नाहीं."

मोहबतखान मनांत चरफडला, पण बाह्यतः हंसून म्हणाला, "सांगा सांगा तर खरें. पाहूं या तो कोठवर कडु आहे तो. सांगा हो फकीरसाहेब."

त्याच्या स्वरांत कुचेष्टा होती. डोळ्यांत तिरस्कार होता आणि ओंठावर उप-हास होता !

फर्जंदबेगानें तें पाहिलें. तो खानाकडे पाहात ह्मणाला, " खानसाहेब, माझे मुलीवर तुमचें मुलीप्रमाणें प्रेम आहे, हें मी जाणतों; पण तिच्या करितां तुह्मीं असलें हें स्थळ कां योजिलेंत, हें मला नाहीं कळत ! एखादा गरीबसा मुसलमान किंवा एखादा उच्च कुलज रजपूत—तुमची इच्छाच होती तर पाहायचा होतात. पण हा असला चमगीधड ( वटवाघूळ ) कां पाहिलात ? "

" फर्जंदबेगजी, " मोहबतखान एकदम उसळून ह्मणाली, " माझा असा अपमान करायचा असेल तर विचार करूनच पुनः जबान उघडा—"

फर्जंदबेग शांतपणें ह्मणाला , " हरामजाद्यांचा मान कितपत ठेवाव-वयाचा हें मला कळतें. अरे मोहबत, तूं मुसलमान कां झालास, हें मी काय ओळखून नाहीं. केवळ वैभवाच्या आशेनें, एखाद्या यवन घराण्याशीं तरी आपला सोयरीक होईल, या आशेनें ! माझ्या मुलीचा नकार काय तुला समजला नव्हता ! अरे पहिल्या नजर भेटीलाच समजला असेल; पण तूं हापापलेला. तुला त्या नेत्रांतील तिरस्कार कळणार कसा ! "

फर्जंदबेगाच्या या प्रत्येक शब्दानें मोहबतखानाच्या हृदयाचा भेद झाला पण त्याला जास्त काहीं करवेना. आपल्या जन्माचा कलंक त्याला माहीत होताच. तेव्हां त्या विषयीं जास्त बोलून आपलाच आणखी अपमान करून घेण्यापेक्षां मुकाट्यानें येथून निघून जावें, हें बरें. असाच त्यानें विचार केला.

तो जागचा उठला व अबदुलखानास ह्मणाला, " माझा असा अपमान व्हावयाचा होता तर मला कशाला निःकारण तसदी दिलीत. " एवढें बोलून तो तेथून निघून गेला. फर्जंदबेगाचे अपमानकारक शब्द त्याच्या हृदयांत सलत राहिले.

तो गेल्यावर अबदुलखाने फर्जंदबेगास कठोरपणानें ह्मणाला, " तुह्मी फकीर झालांत ! ऐनवेळीं येऊन माझ्या सर्व बेतावर का पाणी ओतलेंत. "

" माझ्या पोरीनें जन्मभर दुःख सोसावें, अशी माझी मुळींच इच्छा नाहीं आणि या मोहबतखानाविषयीं माझे मत अत्यंत प्रतिकूल आहे. "

" मग या कृत्यानें तरी हसीनेला सुख लागेल अशी कां तुमची कल्पना आहे ? " अबदुलखानानें तिरस्कारानें विचारिलें.

फर्जंदबेगानें त्याच्या बोलण्याचा हेतु ताडला. तो ह्मणाला, " ठीक आहे. यापुढें हसीना तुमच्याकडे राहणार नाहीं समजलांत. "

" मग कुठें घेऊन जाणार तिला ? "

" त्याची तुह्माला गरज. " फर्जंदबेगानें चटकन् उत्तर दिलें.

यानंतर पुष्कळ प्रश्नोत्तर होऊन फर्जंदबेग आपल्या लेकीला घेऊन तेथून बाहेर पडला व जयश्रीकडे आला.



# परिच्छेद ३९ वा.

## सुगावा.






हबतखान आपल्या वाड्यांत परत आला. अपमानाचें अपयश पदरीं घेऊन आपल्याला परत यावें लागेल, अशी त्याला निसुटतीसुद्धां कल्पना नव्हती. आतांपर्यंत त्याचा एक आडाखा चुकला नव्हता कोठेंही त्याला अपयश आलें नव्हतें. पण या ठिकाणी मात्र तो सपशेल घसरला! घसरला कसला चांगला तोंडघशीं पडला !

प्रत्यक्ष वधूनें तिरस्कारानें नकार दिला. आणि तिच्या बापानें–फर्जंदबेगानें ओह ! त्यानें तर असा घाणेरडा अपमान केला कीं, साऱ्या जन्मभर

तो अंतःकरणांत सलत राहावा! हरामज्यादा! मोहबतखानाला ही शिवी !! क्रोधानें त्याचें चित्त क्षुब्ध झालें! त्याच्या मुठीवळून कल्पनिक फर्जंदबेगाकडे वळूं लागल्या ! एकांतांत–स्वतःच्या–महालांत–आल्यावर आतां त्यास खूपच अवसान आलें! त्याची सर्व वीरश्री आतां जागृत झाली !

पण प्रत्यक्ष फर्जंदबेगासमोर त्याला कांहीं बोलवलें नाहीं. शरमिंदे-पणानें तो इतका विरमला कीं, त्याच्यापुढें त्याच्याशीं एक शब्द न बोलतां तो मुकाट्यानें तेथून निघून आला. वाड्यांत आल्यावर त्याची चीड नोकरां-चाकरांवर काढण्यास त्यानें प्रारंभ केला. कितीवेळतरी त्यास पुढें काय करावें हेंच सुचेना. चडफडाट मात्र सारखा चालूं होता.

फर्जंदबेगाचा कांहींतरी सूड घेण्याची कल्पना त्याचे मनांत पुष्कळवेळां आली. परंतु पुनः त्याला वाटे, फर्जंदबेग बोलून चालून फकीर. त्याचा सूड घ्यावयाचा ह्मणजे काय करावयाचें ? त्याचा प्राण घेण्यांत कांहीं मौज नाहीं. बरें, त्याचा कांहीं अपमान करून त्यास खालीं पाहण्यास लावावें तर ? पण तो बेत तरी कसा साधणार ? त्याची फकिरीवृत्ति त्यापासूनही त्याचा सांभाळ करील ? आणि समजा तसें कांहीं करून त्याच्या मूर्खपणाचा मोबदला त्याला दिला तरी हसीनेच्या आयुष्यावर अगर मनावर त्याचा कितीसा परिणाम होईल ? फार थोडा. तिनेंही आपला तिरस्कार करून एक प्रकारें आपला अपमान केलाच आहे. तेव्हां तिला प्रायश्चित्त काय द्यावयाचें ! तेव्हां अशी कांहीं तोड काढावी कीं, ज्याच्यायोगें हसीनेची बेअब्रू होऊन त्यांमुळें फर्जंदबेगाची नाचक्की होईल.

बेत तर ठरला. पण उपाय कसा योजायचा ? हसीना ह्मणजे सामान्य कुलांतील स्त्री नव्हे. आपलें शरसंधान तिच्यापर्यंत जाऊन भिड-ण्यांत अनेक अडचणी आहेत. त्या कशा दूर करावयाच्या ? विचार पडला. दुसरी गोष्ट, या बाबतींत कांहीं गफलत झाली आणि बाजू आपल्या आंगावर आली तर ? अबदुलखानाशीं वैराचा प्रसंग ! फार जपून वागलें पाहिजे.

याच विचारांत त्यास हसीनेच्या रूपाचें स्मरण झालें व तिच्या विषयींची

त्याची स्पृहा पुनः जागृत झाली. आणखी कांहीं योजना करून बलात्कारानें कां होईना तिला पत्नीरूपानें हस्तगत करावी. असें त्यास वाटूं लागलें. त्याचवेळीं त्यानें स्वतःसच एक प्रश्न केला. पण हसीनेनें इतक्या स्पष्टपणानें आपल्यास कां नाकारावें बरें ? असा तिनें कोणता कमीपणा आपल्यांत पाहिला ह्मणून तिनें आपला तिरस्कार केला ? आपलें रूप वाईट नाहीं. वय फार नाहीं. मग तिला मी का रुचूं नये. ?

असा विचार करीत आपल्या रूपाची व वयाची छाननी करण्याकरितां तो एका मोठ्या आरशाजवळ जाऊन उभा राहिला ! त्यानें स्वतःस आपाद मस्तक न्याहाळलें. नाक मुरडण्यासारखें त्यास स्वतःमध्यें कांहीं आढळलें नाहीं.

मिशीला पीळ भरीत आणि मधून मधून दाढीला कुरवाळीत तो स्वगत ह्मणाला, " मी सुंदर आहें. जवान आहें. माझें वैभव मोठें आहे. माझा अधिकार वाढता आहे. बादशाहाचें माझ्यावर प्रेम आहे. मी चांगला वढवय्या आहे ! मग चुकलें कुठें ? हसीनेनें मला कां नाकारावें ? बायकांच्या नजरेंत भरण्यासारख्या सर्व गोष्टी मला अनुकूल असतां तिनें माझा स्वीकार कां केला नाहीं ? अब्दुलखानानें माझी स्तुती तिच्याजवळ भरपूर केली नसेल काय ? नाहीं पण तसें ह्मणतां येत नाहीं. हसीना मला देण्यांत त्याची सम्मति होती ! त्याच्या पत्नीचीही असावी, असें त्याच्या बोलण्यावरून दिसलें. फर्जंदबेग तर येथें नसतोच. मग कोणाच्या सल्ल्यावरून हसीनेनें आपणास नाकारिलें ? कोणत्या कारणानें आपण तिच्या मनांत भरलों नाहीं ?

मोहबतखानानें पुष्कळ विचार केला. इकडे तिकडे हेलपाटे घालून आणि आरशापुढें उभें राहून त्यानें आपल्या प्रतिबिंबाला त्याचें उत्तर विचारिलें. पण कोडें सुटलें नाहीं. हसीनेनें आपल्यास कां नाकारिलें याची मखखी त्यास ताडतां आली नाहीं.

याचवेळीं त्याच्या प्रेमांतील व सलगींतील एक दासी, त्याचें पानदान घेऊन आली. त्यानें कांहीं अन्य उदाहरणानें हाच प्रश्न—आपल्या डोक्यांत घोळत असलेला प्रश्न तिला विचारिला.

ती हंसत ह्मणाली, " त्यांत एवढें कोडें तें काय आहे ? नायिकेचे नेत्र आणखी कोठें तरी गुंतले असले पाहिजेत. "

मोहबतखानाला हें उत्तर अचूक पटलें. त्यानें पान खात विचार करीत ह्मटलें, " खरें आहे. तुझें ह्मणणें बरोबर आहे. नायिकेचे नेत्र आणखी कोठेंतरी गुंतले असले पाहिजेत, हेंच खरें, पण कायग बकावली, ( हें त्या दासीचें मोहबतखानानें ठेवलेलें लाडकें नांव ) ह्या नायक कोण हें ओळखतां येईल का ? "

" हो न यायला काय झालं ? —तुमचा पैसा तुह्माला काय सांगणार नाहीं. ? "

मोहबतखान खुश झाला-व त्यानें तिच्या कानांत कांहीं मंत्र फुंकला.

बकावली त्यास खात्री देत तेथून निघून गेली.

मोहबतखान पुनः इकडे तिकडे फिरूं लागला. बकावलीचें उत्तर त्यास पटलें असल्यामुळें तेंच आतां त्याच्या डोक्यांत घोळूं लागलें. तो स्वगत ह्मणाला."बरोबर हसीनेचें मन कुठें तरी गुंतलें आहे. तिचा कोणी तरी दोस्त आहे. यांत संशय नाहीं. पण अबदुल्लखानाच्या जनानखान्यांत कोणत्या धूर्तानें असा नाजुक प्रवेश करून घेतला असेल बरें ?"

या प्रश्नावर त्यानें आपल्या परिचयांतलि अनेक धूर्त, लफंगी आणि इष्की तरुणांच्या मूर्ति आपल्या डोळ्यापुढें आणिल्या आणि त्यांच्या चरित्रांची जांच केली अगदीं जहांगीर बादशहाला सुद्धां त्यानें आपल्यापुढें खेंचलें परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. त्या तरुणांपैकीं एकाचाही हसीनेपर्यंत हात पोंचणें त्यास संभवनीय वाटेना.

नाहीं ह्मणायला जहांगिराविषयीं त्यास थोडा संशय आला, त्याचें चरित्र व त्याचीं असलीं लफडीं तो अनेक जाणत होता. तेव्हां त्यानेंच एखाद्या मीनाबाजारांत ती मासळी आपल्या गळ्याला अडकवून घेतली असली पाहिजे; असें त्यास कांहीं वेळ वाटलें. पण थोड्या वेळानंतर हीही कल्पना त्यास युक्त वाटेना. कारण एक तर अलीकडे बरेच दिवस जहांगीर

मेहरुन्निसेच्या नादांत होता. दुसरी गोष्ट, अबदुलखानाला ही गोष्ट कळल्या-वांचून राहतीना. आणि तसें कांहीं असतेंच तर हसीनेचें व बादशहाचें लग्न होण्यास कसलाच प्रत्यवाय नव्हता. शिवाय जर कांहीं तशीच भानगड असतीं तर आपली सोयरीक हसीनेशीं होतें आहे, हें कळतांच बाद-शहा गप्प न बसतां त्यानें आपणांस तोंडानें नाहीं तर निदान कृतीनें तरी ही गोष्ट न होऊं देण्याची सूचना दिली असती. कारण आपल्यासारख्या स्नेह्याशीं तरी तो असली प्रतारणा करणार नाहीं, अशी मोहबतखानाची खात्री होती. तात्पर्य, जहांगिराविषयींची त्याची शंका लौकरच नष्ट झाली.

पण तेवढ्यानें त्याच्या मनाचें कुठें समाधान झालें ? हसीनेची दोस्ती जोडणारा भाग्यवान कोण ? हें कोडें कांहीं त्यास सुटलें नाहीं,

शेवटीं विचारानें डोकें फारच त्रासलें म्हणून व बकावली येईपर्यंत जिवाला दुसरी कांहीं करमणूक सुचणें शक्य नाहीं असें पाहून तो नौका क्रीडनार्थ यमुनेवर गेला. अगदीं एकटाच गेला. कर्मधर्मसंयोग ज्या डोंगीं-तून मानसिंग स्त्रीवेषानें ठाकुरसाहेबांची सुटका करण्यास निघाला होता, तीच डोंगी मोहबतखानाच्या वांटणीस आली. तींत बसून पात्रांत शिरला.

नदीच्या मध्यभागीं गेल्यावर डोंगीवाल्यास त्यानें डोंगी स्थिर ठेव-ण्यास सांगितलें. त्याप्रमाणें आज्ञापालन झाल्यावर वरच्या आकाशाकडे पहात तो स्वस्थ पडून राहिला.

सुमारें पावघटका तरी मोहबतखानाची समाधी भंग होण्यासारखें कांहीं कारण घडलें नाहीं. त्यानंतर त्याच्या ओळखीच्या मंडळींची होडी तिकडे आली. मोहबतखान उठून बसला. सलाम झडले. पानांची (विड्यांची) देवघेव झाली. एकदोन स्नेही त्याच्या होडींत येऊन बसले. गप्पास प्रारंभ झाला.

एकानें हंसत विचारिलें, "काय खानसाहेब, अलीकडे तुम्ही दोघा भावांनी मनांत तरी काय आणिलें आहे ? तो मानसिंगही असाच एकटादुकटा नाहीं तसले वेष घेऊन जात असतो. तुम्हीही आज एकटेच

इकडे मुकळा.....काय आहे काय यार, ही भानगड ! दोघांनींही पिंज-ऱ्यांतलीं पाखरं .....नाहीं गांठलीं. त्या मानसिंगानं खास कांहीं तरी भानगड केली आहे. लेकाचा परवा जनान्या वेषांत कुठं जात होता—भगवान जाणें !—" एवढें बोलून तो डोळे मिचकावीत डोंगोवाल्याकडे पाहात ह्मणाला, " काय रे ए लुच्चा ! तुझ्या परवाच्या बाईसाहेब पुनः भेटल्या होत्या का ?—का गेल्या जमनेच्या पोटांत ?—काय लुचेगिरी, अरे मोहबत, अरे यार बोल ना ? वेड्याचं सोंग घेऊन आह्माला ठकवूं पाहतोस होय ? " असें बोलून तो मनमुराद हंसला !

मोहबतखानाला त्याच्या टकिचें खरेंच मोठें आश्चर्य वाटलें व त्यानें त्यास त्याचें स्पष्टीकरण विचारिलें. तेव्हां त्याच्या दोन्हीं स्नेह्यांनीं त्यास त्या रात्रीं घडलेली गंमत सांगितली. ते ह्मणाले, " आह्मी मागून जी चौकशी केली, त्यावरून खानसाहेब, ती बिबी दुसरें कोणी नसून आपले बंधु मानसिंगजीच होते, असें आह्मीं खात्रीनें ह्मणतों. त्यावेळीं त्यानें नदींत उडी टाकून पलीकडच्या जनान्याच्या भागांत प्रवेश केला ह्मणून. नाहीं तर त्याची अशी मजाक उडविली असती कीं, ज्याचें नांव तें. अन् शिवाय असें झालें कीं पलीकडे थोड्याच अंतरावर कोणाचासा जानना आला होता. मग तो या मानसिंगाच्याच धोरणावर आला होता कीं कोण जाणे ? कारण त्याच नावेवर तो चढला असावा अशी आमची समजूत आहे. लेकानं कुठं भोंक पाडलं आहे, कांहीं समजत नाहीं. या चार दिवसांत तो भेटलाही नाहीं. घरींही तपास लागला नाहीं. मग कुठं गोकुळांत रमला आहे, देव जाणे ! "

यावर मोहबतखान कांहीं बोलला नाहीं. पण त्याच्या अंतःकरणाला मात्र इंगळी डसली ! कांहीं सबळ पुरावा मिळाला नसतांही त्यास हसीनेजवळ मानसिंग उभा असल्याचें चित्र दिसलें ! त्यास आश्चर्य वाटलें. हें शक्य नसावें, अशीही त्यानें आपल्या मनाची समजूत करण्याचा प्रयत्न केला. परंतु तें ऐकेना. तें पुनः पुनः ठासून ह्मणालें कीं, " मानसिंगच हसीनेचा दोस्त आहे आणि त्यामुळें तुझी मागणी त्यापरानें नाकारली ! "

या बातमीनें मोहबतखानाच्या मनांत अनेक क्षुब्धतेचे विचार आले. तरी ते त्यानें आपल्या दोस्तांच्या निदर्शनास येऊं दिले नाहींत. त्यानें "मानसिंगाचा व माझा आतां कांहीं विशेष संबंध नाहीं. कोणाला माहीत त्याच्या काय भानगडी आहेत ? त्याची जवानी आहे. चालायचेंच " इत्यादि बोलून वेळ मारून नेली आणि इतर बोलणें काढून तो विषय उडवून दिला. असो.

कांहीं वेळानें सर्व मंडळी परत फिरली व मोहबतखान आपल्या वाड्यांत परत आला. अगदीं पहिली गोष्ट त्यानें ही केली कीं, आपल्या एका विश्वासू नोकराला मुकाट्यानें मानसिंगाच्या शोधार्थ धाडिलें. नंतर तो त्याची व बकावलीची वाट पाहात बसला.

रात्रीं दहा वाजेपर्यंत त्यास वाट पाहावी लागली. नोकरानें येऊन सांगितलें, " मानसिंगजी नुकतेच कोठूनसे घरीं आले असून त्यांची तब्येत कांहींशी नाराज आहे. ह्मणून ते दोन दिवस घराबाहेर पडत नव्हते. "

" येवढ्या बातमीनें काम नाहीं भागायचं. " मोहबतखानानें त्यास म्हटलें, " पुन: उद्यां जाऊन गेल्या चार दिवसांत मानसिंगानें काय काय गोष्टी केल्या आणि तो कुठें कुठें जाऊन आला याची बातमी काढून आण. " असें म्हणून त्यानें त्याची रवानगी केली.

नंतर त्यानें बकावलीची भेट घेतली. तिनें सांगितलें, " हसीनेचा कोणीतरी प्रियकर खास आहे. अलीकडे दोनतीन दिवस तिच्या महालांत कोणी एक खुबसुरत औरत येऊन राहिली असून, तिच्याकडे तिचा फार ओढा आहे, व ती औरत कोण आहे ? यांचा ती कोणालाच थांग लागूं देत नाहीं. "

आपल्या दासीचें हे बोलणें ऐकतांच मोहबतखान ताडकन् उठून म्हणाला, " बस्स ! बस्स ! ! सर्व रहस्य समजलें ! अरे बदमाशा ! ठीक आहे पाहून घेईन ! " असें म्हणुन त्यानें आपल्या मिशीला पीळ भरला ! थोड्या वेळानें त्यानें बकावलीस आपलें भोजन वाढून आणण्यास सांगितलें व तें कार्य करण्यास ती निघून गेली.

प्रत्यक्ष आपला भाऊच हसीनेचा प्रियकर आहे, याबद्दल आतां त्यास मुळींसुद्धां शंका राहिली नाहीं आणि या गोष्टीचें त्यास कमालीचें आश्चर्यही पण वाटलें. मानसिंग नेबळट आहे, जनानी आहे, अशी त्याची समजूत होती आणि केव्हां केव्हां त्यानें स्वतःही त्याबद्दल त्याची कुचेष्टा केली होती, असें असतां त्याच मानसिंगानें सर्वांची दृष्टी चुकवून अगदीं काव्यांत असलेलें मधाचें पोळें सहज उपटावें आणि आपल्यावर मात करावी ही गोष्ट त्यास अत्यंत नवलाची तर तितकीच क्रोधाची आणि अपमानाची वाटली. घटकाभर त्यास पुढें काय करावें हेंच सुचेना.

त्यानंतर त्यानें आपले नित्याचे भोजनादि विधि उरकले; परंतु तिकडे त्याचें बिलकूल लक्ष नव्हतें. तें सर्व काल्पनिक मानसिंग-हसीनेच्या हेव्या-दाव्यांत गुंतलें होतें.

हसीनेनें आपल्यास झिडकारिलें; त्याचें कारण हें अं ? मानसिंग तिच्या नजरेंत भरला म्हणून मी तिला नको ? मला ज्या वेळीं तिनें नकार दिला त्यावेळीं कदाचित् तिचा प्रियकर जनानी वेशांत तिच्या महालांत असेल आणि त्याच उन्मादांत तिनें आपली मागणी अमान्य केला असली पाहिजे. शेवटी मानसिंगानें पैज जिंकली !

मोठा असह्य विचार !

मानसिंगाचे ठायीं दुसरा एखादा तरुण असता तर मोहबतखानाला इतकें वाईट वाटलें असतें कीं नाहीं कोण जाणे ? पण हसीनेच्या सुंदर छबीजवळ मानसिंगाची मूर्ति पाहतांच मोहबतखानाला मरणप्राय दुःख झालें. या गोष्टीला सूड घेण्याकडे त्याची वृत्ति साहजिक वळली ! ही अभंग जोडी दुभंग करून जर आपल्यास हसीनेला, मानसिंगाला व फर्जंदबेगाला जन्माचें दुःखी करितां आलें, तर काय बहार होईल, असें त्यास वाटलें.

मनुष्याचा काय स्वभाव असेल तो असो, एकतर त्यास ज्या सुखाला आपण आंचवलों, तें कोणासच मिळूं नये, असें मनापासून वाटतें. त्यांतून तें सौख्य जर कां आपल्या भावाच्याच वाट्यांला गेल्याचें त्याच्या

नजरेस आलें तर मग त्याच्या दुःखास पारावारच राहात नाहीं. पुष्कळ भाऊबंदकीमध्यें हें कारण प्रामुख्यानें दिसून येतें.

मोहबतखानाच्या दांतांत हसीना–मानसिंग हें जोडनांव सारखें पिसत राहिलें. त्या रात्रीं त्यानें हसीना आपल्याला मिळण्यापेक्षां मानसिंगाजवळून ती कशी फुटेल याचाच विचार केला. अगदीं पहिला विचार त्याला हा सुचला कीं, ताबडतोब फर्जंदबेगाकडे जावें आणि त्याच्या नाकावर टिचून त्याच्या मुलीची कीर्ति त्यास सांगून, त्यास लाजवावें. पण दुसऱ्याक्षणी त्यानें पुरावा काय ह्मणून विचारल्यास आपण काय सांगणार ? ही शंका घेऊन तो विचार रद्द केला. दुसऱ्यांदा त्यास वाटलें, अबदुलखानाच्याच कानावर या सर्व गोष्टी घालवून हसीनेस कैचींत धरावी. पण येथेंही त्यास पुराव्याची अडचण भासूं लागली आणि शिवाय मानसिंग सावध होऊन नामानिराळा राहील. तेव्हां तेंही बरोबर नाहीं. असे अनेक विचार त्याचे मनांत आले; पण ते सर्व त्यास निष्फळ आणि आपल्या अंगलट येण्यासारखे वाटले.त्याला अशी युक्ति पाहिजे होती कीं ज्याच्यायोगें तें जोडपें पकडतां यावें.आलटून पालटून तो हाच विचार करीत होता.

पुष्कळ वेळ नाना तऱ्हेचे विचार केल्यानंतर मध्येंच त्यास असा एक विचार सुचला: मानसिंगाला मेवाडच्या दरबारची वकिली मिळाली आहे तेव्हां तिकडे त्याचें गमन चटकन होईल, अशी कांहीं तजवीज करावी. तो दूर गेल्यानंतर हसीना मानसिंगाकरितां किंवा तो तिच्याकरितां काय खटपटी करितात याचा अदमास घ्यावा आणि त्यांत त्यांचे निरोप किंवा चिठ्या जर आपणास पकडतां आल्या तर आपल्यास खरी मजा करितां येईल. आणि जमल्यास सर्वांचा यथायोग्य सूडही घेतां येईल."

बस्स ! ठरला बेत !! मोहबत खानानें त्याच्यावर खूप विचार केला. कारस्थान कसें जुळवावयाचें तें नीट ठरविलें आणि प्रत्येक धागा जेथल्या तेथें बसवून तो स्वस्थ झोंपीं गेला !

प्रातःकाळीं तो लवकर उठला. शौचमुखमार्जनादि विधि त्यानें उरकले. आणि नंतर तो आपल्या भावास भेटण्यास ह्मणून गेला.

मानसिंग स्थानावर होतांच दोघां भावाचें खालीलप्रमाणें बोलणें झालें.

मोहबतखानानें मोठ्या कळकळीनें ह्मटलें, मला वाटतें आतां तुह्मीं येथें फार दिवस गमूं नये. अल्लाच्या मेहरबानीनें तुह्माला चांगला हुद्दा मिळाला आहे."

"हो–माझा आहेच तो विचार. चार आठादिवसांत मी निघेन ह्मणतों" आपल्या भावाच्या कळकळीचें मनातले मनांत नवल करीत मानसिंगानें म्हटलें, "आई व बाबा उद्यांपरवा निघणार आहेत. ते गेल्यावर त्यांच्या मागोमाग मीही निघेन."

"चार आठदिवस तरी उगीच घालवितो आहेस—" मोहबत त्याच्या मुद्रेकडे बारकाईने पहात म्हणाला, "बाकी तसें कांहीं महत्वाचें तुझें इथें काम असेल तर माझा कांहीं आग्रह नाहीं हो. मी आपलें सहज सांगितलें."

आपल्या भावाच्या प्रेमाला कांहीं अर्थ आहे, आज तो इतक्या सकाळीं आपल्याकडे मुद्दाम आला, यालाही कांहीं तरी कारण आहे, हें मानसिंगानें तेव्हांच ओळखलें व तो एकप्रकारें सावधही झाला.

"आतां तुझी प्रकृति कशी आहे ?" मोहबत खानानें सहजविचारल्याप्रमाणें म्हटलें, "अलीकडे दोन दिवस तूं निजूनच होतास, असें ऐकलें." असें म्हणत तो किंचित हंसून म्हणाला, "जवानीच्या बेफामपणांत रात्रीच्या उनाडक्या फाजील उपयोगाच्या नाहींत हो."

मानसिंग ओशाळला. बायकी लज्जनें त्याची मुद्रा लाल झाली. त्याची इच्छा नसतांही त्याच्या मुद्रेंत हा पालट पडला व तो पाहून मोहबतखानानेंही आपला ओंठ चावला !

या नंतर थोड्यावेळानें मोहबतखानाची स्वारी तेथून बाहेर पडून मुख्य मंत्र्याकडे गेली आणि तेथें त्यांनीं मानसिंगाविषयीं कळकळीचें प्रदर्शन करून त्यांचे करवीं मानसिंगास मेवाडाला एकदम निघून जाण्याचा हुकूम सुटेल, अशी व्यवस्था केली.



# परिच्छेद ४० वा.

## मेवाडच्या प्रेमाकरितां.

आपण आग्र्यास आल्यानंतर आपल्या आयुष्यांत कांहीं महत्वाचे प्रसंग घडून येतील, अशी जयश्रीची सूतराम आशा नव्हती परतु त्या नंतरचें तिचें दैवालिखितच मोठें चमत्कारिक होतें. मेवाडच्या त्यावेळच्या कथेंत तिचेंही नांव प्रामुख्यानें गोवलें जाणार होतें.

त्या दिवशींच्या विलक्षण योगायोगाचें आपल्या मनाशींच कौतुक करीत ती जनानी वेषांतील मानासिंगाला घेऊन आपल्यावाड्यांत परत आली. घरीं येतांच त्यानें आपलें वेषपरिवर्तन केलें. पुनः त्या दोघांचें कांहीं बोलणें झालें. दिवेलागणींचे सुमारास मानासिंगानें मुक्काट्यानें आपल्या घरीं जावें असें ठरलें.

या गोष्टीला कांहीं काळ लोटतो न लोटतो तोंच फर्जंदबेगाच्या आगमनाची वर्दी आली त्यांत तो मुलीला घेऊन आपल्याकडे आल्याचें पाहून तर तिला भारीच नवल वाटलें. तिनें त्या दोघांही पितापुत्रीचें सहास्य स्वागत केलें.

फर्जंदबेग अद्यापिही अस्वस्थचित्तच होता. त्यानें विशेष कांहीं न बोलतां एकदम ह्मटलें, "जयश्री कांहीं कारणामुळें या माझ्या अनाथ मुलीला तुझ्या आश्रयास आणून ठेवण्याचें माझ्या नशिबीं आलें आहे. या दैवयोगाचें कारण सांगण्याइतकें माझें मन स्वस्थ नाहीं. पण तिला योग्य ठिकाणीं ठेवण्यासारखें विश्वासाचें स्थान मला या आग्र्यांत दुसरें दिसत नाहीं. मी तुझ्याकडेच कां आलों हें सुद्धां मला यावेळीं सांगतां येणार नाहीं. एवढें खरें कीं, तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास बसलेला आहे आणि तेवढ्याकरितां ही ठेव–हसीना–तुझ्या जवळ कांहीं दिवस ठेवण्याचा माझा

विचार आहे ! तुझ्या परिचयाचा मी फाजील फायदा घेऊन तुझ्या सौजन्याला मी त्रास देत आहे, याची मला जाणीव आहे. परंतु यावेळीं मला दुसरा कांहीं उपायच सुचत नाहीं. ''

जयश्री एकदम ह्मणाली, पण असें मानण्याचें कारण काय ? मी आपली कन्या आहे. व हसीना माझी बहीण आहे. माझ्या घरीं येण्याचा आपल्या दोघानाही हक्क आहे. कोणत्या संकटामुळें आपण इथं आलां हें मी मुळींच विचारीत नाहीं आणि विचारणार नाहीं. माझ्यावर विश्वास ठेवून आपण हें आपलेंच घर समजून इथें आला, याचा मला खरोखरच आनंद वाटला ! कांहीं दिवसाकरितांच नव्हे तर सदासर्वदा दोघंही माझ्या घरीं राहा. माझे पतीही याला आडकाठी करणार नाहींत आणि ते हसीनेकडे बहीण या नात्यानें पाहतील अशी मी खात्री देतें. आपण निश्चित असा ''

फर्जंदबेगाला समाधान वाटलें. तो शांतपणें ह्मणाला, अल्ला तुझें भलें करो ! हे तुझे उपकार फेडण्याचा प्रसंग आल्यास फर्जंदबेग आपले प्राणही अर्पण करील हें मात्र लक्ष्यांत ठेव आणि तसा प्रसंग आलाच तर माझें स्मरण ठेव. मी आतां जातों. एकदोन दिवसांत पुढें काय करावयाचें तें ठरवीन. '' असें ह्मणून तो निघून गेला.

तो निघून गेल्यावर दुःखी व उदास हसीनेला आपल्याजवळ बसवून जयश्रीनें तिचेही शांतवन करून तिला धीर दिला आणि ह्मटलें, " तुमच्या परवानगीवांचून तुमच्या मैत्रिणीला ( मानसिंगाला ) मी इकडे आणिलं त्याचं कारण तुमचें दोघांचेंही संकट निवारण व्हावं, हेंच होय. बाकी आतां तुह्माला कशाचीही काळजी करायला नको. अगदीं निर्धास्तपणें तुह्मी इथं राहा. '' यापेक्षां ती जास्त कांहीं बोलली नाहीं. पण तेवढ्यानें हसीनेस समाधान वाटलें व तिनें आपल्या बापानें आपल्यास इकडे कां आणिलें, त्याचें कारण सांगितलें. आणखींही त्यांचीं बरींच बोलणी झालीं; पण तेवढ्या संवादांत मानसिंगाचा निर्देश दोघींनींही केला नाहीं. यामुळें हसीनेचें मन बरेंच प्रशस्त झालें. असो.

ठरल्याप्रमाणें मानसिंग जाण्यास निघाला. त्यावेळीं पुनः जयश्रीचें व त्याचें कांहीं बोलणें झालें. नंतर तो आपल्या घरीं आला व ती आपल्या पुढच्या विचारास लागली.

आतां जयश्रीच्या मनांत ठाकुरसाहेबांच्या सुटकेचे विचार घोळूं लागले त्या विचारांत ती हसीनेला सुद्धां विसरली.

त्या रात्रीं त्या दोघीही एकाच महालांत जवळ जवळ निजल्या. कांहीं वेळ त्यांचे मेवाडला जाण्यासंबंधीं किंवा तेथील राहण्यासंबंधीं बोलणें झालें नंतर दोघींनींही एकमेकींस ' आतां निजावें ' असें ह्मणून बोलणें बंद केलें.

परंतु दोघींनाही झोंप आली नाहीं. मात्र दोघींनाही वाटत होतें, दुसरी निद्रागत झाली असावी.

आपल्या बुद्धिप्रमाणें व तर्कशक्तिप्रमाणें जयश्रीनें ठाकुरसाहेबांच्या सुटकेच्या अनेक योजना बसविल्या आणि तितक्यांना अनेक शंका उत्पन्न होऊन त्या तिला अशक्य वाटूं लागल्या.

मध्यान्हरात्र उलटून गेली तरी जयश्रीला झोंप येइना कीं, एखादी बेमालूम तोड सुचेना. शेवटीं ती बिछान्यावर पडून कंटाळली. प्रथम ती उठून बसून विचार करूं लागली. तसेंही बरें वाटेना तेव्हां ती उठून इकडें तिकडे फिरूं लागली.

हसीना अर्धवट जागीच होती. ती तोंडावरून पांघरूण घेऊन पडली होती. जयश्रीच्या फिरण्याची तिला चाहूल लागली. तिला आश्चर्य वाटलें. तिनें पांघरूण काढून पाहिले तो जयश्री इकडे तिकडे फिरत होती.

तिला आश्चर्य वाटलें. ती उठून बसली व ह्मणाली, " हें काय ? तुह्मी जागच्याच ? तुह्माला झोंप नाहीं आली ?—कां बरें ? "

दोघीही परस्पराजवळ बसल्या.

हसीनेनें ह्मटलें, " तुह्माला कां बरं झोंप येऊं नये ? तुह्मीं एवढी कसली चिंता करतां आहां. मला तुह्मी निर्धास्त राहायला सांगितलें अन् तुह्मी अशा काळजींत कीं, तुह्मांला धड झोंपही येऊं नये. "

जयश्रीनें गंभीरपणें म्हटलें, "मला स्वतःची किंवा स्वतःच्या कुटुंबाची कसलीच काळजी नाहीं. परंतु माझ्या एका नातलगाची त्याच्या दुर्धर संकटांतून कशी सुटका करावी? या काळजींत मी आहें. एखादी चांगलीशी युक्ति सुचेना हो–"

हसीनेनें सहज विचारिलें, "माझ्या वडीलांच्या मदतीचा कांहीं उपयोग होण्यासारखा नाहीं का? ते तुमचं काम आनंदानें करतील!"

जयश्रीनें अस्पष्ट स्वरांत कांहींसें स्वगतच म्हटलें, "तुमच्या वडिलांच्या मदतीचा उपयोग होय!— " असें म्हणून ती विचार करूं लागली. आणि त्यावेळीं तिला एक विलक्षण तोड सुचली. ती एकदम म्हणाली, "होय— असेंच करावं! —अहा! युक्ति पण युक्ति!!—हसीनबी, तुमच्या वडिलांचा उपयोग मला फारच होईल."

हसीना म्हणाली, "मग ते जरूर तुमच्या उपयोगीं पडतील."

जयश्री सुचलेल्या युक्तीचे धागे जुळवीत म्हणाली, "त्यांनीं जर माझं म्हणणं ऐकलं तर काय बहार होईल? फारच चांगलं होणार आहे."

हसीनेनें म्हटलें, "अगदीं खात्रीनें ऐकतील ते मघाच्या भेटींत त्यांनीं तसं वचन नाहीं का दिलं? ते वचनाचे मोठे पक्के आहेत.

जयश्री म्हणाली, "काय होईल तें खरें! पण माझं काम इतकं अवघड आहे—"

पुढें दोघीही अंथरुणावर पहुडल्या.

"फर्जंदबेगानें आपलें म्हणणें मान्य केलें तर ठाकुरसाहेबांची सुटका हां हां म्हणतां होईल आणि कसलाही बोभाटा होणार नाहीं. त्यांनी आपलें म्हणणें मान्य मात्र केलें पाहिजे" इत्यादि विचारच पुनः पुनः करीत जयश्री झोपीं गेली.

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं उठल्यापासून तिला फर्जंदबेगाच्या आगमनाचा ध्यास लागला. तो केव्हां येतो आणि आपण त्याला आपली अडचण

सांगून त्याच्याकडून मदतीचें वचन केव्हां घेतो असें तिला झालें. सारी सकाळ आणि दुपार तिची याच विवंचनेंत गेली. इतक्यांत फर्जंदबेग आल्याचें तिला कळलें.

तिच्या आनंदास पारावार राहिला नाहीं. तिनें त्यास एकांतांत बोलावून घेतलें. हसीनेला सुद्धां तिकडे येण्याची मनाई केली.

प्रथमतः फर्जंदबेगानें म्हटलें, " जयश्रीबाई, मी हसीनेविषयीं कांहीं योजना केली होती; पण ती आतांच जुळेल असें वाटत नाहीं. तव्हां तिला तुम्ही आपल्या मेवाडांत घेऊन जाल का ? तरच बरें होईल. न हो तर—"

" त्याचीं नका तुम्हीं काळजी करूं. हसीनेच्या सर्व जन्माचा भार मी आपल्यावर घेतें आणि तिच्या केसालाही धक्का न लागेल, अशी हम्मी देतें. " जयश्री मध्येंच म्हणाली, आतां मीच तुम्हाला एक प्रश्न धीटपणानें विचारतें त्याचें उत्तर द्या म्हणजे झालं "

" तो कोणता ? " फर्जंदबेगानें कांहींसें आश्चर्यानें विचारिलें.

जयश्रीनें म्हटलें, " तुम्ही पुढें काय करणार ? तुम्हाला कांहीं काम आहे कीं, तुम्ही आतां पुनः मेवाडांतच जाणार—"

" जयश्री, मी बोलून चालून फकीर. त्यांतून म्हातारा. मला कसलें काम आलें आहे ? पण त्यामुळेंच मला हसीनेसारख्या तरुण सुंदर मुलीला बरोबर बाळगतां येत नाहीं. "

" नाहीं. नाहीं. त्याकरितां मी नाहीं विचारिलें. " जयश्रीनें एकदम म्हटलें, माझें एक तुमच्याकडे काम आहे. ते करण्यास तुम्हांला सवड आहे काय ? असा माझा हेतु विचारण्याचा ! "

फर्जंदबेग म्हणाला, " तुझें काम करण्यास ? अलबत् वेळ आहे आणि इच्छाही पण आहे. याबद्दल मी तुला पूर्वींच विनंति केली आहे सांग, जयश्री, तुझें काम सांग. " तें कळण्यापूर्वींच माझ्या शक्तीबुद्धीप्रमाणें तें करण्याचें मी तुला वचन देतों. "

" माझें काम मोठें चमत्कारिक आहे. बरंच अवघड आहे. "

" माझी इच्छा नसती तर या तुझ्या सबबी मला पुरेशा आहेत• परंतु तसें नाहीं. तुझ्या उपयोगी पडण्याची मला इच्छाच आहे• निःसंकोच-पणानें तूं आपलें काम सांग. " फर्जदबेग ह्मणाला, " हें पहा जयश्री, आतां या जगांत मला दोन मोहाच्या वस्तु आहेत. एक हसीना व दुसरे माझे प्राण• हसीनेचा भार तूं उचलला आहेसच—"

" त्याबद्दल आपल्यास कसलीच काळजी नको. " जयश्रीनें निश्च-यानें म्हटलें " पतीच्या पायांस स्मरून सांगत्यें, कीं, माझ्या जिवांत जीव असेपर्यंत मी हसीनेचा पाठच्या बहिणी प्रमाणें सांभाळ करीन—"

" मला जास्त खात्री नको आहे. तूं रजपुताणी आहेस, प्रतापाची सून आहेस एका वीराची पतिव्रता आहेस. तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास आहे तुझें काम सांग—"

जयश्रीनें कांहीं विचार केला व म्हटलें, " तुमचा ज्याप्रमाणं माझ्यावर विश्वास आहे, त्याप्रमाणं माझाही तुमच्यावर आहे तरीपण मी एक वचन मागतें. मी कामतर सांगतेंच; पण कांहीं कारणामुळें—अडचणी-मुळं—तुम्हाला तें करवलं नाहीं किंवा करावेंसें वाटलं नाहीं तर तुम्ही मी सांगितलेली गोष्ट गुप्त ठेवाल ? ध्यानात ठेवा, मी हें स्वार्थाकरितां विचारात नाहीं. मेवाडच्या कल्याणाकरीतां मी हें वचन तुमच्याकडून घेत आहे नाहींतर आमचें—मेवाडचें फार नुकसान होणार आहे— "

" तें व्हावं अशी माझी इच्छा नाहीं. जयश्री, मी मुसलमान असलों तरी मेवाड विषयींची माझी प्रीति किंवा प्रतापाविषयींची माझी भक्ति खोटी नाहीं—" फर्जदबेग गंभीरतेनें ह्मणाला, " तूं आपल्या पतीची कसम खाऊन मला विश्वास दिलास मी आपल्या धर्माची कसम खाऊन सांगतों कीं कोणत्याहि कारणानें मी तुझा विश्वासघात करणार नाहीं.अगोदर मी तुझं काम करीनच करीन; पण दुर्दैवानें माझ्या हातून तें झालं नाहीं

तर तुझ्या वाटेंत मी कांटे पसरण्याचें पाप तरी खास करणार नाहीं. तूं पूर्ण विश्वास ठेव. सांग बेटा, आपलें काम सांग—"

जयश्रीनें पुनः कांहीं विचार केला. ऐनवेळीं तिचें मन डळमळूं लागलें तें पाहून फर्जंदबेगानें पुनः तिची खात्री केली. तेव्हां ती म्हणाली, "पिताजी—हो तुम्ही माझे वडीलच नाहीं तर काय ?—पिताजी, तुमच्याबद्दल मी थोडी तरी शंका घेतें या बद्दल मला क्षमा करा; पण आमची स्थिति मोठी नाजूक झाली आहे. कोण कोणत्यावेळीं कुठं आणि कसा विश्वासघात करील याचा नेम नाहींसा झाला आहे. त्यामुळं फारच जपून वागावं लागतं."

तुझी सावधगिरी बरोबर आहे आणि योग्यही आहे. आणि मला त्याबद्दल आनंदच वाटतो आहे. तुझें काम नाकारण्याचें कारण मला कांहीं दिसत नाहीं. त्यांतून तुला कांहीं शंकाच येत असेल तर तूं तें न सांगावेंस हें बरें."

"तसें करून कसें चालेल. एक उपाय सुचला आहे आणि तो तुमच्या मदती वांचून होणंच शक्य नाहीं." जयश्री सचिंत होऊन म्हणाली, "आमच्या जन्मभूमीच्या कल्याणाबद्दल मला तुमच्यासारख्या मनुष्याची याचना करण्याचा प्रसंग यावा याचा मला भारी खेद वाटतो."

"कारण ?"

"कारण ? कारण आम्हाला मदत करणं म्हणजे स्वजाती द्रोहच करणं नाहीं का ?"

"सत्कृत्याला मदत करणं म्हणजे परमेश्वराची आज्ञा पालन करण्या सारखं आहे. मोंगलांकडून रजपूत जाति अनिष्टतऱ्हेनें व हकनाक छळली गेली आहे. त्याचें परिमार्जन माझ्यासारख्यांनीं थोड्याशा सहाय्यानं केलं तर मला नाहीं वाटत तें पाप होईल."

जयश्री एकदम म्हणाली, "असे तुमचे विचार असले तर मग सांगत्येंच तुम्हाला माझं काम." असें म्हणून तिनें पुनः कांहीं विचार

केला आणि खालच्या स्वरांत म्हटलं "ठाकुर ईसरसिंगजीला तुम्ही ओळखतां ?"

"नावानें. प्रतापाचा तो जीव कीं प्राण होता. तो मोठा लढा वीर आहे, असें ऐकतों त्याचप्रमाणें तो मोठा करारी व स्वाभिमानी आहे.'

होय असे ते आहेत खरे पण दुर्दैवाने आज ते मोंगलाच्या कैदेंत इथं आग्र्यांत आहेत. आपल्याला त्यांची सुटका करावयाची आहे."

"पण मोंगलाच्या जाळ्यांत ते सांपडले कसे ?

"दगलबाजीनें ! कोणी केली भगवानाला माहित; पण ते कैदेंत येऊन पडले खरे."

"मग मी काय करूं सांग. तूं सांगशील तें करण्यास मी तयार आहे."

"तुमच्या आणि ठाकुरसाहेबांच्या रूपांत विलक्षण साम्य आहे तेव्हां त्यांच्या जागीं" जयश्री ओशाळत म्हणाली, "कैदेंत जाऊन राहा म्हणण्याची मला खरोखरीच शरम वाटते. परंतु ठाकुरसाहेबांची मुक्तता होण्यांत मेवाडचें एवढें मोठें कल्याण होणार आहे." असें म्हणून ती आशेनें फर्जंदबेगाच्या मुद्रेकडे पाहूं लागली.

फर्जंदबेग हंसून म्हणाला, "मला म्हाताऱ्याला सुळी देण्याचा विचार आहे होय ? ठीक आहे. कांहीं हरकत नाहीं. जयश्री, बेटा, या एवढ्या क्षुल्लक गोष्टीत संकोच कसला आला आहे ? सांग—सविस्तर सांग तुझी योजना. मी त्याप्रमाणें वागण्यास तयार आहें बरें,"

फर्जंदबेगाचें हें आश्वासन ऐकून जयश्रीस आनंद वाटला. तिनें आपली योजना त्यास सांगितली व म्हटलें, "आज एवढी कृपा तुम्ही केलीत कीं मागून तुमच्या सुटकेकरितां मी मुद्दाम इथें येऊन राहीन आणि तुमची सुटका करीन"

" तें पुढचें पुढें पाहूं. आज आपल्याला एवढें करायचें ना ? ठीकआहे. मला एक बारातासांचा सवड दे. विश्वास ठेव. मी वचन दिल्या-वर मागें घेणार नाही. "

नाहीं तशी शंका आतां मला येत नाहीं. तेवढी मुदत आम्हालाही पुढच्या तयारीस पाहिजेच.





# परिच्छेद ४१ वा.

## शेवटचा प्रयत्न !






नसिंगाच्या मनाला दोन गति होत्या. एक मेवाड भर्त्याची आणि दुसरी इष्काची. कोणत्याही एका गतींत असतांना दुसरीचा पूर्ण विसर पडे आणि कांहीं प्रसंगानें एका गतींतून दुसऱ्या गतींत जाण्याचा त्यास योग आला कीं, पस्ताव्यानें दुःख सहन करावें लागे. तो ठाकुरसाहेबांच्या सुटकेच्या प्रयत्नांत होता, त्यावेळीं त्याला हसीनेचें स्मरणही नव्हतें; परंतु त्या खटपटींत असतां छद्मवेषांत त्याची व हसीनेची भेट झाली आणि तेवढ्यानें त्याचें आसन डळमळलें. मन त्याची ती समाधी बरोबर जमेना आणि त्याच घांदलींत तो आपल्या प्रेयसीच्या बाहूंत येऊन पडला ! येथें त्यास आपल्या कर्तव्याचें पूर्ण विस्मर झालें. मन इष्काच्या गतींत गुंगलें. त्यावेळीं जयश्रीनें येऊन थप्पड दिली. मानसिंग भानावर आला. त्यानें आपला प्रसंग ओळखला व त्याचें मन दुसऱ्या गतीकडे वळलें !

मोहबतखान त्याचेकडे आला. त्यावेळीं तो या गतींत—कर्तव्यस्मर-

पाहिलें. आपल्या वर्तनाचा आपल्या भावाला कां बरें संशय आला? आपण ठाकुरसाहेबांच्या मुक्ततेकरितां झटतों आहोंत, याचा त्याला कांहीं सुगावा लागला असेल काय? अशीच त्यास शंका आली. कारण मन त्या गर्तीत होतें. हसीनेच्या आमिषांत मोहबतखान गुंगला आहे, हे त्यास माहीत असूनही तशा कांहीं संशयानें तो आपल्याकडे आला असेल, अशी शंका कांहीं मानसिंगास आली नाहीं. असो.

मोहबतखान निघून गेल्यावर मानसिंगानें या दृष्टीनें त्याच्या आगमनाकडे पाहून सावधगिरी ठेवण्याचें योजिलें. तो जयश्रीकडे पुरुषवेश करून आपल्या घरीं परत येतेवेळीं त्यादोघांचें कांहीं बेत ठरले होतें, त्याप्रमाणें मानसिंग मोहबतखान निघून गेल्या नंतर मुकाट्यानें ठाकुर साहेबांचेकडे गेला

यावेळीं त्याला ठाकुरसाहेबाकडे जाणें ह्मणजे अगदीं मरण होतें. त्यांच्या समोर गेल्यावर तें आपली थोडीही दया ठेवणार नाहींत आणि इतके रागावलेले असतील कीं, आपल्याशीं ते बोलतील कां नाहीं, याची शंका. असे विचार मानसिंगाचे मनांत आले, परंतु न जाण्याखेरीज त्यास गत्यंतर नव्हतें. कारण यावेळीं तो कर्तव्यस्मरणाच्या गर्तींत होता.

मानसिंगानें कल्पना केल्याप्रमाणेंच ठाकुरसाहेबांच्या बंदिखान्याचें वातावरण अगदीं बिनसून गेलें होतें. प्रथमतः अजबखानच घुश्शांत दिसला. मानसिंगाला ठाकुरसाहेबांकडे नेण्यांस तो राजी होईना तो गुरगुरत ह्मणाला, " कशाला जातोय त्या थेरड्याकडे. कुणाला ठाऊक काय लेकाचें बिघलंय! वाघासारखा खवळलाय् गडी वाघासारखा!"

अजबखानची ही प्रस्तावनाच मानसिंगास पुढच्या प्रळयाची कल्पना देण्यास पुरेशी होती. पण ठाकुरसाहेबांची भेट घेतल्याखेरीज त्यास परत फिरतां येत नव्हतें आणि त्यांना भेटल्याखेरीज जावयाचें नाहीं, असा त्याचाही पण निश्चय होता. तेव्हां त्यानें थोडीफार अजिजी करून अजबखानास खुश केलें आणि ह्मटलें, " माझ्या भेटीनें कदाचित त्यांचा राग शांत होईल

आणि त्यांच्या रागावं कारणही कळेल ! पाहूं तर खरं कां रागावले आहेत ते. ही म्हातारीं माणसं मोठीं लहरी असतात. ”

अजबखान त्रासिक मुद्रा करून म्हणाला, “ तें कांहीं खोटें नव्हे. आणि त्यांत हा म्हातारा तर असा बिलंदर आहे एकदां बिनसला म्हणजे पुन: ताळ्यावर आणतां आणतां पुरे वाट. बरं तें असो. मानसिंगजी मी तुम्हाला त्याच्याकडे नेतो. पण तुम्ही आमचं काम केलं पाहिजे. तो प्रसन्न झाला तर त्याला तुम्ही ‘ अजबखानसाहेबांचें काय काम आहे तें करून टाकानांत, असं म्हणा. ”

“ तें माझ्याकडे लागलं ” मानसिगानें एकदम मान्यता दिली.

“ नुसतं बोलण्यानें नाहीं भागणार. तो राजी नाहीं झाला तर मी तुम्हाला इथं नाहीं येऊं देणार ! अगदीं खात्रीनें सांगतो. ” अजबखानानें बजावलं.

“ त्याची नको काळजी. मी आपल्याकडून अगदीं शिकस्त करून पाहतों. नाहीं जमलं तर तुम्ही आम्हाला पुन: त्यांच्याकडे जाण्याची परवानगी देऊं नका, म्हणजे झालं कीं नाहीं ? ” मानसिगानें म्हटलें.

असा वायदा ठरल्यावर अजबखानानें त्यास ठाकुरसाहेबांच्या महालांत नेऊन सोडलें व तो निघून गेला.

मानसिगाला पाहताच ठाकुरसाहेब चवताळून म्हणाले, “ पुन: आलास आपलें काळें तोंड घेऊन दाखवायला ? बेशरम ! विश्वासघातकी !! जा, मानसिंग एकदम माझ्या पुढून चालता हो ! तुझें तें बोलणें नको आणि ती खोटी आशाही नको. ”

मानसिंग मुकाट्यानें खालीं मान घालून उभा राहिला.

ठाकुरसाहेब पुढें म्हणाले, “ हात हात लांब जीभ काढून बाता मारायचे वेळी लाज वाटली नाहीं तुला अं ? तूं मनुष्य आहेस कीं पशु आहेस ? ”

मानसिंग मध्येंच शांतपणें म्हणाला, " ठाकूरसाहेब, आपण शांत होऊन माझें म्हणणें ऐकाल कां ?—त्या दिवशींचा आपला बेत केवळ दुर्दैवानें फसला. मी सर्व तयारी केली होती व तुमच्याकडे येण्यास निघालों होतों.— '

" मग मध्येंच काय झालं ? त्या तुझ्या यवनींचा निरोप आला होय ?—तूं लाजलास ?–आतां तूं खालीं मान घालतोस ? निर्लज्ज मनुष्या, आपला देश दुर्दैवाच्या पंकांत रुतला असतांना, तुला या पाचकळ प्रेमाच्या गोष्टी सुचतात अं ? धिःकार असो तुमच्या मनुष्यत्वाला ! " ठाकुरसाहेबांनीं तिरस्कारानें म्हटलें.

मानसिंगानें मुकाट्यानें आपल्या खिशांतून एक चिठ्ठी काढून त्यांचे-पुढें टाकली आणि म्हटले, " अगोदर ती चिठ्ठी पहा न् मग मला काय दोष द्यावयाचा आहे तो द्या. मी अगदींच निरपराधी आहे, असं माझें म्हणणें नाहीं. पण दैवाचीही मला तितकी अनुकूलता मिळाली नाहीं एवढेंच मला सांगतां येईल. "

बराच वेळ ठाकुरसाहेबांनी ती चिठ्ठी उचलला नाही व ते पुढें कांहीं बोललेही नाहींत. आतां मानसिंगाच्या नादी लागण्यांत कांहीं अर्थ नाहीं, असें त्यांनी ठरविलें होतें कीं काय कोण जाणे ?

मानसिंग पुनः म्हणाला, " पहा ती चिठ्ठी आपण. आपला भ्रम दूर होईल व रागही शांत होईल.

" कोणाची आहे ती चिठ्ठी ? " ठाकुरसाहेबांनीं त्रासून विचारिलें.

" जयश्रीबाईंची. " मानसिंगानें थोडें थोडें अवसान धरीत म्हटलें, " त्यांची व माझी आकस्मिक गांठ पडली असून दोघांचे हेतुही जुळले आहेत. अर्थात् एकाला दोघे झालों आहों. तेव्हां आशेला जागा अद्याप आहे असें मला वाटतें. "

जयश्रीचें नांव ऐकूनही ठाकुरसाहेबांनीं ती चिठ्ठी चटकन् उचलली नाहीं. इतकी त्यांची निराशा झाली होती. नंतर त्यांनीं ती घेऊन, उलगडून वाचली

" मानसिंगानें केलेली तयारी कांहीं चमत्कारिक योगानें फसली. त्यामुळें त्यांचा नाइलाज झाला. आतां आम्ही दोघेंही त्या खटपटीला लागतों. निराश होऊं नये. "

एवढा मचकूर त्या चिठींत होता. त्यामुळें ठाकूरसाहेबांचें विशेष समाधान झालें नाहीं. थोडासा त्यांचा नूर मात्र बदलला. तो फरक पाहून मानसिंग आणखी धीट झाला व म्हणाला ' ठाकूरसाहेब आपली सुटका म्हणजे सहज कार्य नाहीं. कांहीं प्रयत्न असफुकट जाणारच. त्यामुळें रागाऊन किंवा निराशहाऊन कसं चालेल बरं ? "

" मग आतां तुझं काय म्हणणं आहे ? " ठाकूरसाहेबांनीं कांहींशा विरक्त पणानें विचारिलें, " मला आशा नाहींच आहे. आपलें विचारतों. "

" आजच्या भेटीत–" मानसिंग किंचित् हंसून म्हणाला, " मी फक्त आपल्याला शांत करण्याकरितां आणि ही चिठ्ठी पोंचविण्याकरितां आलों आहे.

" फारच मोठ्या कार्याला आला आहेस तूं. " ठाकूरसाहेब उपहासानें म्हणाले."

मानसिंगानें त्या उपहासाचाही राग न मानतां म्हटलें, " आतां मला विशेष कांहीं जरी सांगतां आलें नाहीं, तरी मी एवढें सांगतों. कीं, या चार आठ दिवसांत वाटेल तो प्रयत्न करून आम्हाला तुमची सुटका तरी केली पाहिजे किंवा तो नाद सोडून दिला पाहिजे. कारण माझ्या हाल चालीवर कोणाची तरी नजर असावी.असा संशय मला आज सकाळींच आला आहे."

ठाकुरसाहेबासारखा करारीस्वभावाचा मनुष्यहि आशेने नादान झाला. पुनःत्यांना वाटलें न जाणो ही संधा गेली तर काय करा ? मानसिंगाशीं सख्य जोडण्यास ते पुनः तयार झाले. पुनः त्याचें खलबत झालें.

कांहीं वेळानें मानसिंग जाण्यास उठला व त्यावेळीं त्यास अजाबखानाच्या गोष्टींचें स्मरण झालें. तो म्हणाला, " या अजबखानाला तुम्ही कां नाखुश केला आहेत ? "

ठाकुरसाहेब रागानें म्हणाले :" तो अगदीं लतकोडगा आणि खोटा मनुष्य आहे. या नाजुमीच्या सोंगाखालीं त्याला मी हजारों रुपये मिळवून दिले. परंतु तो असा कृतघ्न आहे कीं, सुटका करण्यास मुळींच तयार होत नाहीं. पाजी—

मानसिंगानें म्हटलें, " नालायख माणसावर उपकार केले कीं ते असे उलट्या काळजाचे होतातच. त्याला दोष देण्यांत तरी काय अर्थ आहे. आपलें दुर्दैव म्हणून गप्प बसणें भाग आहे नव्हे आपलें काम साधेपर्यंत उलट त्याला चुचकारणें आपलें कर्तव्य आहे. "

" छे: ! त्याचा मला इतका तिटकारा आला आहे कीं, आतां त्याचें मी एक म्हणणें ऐकणार नाहीं. संधी साधेल तर चोराला यमसदनीं पाठवीन, कधीं सोडणार नाहीं. "

" असा अनर्थ करून भागणार नाहीं. " मानसिंग त्यास शांत करीत म्हणाला, " गरज आपल्यास आहे. तो रुष्ट झाला तर सगळेंच बिनसेल, आजच तो घुश्यानें मला येऊं देत नव्हता. कांहीं झालें तरी त्याला खुश ठेवला पाहिजे. नाहींतर तो मला बंदी करील आणि पुढच्या सर्व बेतावर पाणी पडेल. तेव्हां कांहीं करून त्याला खुश ठेवा. "

ठाकुरसाहेबानीं त्याची विनंति मान्य केली. नंतर मानसिंग त्यांची रजा घेऊन बाहेर पडला. जातां जातां त्यानें अजवखानासही खुश केलें.

मानसिंग घरीं आला पण दिवसभर त्यानें कांहीं काम केलें नाहीं. संध्याकाळीं त्यास मुख्य मंत्र्याचें बोलावणें आलें. त्याप्रमाणें तो भेटीस गेल्यावर तेथें त्यास एक दिवस तयारी करतां घेऊन एकदम मेवाडकडे रवाना होण्याचा हुकूम मिळाला. ही आपल्या भावाची कृपा आहे, हें त्यानें तेव्हांच ताडलें. त्याचें मन कांहींसें खिन्न झालें; पण मग त्यानें विचारांत विशेष वेळ न दवडितां जयश्रीकडे गमन केलें.

त्या दोघांची भेट होतांच मानसिंगानें प्रथमत: आपल्या हुकमाची वार्ता सांगून क्षणभर जयश्रीसही निराश केलें आणि हा परिणाम आपल्या बंधूच्या

फाजीलपणाचा आहे व त्याला कारण अमूक असावें, अशी आपली शंका आहे. इत्यादि गोष्टी सांगितल्या.

प्रथम कांहीं वेळ जयश्रीलाही गोंधळल्यासारखें झालें; पण मागून तिला मोहबतखानानें कोणत्या हेतूनें हा खोडसाळपणा केला असेल, याची अटकळ आली व तिनें ह्मटलें, " खानसाहेबानीं हें कां केलें हें मी ओळखलें. तुह्माला त्यांचा पेंच कळला नाहींसें दिसतें, कांहीं हरकत नाहीं. त्यांच्याही तोंडाला आपण पानें पुसूं. "

" पण त्याचें आज महत्व नाहीं. ठाकुरसाहेबांची सुटका कशी होईल हा प्रश्न. माझ्या पुढच्या अनेक धोरणाकरितां मला आतां परवाचे दिवशीं मेवाडकडे निघालेंच पाहिजे तेव्हां हें कार्य उद्यांच्या उद्यां होणार कसें आणि एक तरी सत्कृत्य आपल्या हातून देशाकरितां झालें, हें समाधान मला मिळणार कसें ? कांहीं नाहीं जयश्रीबाई, आमचें कुटुंबच शापित आहे ! आमच्या सारख्यानीं अगोदरच मेवाडच्या गळ्यावर विश्वासघाताची सुरी फिरविली आहेच ! त्यांत कांहीं करूं पुण्य ह्मटलें तर कसें जमणार ? मी जर आतां असा ठाकुरसाहेबांना सोडून गेलों तर ते काय ह्मणतील ? तुमच्या एकट्यावर सर्व भार टाकावा तर तें तरी योग्य दिसतें ? आणि मग माझ्या जन्माचा उपयोग काय ? धिःक्कार असो त्या दैवाला ! ! " असें बोलून मानसिंगानें स्वतःचा मोठा धिःक्कार केला. जयश्रीनें त्याचें मन पाहण्याकरितां त्यास मुद्दाम न बोलूं दिलें.

नंतर तो फारच उदास झालेला पाहून ती त्यास ह्मणाली. " मानसिंगजी, इतकं निराश होण्याचें कारण नाहीं. सत्कृत्य करण्याची इच्छा असली ह्मणजे देव तशांतही सहाय करितो. कृष्णजन्माच्यावेळीं नाहीं का पहारेकऱ्यानां झोपा लागून वसुदेव देवकीच्या बेड्या गळून पडल्या आणि बंदिखान्याचीं कुलपें तुटून पडलीं. त्याच प्रमाणें आतांहि होईल. आमच्या मामंजींचे पुण्य केवढें आहे, याची मानसिंग तुह्माला कल्पना नाहीं.तुह्मी निश्चिंत व्हा.उद्यांचा सबंध दिवस तुमचा आहे ना ? शहाण्या मनुष्याला तेवढ्या वेळांत कार्य उधळून लावणें अशक्य नाहीं. " असें ह्मणून तिने आपली योजना व तिला फर्जंदबेगाची अनुमति त्यास सविस्तर निवेदन केली.

मानसिंगालाही ती युक्ती ताबडतोब पटली. तो हर्ष पावून ह्मणाला, " खरंच ! या युक्तीनं आपण ठाकुर साहेबांना खास सोडवूं शकूं. पण—पण—मला एक शंका येते. विचारूं का ? मनांत भलतंच कांहीं आणूं नका. आपण सर्व बाजूंनीं विचार केला पाहिजे, ह्मणून ह्मणतों:— "

" बोला—मोकळ्या मनाने बोला. या वेळीं मुग्धता नाहीं उपयोगाची. " जयश्रीनें त्याच्या ह्मणण्यास मान्यता दर्शवीत ह्मणालें, " मागून फसगत व्हायला नको. "

मानसिंगानें विचारिलें, " फर्जंदबेगजींच्या औदार्याला हसीनेची संमत्ति मिळेल ना ? कारण, ठाकुरसाहेबांची सुटका झाल्यानंतर आपणास बेगजींची सुटका करतां येईलच असें नाहीं. शिवाय पुढं मागें कपट उघडकीस आल्या-वर बेगजी मुसलमान असले तरी त्यांना कोणती शिक्षा फर्मांविण्यांत येईल, यांचा कांहीं नेम आहे ? त्यावेळीं समजा, त्यांना देहांत शासन झालें तर ? हसीना त्याचें अपयश कोणाला देईल ?—कदाचित् या शंका कांहीं स्वार्थीं माझ्या मनांत आल्या आहेत, असें समजा; पण याचा विचार आपण केला पाहिजे. असें मला वाटतें. "

जयश्री शांतपणें म्हणाली, मानसिंगजी, तुमचें म्हणणें अयोग्य कोण म्हणेल ? त्याचाही विचार मी केला आहे. सुचलेल्या मार्गानें आपण ठाकुर साहेबांची सुटका तर करूं या. पुढें देव सुचवील तसें पाहूं. आम्ही करतों आहोंत, तें कार्य वाईट नाहीं. अशी आपली खात्री आहे. आपण त्यांना मदत करतों आहों, तें वाईट नाहीं, असें फर्जंदबेगांनाही वाटतें. मग देव काय आम्हाला याचें वाईटच फळ देईल ? मुळींच नाहीं. त्यांतून आप-णांस दूरवर विचार करण्यास सवड कुठं आहे ? तेव्हां आतां पुढें काय होईल याचा विचार आपण करूंयाच नको. आतां काय करतां येईल, तें पाहून पाऊल टाकूं या. त्यांतून देवाची मर्जी जशी असेल तसेंच घडून येणार आहे.

" ठीक आहे. मला वाटतें तें मी सांगितलें. तुमचेंही म्हणणें मला

पटलें. हो, प्रत्येक योजनेंत कांहींना कांहीं गोम रहावयाची. मग इतका विचार तरी कशाला ? ”

“ आतां असें करायचें. उद्यां तुम्ही सकाळीं ठाकुरसाहेबांना भेटून त्यांना तयार राहण्यास सांगयचें व पुढें बेगजींची सुटका होण्याची कांहीं उपाय योजना आतांच होण्यासारखी असल्यास करून ठेवायची. नंतर उद्यां सायंकाळीं मी आपल्या वृद्ध पित्याला म्हणजे बेगजींना घेऊन नाजुमीसाहेबाचे दर्शनास जाईन. द्रव्याचा भरपूर उपयोग केला म्हणजे फर्जंदबेग व ठाकुर साहेब यांची अदलाबदल होण्यास फारशी अडचण पडणार नाहीं. तोंपर्यंत तुम्ही दोन चपल घोडे व दोघा मनुष्यांची प्रवासाची तयारी अशा एका जागीं करून ठेवायची कीं ठाकुरसाहेब बंदीखान्यांतून सुटतांच माझ्या घरीं येतील आणि तेथून हसीनेला बरोबर घेऊन मेवाडकडे जाण्यास निघतील, त्यावेळीं त्यांची थोडीही गैरसोय अगर घोटाळा होता उपयोगी नाहीं.

“ हसीनेला ठाकुरसाहेबांबरोबर पाठविणार ? ” मानसिगानें कांहीं आश्चर्यानें म्हटलें. “ माझी कसलीच हरकत नाहीं; पण––”

“ हसीनेच्या रक्षणाची जबाबदारी माझ्यावर असल्यामुळें तिला यापुढें म्हणजे तिचा बाप कैदेंत टाकल्यानंतर आग्र्यांत ठेवणें इष्ट नाहीं. त्याचीं कारणें मी मागाहून सांगीन सध्यां मी सांगतें त्याप्रमाणेंच करायचें. ” जयश्रीनें आज्ञार्थ बजावलें.

“ तुमची प्रत्येक आज्ञा मला मान्य आहे. ” मानसिगानें नम्रतेनें उत्तर दिलें.

“ठीक आहे. मग त्या तयारीला लागा तर. आतां तुमच्या प्रवासाची तयारी करतांना एका जनानी सवारीचीही व्यवस्था ठेवा. ” जयश्रीनें किंचित हसून म्हटलें.

‘ माझ्या बरोबर जाताना––” मानसिगानें आश्चर्यानें प्रश्न केला.

“ होय. एक तरुणी प्रवासिनी तुमच्याबरोबर येणार आहे. ”

“ कोण !

" आयत्यावेळीं कळेल, " एवढें बोलून जयश्रीनें त्यास निरोप दिला.

मानासिंग विचार करीत घरीं आला. जयश्रीच्या योजनेंतील कांहीं गोष्टींचा त्यास उलगडा पडला नाहीं. पण तिच्याशी हुज्जत घालण्याची त्याची तयारी नव्हती. हसीनेशीं एकवार बोलण्याची त्यास अनिवार इच्छा होती परंतु ती बोलून दाखविण्याचें धैर्य त्यास झालें नाहीं.

मानसिंगाची रवानगी केल्यानंतर जयश्रीनें हसीनेची एकांतीं भेट घेतली व तिला अगदीं आपल्या पोटाशीं धरून म्हटलें, " हसीनबी, तुमच्या पालण पोषणाची जवाबदारी मी आपल्यावर घेऊन तुमच्या वडिलांना मी माझं काम सांगितलं आहे. "

" मग त्यांनीं तें करण्याचें कबुल केलें ना ? " हसीनेनें एकदम विचारिलें.

" होय. पण तुमची त्याला अनुमति आहे का ? "

" माझी ?—कां ? "

" त्या कार्यांत त्याच्यावर कांहीं संकट आलें तर ? "

हसीना थोडावेळ विचारांत पडली. नंतर ती म्हणाली, जुबेदी माझे वडील ते तुमचेही वडीलच. त्यांच्यावर संकट आलेलें तुम्हांला खपेल का ? नाहीं ना, झालं तर ! त्यांनीं कबूल केलेल्या कामाला मी कशाला मोडता घालूं ? तुम्ही नाहीं का मला ? "

"शाबास ! बापाला शोभण्यासारख्या अहा . " जयश्री तिला आलिंगन देऊन म्हणाली, " होतांहोईतो तुमच्या वडीलांवर कांहीं संकट येणार नाहीं. मी आपल्या छातीचा ढाल करून त्यांच्या रक्षणार्थ झटेन. कांहीं दिवस यांचा वियोग तुम्हांला होईल. पण पुढें ते तुमच्याजवळ येऊन रहातील.'

असें म्हणून तिनें आपली पुढची योजना सांगून तिचें मन तयार केलें.

हें झाल्यावर तिनें एकांतीं बसून परमेश्वराची प्रार्थना केली व प्रतापसिंगाचें स्मरण करून त्याचा आशिर्वाद मागितला.

# परिच्छेद ४२ वा.

## गरुड उडाला !



फर्जंदबेगाची उदारता, जयश्रीची कल्पकता आणि मानसिंगाची चपलता फळाला आली ! मोगलाच्या खिशांतील खरें नाणें काढून घेऊन त्या जागीं खोटें नाणें ठेवण्यांत आलें ! आफ-सोस ! लिहिण्याच्या भरांत फर्जंदबेगासारख्या उदारधी बद्दल हें काय भलतेंच लिहून गेलों ? फर्जंदबेग खोटें नाणें मुळींच नव्हे ! अस्सलांतील अस्सल ! ह्मणूनच अनुपमेय ! तेव्हां उपमेच्या नादीं न लागतां पुढें चालूं.

जयश्री ठाकुरसाहेबांस घेऊन आपल्या वाड्यांत आली. तिनें त्यांस व हसीनेस चटकन जेऊं घातलें. तों पर्यंत मानसिंगानें त्यांच्या पुढच्या प्रवासाची बेमालूम तयारी केली.

ठाकुरसाहेबांच्या आनंदास पारावार राहिला नाहीं. त्यांना जयश्रीचें राहून राहून कौतुक वाटलें. " जयश्री, तूं अबला असूनही मेवाडच्या शत्रूशीं जो डाव खेळलीस, तो निःसंशय अजब आहे. आह्मी पुरुषांनीं कित्ता घेण्यासारखा आहे. नाहीं तर त्या कैदखान्यांतून सुटण्याची माझी कांहीं आशा नव्हती. "

स्वस्तुतीनें ओशाळलेल्या जयश्रीनें जवळच उभा असलेल्या मानसिंगास त्याचें सर्व श्रेय देण्याच्या हेतूनें ह्मटलें, " या कृपेचें खरे श्रेय यांचें आहे. मी एकटी काय करणार होतें. यांनी बरीच खटपट केली—"

मानसिंगानें ह्मटलें, " मला लाजविण्याकरितांच जयश्रीबाईनीं हें ह्मटलें असेल तर त्या टोमण्यास मी सर्वस्वी योग्यच आहें. "

ठाकुरसाहेबानीं मध्येंच ह्मटलें,"तसें नाही मानसिंग,जगांतील कोणत्याहि

सत्कृत्याचे श्रेय एखाददुसऱ्या माणसाला मिळत असले तरी त्याची घटना अनेकानेक माणसाकडून होत असते. त्याप्रमाणे या कार्याचे खरं श्रेय जयश्रीला—"

" नाही—नाही याचे खरं श्रेय त्या महाभागाला आहे, ज्याने आज स्वजातिद्रोह पत्करूनही आह्माला सहाय्य केले आणि स्वतः कारागृहवास पत्करला ! " जयश्रीने अभिमानाने ह्मटले. " याचे श्रेय गायचेच झाले तर ते फर्जंदबेगजींना दिले पाहिजे "

केव्हांही —केव्हांही ! " ठाकुरसाहेबाना ह्मटले, " मान, तुझ्या बापाचें चरित्र आणि फर्जंदबगाचे हे एकच कृत्य याची तुलना केली तर ! मानसिंग, तुला ही तुलना विशेष लक्ष्यांत ठेवली पाहिजे. तुझ्यामध्ये कार्य करण्याची कळकळ आहे पण मनाचा खंबीरपणा नाही. तेव्हा आता आड्यातून मेवाडांत जाण्याचेवेळी आड्याने दिलेले अवगुण ध्येन ठेऊन जा म्हणजे तुझ्या हातून काही तरी चागल कार्य होईल —"

हे बोलणे वाढत गेल्यास ते अप्रिय होण्याचा संभव आहे असे जाणून जयश्रीने मध्येच ह्मटल, ' मानसिंग आता आपलेच शिष्यत्व पत्करतील. ह्मणज कशाचीच काळजी नको. ' एवढ बोलून ती मानसिंगास ह्मणाली, " आपला प्रत्येक क्षण मोलाचा आहे. पुढच्या तयारीची स्वतः एकदां पाहणी करा बरं "

मानसिंग व ठाकुरसाहेब—दोघानाही तिचा हेतु कळला. मानसिंग तेथून मुकाट्यान निघून गेला. ठाकुरसाहेब जयश्रीच्या चातुर्याचे कौतुक करीत ह्मणाले, " श्री, राजकारणांत माणसे जोडण्याचे कार्य पुरुषापेक्षा बायकाच जास्त सफाईने करतील. मी भारी कठोर आहे नाही ?

" तसं काही म्हणता येणार नाही. " जयश्रीने गंभीरपणे म्हटले " पण या मानसिंगजीचे बाबतीत आपण जरा निराळेच वागल पाहिजे. त्यांच्यामध्ये बायकी अंतःकरण आहे. त्याचा आपण विचार केला पाहिजे. "

" मेवाड दुःखांत असतांना रजपुत तरुणांनी मुगांची लालसा करणे

मला नाहीं आवडत. त्यांतून हा पोरगा इतका मूर्ख आहे; एका तरुण यव नीच्याच— ”

जयश्री नाकावर बोट ठेवून म्हणाली, “ ठाकुरसाहेब, कांहीं गोष्टी अशा आहेत, कीं त्यांच्याविषयीं विचार न करणेंच बरें. मानसिंगजीमध्यें दुसरे अनेक चांगले गूण निःसंशय आहेत. त्यांचाच आपण विचार केला पाहिजे. आणि होईल तितका उपयोग करून घेतला पाहिजे. आपल्याला काय सांगूं—पण खरें म्हणजे मानसिंजींचें प्रेमच यावेळीं आपल्या उप योगी पडलें आहे. अर्थात् तें अयोग्य असलें तरी वाईट म्हणतां येत नाहीं.”

“ म्हणजे काय ? ” ठाकुरसाहेबांनीं आश्चर्यानें विचारिलें.

“ म्हणजे असें कीं, फर्जंदबेगाच्या कन्येवरच मानसिंगजींचें प्रेम आहे. तिचेंही उलट यांच्यावर आहे.तेव्हां त्यांच्या सुखाकरितां व प्रेमाकरितां तिनें आपल्या पित्यास—फर्जंदबेगसाहेबास—कारागृहवास पत्करून आपली सुटका करण्याच्या कार्यास अडथळा केला नाहीं. ”

या गोष्टीचें ठाकुरसाहेबांना विशेष आश्चर्य वाटलें.ते म्हणाले, “विलक्षण आहे ! मेवाडच्या शत्रूपैकींच दोघांबापलेकींनीं इतका स्वार्थत्याग करावा, इतकं औदार्य दाखवावं. आश्चर्य आहे ! रजपुतांनीं स्वदेशद्रोह पत्करून तिच्या पायांत पारतंत्र्याच्या बेड्या घालण्याची व्यवस्था करावी आणि फर्जंदबेगा सारख्या मुसलमानानें त्याच बेड्या तोडण्याकरितां स्वतःची मान पुढें करावी ! विलक्षण आहे !! हें मेवाडचें भाग्य म्हणायचें कीं अभाग्य ! ”

“ तें चितोडस्वतंत्र झाल्यावर ठरेल ! ” एवढें बोलून जयश्रीनें तो विषय बदलला. ती म्हणाली, “ आतां आपण पुढें काय करणार ? ”

“ मी आतां मेवाडांत एकदम सरळ नाहीं जाणार. गुप्त रीतीनें जाणार. महाराणाअमरसिंग काय करतो आहे, सरदार दरकदार काय करीत आहेत,एकंदर मेवाड कोणत्या मनःस्थितींत आहे.माझ्यासंबंधीं लोकांची काय भावना आहे, मला पकडून देण्यांत कोणाचें अंग आहे, इत्यादि गोष्टींचा मी बारकाईनें तपास काढून,नंतर काय करावयाचें तें ठरवीन. सध्या मी मुक्त

हीच गोष्ट मोठी झाली आणि जयश्री, त्याचें श्रेय मी तुलाच देतों. प्रतापसिंगाच्या पश्चात् मेवाडच्या हिताकरितां इतकी जागरूक राहाणारी अशी मला तूंच एक दिसलीस ! जयश्री, तूं आपली दोन्हीं कुळें धन्य केलींस ! ”

जयश्रीनें मध्येंच विचारिलें, “ बरें आपल्या बरोबर मी हसीनेला देणार आहें. तिची आपण कशी व्यवस्था कराल ? तिच्या रक्षणाची आपल्यावर केवढी मोठी जबाबदारी आहे, हें मीं सांगायला पाहिजे असें नाहीं. ह्मणून विचारतें. मीं मेवाडांत आल्यानंतरची काळजी नको. परंतु तोंपर्यंत तुमच्यामागें तिचें रक्षण करणें लागणार ! ’

“ ठाकुरसाहेब ह्मणाले, “ विचारकरण्यासारखा प्रश्न आहे आणि त्याचा विचार आतांच केला पाहिजे, कारण मेवाडांत गेल्यावर मला स्वस्थता नाहीं आणि माझ्यामागें असली जबाबदारी असतांही उपयोगी नाहीं.”

थोडावेळ दोघेंही विचारांत पडलीं !

कांहीं वेळानें ठाकुरसाहेब ह्मणाले, “ मला वाटतें मानसिंगाच्याच स्वाधीन तिला करण्यांत यावें. त्या दोघाचें जर खरोखरीच प्रेम असेल, तर तोच तिचा खरा सांभाळ करूं शकेल. ”

जयश्रीनें विचार करीत ह्मटलें, “ मला सुद्धां तसेंच वाटतें. पण बेगजींची सुटका होण्याचा कांहीं उपाय नाहीं का ? ”

“ मी करून ठेवला आहे तोच ” ठाकुरसाहेबांनीं ह्मटलें, “ त्या खेरीज सध्यांतरी मला दुसरा दिसत नाहीं. बेगजींनीं चातुर्य लढवून जर बादशहाच्या गळ्यांत मेहरुन्निसा अडकवली तर कार्यभाग खास साधेल. माझा शेवटचा प्रयत्न तोच होता. ”

“ मग हसीनबीला मी मेवाडांत येईपर्यंत मानसिंगाच्या देखरेखीखालीं यावी, हेंच बरें. ” जयश्रीनें ह्मटलें, “ त्याशिवाय दुसरा उपाय कांहीं दिसत नाहीं. मी एक योजना केली आहे, पण कांहीं घोटाळा झाला तर ? ”

“ त्या बरोबर हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, त्या नंतर मानसिंगाकडून कांहीं देशकार्य होईल, अशीही आशा करतां कामा नये. ” ठाकुरसाहेबांनीं सुचविलें.

इतक्यांत मानसिंगानें येऊन सर्व तयारी अगदीं कडेकोट असल्याचें सांगितलें. तो ह्मणाला, " ठाकुरसाहेब आपल्या दोघांच्या अरदलींत दोन माणसें एक नोकर व एक दासी. आणि आपल्यावर कसलेंही संकट येऊं नये ह्मणून पंचवीस शूर वीर आपल्या आगेमागें मेवाडांत पोंचेपर्यंत देखरेख ठेवतील. आपल्या बरोबरच त्यांना देणार होतों; परंतु जमाव झाल्यास उगीच संशय उपस्थित होण्याचा संभव. "

" ठीक आहे. " ठाकुरसाहेब ह्मणाले, " तुह्मी केली आहेत ती व्यवस्था कांहीं गैर नाहीं; पण आतां मी स्वतंत्र आहे. माझी तलवार आतां माझें रक्षण करील. "

निघण्याची तयारी झाली. जयश्रीनें हसीनेला पुनः पुनः निर्वाळा देऊन सांगितलें की, " मी तुमच्या मागोमाग आहेच. वाटेंतच आपली भेट होईल. तुह्मी ठाकुरसाहेबांचे बरोबर निःशंक जा. ते तुमचा वडिला प्रमाणें संभाळ करतील. "

या नंतर आपल्या प्रियकराची भेट व्हावी, अशी तिची इच्छा दिसली ह्मणून मागचा पुढचा विचार करून जयश्रीनें ती घडवून आणिली.

भेट होतांच हसीनेनें करुणवाणीनें प्रश्न केला, " जिगर ! आपल्या नशिबांत पुढे काय आहे ? "

मानसिंग स्तब्ध बसला.

हसीना पुढें म्हणाली, ' इष्क जहर आहे म्हणतात. जहर प्यालें असतां मरण येतें. प्यारे, शेवटीं मला मरण दिसते आहे. "

मानसिंगानें तिचें तोंड बंद केलें. तो म्हणाला, " मरण येणार असेल तर ते दोघांना एकदम एके वेळीं येईल. हसीन ! आपण मेवाडकडे निघालों आहोंत. माझा मेवाड तुला दुःख देणार नाहीं. "

लौकरच प्रवासी आपल्या मार्गास लागले.



# परिच्छेद ४३ वा.

## घावाला प्रतिघाव !



मोहबतखान आपल्या महालांत अस्थिरतेनें इकडे तिकडे फिरत होता. मानसिंग येथून निघून गेल्यानंतर हसीनेला प्रसन्न करण्याचा आणखी एकदां प्रयत्न करावा, कीं, त्यां दोघांचे प्रेमाचे डाव पकडून जगासमोर त्यांची बेअब्रू करावी, याचा त्यास मोठा विचार पडला होता. एकदां त्यास वाटे, मानसिंगाच्या फंदांत पडलेली पोरगी आपणास केव्हांच वश होणें शक्य नाहीं. तेव्हां तिची बेअब्रू करून सूड उगवावा, हेंच बरें; पण दुसऱ्याच क्षणीं तिचें मनोहर रूप त्याच्या डोळ्यांपुढें येई आणि म्हणे कीं, तिचा अंगिकार करून संसारसुख भोग. हसीना तुझी पत्नी झाल्यावर कांहीं तुझा तिरस्कार करणार नाहीं. घंटा घंटा एकांतीं बसून त्यानें याचा विचार केला; पण उलगडा झाला नाहीं. कोणता विचार पक्का केला असतां आपल्यास यश येईल, हें त्यास उमजलें नाहीं.

शेवटीं त्यानें मानसिंगाचें जाण्याचें जाहीर झाल्यावर हसीनेची काय स्थिति होते, याचा बारकाईनें तपास करण्याकरितां बकावलीस पाठविलें. परंतु आपल्या कुटुंबांत घडलेली हसीनेच्या गमनाची गोष्ट अबदुलखानानें बाहेर न फुटण्याचा कडक बंदोबस्त केला असल्यामुळें निदान त्यावेळीं तरीं मोहबतखानाच्या धूर्त दासीस हसीनेच्या वास्तविक स्थितीचा पत्ता समजला नाहीं.

त्यानंतर त्यास कळलें कीं, मानसिंग हुकुमाप्रमाणें ताबडतोब निघणार असून त्याच्याबरोबर एक जनानी स्वारीही जाणार आहे. हें वृत्त ऐकतांच त्यास अत्यंत आश्चर्य वाटलें. हसीना मानसिंगाबरोबर पळून तर जाणार नसेल, अशी त्यास शंका आली व त्यानें पुनः बकावलीस अबदुलखानाच्या जनानखान्याचा भेद काढून आणण्यास पाठविलें. त्याचें उत्तर

त्यास ज्यावेळीं इकडे हसीना ठाकुरइसरी सिंगाबरोबर आग्र्याबाहेर पडली त्यावेळीं मिळालें!

बकावलीनें येऊन हळूच ह्मटलें, "त्या घरची आंतली खरी वार्ता कळणें मोठें कठिण झालें आहे. माझ्या अदमासानें मी सांगत्यें कीं, हसीना कीं कोण ती तेथें नसावी."

मोहबतखानाची अक्कल गुंग झाली! हसीना अबदुलखानाकडे नाहीं तर गेली कुठें! आणि गेली असेल तर खान कसा गप्प बसेल? बरें मानसिंगाबरोबर जनाना जाणार तो कुणाचा? मेवाडांत कोणाचें कोणी जाणणारें आहे काय? कांहीं नीट सुचेना! बरें सगळ्यागोष्टीचा नीट तपास करावा तर? वेळ कुठें आहे? उद्यां सकाळीं तर मानसिंग कूच करणार! पुढें तें ओडपें हातांतून निसटल्यावर मग काय करावयाचें?

अनेक विचारांच्या गोंधळानें मोहबतखानांस पिसाळल्याप्रमाणें झालें आणि त्याच भरांत त्यानें मानसिंगाला प्रवास मार्गांत गांठून त्याचा जनाना पळवावयाचा! असें ठरविलें. परकी स्त्री असली तर सोडून द्यावयाची. हसीना असली तर? ओहः! आपला हक्कच आहे तिच्यावर! याच विचाराचा नीट विचार करून त्यानें तो कायम केला.

* * * *

या नंतर पांचसहा दिवसां नंतरची गोष्ट.

मोहबतखान आपल्या नाटकाचा काय परिणाम होतो हें पाहण्याकरितां मोठ्या विवंचनेंत वाट पाहात बसला असतां बकावलीनें येऊन त्यास खुश केलें. ती ह्मणाली, "खानसाहेब! बक्षीस टाका बक्षीस! आपली हसीना धरून आणिली! पाहतां काय! तुमच्या कामाला गेली होती कोण?

मोहबतखान आनंदानें बेहोष झाला. त्यानें बकावलीला आलिंगन देऊन तिला सविस्तर हकीगत विचारिली. तेव्हां तिनें थोडक्यांत खालील प्रमाणें सांगितलें.

ती म्हणाली, " आमची टोळी मानसिंगजींच्या स्वारीमागें दबत दबत निघाली. प्रथम मी भिकारणीच्या वेषानें पुढें जाऊन जनाना कोण आहे तें पाहिलें. तुम्ही वर्णन केल्याप्रमाणें ती हसीनाच निघाली. पोषाख तोच. रूपही सुंदर. वय थोडें जास्त वाटलें; मग मी आपल्या टोळींत परत आलें व हल्ला करण्यास हरकत नाहीं, असें नायकास सुचविलें. नंतर दुसरे दिवसाच्या मुक्कामांतच आम्ही हल्ला केला. त्या वेळीं तुमच्या मानसिंगाची काय तिरपट म्हणतां ? अगदीं बाई बायक्या ! पण त्यामुळें आमचं काम चटकन झालें. हसीनाही म्हणाली, त्यांच्या म्हणजे मानसिंगाच्या केसाला धक्का न लावाल तर मी तुमच्या स्वाधीन मुकाट्यानें होतें. आम्हाला तेंच पाहिजे होतें. आम्ही तिला घेऊन परत फिरलों. मानसिंगाची स्वारी चुरमुरे खात पुढें गेली.

" पण हा हल्ला कोणी चढविला, हें त्याला कळलें नाहीं."

" छे: त्याची शंकाच नको. तें भेदरट बिचारं. चोरांचा हल्ला झालाय् असं ऐकतांच अर्धं मेलं झालं ! बाकी कांहीं म्हणा त्याची काहीं हसीनेवर खरी प्रीति दिसली नाहीं. "

" कशा वरून ? "

" कशावरून म्हणजे ? मनुष्य कितीही भित्रा झाला म्हणून आपल्या प्रेमाच्या माणसाला मुकाट्यानं दुसऱ्याच्या ताब्यांत देईल कीं काय ?–तें कांहीं कां असेना. आम्ही तुमच्या पांखराला पकडून आणलंय. एवढं खरं—"

" काम लौकर फत्ते होऊन इतके दिवस कां बरं लागले ? "

" मध्यें तुमचं कबूतर आजारलं ! दोन दिवस पोटांत दुखतं म्हणून विवळत होती. मग कांहीं दिवस लोटलेत कीं काय, कुणाला माहित ? "

" भलतंच कांहीं तरी —"

" कां वाईट कां वाटतं ? बकावलीनें विचारिलें."

मोहबतखान तो विषय उडवून देण्याकरितां म्हणाला, " तिला कुठं आणून ठेवली आहे ? आतां तिची तब्येत बरी आहे ना ? "

" टुणटुणी ! " बकावली हंसत म्हणाली, " आज संध्याकाळीं तुम्हाला तिच्याकडे समाचारास जाण्यास हरकत नाहीं. तुमच्या नव्या बागेंतच तिचा मुक्काम आहे. "

पुढें दोघांचें आणखी बोलणें झाल्यावर बकावली निघून गेली व मोहबतखान पुढचे विचार ठरवीत इकडे तिकडे फिरत राहिला. प्रथम कांहीं वेळ तर त्यास अत्यानंदामुळें कसलेच विचार सुचेनात. केवळ आत्मगौरवदर्शक मिशीला पीळ भरीत तो इकडे तिकडे फिरला, पुढें त्यानें आपले कांहीं विचार नक्की केले.

आतां त्यास संध्याकाळ होण्याची गडबड झाली. त्याप्रमाणें ती वेळ येतांच तो मोठ्या थाटाचा पोषाख करून एका विश्वस्त नोकरासह स्वतःच्या नव्या बागेकडे गेला.

* * * *

हसीना स्थित झालेल्या स्थानांत मोहबतखानानें हळूंच प्रवेश केला. समोरच सुगंधी तेलदीपाच्या प्रकाशांत त्याच्या नेत्रांचें सार्थक करणारी रमणी मूर्ति आपादमस्तक शुभ्र सूक्ष्म वस्त्रावगुंठन घेऊन बसली होती !

मोहबतखान तेथल्या तेथें तटस्थ झाला ! त्याच मूर्तीनें आपल्याला झिटकारल्याचें त्याच्या स्मरणातून निघून गेलें ! तो आपल्या स्थानावरूनच मोठ्यानें म्हणाला, " सुंदर हसीने ! रमणीय गुलाब पुष्पा ! मी तुला तुझे सर्व अपराध माफ केले आहेत !—सौंदर्य कलिके, आपलें अवगुंठन दूर करून माझ्या महालाची शोभा आपल्या मुखचंद्राच्या प्रकाशानें प्रकाशित नाहीं का करणार ?—काढ ! सुंदरी तोंडावरून पदर काढ ! ! होऊं दे—माझ्या अंतःकरणांत पसरलेल्या अमावास्येची पौर्णिमा होऊं दे ! ! सार तो ढगाचा पातळ पडदा ! ! हसीन ! हसीन ! ! "

आपल्या एकेक वाक्या गणिक एकेक पाऊल पुढें टाकीत मोहतबखान बराच पुढें आला. तरीही ती सुंदर मूर्ति क्षणमात्र हालली नाहीं कीं, अणुभर आपल्या आसनावरून चळली नहीं ! जणूं काय पाषाण मूर्तीच !

वेश्या झालेल्या मोहबतखानास तो रमणीगर्व वाटला ! त्यांतही त्यास सौंदर्य दिसून आलें ! ती न हालण्यांतच त्यास सुंदर काव्यपंक्ति दिसूं लागल्या पुन्हां त्याच्या सरस्वतीला पालवी फुटली.

" हसीन ! युवयुवतींच्या प्रथम भेटींत न बोलण्याचा रमणींचा मानच आहे ! तो तूं निःशंकपणें बजावते आहेस, याचें मला मोठें कौतुक वाटतें पण ध्यानांत ठेव हसीन,अशा मुग्ध मुखांतून मधुर बोल कसे काढवावेत, हे रसिक पुरुषही जाणत असतो ! हसीन ! मी ही तशी कांहीं विद्या शिकलें आहे ! पाहूं आजच्या परिक्षेंत कोण उत्तम ठरतें ! "

तरीही पहिली स्थिति कायम राहिली. त्यावेळी मात्र काय असेल ते असो मोहबतखानास एक प्रकारची भीति वाटली ! संकटांत सांपडलेली तरुणी बेफाम होऊन वाघिणीचे रूप धारण करते म्हणतात ! तसा तर कांहीं प्रकार नाहीं ? त्यास विचार पडला ! मुकाट्यानें तो किती वेळ तरी समोरच्या निश्चल मूर्तिकडे पहात राहिला !

पळांमागेंपळें त्वरेनें धावत होतीं ! हृदयाचे ठोके अविरत पडत होते ?

मोहबतखानाच्या भीतीस अनेक कुशंकांची जोड मिळाली ! समोर बसलेली मूर्ति जिवंत तरी आहे का ?—कांहीं भूतचेष्टा तर नाहीं ना ?—हसीना आपल्या टोळीच्या एकदम स्वाधिन झाली, त्यांत तिचा कांहीं हेतु तर नव्हता ना ?—ही हसीनाच आहे की ?--

मोहबतखानानें नीट न्याहाळून पाहिलें. वस्त्रांच्या गर्दीत शरीर सौष्ठव समजून येणें कठीण होतें ! एकदां त्यास वाटलें, ही हसीना नव्हे—पुनः वाटे, छेः ! निःसंशय ती हसीनाच !—पण मग ती इतकी मुग्ध कां ? इतकी निश्चल कां ?

या विचारानें त्यास कांहीं वेळ तरी संदेहांत पाडलें ! तो खालीं मान घालून युक्ति शोधूं लागला तोंच त्याचे कानीं हास्यध्वनी आला ! तो दचकला ! त्यानें वर त्या तरुणीकडे पाहिलें ! कांहीं फरक नाहीं ! पूर्वीचीच स्थिति कायम ! मग तें तिरस्कार व्यंजक हास्य कोणाचें ?

मोहबतखान क्षणभर तरी खुळा झाला !

मग त्यास उमजलें. अपमान करण्याची रमणीजनाची ही एक नवीन तऱ्हा आहे म्हणून ! अशा डावानेंही शेवटीं मोहबतखानाचाच पाडाव अं ?

त्यास क्रोध आला. तो म्हणाला, " हसीन ! सुंदर तरुणींना कसें प्रसन्न करावें हें मी ओळखतों; पण त्या बरोबर रूपगर्वितांचा मद कसा झाडून टाकावा याचाही मंत्रपाठ मी शिकलेलों आहें ! हसीन ! पांच अंकाचे आंत तोंडावरील पदर काढ नाहीं तर तुझा मान राहणार नाहीं ! पहा मी एकेक पाऊल पुढें येत आहें--" आपल्या या दटावणीचा कितपत उपयोग होतो, हें पाहण्याकरितां तो क्षणभर थांबला.

कांहीं फरक नाहीं !

त्यानें एक पाऊल टाकून म्हटलें " एक—" आणि तो दचकला ! त्या रमणीकडून त्या ' एकचा ' प्रतिध्वनि झाला असावा, अशी त्यास शंका आली !

पुनः वातावरणांत एक मंजुळ हास्य उमटलें !

मोहबतखान तिच्याकडे पहात बजावीत म्हणाला, " ठीक आहे. कर कुचेष्टा ! पहा—पुनः विचार कर ! नाहीं तुझी इच्छा ! ठीक आहे ! पुनः ( पाऊल टाकीत ) दोन--"

रमणी चटकन उठली आणि अवगुंठनांतून म्हणाली, " दोSSSन ! "

मोहबतखान दचकला ! त्यास काय करावें हेंच सुचेना !

रमणी त्याच्याकडे एक पाऊल टाकीत म्हणाली " तीSSSन ! " पुनः ती थांबली व पुनः म्हणाली " चाSSSर ! "

कां कोणाला माहीत ? तिचें एक पाउल पुढें पडतांच मोहबतखान एक पाऊल मागें सरकला ! तें पाहून रमणी हंसली ! त्या हंसण्यांत मोहबतखान असा विरघळला ! !

रमणी पुनः एक पाऊल टाकून म्हणाली, " पांSSS ( तोंड वरील बुरखा दूर सारीत) च !--सलाम आलेकम् ! खानसाहेब ! ! आलेकम् सलाम् ! ! !"

अमावास्येच्या रात्रीं स्मशानांत भूत पाहिल्याप्रमाणें मोहबतखान दचकला !

ती ‘ **संधिकालांतील** नायिका ’ जयचंदाची पतीव्रता, मेवाडची जयश्री होती ! ! !

*                *                *                *

ज्यावेळीं मानसिगानें आपल्यास मेवाडकडे जाण्याचा तांतडीचा हुकूम मिळालेला आहे आणि त्याला कारण आपला भाऊ आहे, इत्यादि हकीगत जयश्रीस निवेदन केली, त्याचवेळीं तिनें पुढें असा एखादा प्रसंग घडून येईल असा कयास बांधला होता. त्याचे अगोदर तिला हसीनेनें आपली सर्व हकीगत सांगितली असल्यामुळें त्या दोन्ही हकीगतींची तिनें सांगड घालून मोहबतखानाच्या मनाचा बरोबर ठाव घेतला. मानसिंग समजतो त्याप्रमाणें मोहबतखानास ठाकुरसाहेबांच्या मुलीचा संशय आला नसून हसीनेच्या नकारानें तो चिडलेला आहे आणि त्याचें कारण शोधीत असतां त्यास मानसिंग हसीनेचा संबंध कळून आलेला आहे; असें तिला खात्रीलायक वाटलें. हसीनेच्या सांगण्यावरून मोहबतखान तिच्याशीं विवाह करण्यास फारच आतुर असल्याचें तिला माहित होतें, तेव्हां मानसिंगाचा कांटा बाजूला सारण्याकरितांच मोहबतखानानें त्यास तांतडीचा हुकूम मिळण्याची व्यवस्था केली असली पाहिजे. अर्थात् मानसिंगाच्या हालचाली बरोबर खान हसीनेवर ही गुप्त पाळत ठेवण्यास सोडणार नाहीं आणि तशी कांहीं चाहूल त्याला लागली तर तो कांहीं घोटाळा घालणार. तेव्हां त्यास चकविण्याकरितां तिनें हसीनेला रजपुताणीच्या वेषांत ठाकुरसाहेबाबरोबर रवाना केलें आणि स्वतः हसीनेचा पोषाख करून मानसिंगाबरोबर जाण्याचें योजिलें.

पुढें त्या प्रमाणें मानसिंग तिच्यासह निघाला असतां मार्गांत हल्ला झाला. जयश्रीस हसीना समजून पकडण्यांत आलें. तीही मुकाट्यानें स्वाधीन झाली. नंतर ठाकुरसाहेब हसीनेला मेवाडांत जाऊन पोंचण्यास अवधी मिळावा म्हणून तिनें आजारीपणाचें सोंग घेऊन दिवस लांबविले. कारण मोहबतखानाजवळ येतांच रहस्य फुटणार आणि त्या रागाच्या भरांत तो

चौकशी करून मूळव्यक्तींचा पाठलाग करण्याचा प्रयत्न करणार हें ठरल्यासा-रखेंच होतें. ह्मणून तिनें हें धाडस केलें.

मोहबतखानास मात्र अशा कपटाची अटकळ बांधतां आली नाहीं. कारण अबदुलखानाच्या बंदोबस्तामुळें हसीनेची पुढची हकीगत त्यास कळली नाहीं आणि त्यामुळें त्याची ही अशी फसगत झाली !

हसीनेऐवजीं जयश्रीच त्याच्या पुढें येऊन उभी राहिली ! अर्थात् तिला पाहून तो अवाक् झाला, यांत आश्चर्य तें काय ? यांत पूर्वीची अशी ऐक हकीगत होती कीं,आपल्या पूर्वाश्रमांत असतां फार वर्षांमागें ह्मणजे मोह-बतखान मोहनसिंग असतां, सुभ्राजीनें त्याच्याकरितां जयश्रीची मागणी केली होती आणि त्यावेळीं खुद्द तिनेंच मला मोहनसिंग आवडत नाहीं, असा जबाब दिला होता. त्यामुळें हसिनेचा नक्षा उतरविण्याकरितां त्यानें चंग बांधला असतां, तो गर्वाची फपूत उलट प्रसंग अशा तऱ्हेशी पडला कीं, जिनें त्यास नाकारिलें होतें ! विजेच्या लखलखाटाप्रमाणें तो प्रसंग मोहबतखानास आठवून गेला ! त्यावेळची ती मानी व सुंदर जयश्री आजही तितकीच मानी व सुंदरी आहे, आणि तिनें धाडस बांधून आपला आतांचा बेत---मग तो कोणत्याहि कारणानें असो---ढांसळून पडलेला पाहून त्याच्या मनाची कांहीं चमत्कारिकच स्थिति झाली ! कितीवेळ तरी तो हतबुद्ध होऊन जयश्रीकडे पाहात राहिला.

जयश्रीही त्याच्या मुद्रेकडे पाहात होती. कांहीं वेळानें तिनें आपल्या कमरेंत खोचलेला तीक्ष्ण धारेचा जंबिया बाहेर काढिला.

त्याची चमक पाहतांच मोहबतखान दचकला. तो तिरस्कारानें म्हणाला " माझा खून करणार तूं ? "

" निष्कारण केव्हांही नाहीं."जयश्रीनें शांतपणानें म्हटलें,"तुमचें माझें वैर थोडेंच आहे ! "

"मग---मग 'मोहबतखान अडखळत, ह्मणाला"तूं इथें कां आलीस ?"

जयश्रीनें उत्तर दिलें, " मी आपखुशीनें नाहीं आलें. तुमच्या लोकांनें मला भरून आणिली. "

" पण तूं मला नको होतीस—"

" मग माझातरी आग्रह कुठं आहे कीं, मला स्वीकारा म्हणून ! तुमच्या सारख्या धर्मभ्रष्टांचीं आणि स्वजन द्रोह्यांचीं तोंडें सुद्धां पाहूं नयेत, अशा मताची मी आहें. पण काय करणार ? प्रसंग पडला खरा. " जयश्रीनें तिरस्कारानें ह्मटलें.

" जीभ आवर, जयश्री, जीभ आवर. नाहींतर तुझा स्त्रीपणा मनांत न आणितां मी त्याचें खरपूस बक्षीस तुला देईन. " मोहबतखानानें रागानें बजावलें.

" पण खऱ्या गोष्टीबद्दल इतका राग यावा का ? " जयश्रीनें उपहासानें ह्मटलें, " मेवाडशीं द्रोह करण्याचें पाप जर करायचें—"

" जयश्री, असला टेंभा तुला मिरवितां येणार नाहीं. तूं आणि तुझा नवरा माझ्याच पंथांतले आहां ! नाहींतर मोंगलांचे तुकडे मोडायला कशाला आलां असतां ? " मोहबतखान तिरस्कारानें ह्मणाला, " जयश्री , अभिमानाच्या भरांत उगीच तोंडाची वाफ कशाला दवडतेस. मी हंसते लोकांला आणि शेंबुड माझ्या नाकाला, या ह्मणीप्रमाणें तुझी फजिती मात्र होईल. "

" सज्जनांची निंदा करणें हा दुर्जनांचा धर्मच आहे." जयश्रीनें कुचेष्टेनें ह्मटलें, " तुह्मी आपल्यावरून जगाची परिक्षा करतां, ती योग्यच आहे. "

" जयश्री, " मोहबतखानानें मध्येंच ह्मटलें, " सावाचा आव आणून चोराची करणी करणाऱ्या जयचंदाच्या पत्नीला हा अभिमान शोभत नाहीं ! ठाकुर इसरसिंगाला मोंगलांहातीं देऊन बाहिरामगडची जहागिर मिळविणारा जयचंद, जयश्री, तुझा पति माझ्यापेक्षांही नीच आहे ! "

बरोबर मर्मीघाव बसला ! जयश्रीला अशी कांहीं शंका होतीच ! त्याचाच पूर्णोच्चार मोहबतखानानें केला. तो ऐकतांच ती किंकाळून ह्मणाली, " काय ह्मणतोस चांडाळा ! "

आपला घाव बरोबर बसलेला पाहून मोहबतखानास विलक्षण आनंद झाला. तो ह्मणाला, " नीट ऐक. मेवाडचा मुख्य मंत्रि जयचंद कामावत यां

वैभवाच्या आशेनें मोंगलाची सेवा गुलपणें पत्करून ठाकुरसाहेबाला पकडून दिलें ! जयश्री. मी तर बोलून चालून मुसलमान झालों आहे. कारण मला हिंदुधर्माचा अभिमान नाहीं.आपल्या जातीचा नाहीं,मेवाडचा नाहीं.उलट मी सर्वांची वैरी आहे.पण तुझ्या नवऱ्यानें काय केलें ? प्रत्यक्ष प्रतापाच्या पुतण्यानें काय केलें ? मोंगलाचें दास्य पत्करलें आणि जहागीर स्वीकारली ! सांग, जास्ती नीच कोण ? मी की जयचंद ? उघड द्रोह करणारा मोहबतखान बरा का, विश्वासघात करणारा जयचंद बरा !—सांग, जयश्री तूं मोठी मानिनी आहेस, मेवाडच्या तुला मोठा अभिमान आहे, मोंगलांचा तुला मोठा तिटकारा वाटतो, सांग बरें; कोण नीच ? कोण दुष्ट ? कोण वाईट ? ”

जयश्री घायाळ झाली ! हतबुद्ध झाली ! ! व्याकुळ झाली ! ! ! ती ह्मणाली, “ हायरे दुर्दैवा ! हें मी काय ऐकतें ! ” आणि ती खालीं पडली व बेशुद्ध झाली !

एवढा सूड बस्स आहे, असें म्हणून तिच्याशीं कोणतीही छेडछाड न करितां मोहबतखानानें तिला तिच्या वाड्यांत पोंचवून दिलें.

# परिच्छेद ४४ वा.

## घायाळ झालेली सिंहीण.



संताप व दुःख यांचा कडेलोट झाला ! जयश्रीनें इकडे तिकडे फिरून पाहिलें, त्यांचा उपशम झाला नाहीं. बिछान्यावर स्वस्थ पडून पाहिलें तरी कांहीं उपयोग झाला नाहीं; शेवटीं ती मनमुक्त रडली तरी हृदयाचा कढ कमी झाला नाहीं ! अरेरे ! किती विपरीत गोष्ट झाली ही ! जें होणं शक्य नव्हतं, जें घडणें इष्ट नव्हतें तेंच घडून आलें !

वाढत्या रात्री बरोबर तिचा मनस्ताप वाढतच गेला ! इतका तिला कधींच झाला नव्हता व पुढेंही होईल असें तिला वाटत नव्हतें ! कारण यावदु:खानें व संतापानें आपला शेवट होणार असें तिला नक्की वाटलें ! गरीब बिचारी हरिणी ! माश्याप्रमाणें तडफडली !!

यापूर्वी तिला कोणत्याही प्रसंगीं कांहीं चमत्कारिक योग घडल्यास आपण स्वप्नांत तर नाहीं, अशी तिला शंका येई, व आपण जागृत आहोंत कीं निद्रित आहोंत याची खात्री तिला करून घ्यावी लागे, पण आजच्या प्रसंगानें ती इतकी होरपळून निघाली कीं, ही वस्तुस्थिती नसून स्वप्न आहे, अशी समजूत आपल्या मनाची व्हावी म्हणून ती प्रयत्न करीत असतांही तिला त्यांत यश आलें नाहीं ! ' जयचंद–तुझापति–मेवाडशी बेइमान होऊन मोंगलांचा गुलाम झाला. ही गोष्ट त्रिवार सत्य आहे ! ' हे शब्द तिच्या कानांत सारखे सणसणत राहिले !

मोहबतखानाविषयीं तिला मोठा तिटकारा वाटे व तो त्यांच्या तोंडा-वर दाखवितां आल्यास पाहावें व जमल्यास त्याची फजिती करावी, या हेतूनें तिनें त्याच्याविरुद्ध मागें वर्णन केलेला कावा लढविला होता; पण परिणाम काय झाला ? ती घाव घालण्यास गेली पण प्रतिघाव असा जोराचा बसला कीं, तिलाच कच खावी लागली ! तिच्या मानीस्वभावालाच असा विषारी उपहास चाखावा लागला कीं, ज्याचें नांव तें !

जयश्री सिंहण खरी; पण मोहबतखानाच्या या वाग्बाणानें पुरती घायाळ झाली ! या दुःखाचा सूड कोणावर उगवावा, कोणाच्या नरडीवर झेंप टाकून, समाधानाचा घुटका घ्यावा, याचाहि होष तिला राहिला नाहीं !

जयचंदाची मूर्ति आणि त्यानें आचरिलेला मार्ग याची तिला सांगडच घालतां येईना. एक जयचंद आपला पति तरी नसला पाहिजे किंवा त्याच्या हातून तें कृत्यतरी न झालें पाहिजे ! आपल्या सतत, दु:खी, उदासीन व दीनदीन मनापुढें तिनें हा शेवटचा किंचितें समाधान देणारा सवाल टाकला

पण मनानें तिला तारडतोब मागच्या अनेक आठवणी दिल्या ! बहिराम गडचें स्मरण असें निरुत्तर करणारें होते कीं, जयश्रीला आपला पती अधम आहे हेंच सार स्वीकारावें लागलें !

स्मरणावरून स्मरण वाढत गेलें व ती प्रतापसिंगाच्या निर्वाण प्रसंगाचें करुणाचित्र पाहूं लागली, त्यावेळीं त्या महात्म्यानें आपल्यास व आपल्या पतीस काय बरें सांगितलें होतें ?—तिला गहिंवरून आलें ! ती ह्मणाली, " मामंजी ! आजचा दिवस असा उगवणार आहे, अशी तुह्मांला कल्पना होती तर ? होय., त्याशिवाय त्यांनीं ती शिकवण कां दिली असती ? आपल्या दोघांकडून मेवाडशीं इमान ठेवण्याचें वचन कां घेतलें असतें ? निर्वाणसमयीं त्यांच्या मनाला कांहीं समाधान नव्हतें ! मेवाडच्या कल्याणा विषयीं त्यांचा आत्मा तळमळतच राहिला ! त्यावेळीं सगळयांनीं शपथा घेतल्या ! आम्ही आपल्या वीरव्रताला जागूं ह्मणून प्रत्येकानें आणभाक केली. परंतु त्याचें पालन कितीजणांच्या हातून झालें ? मामंजींच्या मागें मेवाडची आजची स्थिती काय आहे ? चितोड मोंगलांच्या टाचेखालीं तशीच आहे. मेवाडचा कांहीं भाग शत्रूनीं घेरलेलाच आहे अशा स्थितींत महाराण्यानें काय केलें?—एक विलास मंदिर बांधलें आणि मुख्य मंत्र्यांनीं

जयश्रीची विचारशक्ति येथेंच खुंटली ! कांहीं वेळ तरी ती अगदीं सुन्न झाली !

क्षणाभरानें तिला प्रतापसिंगाजवळ बोललेले स्वतःचे शब्द आठवले ! ती गंभीरपणें ह्मणाली होती, " काकाजी, मी प्रतिज्ञेनें सांगत्यें कीं, मेवाडच्या भवितव्याचे विषयीं आतां आपण अगदीं निश्चिंत असा. आपला हेतु आम्हाला कळून चुकला आहे. त्याचें पाळन करण्यास आम्ही अणुमात्रही चुकणार नाहीं. त्यांतूनही तुमची आमच्या विषयाची शंका सार्थ आहे. असें मला समजलें तर त्या वेळीं माझ्या सौभाग्याचा मुलाहिजाही मी धरणार नाहीं. इतकेंच नव्हे तर आपल्या स्वातंत्र्य मूर्तीचा-मेवाडचा-

कुंकुमतिलक कायम राखण्या करितां मला माझा मळवट पुसण्याची वेळ आली तर तेंही करण्यास मी मागें घेणार नाही......

त्याप्रमाणें आपण काय केलें?—कांहीच नाही. उलट पतीवर फाजील विश्वासून त्याच्या मागोमाग गेलों आणि मनांत कसलिही शंका न आणितां आग्र्यालाही आलों. मोंगलाच्या राजधानीला आलों. आपल्या शत्रूंचें वैभव आनंदानें पाहिलें! या पूर्वी एकदां सुद्धां आपण आपल्या कर्तव्याचा विचार केला नाहीं, अशी आपल्या मनाला कशी भुरळ पडली. मामंजीचा आपल्यावर केवढा लोभ? त्यांची आपल्या खंबीर व मानी स्वभावाविषयीं केवढी खात्री? आणि त्याच आपण नवऱ्याच्या नादानें बहिराम गडीं जाऊन विलास भोगले! धिःकार धिःकार असो आपल्याला!

पुनः मनाला दुसरी गति मिळाली. होय आपण चुकत आलों. कर्तव्याला जागलो नाहीं; पण त्याचा शेवट कसा झाला! ठाकुरसाहेबांची सुटका नाहीं का झाली? समजा, मी आग्र्याला आलें नसतें तर? तेव्हां झालें तें कांहीं वाईट झालें नाहीं! पतीचा अधमपणा सांवरून घेतला. मेवाडच्या एका मोहऱ्याची मुक्तता करण्याचें श्रेय आपण मिळविलें! काय वाईट झालें? ज्याचा शेवट चांगला, तें सर्वच चांगलें नाहीं का?

या विचारानें जयश्रीस थोडेसें बरें वाटलें! आपण कांहीं विशेष चुकलों नाहीं. आणि चुकलों असलों तरी त्याचा शेवट मेवाडचें कल्याण करण्यांतच झाला. तेव्हां आपण कांहीं तितक्या दोषी नाहीं! मनुष्याचा अहंकार त्याला नेहमीं मोह घालीत असतो म्हणतात. जयश्रीची ही आतांची विचारसरणी त्याच धरतीची आहे!

आतां पुढें काय करावयाचें? जयश्रीला मोठा विचार पडला. जयचंद जहांगीराबरोबर शिकारखेळण्यास म्हणून गेलेला होता. तो परत केव्हां येणार याचें तिला नक्की वृत्त कळलें नव्हतें. त्यामुळें आपण त्याची वाट पहावी का पुढची कांहीं योजना ठरवून कार्याला लागावें? पण कार्याला लागायचें म्हणजे तरी काय करायचें? मेवाडच्या राज्यकारभाराची अशी

कोणतीं सूत्रें आपल्या हातीं आहेत म्हणून तीं आपण हलवणार ? इत्यादि उलटसुलट विचार तिच्या मनांत आले व ती गोंधळांत पडली !

इतक्यांत तिला महाराणा प्रतापसिंगाच्या एका प्रसंगीच्या एका बोलण्याची आठवण झाली. त्यानें आपल्या भोंवतालच्या लोकांना उद्देशून म्हटलें होतें, " वीरहो ! मनुष्याला कार्य करणें नको असलें म्हणजे त्याला कर्तव्याचा मोह पडतो व मग त्याला पुढचा मार्ग सुचेनासा होतो. त्याच्या पुढें नाहीं त्या सबबी येऊन उभ्या राहातात. त्यावेळीं त्याला भासूं लागतें खरेंच आपण हीन दीन आहोंत, दुर्बल आहोंत, आपल्याला कार्य करायला संधीच नाहीं. अमक्या तमक्या सोई असत्या तर फार बहार झाली असती ! बस्स ! याच विचारांत तो आपलें आयुष्य घालवून नादान बनत जातो. अशा मनुष्याच्या हातून कोणत्यांहि काळीं कांहींहि कार्य होणें शक्य नाहीं. मी म्हणतों अशा मनुष्याला अगोदर ठार करावा. कारण तो अशा आचरणानें स्वतःची हिम्मत तर घालवून बसतोच पण दुसऱ्याचीही घालवून बसतो ! मोठा नीच मनुष्य असला ! माझ्या मित्रानों, माझ्या मनाची अशी कांहीं निराशा झाली, म्हणजे मी त्याला म्हणतों, वेड्या प्रतापा मेवाडला मुक्त करायचें हें तुझें कर्तव्य तुझ्यापुढें चक्क आहे ना ? मग आतां कसें करूं नी काय करूं हा मंत्र कशाला ? कामाला लाग. जेवढें कार्य उरकत असेल तेवढें करून घे. आयुष्य क्षणभंगूर आहे. आज आहे उद्यां नाहीं. विचारांत व सबब हुडकण्यास वेळ नको घालवूं, सबबी या सगळीकडे भरलेल्या आहेत. एकीला जवळ केली कीं दुसरी आलीच तिच्याबरोबर ! जगांत सर्व माणसें आपआपल्या सुखार्थ धडपडत आहेत. मग सगळ्यांनाच सारख्या सोई कुठल्या मिळणार ज्याला जशा असतील, त्यांतच त्यानें आपली कर्तव्य परायणता दाखविली पाहिजे ! आम्हाला आमचा मेवाड म्हणून स्वतंत्र हवा ! मोंगलांनाही तो सत्तेकरितां हवा ! दोघांची ताणाताणी व्हायचीच ! ज्याचें कार्यबळ श्रेष्ठ असेल तो जिंकेल ! ...... "

या भाषणाचें स्मरण होतांच जयश्री खडबडून उठली ! ती म्हणाली " प्रतापसिंगाची मी [illegible] आहें. माझें कर्तव्य काय आहे, हेंही मला माहित

आहे. त्याचें पालन करीन म्हणून मी वचनही दिलें आहे. मला तें पोर पाडलें पाहिजे. जयश्री, तुझ्या समजुतीप्रमाण तुला करतां येईल तें सत्कार्य कर ! प्रत्यक्ष शत्रूनें—मोहबतखानानें तोंडांत मारून तुमचें पाप तुमच्या पदरांत घातलें तरी तूं गप्पच बसणार ? नाहीं मुळींच नाहीं ! आपला पति चुकला ना ? चुकूंदे. आतां त्याला सावध करूं, दोघेंही कार्याला लागूं ! ”

जयश्रीला या विचारानें मोठा हुरूप आला. पुढच्या योजनेचा तिनें विचार केला. मनाची ग्लानी नाहींशी होतांच त्याला पटापट उलगडा पडूं लागला. प्रथम आपण आग्र्यांतून निघून जाणें हें आपलें आद्यकर्तव्य ठाकुर साहेब मेवाडांत गले आहेत. आपणही तिकडे गेल्यावर त्यांना थोडी तरी मदत होईल. आपली पति शुद्धीवर आला तर तोसुद्धां कार्यतत्पर होईल. मुख्य मंत्री सावध झाल्यावर मग पुढचीं कार्यें काय आपो-आप होतील.

या नव्या विचारांत ती इतकी तन्मय झाली कीं, रात्रीचा काल सुरू आहे, याचें तिला भान राहिलें नाहीं आणि तिनें दासींना हाका मारून प्रवासाची तयारी करण्याचा हुकूम केला. आपल्या मालकिणीचें मन ठिकाणावर नाहीं हें त्याना माहित होतेंच. त्यांनीं तिला सौम्यपणानें आतां रात्र असल्याचें निवेदन केलें.

जयश्री भानावर आली. ती किंचित हंसून म्हणाली. “ खरंच. कांहीं हरकत नाहीं. पण उद्यां सकाळीं कां होईना; पण आतां मेवाडकडे तावडतोब जायचें ! ”

“ मालक येण्याचे पूर्वीच ! ” दासीनें प्रश्न केला.

जयश्रीनें कांहीं विचारकेला व निश्चयानें म्हटलें, मालक ‘ येण्यापूर्वीच. तसेंच कांहीं जरूरीचें काम आहे आणि मला पुढें गेलेंच पाहिजे. ’

दासींनीं तें मान्य केलें, त्या निघून गेल्या व जयश्री पुन: विचार करूं लागली. आपण आगाऊ निघून गेल्यास पतीला राग येईल कीं काय

अशी तिला शंका आली; पण तो तीनें तात्काळ बाजूला सारली. आतां त्याचा मुलाहिजा धरावयाचा नाहीं. असा तिनें निश्चय केला.

इतक्यांत फर्जंदबेगाचें तिला स्मरण झालें व तिचें मन डळमळूं लागलें. ती ह्मणाली, आपण त्या उदार मनुष्याला असेंच सोडून जाणें योग्य आहे का ? त्याच्या सुटकेचा भार आपल्या शिरीं आहे. तेव्हां काय करावें बरें आपण ? पतीवर विसंबून तो इथें आल्यानंतर त्याच्या साहाय्यानें आपणांस कांहीं करितां येईल काय ?—नाहीं तसें जमेलच असा भरंवसा नाहीं. पुन: ती घोंटाळ्यांत पडली. पुनः प्रतापसिंगाचें भाषण आठवलें.

बऱ्याच वेळानें तिनें स्वगत ह्मटलें, " मेवाडला जाणेंच इष्ट आहे. मानसिंगजींची आपणास मदत आहे आणि त्यांनाही त्यांच्या हसीनेच्या सुखार्थ फर्जंदबेगजींच्या सुटके करितां खटपट करणें इष्ट आहे, अगदीं भाग आहे. तेव्हां आपल्या भूमींत जाऊनच सूत्रें हालवावीं. आतां आग्र्याला राहाणें नको. जाण्यापूर्वी एकवार नाजुमी साहेबांना भेटून आलें पाहिजे. " इत्यादि विचार करीत असतां तिला एक पत्र लिहिण्याचा विचार सुचला व तिनें तो तात्काळ अमलांतही आणिला. तिनें फर्जंदबेगास खालीलप्रमाणें पत्र लिहून ठेविलें.

" पिताजी "

आपल्या औदार्यानें ठाकुरसाहेबांची सुटका झाल्यानंतर माझ्या कानी अशा कांहीं चमत्कारिक गोष्टी आल्या आहेत कीं, आतां मला मेवाडांत गेलेंच पाहिजे, ह्मणून मी आजच निघणार आहें. त्यावरून असें समजू नका, कीं आह्मी तुह्माला तुमच्या दैवावर सोडून जातों. छे; तसें मुळींच नाहीं. मेवाडांत राहूनही मला आपल्या सुटकेची खटपट करतां येईल. मी पुन: आग्र्यास येईन. पण आज मला गेलेंच पाहिजे. आणि मला पक्की खात्री आहे तुमचीं काळजी देव घेईल ! तुह्मीं सत्कार्यच तसें केलें आहे ! मी मेवाडांत जातें ह्मणून रागाऊं नका आणि हसीनेचीही काळजी करूं नका. "

ठाकुरसाहेबांची सुटका इतक्या बेमालूमपणें झाली होती कीं, अजब-खानालाही त्याचा संशय आला नाहीं. मग इतरांना काय कळणार. ठाकुरसाहेब पुन: नाजुमीचें कार्य जास्त जोरानें करूं लागल्याचाच त्यास आनंद होता.

प्रात:काळ होतांच जयश्रीनें नाजुमीसाहेबाकडे गमन केलें. त्यांनीही तिचें पत्र वाचून तिला त्याचें उत्तर दिलें, " तूं खुशालजा ! माझी काळजी नको. "

मग त्या दिवशी जयश्री आपल्या इतमामासह मेवाडास निघाली. ती आपल्या मनाची मालकीण असल्यामुळें तिला कोणीहि विचारिलें नाहीं.



# परिच्छेद ४९ वा.

## मेवाडांत आल्यानंतर



ठाकुर ईसरसिंग व हसीना आणि मानसिंग व जयश्री यांचे आड्यांतून बाहेर पडण्याचे मार्ग व वेळा अगदीं भिन्न भिन्न होत्या तरी मेवाडच्या हद्दींत जाण्याचे पूर्वी बाहेर सर्वांनीं एक व्हावयाचें असा त्यांचा बेत ठरला होता. परंतु मध्यंतरीं मोहबतखानाच्या टोळीनें जयश्रीस उडवून आणिल्यामुळें थोडासा घोटाळा झाला. मानसिंगास आपण एकटेच पुढें जाण्याचे व जयश्रीला दैवाच्या हवालीं करण्याचें मोठें जोखमीचें वाटलें. शिवाय ठाकुर इसरसिंग व हसीना यांस ही तें बरें वाटणार नाहीं, हें ही त्यास माहीत होतें; परंतु जयश्रीनेंच पकडल्या जाण्याच्या धांदलींत " तुह्मी आतां मेवाडकडेच जा. माझें मी पाहून घेतें. " असें निश्चयानें सांगितल्यामुळें त्यानें कांहींशा सचिंत मनानें पुढचा प्रवास धरिला.

मेवाडच्या हद्दींत जातांच त्याच्या इतमामाची व ठाकुरसाहेबांच्या टोळीची गांठ पडली. मानसिंगानें थोडेसें खरें खोटें बोलून जयश्री पुढें न येण्याचीं कारणें सांगून त्या दोघांची—ठाकुरसाहेब व हसीना यांची—कशी तरी समजूत घालून वेळ मारून नेली. असो.

त्याच रात्रीं ठाकुरसाहेबांनीं मानसिगाची एकांतीं भेट घेऊन ह्मटलें, " मानसिंग, जयश्री तुझ्या बरोबर पुढें न आल्यामुळें व मार्गांत येतां येतां दुसरे कांही विचार [illegible]ल्यामुळें मी आतां पुढें तुझ्या बरोबर येत नाहीं व हसीनची जबाबदारी [illegible] मी तुझ्यावरच टाकतों. कां ? या बद्दल तुझें कसें काय मत आहे ?

मानसिगास विशेषकरून दुसऱ्या गोष्टीचा ( हसीनेची जबाबदारी आपल्यावर घेण्याचा ) मनांतून मोठा आनंद झाला, परंतु तो त्यानें बाहेर दर्शविला नाहीं. उलट गंभारपणाचा आव आणून म्हटलें, "ठाकुरसाहेब, सध्या मी जो मार्ग धरिला आहे, तो माझ्या आतांपर्यंतच्या आचारविचाराला अगदींच भिन्न असल्यामुळें मला प्रत्येकवेळीं बुचकळ्यांत पडल्याप्रमाणें होतें, मी त्याचें उत्तर काय देऊं ?"

ठाकुरसाहेबांनीं आश्चर्यानें म्हटलें, "म्हणजे काय मानसिंग ?"

मानसिग आपली गंभीरता आणखी वाढवून म्हणाला, "इतके दिवस मेवाडचें प्रेम कशाला म्हणतात आणि तें क करायचें, हें मला माहीत नव्हतें; त्यामुळें खावें प्यावें चैन करावी आणि मोंगलाची स्तुति करून त्यांचें हित चिंतावें एवढेंच मी जाणत होतों; परंतु तुमच्या व जयश्रीबाईच्या सहवासानें मला माझें कर्तव्य कळूं लागलें आहे. आतां मला बाह्यत: मोंगलांची सेवा करून अंत:करणानें मेवाडचें हित चिंतावयाचें आहे. आतां मी बाहरून मोंगलांचा दास असलों तरी आंतून मला मेवाडची सेवा करावयाची आहे. माझ्या आचारविचाराला हें वळण नवीनच नाहीं का ? आणि तें माझ्यासारख्याला अवघडहि नाहीं का ?"

ठाकुरसाहेबांनीं एकवार कौतुकानें त्याच्याकडे पाहिलें मानसिग जें बोलला त्यांत सर्वच कांहीं खोटें नव्हतें. तो तें अगदीं मनापासून बोलला. गंभीरपणाचें छद्मी आच्छादन त्यानें आपला मानसिक आनंद लपविण्याकरितां स्वीकारिलें होतें, एवढेंच. म्हणूनच ठाकुरसाहेबांना त्याच्या बोलण्याचें कौतुक वाटलें. ते म्हणाले, "मानसिंग एखादवेळां तूं मोठें सरळ व मार्मिक बोलतोस. त्यावेळीं मला वाटतें कीं, लहानपणापासून तूं मनानें मेवाडचा असतास तर आपल्या जन्मभूमीच्या उद्धारास तुझा चांगला उपयोग झाला असता असो पण. अद्यापिहीं म्हणजे वेळ गेला आहे असें [illegible] भाग नाहीं. मानसिंग चालू कार्याला तुझी बुद्धी नवीन असली तरी [illegible]कार्य करण्याची खरी इच्छा असली तर तुला विशेष घोटाळा पडणार [illegible]. तुला योग्य मार्गही सुचेल आणि तुझ्या हातून कार्यही होईल. आपल्या [illegible]मनावर त बा ठेवण्यास

मात्र तुला थोडें थोडें शिकलें पाहिजे.तूं विलासांत वाढविला आहेस, त्याची लालसा तुला कमी केली पाहिजे. मेवाडचें कार्य व हसीनेचें प्रेम असा संबंध आला कीं, तुला मोठ्या प्रयत्नानें पहिल्याचा स्वीकार करून दुसऱ्याला टाळा दिला पाहिजे—"

" होय—पण तें करूं कसें? " मानसिंग एकदम ह्मणाला, " आतांच तुह्मीं हसीनेला माझ्या स्वाधीन करून निघून जाणार ह्मणतांय् ! तिला जवळ ठेऊन घेतल्यानंतर—ठाकुरसाहेब, तुह्मी मला वडिला प्रमाणें आहांत, स्पष्ट बोलतां याची क्षमा करा. पण—पण, जवानीच्या धुंदीत मला कर्तव्य कसें सुचेल ? "

मानसिंगाचा प्रश्न बरोबर होता ! ज्याचा मोह धरावयाचा नाहीं, त्या वस्तूला जवळ बाळगून तिचें रक्षण करावयाचें आणि कर्तव्यरत रहावयाचें, शक्य तरी आहे ?

पण त्याला ठाकुरसाहेब तरी काय करणार ? त्यांच्या सारख्या लढ-नग्या मनुष्याला एका सुंदर तरुणीच्या संरक्षणाचें लफडें कसें झेंपणार? आणि आज तर त्यांची स्थिति अशी चमत्कारिक होती कीं, त्यांना पुढें काय करा-वयाचें हें माहीत नव्हतें व खुद्द त्यांच्यावर कोणत्या वेळीं काय संकट येईल, याचा नेम नव्हता ! अशा स्थितींत ते हसीनेला कोठें ठेवणार आणि कशी सांभाळणार ? बरें त्यांतून ती त्यांच्या जातीची अगर धर्माची तरी होती ! हो ठेविली असती एखाद्या स्नेह्याकडे. पण तिकडूनही पंचाईत. चांगली मुसलमानाची मुलगी ! ह्मणजे शत्रूंची ! तिला सांभाळण्याची एवढी दिलदारी कोण दाखविणार ? त्यांतून एखाद्यानें तेंही कबूल केलें, तरी तिचें रूप त्या रक्षणकर्त्याला मूर्ख करणार नाहीं कशावरून ? तात्पर्य, तिच्या रक्षणाचा भार घेऊन ठाकुरसाहेबांना स्तब्ध 'हरी हरी' ह्मणत बसणें तरी भाग किंवा विशेष विचार न करितां तिला मानसिंगा हस्तीं सोंपवून आपल्या कार्याला लागणें भाग होतें.ठाकुरसाहेबांनी दुसरा मार्गच स्वीकारला.ते ह्मणाले,' माझ्या एकंदर वृत्तीला हसीनेचें संरक्षण झेंपणार नाहीं. तुझ्या हातीं तिला देणें ह्मणजे तुझ्या

सारख्या तरुणाला स्वकर्तव्यापासून च्युत करण्यासारखेंच आहे: पण कांहीं इलाज नाहीं, तुझें तूंच मन आवरून जयश्री किंवा फर्जंदबेग मेवाडांत येई-पर्यंत हसीनेला सांभाळणें तुला भाग आहे. दहा वेळा, मी मुक्त झालों आहें तो अशा बंधनांत पडण्याकरितां नव्हे. तेव्हां कसाही वाग अन् कांहीं कर मला आतां मुक्त कर म्हणजे झालें. ज्या फर्जंदबेगानें आपण कैदेंत पडून मला मुक्त करण्याचें सहाय्य केलें, त्याच्या मुलीच्या कल्याणाची जबाबदारी ईश्वरी न्यायानें मजवर असली तरी ती मी पाहूं शकत नाहीं. त्याबद्दल मला काय पाप लागावयाचें आहे तें लागूं दे. अगदीं शेवटचें असें समाधान मला त्यांत एवढेंच आहे कीं, तिला मी तिच्याच प्रियकराच्या स्वाधीन करीत आहें."

मानसिगानें म्हटलें, " आपल्या इच्छेप्रमाणें व मला इष्ट असलेली ही जबाबदारी मी स्वीकारतोंच आणि मेवाडच्या उपयोगींही पडण्याचा प्रयत्न करितों---"

" जरूर कर. तुझी हसीना तुला यांत सहाय्यच करील." ठाकुर-साहेब म्हणाले, " माझा तिचा चारदोन दिवसांचाच सहवास आहे; पण तेवढ्यावरून मला वाटतें कीं, ती मुलगी सुशील आहे. ती आपण होऊन तुला मोहांत पाडण्याचा प्रयत्न करणार नाहीं. मी तिला थोडेंसें या बाबतींत सांगणार आहेंच. पण तूं याचा विचार केला पाहिजेस. प्रयत्नानें सर्व कांहीं साध्य होतें, हें ध्यानांत धर."

ठाकुरसाहेबांनीं जातांना हसीनेचाही निरोप घेऊन तिला म्हटलें, " हसीने, मी तुला मुलीप्रमाणें मानून एक दोन गोष्टी सांगतों त्या लक्ष्यांत ठेव. तुझें मानसिंगावर प्रेम आहे, हें मला माहीत आहे. त्याचें अकल्याण व्हावें असें तुला वाटत नसेल, तर त्याला तूं फाजील मोहांत पाडूं नकोस. पुरुषांचा जन्म पराक्रमानें सार्थकीं लागतो. आपल्या मानसिंगाचे हातून मोठे पराक्रम घडून येतील, असें उत्तेजन त्यास देत जा. स्त्रियांनीं मनांत आणिल्यास त्या पुरुषांकडून वाटेल तें कार्य घडवून आणतात. आज मेवाडची सेवा करणें हें मानसिंगाचें आद्यकर्तव्य आहे. तें त्याच्याकडून बरोबर घडत

जाईल, असा सतत प्रयत्न कर. तूं सुशील आहेस चतुर आहेस. तुझ्या पित्या प्रमाणें तुझाही आमच्या देशाला उपयोग झाला तर देव तुझें केव्हांही कल्याणच करील. ''

अशा प्रकारें दोघांनाही पुनः पुनः बजावून ठाकुरसाहेबांनीं एकट्यानेंच मेवाडांत गमन केलें. कूच दरकूच करीत ते साळुंब्र्या नजिक येऊन पोंचले. एकदम प्रगट न होतां आपल्या पश्चात् एकंदर स्थिति कशी काय आहे ? याचा अदमास बांधून मग काय करावयाचें तें ठरवावयाचें असा त्यांनीं विचार केला होता.

प्रथम त्यांनीं संधि साधून लखमनसिंग नांवाच्या आपल्या एका अत्यंत विश्वासू नोकराची गांठ घेतली. आपल्या धन्याला असें एकाएकीं पाहून त्यास अत्यंत आश्चर्य वाटलें व आनंदहि झाला' तो एकदम ह्मणाला, '' धनि साहेब, अन् आपण इकडे कुणीकडे ? ''

'' कां रे ? मी आपल्या घरीं येऊं नये असें तुझें ह्मणणें ? ''

'' तसं नाहीं धनीसाहेब. '' लखमनसिंग सहृदयतेनें ह्मणाला, '' कुणा द्वाडाला वाटेल आपले धनी येऊं नयेत ह्मणून ! पण--पण--मी ह्मणतों, तुह्मी मेवाडांत आल्याचें आणखी कुणाला समजलं आहे का ? ''

'' नाहीं—कां बरं ? तूं असा घाबरल्या सारखा कां दिसतोस ? '.

मग पहिल्यांदा तुह्मी असे आंत येऊन लपा बरं—''

'' मी आंत येऊन लपूं ?--'' ठाकुरसाहेबांनीं आश्चर्यानें विचारिलें, ह्मणजे ? मी काय चोर आहें ह्मणून मला अशी भीति ? ''

'' आपला जीव धोक्यांत आहे साहेब. '' लखमनसिंग ह्मणाला, '' आपण एकाएकीं नाहींसे झाल्यापासून आपल्या संबंधीं नाहीं त्या बातम्या उठल्या आहेत. आपण महाराणाजींवर रागाऊन मोंगलांना जाऊन मिळाला अहां. असं—''

आपल्यावरील हा घाणेरडा आरोप ऐकतांच ठाकुरसाहेबांचा हात एकदम तलवारीवर गेला ! ते क्रोधाने उसळून ह्मणाले, " मी मोंगलाना मिळालों ? कोण म्हणतो हें ? कोणत्या पाजी माणसानें ही बातमी उठवली आहे. लखमन, त्याचें नांव सांग ह्मणजे पहिल्यानदां त्यालाच कंठस्नान घालतों ! माझा विश्वासघात करून पुन: मीच अपराधी ?

" धनीसाहेब, " लखमनसिंग नम्रपणानें ह्मणाला, " गरीबावर रागाऊं नका. शांत व्हा अन् मी काय सांगतों तें ऐका. त्या शिवाय मेवाडांत उजळ माथ्यानें फिरण्याचा विचार सुद्धां मनात आणूं नका. मोठे खोटे दिवस आले आहेत आतां. "

ठाकुरसाहेबांना त्याचें हें म्हणणें पटलें. ते आपला क्रोध आवरून म्हणाले, " खरंच लखमन, मी चुकाटयानंच मेवाडांत प्रवेश केला आहे आणि इथल्या स्थितीचा नीट खुलासा करून घेतल्या खेरीज पुढें कसें वागावें हें मला पुरतें समजणारही नाहीं. " असें ह्मणत ते खालीं बसले व कांहींशा उद्वेगानें ह्मणाले, ' हं सांग बाबा काय ह्मणतात लोक माझ्याबद्दल ?"

लखमनसिंगानें थोडक्यांत मागचा इतिहास सांगितला व ह्मटलें, " तुमच्या एकाकीं नाहींशा होण्यानें व पुढें तुमच्या संबंधी कांहींच वार्ता न कळल्यामुळें उठलेली बातमी बहुतेक सर्वांना खरी वाटते. दिल्लीच्या पातशाहानें तुह्मांला मोठी जहागीर देऊन, तुमची रवानगी बंगाल्यांत नाहीं तर तिकड कुठं काबूलाकडे केली आहे आणि तिकडे तुह्मी मजेंत आहां असेंच सर्व जग समजत आहे. त्यामुळें तुमचें नांव निघालें कीं, जो तो नाक मुरडतो. शिवाय महाराणाजींकडूनही एक गुप्त हुकूम सुटला आहे कीं, ठाकुरसाहेब मेवडच्या हद्दींत दिसले तर त्यांना एकदम कैद करून उदेपुरला पाठवून द्यावें ह्मणून. "

ही विपरीत वार्ता ऐकतांच ठाकुरसाहेब क्रोधानें व आश्चर्यानें मूकस्तंभच झाले ! कितीवेळ तरी त्यांना काय बोलावें, हेंच सुचेना. त्यांचा स्वभाव

इतका शीघ्रकोपी व मानी होता कीं, अगदीं तडाख्यासरशीं त्यांच्या डोक्यांत एक जालीम विचार आला. ते कर्कश स्वरानें लखमनसिंगास म्हणाले, " लखमन, माझ्यावर विश्वास ठेवणारे असे पंचवीस इसम उदईक निवडून आण. आणि त्यांच्यासह आपण सशस्त्र व उघडपणें उदेपुराकडे निघूं. वाटेंत जो भेटेल आणि मजविषयीं जो अविश्वास दाखविल, त्याचें बेलाशक डोकें उडवायचें. मग तो माझा मुलगा असला तरी हरकत नाहीं. मग महाराण्या-जवळ जाऊन त्याचा कान पकडून विचारतों कीं, माझ्यावरचा हा आरोप सिद्ध कर नाहीं तर मरायला तयार हो म्हणून ! मी आतां कोणाचाच मुला-हिजा ठेवणार नाहीं ! पाजी लोक ! मी मोंगलाची नोकरी पत्करली काय ? आणि दिल्लीपतीनें मला मोठी जहागिर दिली ! लखमन, पातशहानें मला आपला जांवई केल्याचें नाहीं का कोणी उठविलें ? खास कोणी तरी जाणून बुजून माझा सूड घेत आहे. नाहीं तर त्या दाढीखांची काय बिशाद होती मला पकडून नेण्याची--"

लखमनसिंगानें मध्येंच आश्चर्यानें विचारिलें, " काय ? आपणास कोणी पकडून नेलें होतें ? "

" नाहीं तर मी आपखुशीनें गेलों होतों ?--" ठाकुरसाहेब दांत खात ह्मणाले, " कोणीतरी चोरांनीं द्रव्याची लांच खाऊन मला अमक्यावेळीं अमक्या ठिकाणीं पकडा ह्मणून मोंगलांना बातमी दिल्या खेरीज ही गोष्ट घडलीच नाहीं. लखमन, हा तुझा धनि इतके दिवस मोंगलाच्या कैदेंत खित-पत पडला होता, बरं बाबा--"

" काय ह्मणतां ? आश्चर्य आहे ! "

" कां ? तुला मुद्धां कां हें खोटें वाटतें माझें बोलणें ? "

" छे छे महाराज, " लखमन एकदम ह्मणाला, " असं समजणा-ऱ्याच्या अंगांत किडे पडतील किडे !--पण ही अशी निमकहरामी केली तरी कुणी म्हणतां ? "

" एक लिंगजीला माहीत ! " ठाकुरसाहेब म्हणाले. " पण मी आतां गप्प नाहीं बसणार ! माझी बदनामी करणाऱ्यांचीं पाळें मुळें खणून काढ

ण्याकरितां अवघा मेवाड पालथा घालीन ! कधीं नाहीं सोडणार ! लखमन उद्यां तूं आपले लोक तयार करच. ”

दोघेही थोडावेळ स्तब्ध बसले. त्यावेळेपुरतें लखमनसिंगानें त्यांच्या म्हणण्यास रुकार देऊन त्यांना शांत केलें. व रात्रीं ठाकुरसाहेबांनीं त्याच्या घरींच मुक्काम केला.

त्या रात्रीं ठाकुरसाहेबांना मुळींसुद्धां स्वस्थता वाटली नाहीं. आपली अशी बदनामी करून आपलें वैर साधण्यांत कोणाचें अंग असावें, याची त्यांनीं आपल्या मनाशींच चौकशी करीत सारी रात्र घालविली; पण प्रत्येक व्यक्ती विषयीं त्यांना विचारांतीं असें वाटलें, आपलें असें वैर साधण्यांत याचा काय फायदा ?

असे विचार करीत असतां त्याचें डोकें थोडें शांत झालें ! व त्यांना पुढें आपण कसें वागावें त्याचे विचार सुचूं लागले. त्यावेळीं त्यांना वाटलें; आपण प्रगट झालों आणि अस्सल रजपुतांनीं चिडून गैर समजानें आपला प्राण घेण्याचा घाट घातला तर ? आपण निरअपराधी आहोंत, हें आपण सिद्ध कसें करणार ? आपणास मुकाट्यानें पकडून नेलें व गुप्तपणें तुरुंगांत नेऊन घातलें इत्यादि हकीगत लोकांना खरी कशी वाटणार ? बरें, त्यांतूनही आपण प्रगट झालोंच तर ही बातमी आपल्या शत्रुकडूनच हां हां ह्मणतां दिल्लीला पोंचेल आणि त्यामुळें फर्जंदबेगावर सुटका होण्याचें आंत प्राणांतिक संकटहि कोसळेल ! त्याकरितां आतांच प्रगट न होतां, आणखी थोडा गम खाऊन आपले शत्रु कोण आहेत ? मोंगलांच्या ताब्यांत देण्याचा अधम प्रयत्न कोणी केला ? तसें करण्यांत त्यांचा काय हेतु होता ? इत्यादि गोष्टींचा तपास लागावा; तों पर्यंत गुप्त राहावें हेंच बरें. लौकरच जयश्री येईल. तिचें व तिच्या करवीं तिच्या पतीचें किती आणखी कोणाचें कितपत सहाय्य होतें ? हें ही समजेल. आपल्या कांहीं दिवसांच्या गुप्त राहण्यानें फर्जंदबेगाच्या सुट-केचा मार्ग सुचल्यास तेंही बरेंच होईल. तात्पर्य, आणखी कांहीं दिवस मेवा-डांत राहून मेवाडला मेलें पाहिजे ! प्रसंग मोठ्या आणिबाणीचा आहे त्यांत कांहीं चुकलें तर त्याचें प्रायश्चित आपल्याला आणि आपल्या सहाय्यकांनाही भोगावें लागेल. तेव्हां आणखी कांहीं दिवस चुपकी मारावी हें बरें.

त्याप्रमाणें सकाळीं उठल्यावर त्यांनीं आपली ही नवीन योजना लख-मनसिंगास सांगितली व त्याला ती कालच्या योजनेपेक्षां विशेष हिताची वाटली. त्या नंतर धनी नोकरांचे आणखी कांहीं बेत ठरले व ठाकुरसाहेब आपल्या संधीची मार्गप्रतिक्षा करीत कार्याला लागले.



# परिच्छेद ४६ वा.

## ग्लानी कीं विपरीत बुद्धि ?






तःच्या जन्मभूमींतच देशभक्तांना चोरा प्रमाणें राह-ण्याची पाळी यावी, ही दुर्दैवाची कमाल होय. परंतु ठाकुरसाहेबांवर आज तोच प्रसंग गुदरला होता आणि कांहीं काळ तरीं हा विलक्षण अन्याय मुका-ट्यानें सहन करीत राहणें त्याना अगदीं अगदीं भाग होतें. !

आपल्यावर संकट आणून नंतर आपल्या पश्चात् आपल्यावर देशद्रोहीपणाचा किळसवाणा आरोप आणऱ्यांचीं नावें कळेपर्यंत अगर आपल्या निरअपराधीपणाचे सबळ पुरावे दाखविण्याची आपली तयारी होईपर्यंत, गुप्त रहावयाचें

आणि त्या दरम्यान मेवाडची स्थिति अवलोकन करावयाची असा विचार करून ठाकुरसाहेब त्या कार्याला लागले खरे: पण आठ पंधरा दिवसांच्या इकडच्या तिकडच्या फिरण्याने त्यांना मेवाडचा जो अनुभव आला, तो पाहून त्यांना स्व:त च्या चोरट्या स्थिती बद्दलच्या दुःखापेक्षांही जास्त दुःख झालें ! महाराणा प्रतापसिंगाच्या निर्वाण प्रसंगीं जनतेमध्यें जो एक प्रकारचा आत्मविश्वास आणि कडक स्वाभिमान दिसत होता, तो आतां त्यांना इतका तुरळक वाटूं लागला कीं, त्यांचें आस्तित्व स्वःतच्या निराश मनाला क्षणिक समाधान देण्याकरितांच त्यांना मानावें लागलें ! प्रतापाच्या वेळचे तरुण मनाचे वृद्ध रजपूत जितके त्यांना कमी दिसले, त्याच्या किती तरी पटीनें अधिक, मनानें मेलेले तरुण रजपूत त्यांना सर्वत्र आढळले ! एका प्रवासांत त्यांना एका तरुणाशी बोलण्याचा मोका आला. त्यावेळीं त्यांना तरुण पिढीचें मन स्पष्ट कळून चुकलें. त्यावेळीं दोघांचा संवाद झाला तो असा:—

ठाकुरसाहेब:—" इतक्या त्वरेनें तुह्मी काय दिल्लीला निघालांत ?

**तरुण**:—होय. यापुढें आतां मी तिकडेच राहीन ह्मणतों. माझ्या तरवारीचा मला इतका विश्वास आहे कीं, मी अर्ज करण्याचा अवकाश, मला फौजेंत कुठेंहि नोकरी मिळेल. सध्याचे दिल्लीचे पादशहा आपल्या पित्या प्रमाणेंच मोठे उदार मनाचे आहेत, ह्मणतात ! हिंदू व मुसलमान असा भेद ते मुळींसुद्धां मानीत नाहींत ! त्यांची पातशाहात वाढत गेली ती उगीच नाहीं ?

**ठाकुरसाहेब**:—( मनांतून संतापून )—मग तुमच्या पराक्रमाला मेवाडांत स्थान नाहीं का ?

**तरुण**:—मेवाडांत !—काय आहे दगड ? मेवाडचें राज्य तें काय एवढेसें अन् त्यांत मी पराक्रम दाखविणार तो काय ? ऊं: ! आपल्याला एकदां नोकरी लागल्यावर आपण मेवाडचं तोंड सुद्धां नाहीं पाहणार !—हें पहा ह्मातारबुवा, आतां आपल्या मेवाडांत कांहीं ह्मणतां कांहीं सुद्धां अर्थ राहिलेला नाहीं ! झालें, संपलें त्यांचें वैभव !

**ठाकुरसाहेब**:—कां बरें तुमच्यासारख्या तरुणांनी प्रयत्न केला तर त्याचें वैभव आहे तें वाढणार नाहीं का? तुमच्या तलवारीला पराक्रमच जागवायचा जर आहे तर मग तो मोंगलाच्या सेवेकरितां कां?

**तरुण**:—( निर्लज्य पणानें हंसून ) पण मोंगल न् आह्मीं दोन कुठें आहोंत? त्यांचं आमचं सगळं एकच राज्य आहे ना! आपलं न् त्यांचं असा भेद भाव करणं आपल्याला नाहीं पसंत!

**ठाकुर**;—( मोठ्या कष्टानें संताप आवरून ) मग तुमचा चितोड मोंगलांच्या ताब्यांत कां?

**तरुण**:—ते आमच्यापेक्षां बलिष्ट आहेत ह्मणून?

**ठाकुर**:—मग आपली तलवार त्यांना वाहून त्यांची बालिष्ठता वाढविण्यापेक्षां त्यांच्याशीं झगडून स्वातंत्र्याकरितां मरणें श्रेयस्कर नाहीं का?

**तरुण**:—( घोंटाळून ) कसं ह्मणालांत? पराक्रम करून मारायचं? ऊं हूः! तें आपल्याला नाहीं पसंत. पराक्रम कशाकरितां करायचा? वैभव मिळवण्याकरितां आणि तो करतांना जर आपण मेलों तर—छेः! आपल्याला नाहींच तें रुचत.

**ठाकुर**:—मग महाराणा प्रतापसिंगजी मरेपर्यंत मोंगलांशीं झगडले तें व्यर्थच ह्मणावयाचें!

**तरुण**:—अं—अं—त्याचं असं आहे बुद्रोपंत, आतां काळ बदलला आहे. आतां आपलं मुकाट्यानं नमतं घ्यावं हें बरं. अहो, मला प्रतापसिंगाच्या कसल्या गोष्टी सांगताय? आज जो उठतोय् तो मोंगलांकडे पळतोय् नोकरी मागायला! आमचे सालुंब्र्याचे ठाकुर—प्रतापसिंग होते तों पर्यंत नाचले मेवाड मेवाड ह्मणून पण पुढें काय? त्यांनीं पाहिलं, हें आपलं काम नव्हेरे नव्हे! आपले मुकाट्यानें दिल्लीला गेले, बादशाहास भेटले, मोठी नोकरी मिळविली. आतां मजेनें बंगल्यांत जाऊन राहिले आहेत.

**ठाकुर**:—असं! एकूण बादशाहा उदार आहे ह्मणायचा?

**तरुण:**—उदार !—अहो उदारच नाहीं तर काय ? ठाकुर इसरसिंग ह्मणजे मोंगलाचा कट्टा वैरी. पण बादशाहा कसले धूर्त ! त्यांनीं त्याच्या पूर्व चरित्राकडे मुळीं पाहिलें नाहीं. मुकाट्यानें जहागीर देऊन आपल्या औदार्याखालींच त्याला दडपून टाकला ! आपल्या राज्यांत असं कांहीं झालं असतं ? अहो नाहींच व्हायचं. मी सांगतों ना नाहींच व्हायचं तसं ! उलट राजद्रोही ह्मणून फाशी मात्र व्हायची अशा मनुष्याला ! मोंगलांनीं राज्य मिळवलं तें उगीच नाहीं ! ते स्वभावतःच उदार व न्यायी ! त्यांची सर आपल्याला येईल काय ?—

**ठाकुर:**—पुरे कर शहाण्या ! आपल्या मार्गाला लाग. मेवाडचें नशीब फुटकें ह्मणून तुझ्या सारखा हिरा त्यांच्या पोटीं आला, दुसरें काय ह्मणावयाचें !

या प्रसंगानें चिडून जाऊन ठाकूर साहेब चार सहा दिवस तरी आपल्या गुप्तस्थानातून बाहेर पडले नाहींत. पण पुनः त्यांना एका नव्या ओळखीनें एक नवीन प्रसंग पाहण्याची अनिवार इच्छा झाली. एका मोठ्या ठाकुराकडे कांहीं देवघेव करण्यास जावयाचें होतें. तेव्हां त्याच्या बरोबर जाऊन आपले सरदार पुत्र कोणत्या मनःस्थितींत आहेत, हें पाहण्याची ठाकूर साहेबांस इच्छा झाली. हा सरदारपुत्र त्यांच्याच एका स्नेहाचा मुलगा असून तो स्नेही मेवाडच्या स्वातंत्र्याकरितां मेला होता. अशा पराक्रमी पुरुषाचे चिरंजीव सध्यां कोणत्या मिजाजींत आहेत, हें पाहण्यास ठाकुरसाहेब गेले.

अगदीं दर्शनींच सरदार पुत्राच्या दिनक्रमाची रूपरेखा कळली. आपल्या सौदागर मित्रासह ठाकुरसाहेब गेले, त्यावेळीं सरदारपुत्र स्वहस्तें आपल्या एका लाडक्या बुलबुल पक्षाला चारा घालीत होते आणि जवळच त्यांचे नोकर कबुतर उडवीत होते, त्यांची मौज पाहत होते. समोरच एक सुशोभीत हवेली उठलेली दिसत होती. त्याच्या गच्चीवर सरदार साहेबांनीं दिल्लीहून आणविलेलीं दोन फुलपांखरें फिदी फिदा हसत धांगडधिंगा घालीत होतीं.

हा प्रकार पांहतंच ठाकुरसाहेबांची वृत्ति क्रोधानें बावरली. मोठ्या

कष्टानें त्यानीं आत्मसंयमन केलें. ते स्वगत म्हणाले, " पिता पुत्रांत हें काय अंतर ! मराठा तुझे सगळेच सरदार पुत्र असेच असले तर ! तुझ्या पुनरुद्धाराची आशा कशाला पाहिजे ? "

नंतर सरदार पुत्रांनीं त्यास भेटीस बोलावलें म्हणून ते आपल्या सौदागर मित्राबरोबर तिकडे गेले. सरदार पुत्राचें हें विश्रामस्थान त्यांच्या इतर चरित्राला साजेसेंच होतें.

त्या स्थानीं सरदारपुत्र व सौदागर यांचा संवाद झाला तो असा:--

सरदार:—परवानें तुमचें तें ' सरबते बहार ' फारच नामी लागलें बुवा ! आम्हाला कांहीं शिशा जरूर पाठवा ! ' खुश—इ—जहर ' ही ही एक मोठी अजब चीज आहे.

सौदागर:—( अभिमानानें ) खास बादशहानां जो माल जातो त्यांपैकीच कांहीं नमुना करितां आपल्याकरितां आणिला होता. ह्या शराबवांचून बादशहा दुसरीला हात पुढां लावीत नाहीत.

सरदार:—( कौतुकानें ) होय ना ? भाग्यवान आहेत ते-ईश्वरस्थाची गादी मिळाली ती उगीच नाहीं ? पुण्य न दाखवें त्याचें !—हें पहा सौदागर साहेब, आपल्यालाही तो खास माल पाहिजे हें समजलों—किंमतीचा प्रश्न आमच्याजवळ कांहींच नको. चार दोन मोहरा कमी कीं जास्त ! त्याचें काय एवढें ? माल मात्र अस्सल असावा ! - बरें परवा आम्हीं सांगितलेलें गजनीच सणंग आणिलें काय ? आणि आयने ?—त्याची आपल्याला फार आवश्यकता आहे !

सौदागर:—सरकार; तो माल चीनहून येतो. हिंवाळा लांबल्यामुळें मार्ग खुंटला होता. आतां येण्यांत आहे. इराणचे गालीचे मात्र फारच पाहण्यासारखे आले आहेत.

सरदार:—मग आणिलेत का आमच्या करितां कांहीं ?—नाहीं अफसोस ! !-हें काय तुम्ही वेड्यासारखें करतां बुवा ? अहो, माल चांगला दिसला कीं आमच्याकरिता आणायचाच ! पुनः ध्यानांत ठेवा ! पुनः सांगतो,

किंमतीची मला पर्वा नाहीं. परवाचें तुमचें झाड ( झुंबर ) नाहीं मी घेतलें? संबंध मेवाडभर तुम्ही फिरलां; पण कोणी तें अवजड म्हणून घेईना तर कांणाला किंमतच जड वाटूं लागली ! आपल्याला नाहीं असली जिगजिग आवडत? माल घ्यायचा म्हटला कीं घ्यायचा ! मुसलमान सरदार असा कधीं विचार करीत नाहींत म्हणे ! ते खरे चनी ! विलास भोगावे त्यांनी ! परवं मीं तो सरदार - काय त्याचं नांव—म्हणे गुलाबी अत्तरानं न्हायला ! शाबास त्याची ! छातीचा पुरुष ! अहो अत्तर तरी किती रुपये तोळ्याचं—

**सौदागरः**—तीनशें ! तिनशें रुपये तोळ्या प्रमाणं चांगलें दोन मण अत्तर घेतलें त्यांनीं ! शोक म्हणतात तो असा !

**सरदारः**—यांत काय संशय ! एवढ्या जबर शोकाला तो गडी मुसलमान होता म्हणूनच टिकला ! आमचा मेवाडकर ! डोळे फाटून मेला असता ! अहो इतकें पाणी नाहीं घ्यायच आमच्यानें !

**सौदागरः**—मग आमचं गिऱ्हाईक कोण आहे ! सारे मुसलमान ! हिंदुपासून आम्हाला काय प्राप्ती आहे ? त्यांतून मेवाडकर तर इतके दरिद्री आहेत—

**सरदारः**—होय ना !—पण मी कांहीं जाऊं देणार अ ! मेवाडची अब्रू ! माझ्या बाबतींत तुम्हाला नाहीं म्हणतां येणार असं !

**सौदागर**—छेः छेः ! सरकार हें काय बोलणं झालं ! आपण आम्हा गरीबांचे पोशिंदे ! त्या दिवशींचें मला पक्कें स्मरण आहे. तें माझें झाड (झुंबर ) खपलें नसतें तर माझें टाळकें फुटलें असतें ! पण स्वामींनीं माझा बचाव केला !

अशा धर्तीचें बरेंचसें बोलणें झाल्यावर त्या धूर्त सौदागरानें मागील बाकी वसूल करून पुढच्याही सौद्याचा किंमत आगाऊ हस्तगत केली ठाकुरसाहेब सखेदाश्चर्य करीत हा सर्व प्रकार पाहात होते थोड्या वेळानें ते दोघेही तेथून बाहेर पडले.

बाहेर आल्यावर सौदागरानें हंसून म्हटलें, " हा आतांचा सरदार म्हणजे निव्वळ अनेक गाढवांचा अर्क आहे ! किती वेडे, खुळे, मूर्ख व टोणपे मारून ब्रम्हदेवानं याची मूर्त घडवली, हें त्याचें त्याला माहीत ! माल कसलाही असो, बादशहा हा असलाच वापरतात. एवढा मंत्र फुंकला कीं, झालें काम ! दामदुपटीची खात्री ! या गाढवाला मुसलमानाप्रमाणं वागण्याची कोण हौस आहे म्हणतां ? मुसलमानी पोषाख, मुसलमानी भाषा, मुसलमानी तऱ्हा सर्व कांहीं याला प्रिय ! एकदां एक अत्तराचा शिशा लागला खोटा. मग काय दिली थाप, अमक्या खानसाहेबांनीं अत्तरानें आंघोळ केली म्हणून ! पण या गाढवानें कांहीं असा विचार केला नाहीं कीं, अत्तरानें स्नान होणें शक्य आहे कीं नाहीं आणि असल्यास तें कोठवर सुखावह होईल ? माझा शिशा खपला, माझें काम झालें !"

ठाकुरसाहेबांचें लक्ष्य उद्वेगानें दुसरीकडेच असल्यामुळें त्यांनी यावर कांहींच उत्तर दिलें नाहीं. तरी सौदागर पुढें म्हणाला, " पण मी याचं कारण सांगूं का ? हा सर्व राजाच्या वर्तनाचा परिणाम आहे ! यथा राजा तथा प्रजा असं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं ! आमचा सध्याचा महाराणा अमरसिंग यानें ही सर्व घडी बिनसून टाकली ! नाहींतर मुसलमानाचें नांव ऐकतांच मेवाड नुसता खवळून उठत होता ; पण आतां कांहीं नाहीं बघा ! सर्वांना झोंपा लागल्या आहेत ! तो बिचारा साळुंब्याचा ठाकुर होता कांहीं तेजस्वी—पण—"

ठाकुरसाहेबानीं प्रश्न केला, " पण त्याचं काय झालं ?"

सौदागर मागें पुढें पाहात म्हणाला, " त्याचं मोठं कोडं आहे बुवा ! आपली लोकांत बोलवा आहे, त्याचं नू महाराण्याचं कांहीं भांडण झालं म्हणून तो रागाऊन मोंगलांचेकडे निघून गेला आणि तिकडे मजेंत आहे. पण मला नाहीं तें खरं वाटत—"

" मग तुम्हाला काय वाटतं ? " ठाकुरसाहेबांनीं उत्सुकतेनें विचार रलें, " तो कुठें असावा अशी तमची कल्पना आहे ?"

सौदागरानें ह्मटलें, अगदीं हलक्या स्वरांत ह्मटलें, "कोणाजवळ बोलूं नका हो. आपलं तुम्हाला म्हणून सांगतों, ठाकुर इसरसिंग मोठा कडवा होता. महाराणाजींनें जो 'उमराव महाल' बांधला ती गोष्ट त्यांना बिलकूल आवडली नाहीं. कारण, चितोड स्वतंत्र होईपर्यंत कोणत्याही मानी रजपुतानें झोंपडीचा महाल करावयाचा नाहीं, अशी प्रतापाची सक्त आज्ञा होती, ती प्रत्यक्ष त्याच्या मुलानें मोडलेली पाहून त्या म्हाताऱ्याला आला राग—म्हातारा ह्मणजे कोण समजलं ना? ठाकुर इसरसिंग! त्यानं राण्याचा मुलाहिजा न धरतां भर दरबारांत या प्रतिज्ञा भंगाबद्दल त्यांची सक्त निर्भर्त्सना केली. ती कांहीं राण्याला रुचली नाहीं किंवा नगावी आणि आपल्या [illegible] मार्गांत हा जुना कांटा उपयोगाचा नाहीं, असा विचार करून महाराण्यानें त्या म्हाताऱ्याला मुकाट्यानं मारून तरी टाकलें असावें किंवा कुठें तरी कैदेंत कोंडून तरी टाकलें असावें. आणि म्हणून उठवलें कीं, ठाकुर इसर सोंगलाकडे गेला ह्मणून—"

"काय ह्मणतां तरी काय हें?" ठाकुरसाहेबांनीं दचकून आश्चर्यानें प्रश्न केला, प्रतापाच्या मुलानें असा पाजीपणा केला असेल ह्मणतां.

सौदागर घाबरून इकडे तिकडे पहात म्हणाला, "हें पहा. तुम्ही केवढ्या मोठ्यांदा बोलतां हें! अहो, ही तुम्हाला माहीतीची बातमी म्हणून का सांगत आहे? आपला माझा होरा तुम्हांला सांगितला! नसेल पटत तर द्या सोडून. पण त्याची शंका अशी मोठ्यानं बोलून नका दाखवूं! नाहीं तर दोघांनाही जावें लागेल तुरुंगांत! राजाच्या अपराधांची चर्चा अशी चवाठ्यावर का करायची?"

यानंतर दोघांनींही एकमेकाचा निरोप घेतला. ठाकुरसाहेब आपल्या मुक्कामांत आले आणि पाहिलेल्या व ऐकलेल्या गोष्टीचा विचार करूं लागले. आपल्या सौदागर सोबत्याचे कांहीं कांहीं शब्द त्यांच्या मनांत भारी ठसले, यथा राजा तथा प्रजा वगैरे!

याच सुमारास जयश्री चंदेल वाडीस येऊन पोंचली व तिची व ठाकुरसाहेबांची (पूर्वी ठरविल्याप्रमाणें) भेटही झाली. त्याप्रसंगीं ठाकुर

साहेब तिला फारच कष्टी दिसले. तिनें तें बदलाव शब्दांतून ठाकुरसाहेब निराशेनें म्हणाले, " जयश्री, तूं स्त्री मनुष्य असल्यामुळें मेवाडच्या आजच्या मनःस्थितीचें खरें ज्ञान तुला होणें थोडें कठीण आहे. त्यामुळें माझ्या मनाच्या यातना तुला अनुभवतां येणार नाहींत, आणि त्या न याव्यात अशी माझी इच्छा आहे. बेटा ! आपल्या मेवाडचें नशीब फुटलें बरं ! प्रताप मेला त्यावेळीं त्याच्या मातृभूमीचाही प्रताप संपला ! ती विधवा झाली ! याच्या पुढचा काळ कसा येणार आहे हें मी काय सांगूं ? पण वाटतें की, तो कांहीं चांगला नाहीं. आज ना उद्यां मेवाडच्या मस्तकावर पातशहाचा पाय पडून, त्याच्या पारतंत्र्याची काळरात्र सुरू होणार ! "

जयश्री घाबरून म्हणाली, " ही कसली अभद्रवाणी ऐकतें आहें ! आणि तीही आपल्यासारख्यांचे तोंडून ? भगवन्ताची इच्छा तरी काय आहे ? "

ठाकुरसाहेब त्वेषानें म्हणाले, " आम्हां नालायखांना भरडून काढण्याची ! "

नंतर त्यांनीं आपले अनेक अनुभव निवेदन केले. ते श्रवण करून जयश्रीही थक्क झाली ! भयभीत झाली ! ती म्हणाली, "आणि मग ? "

" मग काय ! " ठाकुरसाहेबांनीं उद्वेगानें म्हटलें, " सर्वनाश ! जयश्री, राजा नालायक, मंत्रि नालायक, सरदार, दरकदार, बेगरजी, तरुण पिढी नादान, स्त्रिया अज्ञान, वृद्धजन निराश आणि सामान्य जन दरिद्री अशा स्थितींत कोणत्या देशाचा भाग्योदय होईल ! मेवाड अशा स्थितींत आहे; तीच स्थिति कायम राहिल्यास त्याचें आयुष्य लांबलचक असेल, असें का वाटतें तुला ? नाहीं, केव्हांहि नाहीं ! बाळे, चालू काल संधिकालाप्रमाणें रमणीय रंगाचा आहे खरा; पण तो उषःकाल नव्हे सध्याकाळ आहे ! ही रमणीय प्रभा सूर्योदयापूर्वीची नसून सूर्यास्तानंतरची आहे ! जयश्री, आजचा संधिकाल पुढच्या घोर रात्रीची सूचना आहे ! ज्या रजपूत जातीच्या पूर्वजांना शत्रूचें नांव—गौरवानें नव्हे तर तुच्छतेनें

उच्चारलेलें खपत नसे, त्यांच्याच वंशजांना शत्रूच्या आचाराविचाराकडे कौतुकानें पाहूं लागावें याचा काय अर्थ ? मोंगलांनीं आमच्या इतक्या मुली खुशीनें अगर नाखुशीनें हिसकल्या पण परत वाणांत त्यांनीं आपली एकही बेटी आमच्या मोठ्यांतल्या मोठ्या राजास देण्याची इच्छा दर्शविली नाहीं, ही गोष्ट सूर्यासारखी सत्य असतां आम्हांला त्यांच्या विलासांचें व चालीरीतींचें अंधानुकरण करण्याची अनिवार इच्छा व्हावी, याचा परिणाम आत्मनाशांतच होणार नाहीं काय ? कोणत्या खानानें अत्तरानें आंघोळ केली, याची चौकशी करून त्याच्याशीं तशा बाबतींची अहमहमिका आ—म्हांत सुरू झाल्यास आमच्या उगवरचें त्यांचें आसन दृढ होईल कीं ढिलें ? शत्रूनें रंगपंचमीला किती रंग उडवला याचीच बित्तं बातमी काढणारा बहाद्दर आपल्या पूर्वजांनीं स्वातंत्र्याकरितां किती रक्त सांडलें याचा विचार तरी करील का ? आणि जर ती आठवण बुझली तर पुढें मागं शत्रूंनीं प्रबल होऊन आमची नाकेबंदी केली तर त्याची आम्हांला लाज वाटेल का? नाहीं, जयश्री, मुळींच नाहीं वाटणार ! उलट त्यांनीं दिलेला तुकडा खावा, सांगतील ती गुलामगिरी पत्करावी आणि त्यांच्या शाब्दिक कृपाळवाकरितां त्यांच्या पायांखालीं घोटाळत राहून स्वतःस धन्य मानून घ्यावें, अशीच स्थिति येणार, अगदीं खास येणार ! आणि जयश्री, तुझ्या माझ्यासारखीं माणसें कितीही तडफडेनात; मेवाडच्या कपाळीं हा गोंठा फुटणार यांत शंका नाहीं ! जयश्री मी कष्टी आहे तो यामुळें. ”

ठाकुरसाहेब गप्प बसले. जयश्रीहि तोंडात मारल्याप्रमाणें स्तब्ध झाली !

थोडया वेळानें तिनें विचारिलें, “ या स्थितीला, मग काय, कांहींच उपाय नाहीं ? ”

“ माझे शत्रू कोण आहेत ? हें मला कळलें पाहिजे, ” ठाकुरसाहेब म्हणाले, “कारण, ते कांटे जर राहिले तर मला मार्ग काढतां येणार नाहीं.”

जयश्रीच्या कानांत मोहबतखानाचे शब्द घुमूं लागले, व तिच्या नेत्रांपुढें जयचंदाची मूर्ति चमकली ! क्षणभर तरी तिच्या हृदयाची धडधड

थांबली ! मोठया कष्टानें तिनें निराळा विषय काढला. ती म्हणाली, "मान-सिंगजींचा आपणांस कांहीं उपयोग नाहीं का होणार ! "

" कांहीं का पुष्कळ होईल ! " ठाकुरसाहेब आठया घालून म्हणाले, " पण त्याच्या गळ्यांत ती एक मोहनमाळ आहे ना ! ती जवळ असेपर्यंत तो अगदीं निरुपयोगी आहे. नाहीं तर आजच्या निद्रित मेवाडला जागृत करण्याचा एकच उपाय आहे. चितोडगडावर फितुरी आहे आणि आपण धडाडीचा प्रयत्न केल्यास प्रतापाची शेवटची इच्छा पूर्ण होण्यास वेळ नाहीं, अशी जर खात्री मेवाडच्या राजापासून रंकापर्यंत सर्वांना देतां आली तर कदाचित संभव आहे कीं, मेवाड इर्षेकरितां खडबडून उठेल ! "

" मग मानसिंगानें काय करावं, तें मला कळूं द्या. मी त्यांना तयार करतें. "

" मानसिंगाचा बाप सध्यां पश्चात्तापाच्या स्थितींत आहे आणि त्याच्यावर मानसिंगाचें चांगलें वजन आहे. तेव्हां सम्राजीचें एक पत्र " चितोडगड मेवाडच्या महाराण्यास देण्याची माझी तयारी आहे. " अशा अर्थाचें मिळवितां आलें तर त्या पत्राचा कसा उपयोग करावयाचा तें माझें मी पाहून घेतां. "

" मग तेवढें काम मी करतें. हसीनेस मी आपल्याकडे आणून ठेवतें व तिच्या करवीं व माझ्या प्रयत्नानें मी मानसिंगजींना चितोडगडाच धाडून तसें पत्र आणण्याचा शिकस्तीचा प्रयत्न त्याच्याकडून करवितें—' तित-क्यांत जयश्रीला एक विचार सुचला व ती किंचित् थांबून पुढें म्हणाली, " आणि ठाकुरसाहेब, परमेश्वराची इच्छाच असेल तर मी आपले शत्रुही आपल्यापुढें आणून उभे करितें. मात्र आपण आणखी कांहीं दिवस असेच गुप्त राहण्याचें करा. "



# परिच्छेद ४७ वा.

## विवेकभ्रष्ट पतीची भेट.

---




कारीचा शोक शमल्यानंतर आणि परत आग्र्याला जाण्याची लहर आल्यानंतर बादशहा जहांगिराची स्वारी आपल्या तमाम लवाजम्यासह राजधानीला परत आली. अर्थात् त्याबरोबर जयचंदाचेंही पुनरागमन झालें, हें निराळें सांगावयास नको आहे.

पण जयचंद काणावत—मेवाडचा मुख्य मंत्री कोणत्या स्वरूपांत होता ?

हंसाचा कावळा होत नाहीं. अश्वाचा गर्दभ बनल्याचा दाखलाही ऐकीवांत नाहीं. सिंहानें शृगालाचा पेशा पत्करल्याचेंहि कोठें नमूद नाहीं; परंतु उत्तम वर अधम बनल्याचीं अनंत उदाहरणें मनुष्य जातींत प्रत्यहीं घडत आहेत. त्यांचेपैकीं जयचंदाचें एक उदाहरण आहे !

मोंगलांच्या सान्निध्यानें जयचंद आपल्या उच्चस्थानापासून आणखी गडगडला ! राजे लोकांच्या चंचळ स्वभावाप्रमाणें त्याच्यावर बादशहाची एकदम खुशमर्जी झाली ! त्याच्यावांचून जहांगिरास चैन पडेना ! जय-चंदाच्या मोहित मनास हा मान कांहीं हलका नव्हता ! आपलें मेवाडचें राजकाज टाकून तो बादशहामागें मृगयेकरितां गेला तो उगीच नव्हे.

बादशाही रहाणीच्या सान्निध्यामुळें आतां ऐशआरामाची चांगली ओळख झाली. विलासाच्या अनेकानेक तऱ्हा त्यास कळल्या आणि ते

कवकले उपभोगून आयुष्य सार्थकी लावावें; हेंही त्यास न शिकविलें चां-गलें करूं लागलें ! मनाचें हें शिक्षण ज्या प्रमाणांत वाढत गेलें, त्याच प्रमाणांत त्याचें उत्तमत्वापासून अधःपतन झालें. सत्वाची आर्णव नाहींशी झाली ! कर्तव्याचा विसर पडत चालला, आणि स्वाभिमान नपुंसक होत चालला ! आतां त्यांस हांजीची खुबी कळली ! खुशामतीच्या खुमासदार खव्यांत मधुर भाषेची साखर घालून त्या फक्कड पेढयांचा प्रसाद बादशहा-पुढें नेऊन त्याच्या प्रसन्नतेची देणगी कशा मिळवावी ? हेंही त्यास आपो-आप येऊं लागलें.

बादशहाच्या दरबारांतील इतर तुकडेमोडया रजपुतांना जयचंदाचें हें रूपांतर सोयां आणि पसंत आलें ! त्यांचा मान मोंगलांच्या टांचेखालीं चिरडल्यापासून मेवाडचा ताठा त्यांच्या डोळ्यांत चांगलाच खूपत होता. त्यांत प्रतापी प्रतापानें आपल्या मर्मभेदी भाषणानें व बाणेदार वर्तनानें त्यांना असें खिजविलें आणि लाजविलें होतें कीं, त्याचा सूड कसा उगवावा हा त्यांच्यापुढें एक फार मोठा प्रश्न होता ! तो आज जयचंदाच्या वर्तनानें सुटला ! मेवाडच्या मुख्य मंत्र्याची मान मोंगलांना मान देऊं लागली, उद्यां मागोमाग महाराण्याची मानही अशीच तुकूं लागेल, अशी त्यांना खात्री वाटूं लागली ! मिंध्या माणसांना आपले अनुयायी वाढण्याची मना-पासून हौस असते.

आग्र्याला आल्यावर आपली हंसी मेवाडकडे उडून गेल्याचें कळ-तांच जयचंदास आश्चर्य वाटलें ! त्याला राग आला नाहीं. तर ? भीति वाटली ! जयश्रीच्या निघून जाण्याचें कारण हुडकून काढण्याचा त्यानें खूप प्रयत्न केला परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. दुसरा एखादा प्रसंग असता, त्याच्या स्वभावाचें परिवर्तन घडलें नसतें तर ? शक्य आहे, त्याला तिच्या अशा एकाकी निघून जाण्याचें कांहीं विशेष वाटलें नसतें परंतु हें तिचें जाणें त्यास चांगलें जाणवलें ! जयश्री तेथेंच असती तर आणखी मुक्काम वाढविण्याचा बादशाहा आग्रह त्यास मोडवला नसतां पण आतां त्यानें तो नाकारला व तो एकदम झपाट्यानें मेवाडांत आला. त्याचा

सबंध प्रवास जयश्री आपल्या पश्चात् एकदम मेवाडांत कां निघून आली ? या चिंतेंत केला आणि आपल्या रूपांतराचा तिला संशय तर आला नसेल या शंकेनें त्यास दुसरें कांहीं सुचूं दिलें नाहीं. असो.

मजल दर मजल करीत तो चंबेलीवाडींत येऊन पोंचला. मोठया कष्टी मनानें तो आपल्या झोंपडीच्या दाराशीं येऊन पोंचला ! त्यानें सभय-दृष्टीनें सगळीकडे पाहिलें. भोंवतालच्या स्थावरजंगमांत कांहीं म्हणण्यासा-रखा पालट झाला नव्हता पण त्यावर घर मालकिणीच्या स्वच्छंद आनं-दाची छटा दिसून येत नव्हती ! शीतकालांत मेघवर्षाव होऊन सृष्टि जशी गारठून शांत होतें, तसाच तो देखावा होता ! जयचंदाचें अंतःकरण जड होत चाललें ?

पतिपत्नीची दृष्ट भेट झाली ! दृष्टी आनंदली नाहीं ! चर्येवर हास्य उमटलें नाहीं. ! गालांवर संकोचाची लाली उमटली नाहीं ! जिव्हेनें शब्दोच्चार केला नाहीं ! त्या दोघांचा विवाह झाल्यापासून हा काळपर्यंत असा दिवस कधींहि उगवला नव्हता ! असा चमत्कारिक प्रसंग कधींहि घडला नव्हता.

पण जयश्रीचा हा मुग्धपणा विनोदी संवादानें घालविण्याचें जयचं-दास धैर्य होईना. त्यास त्या गोष्टीचा अभ्यास नव्हता असें नाहीं. पण आजचा मुग्धपणा तशापैकीं होता कुठं ? आजचें जयश्रीचें मौन रंगमहा-लांतील नसून कर्तव्यक्षेत्रांतील होतें आणि जयचंद तर तेथूनच भ्रष्ट झालेला होता. मग त्याला विनोद कसा सुचणार ?

अगदीं ठरावीक प्रश्नोत्तरांत दिवसाचा कार्यक्रम संपला. नंतर जय-चंद महाराणा उभरावसिंग याजकडे गेल्यामुळें ते त्याचे दोन चार दिवस राजकाजांत कसे तरी गेले; पण त्यामुळें मनाला कांहीं समाधान वाटलें नाहीं. तें कुढतच राहिलें.

रात्रीं बिछान्यावर पडल्या पडल्या जयचंदानें आपल्या नव्या आयु-ष्याची जुन्या आयुष्याशीं तुलना केली. विलक्षण फरक !

जुन्या आयुष्यांत संपत्ति नव्हती. ऐशआराम नव्हते. भोगविलास नव्हते पण त्या सर्वांचा अभाव जयश्रीच्या एका मधुर हास्यांत विरघळून जात होता.

नव्या आयुष्यांत मनाच्या सर्व इच्छा तृप्त झालेल्या असूनही जय-श्रीच्या हास्याभावीं जयचंदास स्मशानवासाचा भास झाला !

जयचंदानें ही जी नवी अधम तपस्या केली, तिचें फळ त्यास हेंच पाहिजे होतें का ?—बरें पश्चात्ताप करून आतां ही मिळकत झिडकारली तर ?—पूर्वरंग पुन: जमेल, अशी त्यास खात्री वाटेना ! यामुळें त्याचा जीव फार तळमळला !

चार सहा दिवसांनीं जयचंद परत घरीं आला. आजच्यासारखा घरीं येण्याचा निरुत्साह त्यास पूर्वी कधींहि वाटला नव्हता.

तो सायंकाळचें सुमारास घरीं येऊन पोंचला तीच स्थिति कायम ! त्याची छोकरी चंबेली मात्र त्याला पाहून हंसत खिदळत होती. पण तें तिचें हास्य लास्य त्यास पांचट दुधाप्रमाणें वाटलें. खेळकर अचपळ मु-लीला पत्नीच्या हातून घेत व त्याच्या अनेक तक्रारी ऐकत, त्याला खेळवणें जितकें आनंददायक आहे, तितकीं दुसरी कशांतही नाहीं. जयचंद आज त्या सुखाला मुकला होता !

निद्राकाळापर्यंत सर्व कांहीं या गारठ्यांत झालें. शेवटीं जयचंदानें मौनभंग करून जयश्रीच्या जवळ जाऊन म्हटलें. " जयश्री—"

" कांय ? " तिनें सखेदहृष्टीनें त्याचेकडे पहात म्हटलें.

" तूं मजवर रागावली आहेस ?."

" कोण म्हणतं ? "

" मग हें असं वर्तन कां ? माझ्या आगमनानं तुला संतोष झालेला नाहीं दिसत." जयचंदानें म्हटलें, " तुझी मुद्रा अशी खिन्न कां ? "

" माझे जयचंद कोठे गेले ? " हें मला कळत नाहीं म्हणून !.

अगदीं शांत सरळ उत्तर ! परंतु त्यानें वज्राघाताचें कार्य केलें.

जयचंद घाबरून ह्मणाला, " ह्मणजे काय ?"

जयश्रीनें त्याच्या मुद्रेकडे पाहात ह्मटलें, " एक गोष्ट विचारतें. त्याचें खरं उत्तर मिळेल ? "

जयचंद तोंडांत मारल्याप्रमाणें तिच्याकडे पाहात राहिला.

जयश्री पुढें ह्मणाली, " ठाकुर ईसरसिंगजी मोंगलांना जाऊन मिळाले; असं आपण ह्मटलं होतं. लोकांतही तीच अफवा पसरलेली आहे; परंतु ती खरी नव्हती. उलट त्या महापुरुषाला त्यांनीं कैदेंत घातलं होतं—"

जयचंद आपल्या नव्या रूपांत शिरला. तो एकदम म्हणाला, " असं ? "

" कोणी निमकहरामी केली कोणाला माहीत—" जयश्री आपली नजर त्याच्या मुद्रेवरून लवमात्र न ढळवितां पुढें ह्मणाली, " पण त्यांना कैद होऊन त्यांची बेअब्रु झाली, आपण मेवाडचे मुख्य मंत्री ! आपण ती वार्ता खरी न मानतां नक्की तपास काढायला नको होता काय ? "

जयचंदाला तिच्या बोलण्याचा पेंच कळेना. त्यानें एकदम ह्मटलें, " बरं मग पुढं तुझं काय ह्मणणं ? "

" माझं ह्मणणं ? माझं ह्मणणं काय असणार ? " जयश्री एकदम ह्मणाली; " पण हें आतांच तुसडं उत्तर मात्र मेवाडच्या मंत्र्यांना मुळींच शोभत नाहीं. जयश्रीच्या जयचंदाची वाणी इतकी कठोर केव्हांही नव्हती !"

जयचंदाची मान आपोआपच लवली ! हळू हळू त्याच्या मुद्रेवर ओशाळपणा पसरूं लागला ! आपल्या मनाभोंवती पडलेला मोंगलाच्या मिंधेपणाचा फांस त्यास लपवितां येईना.

जयश्री त्याच्या मुखाकडे पाहात होतीच. ती ह्मणाली, " मी आणखी बोलूं का पुढं ? "

जयचंद्रानें धारण केलेली ठकविद्या त्यास सोडून जाऊं लागली. आतां पर्यंत त्यानें आपला अभिनय चांगला केला; कारण जयश्री मोहांत होती. परंतु ज्यावेळीं तिनें सावध होऊन त्यास सत्याच्या धारेवर धरलें त्यावेळीं त्याचें मन लटपटलं. काय बोलावें, कसें वागावें ? हें त्यास कांहीं कळेना !

तो मूढ झालेला पाहून जयश्री पुढें ह्मणाली, " पण आपली अब्रू मी वांचविलेली आहे. ठाकुर इसरसिंगजाना मी सोडविलें आहे ! "

तिची ही वाणी ऐकतांच जयचंद एकदम दचकला. त्याला वेळेंच भान राहिलें नाहीं. तो एकदम ह्मणाला, " काय ह्मणतेस तरी काय चांडाळणी ? "

त्याच्या अंतर्दृष्टीपुढें त्याचीं पापें नाचूं लागलीं !

जयश्रीची शेवटची शंका नष्ट झाली. ती कर्कश स्वरांत ह्मणाली, " असं ! एकूण ठाकुर साहेबांची झालेली सुटका तुम्हाला इष्ट नाहीं, असंच ना ? मग तें केव्हां होतें हेंही तुम्हाला माहित असलं पाहिजे ! आणि ती गोष्ट आपल्याला माहित असून आपण स्वस्थ होतां. नव्हे त्या महात्म्याची जास्त बेअब्रू कशी होईल ? या खटपटींत होतां ?–असच ना ? बोला हो ! आतां मी मोहांत नाहीं ! आतां मी बेशुद्ध नाहीं ! आतां माझ्याशीं कपट करूं नका. आतां माझ्याशीं असत्य बोलूं नका !–सांगा हो, तुह्मीं असं कां केलत ? "

आपल्या पायाखालची वाळू सरकत चाललेली पाहून जयचंद फारच घाबरला. तो ह्मणाला, " जयश्री, हे काय बडबडते आहेस ! "

जें सत्य तेंच ! कपटकर्मांत निपुण असलेल्या एका मनुष्याची मी पत्नी आहे हें खरें; पण मला त्याकर्माचा व्यासंग नाहीं आहे ! सांगा तुह्मी असें कां विवेकभ्रष्ट झालां ? " जयश्री आपला संताप आंतल्या आंत दड-पीत शांतपणा स्वीकारीत पुढें ह्मणाली, " कोणत्या उच्चसुखाच्या आशेनें तुह्मी माझ्याशीं असा विश्वासघात केलात हें सांगाल का ?–कोणत्या महत्कार्याच्या हेतूनें तुह्मीं असा द्रोह आरंभिलात, याचा उलगडा कराल का ? कोणत्या

महत्वाकांक्षेच्या भरी पडून तुम्ही ही कर्तव्यभ्रष्टता स्वीकारली हें कळेल का मला ?-सांगा हो !—माझ्या जिवाची तडफड शमविण्याचें सामर्थ्य तुमच्या उत्तरांत नाहीं हें मी जाणत्यें. तरीपण मी विधवा होऊन किती दिवस झाले ? हें मला कळूं द्या ! किती दिवस मी तुमच्यासारख्या परपुरुषाशीं संसार केला, हें मला कळूंद्या ! माझ्या जयचंदजींच्या मृत्यु कसा झाला, हें मला माहीत होऊंद्या ! मेवाडचे मंत्री कोणत्या मोहांत सांपडून गारद झाले हें मला पाहुंद्या ! महाराणा प्रतापाचे पुतणे स्वर्गाचा मार्ग सोडून नरकाच्या मार्गाकडे का वळले ? यांचे कारण मला ऐकूंद्या. सांगा हो ! तुमच्या गप्प बसण्यानें माझ्या यातना वाढतील ! बोलाहो ! ”

जयचंद उद्वेगानें ह्मणाला, “ जयश्री ! शेवटीं तुला सर्व कळलें ! कोणी सांगितुलें तुला हें ? ”

“ सत्य मुकें नाहीं. पापाची घाण दडपली जात नाहीं. कपटाचा तिढा फार वेळ घट्ट राहूं शकत नाहीं. मला हें सर्व आपोआप कळलें ? अगदीं सहज कळलें ! देवाची इच्छा होती ह्मणून कळलं ! ”

“ मग आतां माझें उत्तर तुला कशाला पाहिजे ? जयचंदानें विचा• विचारलें, “ मी कसा आहे, हें तुला कळलं मी काय केलें ? हे तुला कळलें ?—मग आतां त्याची वाटाघाट कशाला ? ”

“ पण या कृत्यांनीं आपला लाभ काय झाला ? ”

कांहीं नाहीं ? श्री—कांही नाहीं नाहीं ! ” जयचंद उद्वेगानें आपल्या कपाळावर हात मारून ह्मणाला, “ मी तुझ्या प्रेमाला आंचवलों ! श्री, मी केव्हां मेलों ? हें तुला कळलें नाहीं; पण तुला मी केव्हां गमाऊन बसलों, हे मात्र मला आतां कळलें; श्री मी पापी आहे ! अधम चांडाळ आहें ! माझी कृति तुला काय सांगूं आणि ती कां आचरली ह्याची फोड तरी काय करूं ? ”

पश्चात्तापाचे दोन अश्रु जयचंदाच्या डोळ्यांतून निघून गालावर पडले.

जयश्रीला त्याचें फार फारच आश्चर्य वाटलें ! आपला पति आरोप लागूं करतांच ओढेवेढे घेईल, आणखी बहाणे करूं लागेल, खोटें नाटें बोलूं लागेल अशी तिची कल्पना होती; पण ती सर्वस्वी चुकली ! त्यामुळें तिला पुढें काय बोलावें हें सुचेना. किती वेळ तरी ती त्याच्याकडे पाहात राहिली. हेंच तो चुकारपणा करूं लागला तर तिचा संताप खवळला असता आणि त्या भरांत तिनें त्याची निर्भर्त्सना करून त्याचें [illegible] त्याच्या पदरांत भरपूर घातलें; पण तसा प्रसंगच तिच्यावर आला नाहीं. त्यानें आपला अपराध चटकन कबूल तर केलाच, शिवाय पश्चात्तापाचें अश्रुमोचनही केलें.

पण हा पश्चात्ताप खरा असेल कां ? जयश्रीस शंका आली.

जयचंदानें कातरस्वरांत विचारिलें, " श्री, मला क्षमा नाहीं कां करणार तूं ? "

" आपला हा पश्चात्ताप खरा आहे, कशावरून ? "

" हो. मी तुझ्याशीं असेंच वर्तन केलें आहे कीं, तुला ही शंका येणारच. पण तुला सांगतों या पश्चात्तापाचें खरें कारण ! श्री, तुला खरें वाटो अगर खोटें वाटो; पण मी सांगतोंच ! श्री, माझें एकपत्नीव्रत मला इकडे तिकडे पळूं देईना ! तुझ्यावरील माझें अकृत्रिम प्रेम मला यापुढें कपट करण्यास सवड देईना ! म्हणून मी आपला अपराध चटकन् मान्य केला. "

जयश्रीनें त्याच्या नेत्रांत नीट निरखून पाहिलें ! ती गोष्ट खरी होती ! ही अंतरात्म्याची खूण होती ! दुसऱ्या क्षणीं ती त्याच्या बाहूंत बद्ध झाली !

थोड्यावेळांत तिनें करुणावाणीनें प्रश्न केला, " पण आतां आपला उद्धार कसा होणार ! आपलें केवढें अधःपतन झालें आहे ! "

" श्री, तूं पतिव्रता आहेस. माझा उद्धार तुझ्या हातांत आहे ! "

थोडावेळ दोघेंही विचारांत पडली.

नंतर जयश्रीनें ह्मटले " अगदीं पहिली गोष्ट ह्मणजे ठाकुरसाहेब सुटून आले आहेत, ही गोष्ट बाहेर फुटतां उपयोगीं नाहीं. आपण पुनः मोहांत सांपडून जर ही बातमी मोंगलांना पोचविण्याची खटपट केलीत ? तर दोघांपैकीं कोणी तरी एक जिवंत राहील !

" कबूल अगदीं कबूल ! " जयचंदानें ह्मटलें, ' मोगलांच्या नादीं लागून मी आपल्या संसार सौख्यावर निखारा ठेवला ! आतां आणखी त्याच्यावर तेल कशाला ओंतू ? "

" ठीक आहे पुढें काय करावयाचें तें विचार करून ठरवलं पाहिजे." असें ह्मणून ती आपल्या पतीपासून दूर झाली !



# परिच्छेद ४८ वा.

## कर्तव्यनिष्ठा व विलासप्रियता





तो योगायोगच तसा होता! सामान्य जनांच्या दृष्टीनें तो निंद्य होता., धार्मिकदृष्ट्या तो अनुचित होता आणि जातीपातीच्या सोईनेंही तो गैर होता; परंतु त्याला त्या दोघांचा इलाज नव्हता. विधारिखितच असें होतें कीं, मानसिंगासारख्या रजपुताजवळ हसीनेसारख्या यवन तरुणीनें कोणत्याही धार्मिक विधींचा सम्पर्क न होता पत्नीप्रमाणें रहावें.

नाहींतर खरें ह्मणजे ती जयश्रीजवळ रहावयाची. ठाकुर इश्वरसिंगाची सुटका होण्याचेवेळीं फर्जदबेगाची व जयश्रीची जी मसलत झाली होती; त्यांत हसीनेनें जयश्रीजवळ राहावयाचें असेंच ठरलें होतें. परंतु पुढें सर्वच गोष्टी ठरल्याप्रमाणें घडल्या नाहींत. जयचंदाच्या वदगाषीच्या उलगड्यामुळें जयश्रीचें मन अत्यंत उद्विग्न झालें. त्यामुळें हसीनेकडे लक्ष देण्याचें सुचलें नाहीं. ठाकुरसाहेबांना तर असली बला मुळींच नको होती. अर्थात हसीनेच्या रक्षणाचा भार पर्यायानें मानसिंगावरच पडला आणि तो त्यानें सहर्ष स्वीकारलाही अमिरीथाटांतही राहात असतां कामीचा बोजाही विशेष शिरावर नसतां आपलें प्रियमनुष्य मानसिंगास लाधलें होतें. मग त्याला धर्माची किंवा लौकिकाची जातीची किंवा पंतीची आठवण कशाला राहते आहे? बरें, या योगाविषयीं हसीनस काय ह्मणावें तर तिला जगाचा अनुभव नसल्यामुळें तिनेंही त्या स्थितीचा विशेष विचार केला नाहीं. दोघेही आनंदांत कालक्रमणा करूं लागलीं.

परिस्थितीप्रमाणें मानसिंगाच्या मनाची गति कशी बदलत असेल; याचें वर्णन आह्मीं मागें एका ठिकाणीं केलेंच आहे. परंतु आज त्याच्या

सुखाचा ठेवा अगदीं त्याच्या हातांत असतांही मानसिंगाला व्हावें तसें सुख होईना. हसीनेच्या संगतींत त्यास सर्व जगाबरोबर कर्तव्याचीही विस्मृति पडत होती; पण तो काळ फार राहिला नाहीं. मेवाडांत आल्यापासून त्याच्या दोन्ही गति एकमेकींत सम्मिलित झाल्या ! त्यामुळें ऐन सुखांत तो खिन्न होऊं लागला ! आपल्या प्रेयसीच्या आलिंनाकरितां पुढें केलेले त्याचे हात अंतरात्म्याच्या नाखुशीनें लुले पडूं लागले आणि चुंबनाकरितां आतुर असलेले त्याचे ओठ उद्वेगाच्या सुसकाऱ्यांनें मलूल होऊं लागले ! हसीनेच्या प्रेमांत मुरलेला त्याचा जीवात्मा वैषयिक आनंदांत नादान होण्यास अत्यंत उत्सुक असतांही त्याचा परमात्मा त्यास म्हणत होता, "मान ! तुझी मातृभूमि संकटांत असतां तुला हे विलास सुचावेत ? तुझ्यासारख्या तरुणवीरानें कर्तव्य निष्ठा टाकून विलासप्रियतेला कवटाळावें हें बरें आहे का ?—तुला मिळालेलें बाहुबल काय, फक्त एका यवनीच्या आलिंगनातच खर्च करणार ? तुझ्या बाणींचें सामर्थ्य फक्त हसीनेच्या प्रेमकथेंत विरघळून जाणार ? तुझें तेज शेवटीं मातींत मिळणाऱ्या एका देहाच्या पूजेंत व्यर्थ होणार ?—मग जड जिवा ! मेवाडनें कुणाच्या तोंडाकडे पहावें ?—सांग मान, तुझ्या जन्म भूमीनें कसें निरापद व्हावें ?

बस्स ! याच आंतील संदेशाने तो आपल्या सुखवेलींत लपटलेला असतांही खिन्न होत होता. आणि विचार करीत होता कीं काय करावें ? कर्तव्यनिष्ठा धरवत नव्हती. विलास प्रियता टाकवत नव्हती ! पण विलास दंग होईन म्हटलें तर कर्तव्य चैन पडूं देत नव्हतें !

जिवात्मा मोहांत असतां त्यास अंतरात्म्याची ओळख पटत नाहीं.मग मानसिंगाला त्याचा संदेश ऐकूं कसा येत होता ?—कारण होतें. जयश्रीची वरचेवर होणारी भेट आणि गुप्तपणें व गुप्तरूपानें होणाऱ्या ठाकुरसाहेबांच्या हालचाली त्यास झुंगी आणूं देत नव्हत्या ! जयश्री स्त्री असतांहि मेवाडच्या मुक्ततेकरितां होणारी तिची धडपड पाहून आणि वृद्धावस्थेंतही मातृभूमीच्या उद्धाराकरितां संकटांचे डोंगर शिरावर घेऊन खटाटोप करणाऱ्या ठाकुरसाहेबांचें वर्तन पाहून त्याला आपल्या वर्तनाची लाज वाटत होती ! आणि त्यांत त्याला आपल्या कुळाचा इतिहास डंख मारीत होता !

मानसिंगाची अशी स्थिति असतां, त्याच्या संगतींत हसीना मात्र स्वत्वाला पूर्ण विसरली होती. मातापित्याच्या प्रेमाचा अभाव असतांही तिचें आजपर्यंतचें आयुष्य ऐष आरामांतच गेलें होतें; पुढें ऐन तारुण्यांत मानसिंगाशीं सहवास होऊन त्याचें पर्यवसान चालू रहाणींत झाल्यामुळें जगाच्या आचारविचारासंबंधीं अगर स्वतःच्या सुखदुःखासंबंधीं विचार करण्याचें तिला सुचलेंच नाहीं. खावेंप्यावें, ल्यावें नेसावें आणि प्रिय कराच्या संगतींत विलास भोगावे एवढेंच इतिकर्तव्य तिला कळलें. त्यामुळें तिच्याकडून मानसिंगास कर्तव्याची जाणीव देण्याची अगर दुसरें कांहीं महत्कार्य होण्याची आशाच नव्हती. ती प्रेमळ होती, सुशील होती, उदार होती सर्व कांहीं ठीक होतें; परंतु जयश्रीला तिच्यांत जें कांहीं पाहिजे होतें तें नसल्यामुळें तिच्याकरवीं मानसिंगाला वळविण्याचें कार्य तिनें सोडून दिलें. उलट तिला अशीच भीति वाटली कीं, हसीनेस उगीच सतावल्यास तिला कशाचा उलगडा न पडून ती मानसिंगास जास्तच बिलगेल व ती तिची गोड मिठी सुटणें मुश्कील होऊन सर्वच काम बिनसेल. त्यापेक्षां मानसिंगाच्या विवेकबुद्धीलाच टोंचण्या मारून काम कार्यभाग करून घेतां येईल, तेवढा करून घ्यावा. असें तिनें ठरविलें.

ठाकुरसाहेबांची भेट झाल्यानंतर जयश्रीनें तावडतोब मानसिंगाची भेट घेतली. दोघांचें पुष्कळच बोलणें झालें; पण त्या संवादांत जयश्रीस मानसिंगाची स्वकर्तव्याचें ठायीं असावी तितकी उत्कंठा दिसून आली नाहीं. तेव्हां तिनें त्यास स्पष्ट म्हटलें, " हें पहा मानसिंगजी, उगीच हूं हूं म्हणून अगर खोटा उत्साह दाखवून आम्हाला नादीं लावूं नका! हें कार्य माझें नाहीं. ठाकुरसाचें नाहीं आणि तुमचेंही पण नाहीं. तें आहे मेवाडचें! तेव्हां तुमच्या जन्मभूमीचें होय! तेव्हां तुम्हाला जें कांहीं करतां येण्या-सारखें आहे तें चटकन् करूं लागा. करेंगे—करवायेंगे असला पोकळ आशिर्वाद नको! सुदैवानें अगर दुर्दैवानें तुमचा आणि हसीनेचा जो संबंध पडला आहे तो तुम्हाला कर्तव्यनिष्ठा ओळखूं देत नाहीं. हें मी जाणतें तरी पण मी तुम्हाला सावध करण्यास आलें आहे. बहीण या

नात्याने मी तुम्हाला पुनः पुनः विनंती करतें कीं कांहीं काळ तरी विलास प्रियता आवरून धरा आणि कर्तव्याला जागा !––त्यांतून तुमची मर्जी नसलीच तर तसें स्पष्ट सांगा. परमेश्वर दुसरी योजना सुचवील. एवढे मात्र खरें आहे कीं, मेवाडला ग्लानी आलेली आहे ती दूर करण्यास त्याच्यामध्यें पुनः चैतन्य आणण्यास कांहीं तरी एक प्रबळ कारण पाहिजे. तें निर्माण करण्याचें तुमच्या हातांत आहे.तेवढें तुम्ही करान् मग वाटेल तें करीत वसा तुम्हांला कोणी आडवीत नाहीं.पण यावेळीं तुमची मुग्धता मात्र सर्वांचा नाश करणारी आहे " एवढें बोलून नंतर त्याच्या हृदयाला चटका बसावा ह्या हेतूनें ती पुढें म्हणाली, मानसिंगजी, ध्यानांत ठेवा. आपल्या मेवाडा-करितां तुम्ही एवढें एक कार्य केलेंत तरी तें देवाच्या घरीं रुजूं होऊन तुमच्या कुलाचा उध्दार होईल आणि पूर्वजांच्या कपाळींचा नरकवास टळेल ! एवढया एका कृत्यानें तुमच्या पित्याच्या मनाला लागलेला अंगार नाहींसा होईल आणि त्यांचें राहिलेलें आयुष्य शांतींत जाईल ! "

मानसिंगानें तिला अभिवचन देऊन गप्प केलें ! तेवढ्या वेळेपुरता त्यास पश्चात्ताप होऊन चितुरगडावरील अनेक प्रसंग आठवले व त्याच्या हृदयाचा थरकांप झाला ! मातेचे कर्म त्यास आठवलें पित्याचें मानसिक दौर्बल्य त्याच्या दृष्टीपुढें नाचूं लागलें ! भावाची स्वाभिमानशून्यता व धर्मभ्रष्टता त्यास हिणवूं लागली आणि त्यावेळीं त्यास वाटलें आपण खरेंच नादान आहोंत. महामूर्ख आहोंत कर्तव्यभ्रष्ट आहोंत !

त्या भरांत त्यानें हर्षानेचा मोहपाश तोडण्याची त्यानें प्रतिज्ञा केली.

पण पुढें अल्पावकाशांतच तो कसा तोडावयाचा याचें त्यास संकट पडलें !

त्या रात्रीं त्याचा व हर्षानेचा असा संवाद झाला.

हर्षानेनें लडिवाळपणानें विचारलें, " आपण कसल्या विचा-रांत अहां ? "

मानसिंगानें उत्तर दिलें. " सुख कशाला म्हणतात आणि दुःखाचें स्वरूप कसें आहे ? याचा मी विचार करीत आहे ! "

हसीनेच्या कुंदकळ्या किंचित दृश्यमान झाल्या ! तिनें विचारिलें, " मग तुम्ही सुखी नाहींतर ? "

" कशावरून ? "

" त्याशिवाय हा विचार तुमच्या मनांत यायचाच नाहीं. सांगायचं गडे तुम्हाला कसलं दुःख आहे ? "

" हसीन तूं सुखी आहेस, अशी तुझी खात्री आहे का ? "

" मी याचा कधींच विचार केला नाहीं. आणि मी माझ्या जिगर जवळ असेपर्यंत मला तसला कांहीं विचार करण्याचें कारणही पण नाहीं. " असें बोलत तिनें आपली स्निग्ध प्रेमदृष्टी त्याच्यामुद्रेवर रोंखली ! हसीनेला कर्तव्यपाठ पढविण्याचा मानसिंगाचा प्रयत्न डळमळूं लागला.

आत्मसंयमनाची पराकाष्ठा करून तो ह्मणाला, हें पहा हसीन, मनुष्यानें आपल्या हिताकरितांच आपल्या सुखदुःखाचा विचार मधून मधून करीत असावा--"

" सुखांत असतांही ? "

" होय. कारण पुष्कळवेळां ज्याला आपण सुख ह्मणतों तें सुखच असतें असें नाहीं- आपली सुखदुःखाची कल्पना पुष्कळवेळां चुकलेली असते. "

हसीना त्याच्या मुद्रेकडे आश्चर्यानें पाहूं लागली. तिला या असल्या संवादाची हा काळपर्यंत सवय नव्हती. तेव्हां मानसिंग गंभीरतेचा आव आणून ह्मणाला, हें पहा हसीन, गादीवर निजण्यांत आपण सौख्य मानतो पण ह्मणून गादी हें सुखाचें एक उत्तम साधन ह्मणतां येईल का ? नाहीं. केव्हांही ह्मणतां यावयाचें नाहीं. कारण, गादीवर निजण्यांतच जर खरें सौख्य असतें तर निजण्याचें परमावधीचें सौख्य जे शांत झोंप ती गादीवांचून निजणाऱ्या माणसांना कधींही लाभली नसती. परंतु तसें होत नाहीं भूमीवर निजणाऱ्या गरीब मनुष्यालाही अगदीं छान झोंप येऊं शकते. "

" बरं पुढं ?–" हसीना त्या विषयाविषयीं कंटाळा दर्शवीत म्हणाली " आपलं म्हणणं काय आहे शेवटीं, तें कळूं द्या ! "

मानसिंग मोठा निराश झाला. नाहीं तर त्यानें मनांतल्या मनांत हसीनेला आपल्या मनाला अनुकूल करून घेण्याचा केवढा उपद्व्याप मांडला होता. सुखदु:खाची मीमांसा करून कर्तव्य निष्ठेतच मनुष्याला खरें सुख कसें मिळतें ? हें तो तिला सप्रमाण शिकवणार होता; परंतु त्या गोष्टीचा तर तिला बिलकुल कंटाळा आलेला दिसला !

त्याने आणखी एकदां प्रयत्न करून पाहण्याचें योजिलें. तो म्हणाला, " हसीन, अशी कंटाळूं नकोस. कांहीं एका विशेष कारणानेंच मी बोलणें काढिलें आहे. तुला माहीत नाहीं वेडे, मनुष्यावर कोणत्या वेळीं काय प्रसंग गुजरेल याचा कांहीं नेम आहे ? तेव्हां तसा तो येण्यापूर्वीं आपण तयार असणें इष्ट नाहीं का ?

जवळच ठेविलेल्या मंचकावरील गुलाबदाणी हातांत घेऊन हसीनेनें त्यांतील गुलाबजळ आपल्या हातावर शिंपडीत व त्याचा वास घेत निष्काळजीपणें म्हटलें, " मला आपल्या बोलण्याचा कांहीं उलगडा पडला नाहीं. "

" हसीन " मानसिंग तिच्या हातांतील गुलाबदाणी हिसकावून घेत तिला आपल्याजवळ ओढीत म्हणाला, " माझ्या बोलण्याकडे लक्ष दे म्हणजे मी काय म्हणतों तें तुला कळेल ! "

हसीना त्याच्या मुद्रेकडे पाहूं लागली. आपलें बोलणे एकदां भराभर सांगून टाकावें अशा हेतूनें मानसिग बोलूं लागला " हें पहा हसीन ज्या गोष्टींना आपण सुखाची साधनें समजतों. तीं पुढेंमागें त्रासदायक होतात. या कारितां त्यांचे ठिकाणीं विशेष आसक्ति न ठेवता मनुष्यानं आपलं खरें कर्तव्य ओळखलें पाहिजे. "

" आपल्या भोंवतालीं पसरलेलें वैभव दु:खदायक आहे म्हणतां ? "

" आज नाहीं. पुढें होण्याचा संभव आहे. "

हसीना उपहासानें हंसली ! ती म्हणाली, " मला वाटतें, आज आपण जें बोलताय् तें तुमचं तुम्हाला तरी कळतंय् काय कोणाला माहीत ? मी आपल्याला असं विचारतें, जमिनीवर निजणाऱ्यालाही झोंप येते. अर्थात् गादी हें कांहीं सुखाचें साधन नव्हे; पण म्हणून जमिनीवर निजणारा उद्या गादीवर निजला तर त्याला काय कांट्याच्या पंजरावर निजल्यासारखं वाटेल ?–का त्याला आणखी कांहीं त्रास होऊन झोंप येणार नाहीं ? बरं, एकाला गादी मिळत नाहीं म्हणून दुसऱ्यानं आपल्या अंगाखालची गादी काढून टाकावी, असं कां आपलं म्हणणं आहे ?—"

मानसिंग तिचें वक्तृत्व ऐकून थक्क झाला ! हसीना किती छान व मुद्देसूद बोलली असें त्यास वाटलें.

हसीना पुढें म्हणाली, " पुनः असें आज सुखाचीं साधनें ज्यांशीं आहेत तीं उद्यां नाहींशीं होतील म्हणून उगीच चिंता करून हातचें सौख्य दवडण्यापेक्षां मिळेल तितकं व मिळेल तोंवर सुख भोगणं बरं नव्हे का ? मी ही अशी आपल्याजवळ असलें आहे ! सांगायचं बरं ह्यापासून आपल्यास सौख्य होतं ना ?–मग तें अनुभवणं चांगलं, कीं, उद्यां हसीना आपल्याजवळून कदाचित दूर होईल या शंकेनं व भितीनें चालू सुखापासून हात आंखडून धरणं चांगलं ?—सांगायचं बरं ? "

मानसिंग काय बोलणार ? तिच्या प्रत्येक शब्दांत सत्यच सत्य भरलेलें त्यात दिसलें ! ती इतकी पोक्त विचारांची असेल, अशी त्यास ह्या काळ पर्यंत कल्पना नव्हती !

•

सुरुं पाहणारा भ्रमर पुनः कमलांच्या पाकळ्याखालीं दडपला गेला !

जयश्रीनें दोन दिवस मानसिंगाच्या निश्चयाची मार्ग प्रतिक्षा केली.

पुढें जयचंद येऊन थडकला ! त्याचें पापही तिला कळून चुकलें त्या भरांत ती अगदीं चिरडीला गेली. आणि तिनें खालील चिठ्ठी मानसिंगास खरडली,

" पशूंनाही स्वकर्तव्याची जाणीव पटली तर ते कर्तव्यनिष्ठ होतील ! त्यांना अभिमान समजण्याची मनुष्यासारखी अक्कल येईल, तर त्यांचा

रक्षणार्थ तो सदैव जागृत राहून प्रसंगीं त्या करितां प्राणही देईल. अभिवचन पाळण्यांत काय मोठेपणा आहे, हें त्यांना समजेल तर त्याचें पालन करण्यांत ते अणूभरही चुकणार नाहींत! परंतु मनुष्यें कशीं आहेत? त्यांतून तुमच्या सारखी शहाणी सुर्ती ! थू; त्याच्या जन्मावर ! ज्यांना आपल्या शब्दाची चाड नाहीं तो मनुष्य कसला ? ज्याचा स्वाभिमान विलासाच्या कर्दमांत मुर्दाडपणें रुळला तो काय करील ? अनेकवार सर्व गोष्टी समजून सांगूनही ज्याला कर्तव्याची ओळख पटत नाहीं, त्यानें ' मानसिंग ' कां मिरवावें हेंच नाहीं मला समजत ! "

कर्मधर्म संयोगानें ही चिठ्ठी हसीनेच्या हातांत पडली व तिनें त्याचा उलगडा मानसिंगास विचारला तेंव्हां तो ओशाळून ह्मणाला, जयश्री बाईचें मजकडे एक महत्वाचें काम आहे. त्या करितां मला एकवार चितोड गडीं गेलें पाहिजे. "

" मग दिरंगाई कां करायची बरं ? "

" तुझी परवानगी आहे ? "

" अलबत् ! जुबेदीबाईचें काम केलंच पाहिजे. "

" त्यांत संकट असलें तरी ?

" मर्दांना संकटाचें काय होय ? "

मानसिंग चकित झाला ! हसीनेला इतर कशाचा उलगडा पडला नाहीं आणि याच वेळीं तिला हें ज्ञान कोठून आलें बरें !

हसीनेनें ह्मटलें, " आपला शब्द राखण्याकरितां तुह्मी वाटेल तें केलें पाहिजे. "

एवढ्यावरच हें बोलणें भागलें नाही. मानसिंगास तिनें आग्रह करून चितोर गडास पाठवून दिलें.



# परिच्छेद ४९ वा.

## योजनेचा सूत्रपात.





कुरसाहेबांची सुटका झाल्यानंतर त्याच्या जागीं नमूद झालेल्या फर्जंदबेगानें आपल्या इतर दिनक्रमा बरोबर नाजुमीच्या पेशाची वहिवाटही बेखटका चालविली. व्यक्तींची अदलाबदल अगदीं बेमालूम झाल्यामुळें कोणालाही कसलीच शंका आली नाहीं भविष्य कथनाचा विषय अनेक पळवाटांचा असल्यामुळें त्याच्या तफावतीची जबाबदारी नाजुमी साहेबावर येण्याचें कारण कांहींच नव्हतें आणि याचाच फायदा फर्जंदबेगानें सफाईनें घेतला. ठाकुरसाहेबांनीं निर्माण केलेल्या त्या गादीचें महत्व त्यानें मुळीं कमी होऊं दिलें नाहीं. त्यामुळें गिऱ्हाईक कायम राहिलें व अजब खानाचा मिळकतीचा खुराक कायम राहिला. मग तो इतर गोष्टींविषयीं बेखबर राहिला यांत आश्चर्य तें कसलें ? खरी शंका यायची ह्मणजे त्याला पण तोच द्रव्याच्या नादांत चकला!

कसेंही असो, फर्जंदबेगानें उदारपणें व धैर्यानें अंगिकारलेलें व्रत यशस्वी झालें. पंधरा वीस दिवस होऊन गेले तरी कोणालाही कशाचा सुगावा लागला नाहीं. हें सर्व ठीक झालेलें पाहून फर्जंदबेगानें आपल्या सुटकेच्या योजनेचा सूत्रपात टाकला. ठाकुरसाहेबांनीं जातांना त्यास कांहीं कानमंत्र सांगून गेलेच होते, त्याचाच त्यानें अवलंब केला.

ठाकुरसाहेबांच्या नाजुमीच्या अवताराचे महत्व मेहरुन्निसा उर्फ नूरजहान हिनें वाढविलें होतें. फर्जंदबेगानें आपली निशाणबाजी त्याच रोखावर केली.

एके दिवशीं त्यानें तिला आपल्या गुहेंत बोलावून घेतली आणि नंतर त्यांचें पुढीलप्रमाणें संभाषण झालें.

**नाजुमी०**—बेटा मेहर ! तुझा अपत्काल संपला बरं. महिन्याच्या आंत तूं जहांगिराची राणी होणार ! अगदीं खास होणार !

**मेहरू०**—( खेदानें ) खुदा काय करील तें खरं ?

**नाजुमी०**—मी सांगतों तेंच होणार. तुझ्या प्राप्ती करितां बादशहा रात्रंदिवस तळमळतो आहे.

**मेहरू०**—खता माफ हो !–मला त्याचं कांहींच चिन्ह दिसत नाहीं उस्तादजी, माझ्या स्थितींत थोडाही पालट झालेला नाहीं नजर कैद माझ्या वरची कमी नाहीं, मी कोणत्या पेशांत राहून कसं पोट भरतें हें आपल्याला माहित आहेच. [ गहिंवरून ] त्यांना [ जहांगिरास ) माझी आठवण असेल असें मला मुळींच वाटत नाहीं.

**नाजुमी०**—सबुरकर, बेटा सबुरकर !–माझ्या शब्दावर विश्वास ठेव बादशहा तुझ्याकडे येण्यास अत्यंत उत्सुक आहे. अगदीं माझे हे शब्द खात्रीचे आहेत. तू आपल्या मनाचा त्याच्याविषयींचा कल मात्र मी सांगून ठेवल्याप्रमाणं अगदीं प्रेमाचा कर. मागच्या सर्व गोष्टी विसरून जा. म्हणजे तुला यश येईल ! बेटा ! तुझे ग्रह फारच उच्चीचे आहेत.

**मेहरू०**—आपली जबान खोटी कोण म्हणेल. आपल्या आज्ञे·प्रमाणं मी त्यांच्यावरचा सर्व राग काढून टाकला आहे. पण त्यांचं प्रेम मला मिळेल असें मला वाटत नाहीं.

**नाजुमी०**—आणि मी म्हणतों त्याप्रमाणं बादशहा तुझ्याकडे आला तर ?

**मेहरू०**—मी त्यांची फजूल हांजी हांजी करण्यास तयार नाहीं.

**नाजुमी०**—नको करूंस. मुळींच नको करूंस. उलट मी म्हटतों चांगला मान धर. तो पुरता मुठींत येईपर्यंत त्याला आपली प्रसन्नता दर्शवूं

नकोस. यावेळीं तूं त्याला कठोर शब्दांनीं झिडकारलेंस तरी तो तुझ्यापाशीं लोळणच घेईल ! विश्वास ठेव. नीट ऐक मेहेर. आज पासून बरोबर पंधरावे दिवशीं बादशहा तुझ्या घरीं येईल. त्यादिवशीं वार कोणता आहे बरें हो—मला वाटतं जुम्मा. ( शुक्रवार ) आहे. बस्स. ! याच दिवशीं मगरीबचा नमाज संपवून बादशहा तडक तुझ्याकडे येईल ! अगदीं आलाच पाहिजे त्यादिवशींचाच योग दिसतो. बेटा तुझ्या हात पाहूं बरं जरा.—

मेहरुन्निसानें धडधडत्या अंतःकरणानें आपला कंपित हस्त ठराविक छिद्रांतून आंत दिला. नाजुमीनें त्याचें नीट परिक्षण केलें आणि तिची पुन्हां खात्री करून ह्मटलें, " ही जर माझी जुबान चुकली तर इन्शा अल्लाह !—पुन; नाजुमीचें काम नाहीं करणार ! हो तूं अगदीं विश्वासानें जा. "

आमच्या नाजुमीमहाराजावर मेहरुन्निसेचा दांडगा विश्वास ! त्यांत त्यांचें भविष्य कधींच खोटें ठरत नाहीं. असा तिला अनेकदां अनुभव आला होता. मग तिला त्यांची आजची वाणी कशी खोटी वाटेल ?—वास्तविक हें असलें खात्रीचें भविष्य ठाकुरसाहेबांनीं तिला कितीदां तरी सांगितलेलें होतें; पण त्यावेळीं त्यांनीं तिला बजावलें होतें कीं, सर्व योग मोठा चांगला आहे. पण त्या बरोबरच एक दुष्ट ग्रह मोठा प्रबळ आहे तो काय करील याचा नेम नाहीं शेवटीं काय ? त्या ग्रहानेंच धोका दिला ! त्याला नाजुमी काय करणार !

तरीपण आजचें भविष्य खरें होणार असें तिला वाटलें; कारण भविष्यांत त्या दुष्ट ग्रहाचा उल्लेख आला नाहीं. त्यावरून तो गडप झाला असावा. अशी तिनें कल्पना केली ! तिला काय माहित कीं, पहिले नाजुमी बोवा गडप झाल्यामुळेंच भविष्यकथनाच्या भाषेंत असा फरक आहे ह्मणून !

कांहीं असेना नाजुमी साहेबांनीं तिला खुश करून आपला मोर्चा बादशहाकडे वळविला, मात्र त्याला बोलावून घेण्याची यातायात त्यांना पडली नाहीं. इतके दिवस जहांगिरानें त्यांच्याकडे काना डोळाच केला

होता. पण आज त्यास काय वाटलें कोणास माहित तो आपण होऊन त्याच्याकडे आला. नाजुमीसाहेबांनीं त्यास असा घेरांत आणिला !

बादशहा त्याच्या पडद्यापुढें येऊन त्याला प्रश्न विचारणार तोंच फर्जंदबेग त्यास ह्मणाला, माझ्यापर्यंत येण्याची कशाला तसदा घेतली. तुझ्या दुःखाला कारण तूंच आहेस. ”

जहांगिराला त्याच्या त्या बोलण्याचे मोठें आश्चर्य वाटलें, “ तो एकदम उद्गारला, “ माझ्या मनांतील गोष्ट तुह्मांला कळली ? आश्चर्य आहे ! ”

“ आमचें शास्त्र आह्मांला काय सांगणार नाहीं ? ” नाजुमीनें ह्मटलें, “ अरे, तुझें मागचें आणि पुढचें सर्व चरित्र स्वच्छ माझ्या डोळ्या पुढें उभे राहिलें आहे ! बादशहा लौकर शुद्धीवर ये आणि त्या अबलेचें दुःख दूर कर ! तिच्या सुखावरच तुझें सौख्य अवलंबून आहे. तिला जवळ करशील–जगशील नाहींतर नाहींतर ! पण तुला कशाला सांगू पुढचें भविष्य तुझा त्याचेवर थोडाच विश्वास बसणार आहे ?—जा तूं ! तुझ्यासारख्या मनुष्याशीं विशेष वाटाघाट सुद्धां करूं नये अशी शास्त्राची आज्ञा आहे ! ”

बादशहा उगाचच घाबरला. ह्या भविष्याच्या बाबतींत तो भित्राच होता * त्यानें नम्रपणानें ह्मटलें, “ माझा अव्हेर करूं नका. मी आपल्या आज्ञेबाहेर नाहीं. मला आपण मार्ग दाखवा. मी कसम खाऊन सांगतों कीं, मी ह्मटल्याप्रमाणेंच वागेन. ”

---

* ग्रहावर त्याचा ( जहांगिराचा ) विश्वास होता. ग्रहणाची किंवा ग्रहांच्या युतींची त्यास पराकाष्ठेची भीति वाटे. अशा वेळीं तो जनानखान्यांत वगैरे कोठें तरी अगदीं कोपऱ्यांत लपून बसे. अकबराच्या वेळेपासून ज्योतिषराय नांवाचा एक हिंदु ज्योतिषी दरबारांत नेहमीं हजर असे. जहांगिराच्या वेळेस जो ज्योतिषराय होता; त्याची भविष्यें तंतोतंत उतरत त्याजबद्दल सर्व दरबारास मोठा अचंबा वाटे; पण त्यास प्रश्न विचारतांच जहांगिराच्या अंगांत कांपरें भरे. सरदेसाईकृत—मुसलमानी रियासत.

‘ जहांगीर ’

त्याच्या ह्मणण्याकडे दुर्लक्ष केल्याप्रमाणें करून नाजुमीनें ह्मटलें, "जहांगीर, ती गोष्ट आठव. ती कुणाला माहीत नाहीं पण तुझ्या ग्रहांनीं मला ती सांगितली आहे लहानपणीं एकेदिवशीं तूं आणि मेहरुन्निसा जनानखान्याच्या पिछाडीच्या बागेंत हिंडत होतां. त्यावेळीं तुझ्या हातांत दोन कबुतरें होतीं. इतक्यांत तुझ्या मैत्रिणीनें जवळच्या गुलाबाच्या झाडावर फुललेलीं दोन फुलें तला मागितलीं आणि तीं काढण्याकरितां तूं आपल्या-जवळचीं कबुतरें मेहरुन्निसेजवळ दिलींस—" एवढें बोलून तो मिस्किलपणें मध्येंच म्हणाला, "—या हकीगतींत कांहीं चुकत असलें तर सांग हो—"

जहांगीर नवल करीत म्हणाला, "नाहीं महाराज, आपण सांगतां यांतील प्रत्येक शब्द खरा आहे. आपल्याला हें कसें कळलें याचेंच मला आश्चर्य वाटत आहे."

तुझ्या ग्रहानीं हें सांगितलें. जहांगीर, पुढें ऐक. तूं फुलें काढण्यास गेलास. मेहरुन्निसा तीं दोन्ही पाखरें घेऊन तुझ्या मागेंच उभी होती. तीं पाखरें तिच्या हातांत फडफड करीत होतीं, तेव्हां तूं तिला त्यांच्या नीट पकडून ठेवण्याबद्दल बजावलेंस होय ना—पण तीं तिला आवरेनांत आणि त्यांच्या धडपडींत तिच्या कोमळ पकडींतून एक कबूतर उडून गेलें."

"अगदीं बरोबर! अगदीं बरोबर!!" जहांगीर एकदम ह्मणाला नाजुमी पुढें सांगू लागला, "तेव्हां तूं तिच्याकडे वळून ह्मणालास" "सोडलंस त्याला? असं कसं उडालं तें?" त्यावर मेहरुन्निसेनें हंसत हंसत दुसऱ्या कबुतराला मोकळें सोडून म्हटलें, "हें असं उडालं"

जहांगीर थक्क झाला. नाजुमीनें वर्णन केल्य प्रमाणेंच तो प्रसंग घडला होता. तो म्हणाला, "छे! आपण त्या प्रसंगीं हजर असल्याप्रमाणें ही गोष्ट सांगत आहां परंतु त्यावेळीं तिथें आमच्याजवळ दुसरं कोणीही नव्हतं."

बाबारे, ज्योतिष हें शास्त्रच असें आहे." नाजुमी आढ्यतेच्या स्वरांत ह्मणाला, 'पुढें एक त्या प्रसगीं मेहरुन्निसेचा तो विनोदपूर्ण हावभाव पाहून तूं वेडा झालास आणि ही आपल्यास पत्नी असावी, अशी तुला इच्छा झाली! तेव्हां पासून तूं त्या प्रयत्नाला लागलास, पण अकबरशहाला तुझ्या

पित्याला-तुझें तें वर्तन आवडलें नाहीं आणि त्याचा परिणाम झाला असा कीं, मेहरुन्निसा दुसऱ्याची झाली ! ”

“ मला वाटतं, आतां त्या प्रसंगाचं वर्णन न केलं तर बरं होईल. ”

“ तुझी इच्छा नसेल तर राहूं दे; पण तुझ्या चरित्रांतील अगदीं बारीक सारीक गोष्टी सुद्धां मला कशा माहीत आहेत ? हेंच तुझ्या अनुभवाला आणण्याचा विचार होता. ”

“ आपल्या त्रिकाळ ज्ञानाविषयीं माझी अगदीं खात्री झाली आहे. ”

“ मग जहांगिर, ध्यानांत ठेव. ” नाजुमीनें त्यास बजावलें, “ आज पासून बरोबर महिन्याचे आंत तुझ्यावर एक फार मोठें संकट कोसळणार आहे. ”

जहांगिर घाबरून म्हणाला, “ छे छे ! असें कांहीं मला सांगू नका. तुम्ही म्हणाल त्या गोष्टीनां मी कबूल आहे. पण या ग्रहांची बाधा मला न होईल असं करा. सांगा, किती दरवेशांना जेवायला घालूं, अगर फकिरांना द्रव्य वाटूं. ”

“ मेहरुन्निसेला सुखी केल्याखेरीज तुझ्या आपत्तीला आळा बसणार नाहीं. तीच तुझें निवारण करूं शकेल. जहांगिर ! तिला तूं आपली राणी कर. म्हणजे तूं सुखी होशील. तिचा दुःखी आत्मा शांत कर म्हणजे तुझ्या मनास स्वस्थता वाटेल. मेहरुन्निसा एक अजब रत्न आहे त्याला जवळ कर म्हणजे तुझें भाग्य वाढेल ! ”

“ उस्तादजी !—माझी आज किती दिवसांपासूनची तरी तीच इच्छा आहे; परंतु मी काय करूं ?—ती माझा तिरस्कार करीत आहे. ”

“ कां नाहीं करणार ? तिच्याशीं तूं जें वर्तन केलेंस; त्याचा आधीं विचार कर म्हणजे ती करते तें अगदीं बरोबर असेंच तुला वाटेल. तरीपण जहांगिर ! तुमचा दोघांचा विवाह व्हावा असा परमेश्वरी संकेत आहे. या करितां होतां होईतों तिची मनधरणी करून तिचें मन प्रसन्न होईल असें कर. ”

“ आपली आज्ञा मला मान्य आहे ”

" थांबा—तुझा हात कर पाहूं पुढें म्हणजे तिच्याकडे जाण्याला तुला कोणती वेळ योग्य आहे तें सांगतों—"

जहांगिरानें त्याप्रमाणें केलें.

नाजुमीनें त्यास तोच जुम्मा सांगितला आणि म्हटलें, " याच दिवशीं मगरीब झाल्यानंतर तूं तिच्याकडे जा तिची मनधरणी कर तिच्या हाता पायां पड. सर्व अपराधांची क्षमा माग.म्हणजे तूं यशस्वी होशील ! जा बेटा ! यांत अगदीं चुकूं नकोस. नाहीं तर व्यर्थ संकटांत पडशील. "

जहांगिरानें तें सर्वस्वी मान्य केलें.

* * *

ठरविलेला जुम्मा उगवला आणि त्या दिवशीं दुपारीं अर्डीचाचा नमाज होतांच जहांगिर मोठ्या थाटामाटानें मेहरुन्निसेकडे गेला. तेथें गेल्या वर तिचें ते अनुपमेय सौंदर्य, मर्यादशील स्वभाव व मानी मापणाचे डब पाहून बादशाहा अगदीं वेडा झाला.

त्यावेळीं त्या सौंदर्यलतिकेनें अगदीं साधाच पोषाख केला होता. आल बेला नांवाचा मलमलीचा साधा लहंगा तिनें धारण केला होता व तशाच प्रकारची एक सुंदर कुर्ती अंगांत घातली होती. या साध्या वेषानेंच तिच्या अलौकिक सौंदर्याला विलक्षण उठाव मिळालेला होता.

बादशाहाची स्वारी एकदम आंत येतांच ती अत्यंत लगबगीनें उठली व लोकाचाराप्रमाणें तिनें त्याचें स्वागतही केलें; परंतु तिनें आपली मुद्रा अगदीं शांत ठेविली होती. त्याच्या आगमनाची तिला अपेक्षा असतांही तिच्या मुद्रेवर आनंदाचा किंवा आश्चर्याचा भाव दिसला नाहीं.

जहांगिरानें एकवार तिच्याकडे नखशिखान्त पाहिलें आणि नंतर त्यानें म्हटलें, "मेहर ! माझ्यावरचा तुझा राग कमी झाला का ?"

" अलमदुनियेच्या बादशहांनीं माझ्यासारख्या एका गरीब अबलेच्या रागाचा एवढा मुशाहिजा धरण्याचें कारण नाहीं. " मेहरून्निसानें त्याच्याकडे एक कटाक्ष फेकून म्हटलें.

' मागच्या गोष्टी आतां आपण दोघांनीं विसरणें चांगलें.नव्हे का

"केवळ वाचेच्या लाघवानेंच हृदयाच्या जखमा भरून येणें शक्य असेल तर तसेंही समजण्यास हरकत नाहीं."

"माझ्या हृदयाचें—माझ्या सलतनतीचें—माझ्या सर्ववैभवाचें स्वामित्व तुझ्याकडे दिल्यावर आणि मी तुझें जन्माचें दास्य पत्करल्यावरही तुझें दुःख कमी नाहीं का होणार?—"

या उत्तरावर दोघांचीही नजरभेट झाली. तिच्या नेत्रांत अल्पांशानें तरी प्रेमाची स्निग्धता उतरली असावी असें बादशाहास वाटलें आणि म्हणून त्यानें आणखी लगट करून व मधुर भाषण करून तिच्या आंतरिक घुश्शाला बरेंच नरम केलें.

आपण कांहीं दिवस मानिनीचें व्रत चालू ठेवल्यास बादशाहावर आपली चांगली छाप पडेल असें तिनें ठरवून त्याप्रमाणेंच बोलणें चालणें केलें. मग बादशहानेंही तिला विशेष त्रास दिला नाहीं. आज ना उद्यां ती आपणास खास वश होईल असा त्यास विश्वास वाटला व तो आनंदित मनानेंच परत गेला.

या भेटीनंतर दुसरें दिवशीं मेहरुन्निसेनें नाजुमीकडे गमन केलें व आपला विजय सांगितला. त्यानें तिला बधाई देऊन आशीर्वाद दिला आणि म्हटलें "मेहर! आतां तूं लौकरच राणी होणार! अगदीं खात्री बाळग! तूं मोठी भाग्यवान् आहेस! तुझें आतांपर्यंतचें आयुष्य मोठें चमत्कारिक प्रसंगांत गुदरलें; पण यापुढें तुझा भाग्यतारा सारखा चढत राहणार! तुझ्या हातून मोठमोठीं राजकारणें घडतील आणि तुझी कीर्ति दिगंतरी पसरेल मग मेहेर! त्यावेळीं तूं माझी आठवण ठेवशील ना? तूं बादशाहीण झाल्यावर तुला जर मी एक विनंति केली तर ती मान्य करण्याचें तूं वचन देतेस का?"

"अलबत्!—सांगा आपली काय इच्छा आहे?"

"आतां नाहीं सांगत; पण या प्रसंगाची आठवण राहण्याकरितां व माझी तुला ओळख पटण्याकरितां तूं मला एखादी तुझी आवडती वस्तु देऊन ठेव. ती वस्तु पाहतांच तूं माझी कोणतीही मागणी पुरवली पाहिजेस—घाबरू नकोस. मी तुला अगर कोणालाही संकटांत पाडणार नाहीं. कोणतीही गैर मागणें मागणार नाहीं."

मेहरून्निसेला त्याच्या बोलण्याची खात्री पटली व तिनें आपल्या कानांतील एक कर्णफूल नाजुमीस दिलें आणि म्हटलें, "हें फूल जो कोणी घेऊन मजकडे येईल आणि तो जें कांहीं मागेल तें मी त्याला देईन. अल्लाची कसम !"



# परिच्छेद ८० वा.

## उद्धारचा एकच मार्ग.

———:०:———



तोरगडीं जाण्यांत मानसिंगाचें मन विशेष नव्हतें. एक तर त्यास हसिनचा वियोग नको होता आणि दुसरी गोष्ट आपल्या मात्यापित्या विषयीं त्यास अलीकडे विशेष प्रेमादर वाटत नसल्यामुळें त्यांच्याकडे जाणेही त्यास नकोसे होतें; परंतु जयश्रीच्या तगाद्यानें व हसिनच्या अनुमतीमुळें त्यास ही नापसंत गोष्टहि करणें भाग पडलें. तो खिन्न मनाने चितोडास आला.

तो गडाच्या महाद्वारांत येतो न येतो तोंच त्यास मेहरुन्निसा आणि बादशाहा जहांगिर यांचा विवाह होणार असल्याची वार्ता कळली. बादशाही मिजाजीची त्याला माहिती असल्यामुळें त्यास त्याचें विशेष नवल वाटलें नाहीं. तो मुकाट्यानें वाड्यांत जाऊन दाखल झाला.

कुटुंबांत परस्पर प्रेम नसलें ह्मणजे कोणीही मनुष्य देशांत राहून येवो अगर घरांतून देशांतराला जावो कोणत्याही त्याच्या येण्याचें वा जाण्याचें कौतुक अथवा खेद वाटेनासा होतो. सुम्राजांच्या कुटुंबांत आज तीच स्थिती असल्यामुळें मानसिंगाच्या आगमनानें कोणालाच कौतुक वाटलें नाहीं. कांहीं नोकरांना व त्याच्या प्रीतींतील दासींना मात्र आनंद झालेला दिसला.

मानसिंग आज आपल्या घरीं आला असूनही त्याची स्थिती एखाद्या निर्दाईन पाहुण्या प्रमाणें होती. त्याला ही गोष्ट बरीच जाणवली.

मैनलदेवीची व त्याची भेट झाली त्यावेळीं बादशाहाच्या विवाहाबद्दल वाटाघाट झाली! तिचें चरित्र माहीत झाल्यापासून मानसिंगाला तिच्याशीं बोलत बसण्यांत प्रेम वाटत नसे व त्याला तिच्या मुद्रेकडे पाहण्यांत लाजही वाटे; परंतु खुद्द मैनलदेवी त्याबद्दल अगदीं निश्चित होती. जणूं काय आपल्या आयुष्यांत ज्या चमत्कारिक गोष्टी घडल्या; त्या आपल्या पाकट्या मुलाला कळल्याच नाहींत असें धरूनच ती वागत होती.

तो आपल्या पित्याला भेटला त्यावेळीं सुम्राजी त्यास आणखीही खंगलेला दिसला.

होय! सुम्राजीला आपल्या एकंदर आयुष्यक्रमाची विलक्षण खंत आलेली होती, आणि तीच खंत त्याच्या मनास आणि मनाबरोबर शरीरास खात होती. त्याला सारखें वाटत होतें. मैनलदेवीचा खून झाला पाहिजे! याच विषयाचा तो सारखा विचार करीत होता. पण हें पाप करण्यासही त्याचें दुबळें मन समर्थ नव्हतें. पूर्वीप्रमाणें आतां त्याच्या मनावर मैनलदेवीचें प्रभुत्व नव्हतें. हें खरें; पण तिच्यावर अंमल गाजवून तिच्या प्राणांचें हरण करण्यास मात्र तो अद्यापीही दुबळा होता!

मानसिंगाची व त्याची भेट होतांच सुम्राजीनें आपला विषय काढला. तो चेकाळून म्हणाला, "मान! तूं कांहीं म्हण. त्या चांडाळणीचा प्राण घेतल्याखेरीज माझ्या मनाला स्वस्थता वाटणार नाहीं. ज्या घटकेला ती मरेल त्याच घटकेला माझ्या सुखाचा जन्म होईल. मान! ती मेली पाहिजे.

दैवाच्या विलक्षण गतीनें सुम्राजीला आपल्या मनाचें दुःख बाहेर टाकण्यास आपल्या पुत्राखेरीज दुसरें स्थानच नव्हतें त्यामुळें मानसिंगाला पाहतांच त्याच्या मनाला बरें वाटलें व तो संधि सांपडतांच त्यास एकांतांत घेऊन गेला आणि वरीलप्रमाणें आपल्या मनाचा संताप त्यानें बाहेर टाकण्यास प्रारंभ केला.

नको होतें तेंच मानसिंगाच्या कपाळीं आलें. त्यानें उदासीनतेनें बापाच्या चेहऱ्याकडे पाहिलें त्याला त्याची कींव आली व कांहीं तिरस्कारही वाटला.

त्यानें बराच वेळ त्याची बडबड ऐकून घेऊन ह्मटलें, " बाबा, तुमचें संकट असें कांहीं चमत्कारिक आहे कीं, तें तुमचें तुह्माला टाळतां येत नाहीं, आणि मी तुमचा पुत्र असलों तरी मलाही पण त्याचें निवारण करतां येणार नाहीं. त्यापेक्षां मी ह्मणतों तुम्ही तो नाद सोडून कां द्यानांत. कुलोद्धाराचा तेवढाच मार्ग आहे; असें थोडेंच आहे. तुह्मी मनांत आणाल तर तुह्मी असें एक काम करूं शकाल कीं, ज्यानें तुमचा सर्व कलंक धुवून जाईल. "

" कोणतें काम तें ? "

" त्या दिवशीं–त्या चांदण्यारात्रीं आह्मांला त्या पडक्या देवळांत मसलत झाली ती. त्याचा तुह्मी कांहीं विचार केला आहेत काय ?–मी त्याच कामाकरितां मुद्दाम आज आलों आहे आणि त्याचा निकालही पण आजच्या आज झाला पाहिजे— "

सुम्राजीनें भीतीनें इकडे तिकडे व दाराकडे पाहिलें. दाराबाहेर कोणी-तरी उभें राहून आपला संवाद ऐकतें आहे असाही त्यास संशय आला. तात्काळ त्यानें मानसिंगाचा हात दाबून त्यास स्तब्ध केलें आणि दबत दबत पुढें होऊन दार उघडलें.

दाराबाहेर मैनलदेवी उभी होती. पतीला पाहतांच ती न विरमतां ह्मणाली, " पितापुत्राचं एवढं कसलं हितगुज चाललं आहे तें ? मला नाहीं का कळण्यासारखं ! "

सुम्राजी कांहीं न बोलतां तिरस्कारानें तिच्याकडे पाहात तेथून निघून गेला मैनलदेवी एकवेळ त्याच्याकडे पाहून गालांतल्यागालांत हंसली व हातानें आपला पदर सांवरीत आंत आली.

मानसिंगापुढें येऊन तिनें तोच प्रश्न केला. आपल्या संवादांतील बराच भाग हिनें ऐकला असावा, असें त्यास वाटलें. त्यानें कसें तरी तिचें समाधान केलें आणि तेथून पाय काढला. पण त्या दोघांच्या या वर्तनानें तिचा संशय कमी न होतां बळावला.

* * * *

मैनलदेवीनें नेमलेले तीक्ष्ण कान त्या दोघांच्या पाळतीवर असतां त्या

दोघांची मसलत झाली कीं, राजवाड्यांत बोलतबसण्यापेक्षां बारा वाजल्या नंतर स्मशानाच्या बाजूला कोठेंतरी जाऊन एकांत करावा.

त्याप्रमाणें ती वेळ येतांच अगोदर मानसिंग, मागाहून सुम्राजी आणि त्याचे मागून त्या दोघांना न कळत वेष बदलेली मैनलदेवी अशीं पात्रें स्मशानाकडे वळलीं !

यावेळीं मध्यरात्र उलटून गेली होती. आजारांतून नुकत्याच उठलेल्या रोग्याप्रमाणें कळाहीन चंद्रमा आकाशमार्गीला लागून कांहीं फार वेळ झाला नव्हता ! रात्राच्या धूसर कृष्णवर्ण अंधेरामधून त्याचा निवळट क्षीण प्रकाश मोठ्या कष्टानें चहूंकडे पसरत होता. त्यामुळें रात्रीचा भयाणपणा कमी होण्याऐवजीं वाढत मात्र होता.

स्मशानाजवळ येतांच दोघेही क्षणभर थांबले. दोघांच्याही नजरा चहूंकडे फिरल्या मैनलदेवीचा पाठलाग दोघांनांही कळून आला नाहीं. एकतर तशी त्यांना शंका नव्हती आणि दुसरी गोष्ट अंधारही होताच.

नंतर त्यानीं सभय दृष्टींनी एकमेकांकडे पाहिलें.

मानसिंगानें ह्मटलें, " वेळ मोठी भयाण आहे; परंतु आपल्याला मसलतच तशी महत्वाची करावयाची असल्यामुळें अशा ठिकाणींच येणें भाग आहे. "

यावर सुम्राजी वेड्यासारखा हंसला; पण तें निरर्थक मात्र नव्हतें तो ह्मणाला " आपल्या एकंदर आयुष्यक्रमाला हें असें अपरात्रीं स्मशानांत येणें शोभण्यासारखेंच आहे. वेड्यापोरा, माझ्या बोलण्याचा अर्थ नाहीं कळला तुला ?—मान, मसलत करायची कुणाकरितां ? मेवाडकरितां म्हणजे आपल्या मायभूमिकरितां. ती होणार कोणामध्यें ?—पितापुत्रांत ! करायची जागा चितोर गढावर असें असतां ती उघडपणें, मोकळ्या मनानें राजवाड्यांत करण्यास आपलें मन कचरतें ! कां ? तर ती निर्लज्ज चांडाळीण ऐकील आणि कदाचित् बोभाटा करील म्हणून ? मान ! तुझी आई व माझी पत्नीच आपली शत्रु असेल काय किंवा होईल काय ? अशी तुलामला भीति !

यापेक्षां गम्मत दुसरी असेल का ? स्वातंत्र्याचा अभिमान सोडून, मातृभूमीच्या मस्तकावर लाथ मारून, आपल्या जातीगोताला सोडून थोड्याशा लाभाकरितां शत्रूच्या पायातळीं जाऊन पडलेल्या मनुष्यरूपी किड्यांचें जीवन इतकें अधःपाताचें झाल्यास त्यांत नवल तें काय ? चल बाबा—चल ! स्मशानांत बसूनच मसलत करण्याचें आपल्या कपाळीं आहे. ”

असें म्हणून तो पुढें झाला. मानसिंगानें त्याचें अनुकरण केलें. मैनलदेवीची पिशाच छाया त्यांच्या पावलांवर पावलें टाकीतच येत होती.

दोघेही स्मशानांत शिरले. चंद्राच्या प्रकाशांत थोडा थोडा तजेला येत होता

बरेंच स्मशान मागें टाकून ते दोघे एका प्रशस्त समाधीच्या बाहेरच्या चौथऱ्यावर जाऊन बसले. मैनलदेवीही लौकरच मांजराच्या पावलांनीं तेथें येऊन दाखल झाली आणि अगदीं हळू बोलणेंही सहज ऐकूं येईल, अशाजागीं लपून बसली.

थोड्या वेळानें सुम्राजी म्हणाला, “ बोल बेटा, मान ! आतां मोकळ्या मनानें बोल ! अगदीं प्रशस्तपणानें बोल आतां तुला खालच्या स्वरांत बोलण्याचें कारण नाहीं अगदी खुल्या दिलानें सर्व मसलत सांग. ती अवदसा इथें येणें तर शक्य नाहींच; पण ती जिवंत असल्यामुळें तिचें पिशाच येऊन ऐकत उभें राहिल अशीहि भीती बाळगण्याचें कारण नाहीं. तेव्हां अगदीं मोकळ्या मनानें बोल. ”

मानसिंगानें म्हटलें, “ बाबा, आपल्या मनाची तयारी असेल तर मसलत कांहीं लांबलचक नाहीं. विशेष अवघडही नाहीं एका दिवसाचा सुद्धां अवधी नको आहे. मनाभोंवतीं पडलेलें गुलामगिरीचें बंधन तोडून टाकायचें आणि शरीरानें स्वबंधूंना जाऊन मिळण्याची तयारी ठेवायची. ”

सुम्राजी एकदम म्हणाला, “ गोष्ट अगदीं सोपी आहे आणि अत्यंत उत्तम आहे; पण मान, ती मला आचरितां येणार नाहीं. असा आश्चर्यानें पाहूं नकोस मजकडे. मेवाडच्या कल्याणाकरितां मी कांहींतरी करण्यास कबूल आहे; पण तें असें पाहिजे कीं, ज्यामध्यें दिल्लीच्या बादशहाशीं बेइमान झाल्याचा आरोप उघडपणें तरी मजवर कोणाला शाबीत करतां येऊं नये. ”

मानसिंगाला त्याच्या बोलण्याचा अर्थ न कळल्यामुळें तो त्याच्याकडे पाहात राहिला.

तेव्हां सुग्राजीनें म्हटलें, "तुला माहीत नाहीं मान; पण थोडा विचार कर म्हणजे मी उघडपणें महाराणा उमरावाकडे येण्यास कां विचकतों हें तुला कळेल!—मान, माझें वय आतां झालेलें आहे. मी स्वबंधूंना येऊन मिळालों तरी त्यांच्या अगर मेवाडच्या कितीसा उपयोगी पडेन बरें? दुसरी गोष्ट, मी तिकडे आलों तरी मेवाडकरांना माझ्या येण्याचें कौतुक थोडेंच वाटेल म्हणतोस? मुळींच नाहीं. प्रत्येक मजविषयीं साशंक राहील आणि माझी निंदा करील कीं, साराजन्म मोंगलांच्या सेवेंत घालविला न आतां आलाय् पुण्यमार्ग आचरायला! सांग असें होईल कीं नाहीं? अलबत् होईल. मग ती निंदा माझ्यानें सतत ऐकवेल का? मजविषयीं अविश्वास बाळगणाऱ्या लोकांच्या संगतींत मला मनमोकळेपणानें राहतां येईल का?—तेव्हां आतां तिकडे येण्यापेक्षां धरली आहे तीच बाजू शेवटपर्यंत निभावणें योग्य होईल.—मी काय म्हणतों तें नीट लक्ष्यांत घे! म्हणजे तुला माझा राग येणार नाहीं.

मानसिंगाला त्याचें बोलणें सर्वस्वी पटलें. तेव्हां सुग्राजी पुनः म्हणाला, "शिवाय मेहबतखानाचा मी दास आहें ही गोष्ट कोणीही दृष्टीआड करणार नाहीं. त्यापेक्षां माझा नाद सोडून तूं मात्र मेवाडला जाऊन मीळ. आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाचा इतिहास डोळ्यापुढें ठेवून स्वदेशकल्याणार्थ झट. त्यायोगें तुझें कल्याण होईल. मला आनंद वाटेल आणि आपल्या कुलाचा उद्धार होईल. तूं जवान आहेस. तुझ्या या सत्कार्यांत देव तुला यश देईल, असा मी तुला आशीर्वाद देतों."

"पण चितोरगड आज महाराण्याला पाहिजे. त्याची वाट काय?"

सुग्राजीनें कांहीं विचार केला आणि म्हटलें," "त्याला एकच मार्ग आहे. त्यानें मजवर चढाई करण्याचें सोंग करावें. मी लढण्याचा बहाणा करून पराभव पत्करीन आणि गड सोडून चालता होईन. म्हणजे कोणाचेंही नुकसान न होतां, सर्वांचे उद्देश सिद्धीला जातील."

थोडा वेळ दोघेही स्तब्ध बसले. दोघांनींही पुन: विचार केला. बस्स याखेरीज उद्धाराचा दुसरा मार्ग नाहीं अशी दोघांचीही खात्री झाली.

मानसिंगानें म्हटलें, "आपलीच कल्पना बरी दिसते. आणि ती ताबडतोब अंमलांत आणण्यास आजकालचा प्रसंगच योग्य आहे. बादशाहाची स्वारी मेहरुन्निसेशीं विवाह लावण्याच्या गर्दीत आहे त्याच आनंदांत सर्वांचें लक्ष्य आहे, तोंपर्यंत आपण हा डाव—"

इतक्यांत मैनलदेवीच्या नाकानें दगा दिला. तिला जोराची शिंक आली! दोघेही दचकले ! दोघांनीहि चटकन् उठून इकडे तिकडे पाहिलें !

सुम्राजी एकदम कर्कश स्वरानें म्हणाला, " मान ! आपल्यावर कोणाची तरी पाळत आहे ! ती कोणाचीही असो ! तें मनुष्य ठार झालें पाहिजे ! चल, तपास काढूंया— "

दोघेही त्या कार्याला लागले ! मैनलदेवीचें अस्तित्व त्यांना उमगून आलें ! मात्र तिनें वेष बदलल्यामुळें तिचें व्यक्तित्व त्यांना कळलें नाहीं. ती प्राणभयाकरितां पळूं लागली आणि हे दोघे तिचा पाठलाग करूं लागले

सुम्राजीला काय वाटलें असेल ते असो, पण मानसिंगाला मात्र ती आपली आई असेल काय? अशी शंका आली आणि त्याचा पाय ढिला पडूं लागला.

प्राण वांचविण्याकरितां पळणारें मनुष्य केव्हांही जास्त वेगानें पळतें. त्या नियमानें स्थूलदेही मैनलदेवी जोरानें पळत होती. तिला आटोक्यांत आणण्याचें सामर्थ्य सुम्राजीमध्यें नव्हतें आणि उपरोक्त शंकेनें मानसिंगाचा वेग थंडावत चालला होता. त्यामुळें त्या दोघांत व मैनलदेवी मध्यें जास्त जास्त अंतर पडूं लागलें. तें पाहून सुम्राजी धापा टाकीत म्हणाला, " मान ! तें मनुष्य मेलें पाहिजे नाहींतर सर्वांचा नाश आहे ! पळ--वेड्या—जरा जोरानें पाय उचल ! "

पण इतक्यांत मैनलनें ' मेल्यें मेल्यें ! ' अशी किंकाळी फोडली व तिची गति अडखळली !—दहा पांच पावलांत ती धाडकन् खाली पडली !

एका कृष्ण सर्पानें तिला कडकडून दंश केला होता ! तो स्वछंदपणें विरहत असतां मैनलदेवीनें त्याच्या अंगावर पाय दिला ! तात्काल त्यानें आपला स्वभाव दाखविला ! ती पाठीमागच्या मृत्युंतून सुटून पाहात होती; पण आज ती मरावी, असा परमेश्वरी संकेत होता ! यामुळें तिचें पायाखाली लक्ष्य गेलें नाहीं आणि शेवटीं कृष्णसर्पाच्या क्रोधाला तिला बळी पडावें लागलें.

किंकाळी ऐकतांच दोघांही पितापुत्रांना तिचें व्यक्तित्व कळलें. ती पडलेली पाहतांच दोघेही धावले. धावतां धावतां सुग्राजीनें मानसिंगास बजावलें," मान ! ती तीच आहे.पण कोणत्याही सबबीबर आतां तिला जिवंत ठेवावयाचें नाहीं हो ! हं चल पळ ! ती पडली आहे तोंपर्यंत तिला गाठूं या.

दोघेही तिच्याजवळ आले ! चंद्रप्रकाश आतां चांगला स्वच्छ झाला होता ! मैनलदेवी विवळत पडलेलें स्थानही मोकळें होतें.'

कृष्णसर्प चांगला जहाल विषारी असला पाहिजे !—तिच्या सर्वांगांत विष भिनून गेलें होतें ! आपल्या मुलाला पाहतांच मैनलदेवी ओंठावरून जीभ फिरवीत अडखळत म्हणाली, "मान ! मला साप चावला रे !"

मानसिंग भीतीनें तटस्थ झाला ! तो मटकन् खालीं बसला व तिच्या अंगावर हात ठेवून चाचरत म्हणाला, "तुला साप चावला?—कुठं कुठं ?"

सुग्राजी मध्येंच म्हणाला, ,' तुला साप चावला ! चांगला कडकडून चावला कीं नाहीं ? हा ! हा ! ! हा ! ! !—मैनलला साप चावला ! गेली माझी कर्मदशा संपली ! मैनलला साप चावला ? हा ! हा ! ! हा ! ! —असें म्हणून तो मनापासून हंसला !

मैनलदेवीवर विषाचा परिणाम भरभर होऊं लागला ! ती काळी पडत चालली ! हातपाय पाखडतां पाखडतां तिच्या तोंडाला फेस येऊ लागला. डोळ्यावर झांपड पडूं लागली ! तोंड उघडें पडलें. जीभ बाहेर लोंबूं लागली !

मानसिंग भेदरलेल्या दृष्टीनें हा सर्व प्रकार पाहात होता. थोड्या वेळानें त्या देहांत विलक्षणच फरक झाला! सर्व देहावर विलक्षण फुगवटी आली आणि ठिकठिकाणीं नसा फुटून रक्त वाहूं लागलें. हातपाय व तोंड वांकडें तिकडें झालें! आणि अशा भेसूर स्थितींतच आचके देतां देतां मैनल देवीनें आपला अवतार संपविला!

"जा! चांडाळणी! मर जा!" असें ह्मणून सुम्राजानें त्या प्रेताला लाथ मारली व तो मानसिंगाला घेऊन वाड्यांत निघून गेला.



# परिच्छेद ५१ वा.

## दुःखव्याप्त पत्नी व अनुतप्त पति.



---:o:---

सुखकालांत पृथ्वीला स्वर्गाचें स्वरूप देणारी व दुःख-कालांत कसल्याही भयंकर विपत्तीचा विसर पडण्यास लावणारी संसारांतील प्रमुख गोष्ट म्हणजे पत्नीचा आनंद होय. जयचंद हाच आनंद गमावून बसला! आपलें कुटिल कारस्थान जयश्रीस कळल्यास ती आकाशपाताळ एक करील अशी त्याची अपेक्षा होती; परंतु तसें कांहीं झालें नाहीं. जयश्री त्याच्यावर कडकडली नाहीं, संतापानें बेफाम झाली नाहीं, किंवा तिनें आणखी कांहीं अनर्थ केला नाहीं. नवऱ्याचे तोंडूनच पापाचा स्वीकार बाहेर पडतांच ती स्तब्ध झाली! ती केविलवाणें म्हणाली, "हें आपण काय केलेंत?"

जयचंदाचें पाप प्रायश्चितावांचून राहिलें!

जयश्रीनें त्यास क्षमा केली कां?–कोणाला माहीत? पण तिनें स्तब्ध बसणें त्यास त्या प्रतीचें वाटलें! त्याला तें नको होतें! त्यास तिचा संताप तिचे शाप पाहिजे होते. पण ती त्याची इच्छा पूर्ण झाली नाहीं. त्यामुळें त्यास फारच खेद झाला!

पश्चात्ताप पावलेल्या अंतःकरणास क्षमेचें शासन फारच जबर वाटतें जयश्रीचें मौन जयचंदास असेंच मोठें जाचक वाटलें.

पण तिनें त्यास क्षमा केली होती का?–मोठा बिकट प्रश्न होता.

जयश्री स्तब्ध कां बसली? प्रत्यक्ष पतीची निमकहरामी तिला पटली का?–नाहीं. मुळींच नाहीं! मग ती कडकडली का नाहीं?

तीन कारणें होतीं. तिच्यापुढें येतांच जयचंदानें आपलें पाप चटकन् कबूल केलें हें पहिलें कारण. त्याचा अपराध ऐकतांच तिला त्याची अत्यंत घृणा आली, हें दुसरें कारण आणि तो आपला प्राणप्रिय पति आहे या जाणिवेनें तिचें अंतःकरण अत्यंत कळकळलें, हें तिसरें कारण ! हीं कारणें नसतीं— प्रेम व तिरस्कार हे दोन विकार एकाच वेळीं अत्यंत उद्दीप्त झाले नसते तर ? —तर काय झालें असतें कोणास माहीत ?—त्यांच्या अस्तित्वामुळें जयचंदाची अपेक्षा फोल ठरली आणि जयश्रीचें स्वरूप कांहीं वेगळेंच घडून आलें ! एवढें मात्र खरें.

पण या गडबडींत एक गोष्ट घडली. ज्या आनंद-रत्न-प्रकाशांत जयचंद इंद्राचें सौख्य उपभोगीत होता; जयश्रीच्या ज्या आनंदानें चंबेलवाडीचा प्रदेश महकूब राहिला होता; ज्या आनंदानें त्याची प्रजा त्यांच्यावर सदैव प्रेम करीत होती; तो आनंद कायमचा मावळला ! जयचंद तें रत्न अखेरचें हरवून बसला ! या आनंदाचेंच वर्धन व्हावें म्हणून जयचंदाला विलास आठवले. विलासाकरितां संपत्तीची जरूर भासली संपत्तीकरितां मातृभूमीशीं बेइमान होण्याची त्यास इच्छा झाली. त्या इच्छेनें तो मोंगलांस मिळाला; परंतु शेवटीं या सर्वांचा परिणाम काय झाला ? तो एकेक पायरी चढण्यास गेला; पण शेवटीं त्यास काय आढळून आलें ?—मूळ भांडवल नाहींसें झालें ! स्वर्गाऐवजीं नरकवासाचाच प्रसंग प्राप्त झाला.

आतां जयश्रीची स्थिती एखाद्या निद्राभ्रमिष्टाप्रमाणें झाली. तिचा आयुष्यक्रम पूर्वी प्रमाणेंच सुरू होता; पण त्यांत तिचा आनंदी स्वभावाचा पूर्ण अभाव होता. आप या चिमुकल्या चंबेलीशीं सुद्धां तिचें हसणें खेळणें बंद झालें होतें चंबेलवाडींतील लोकांनाही या फरकाचें भारीच नवल वाटत होतें. जयचंदाची उदास दुःखी मुद्रा आणि जयश्रीची विमनस्कता त्यांना स्वप्नांत सुद्धां खोटी वाटली असती. पुष्कळांनीं त्याबद्दल चौकशी केली परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. खरें रहस्य उमगलें नाहीं. तें जोडपें दुःखीच राहिलें आणि लोकही त्याबद्दल सखेदाश्चर्य करीत राहिले. असो.

नंतर एके दिवशीं मानसिंग चितोडगडीं रवाना झाल्याचा हसीनेचा

निरोप आला व त्या निरोपानें जयश्रीचा मुद्रा थोडी प्रसन्न दिसली. त्या-वेळीं त्या दोघां पतिपत्नींचा खालीलप्रमाणें मोघम संवाद झाला.

"जयश्री, आपल्या आयुष्याचा शेवट कसा व्हायचा ?"

"प्राक्तनास माहीत !"

"मला हें दुःख आतां सहन नाहीं होत !"

उत्तर नाहीं.

जयचंदानें उद्वेगानें ह्मटलें, "माझा तुला अत्यंत तिटकारा आला आहे. मग तूं मजवर संतापत कां नाहींस ?—जयश्री, संताप ! खूप संताप ! तुझा क्रोध, तिटकारा बाहेर टाक !

"माझें अंतःकरण मेलं आहे !"

"मग पतिव्रते ! मला शाप तरी दे !"

"दुर्दैवानं आपण माझे पति आहांत !"

"मग हें काय असेंच चालायचें. आपल्याविषयीं लोकांत चर्चा सुरू आहे."

"ज्याची मनाची लाज सुटली त्यानें जनाला तरी कां भ्यावें ?"

"मग मीं पुढें काय करावें अशी तुझी इच्छा आहे ?"

जयश्री कांहीं न बोलतां तेथून उठून गेली ! जयचंदानें आपल्या कपाळावर हात मारून घेत म्हटलें, "हायरे दुर्दैवा ! हें काय झालें !"

+ + +

ठाकुरसाहेबांचा अज्ञातवास अद्यापिही सुरू होता. मानसिंग चितो-डास रवाना झाल्याची बातमी त्यांना कळविण्याकरितां व त्यांचा समाचार घेण्याकरितां जयश्री त्यांचेकडे गेली.

जयश्रीनें म्हटलें, "एक लिंगजीची कृपा असेल तर मानसिंग यश घेऊन येईल."

"तसें झालें पाहिजे. ह्मणजे. ह्मणजे चालू संधीचा मेवाडला चांगला फायदा मिळेल." ठाकुरसाहेबांनीं ह्मटलें, "खरंच जयश्री ! आह्मांला उठाव करण्यास किती चांगली आहे ह्मणतेस ! फारच नामी !"

"ती कशी बाप ?"

" आग्र्याचें कांहीं विशेष वर्तमान तुला कळलें नाहीं काय ?"

" कोणतें ?—" जयश्रीनें साशंक होऊन प्रश्न केला. " फर्जंदबेग खुशाल आहेत ना ?"

" खुशाल आहेत. त्यांची नको काळजी. ही संधि अशीच आहे कीं त्यांत आपल्या अनेक इच्छा सहजी तृप्त होण्याचा संभव आहे."

जयश्री ठाकुरसाहेबांच्या मुद्रेकडे उत्सुकतेनें पाहूं लागली.

तेव्हां ते म्हणाले, "तुला आग्र्याकडील कांहींच वार्ता समजली नाहींसें दिसतें. जयश्री, जहांगीराचा मेहरुन्निसा नामक एका सुंदरीशीं लौकरच विवाह होणार आहे."

जयश्रीला या वार्तेचें विशेष नवल वाटलें नाहीं; पण ठाकुरसाहेबांनीं ती सांगण्यात जी उत्सुकता दर्शविली, त्याचें मात्र तिला वाटलें. तें तिचें आश्चर्य ओळखून, " श्री, या वार्तेचें महत्व तुला पटणार नाहीं; पण खरी स्थिति अशी आहे कीं, मोंगलबादशाहा या विवाहाच्या धामधुमींत आहे तों पर्यंत जर आपण उठाव केला आणि हल्ल्यावर हल्ले चढविले तर काय बहार होईल म्हणतेस ? आपल्या थोरल्या राणाजींच्या सर्व इच्छा आपण वर्ष सहा महिन्यांत पूर्ण करूं शकूं " असें म्हणून त्यांनीं जहांगिराच्या या विवाहासंबंधी इतर गोष्टी सांगून तिला त्याचें महत्व पटविलें.

जयश्रीलाही ती गोष्ट पटली. कांहीवेळ तिनें विचार केला नंतर तिनें प्रश्न केला, " मग या संधीचा आपण फायदा कां घेत नाहीं ? आपण प्रगट व्हा आणि सर्वांना जागृत करा. आपल्या गुप्त शत्रूंची आपण मुळींच भीति बाळगूं नका. त्यांचा बंदोबस्त मी करतें. "

" म्हणजे ? " ठाकुरसाहेबांनीं आश्चर्यानें प्रश्न केला, " ते कोण कोण आहेत हें तुला माहीत झालें काय ? "

" होय. नांवानिशीं. "

ठाकुरसाहेबांनीं कपाळाला आठ्या घालून विचारिलें, " कोण आहेत ते ? "

जयश्री स्तब्ध बसली. तिनें कांहीं विचार केला आणि शांतपणें म्हटलें,

" उद्यां सायंकाळीं आपण चंबेळवाडींत आमच्या घरीं यावें. तिथं मी आपला अपराधी आपल्यासमोर आणून उभा करीन."

ठाकुरसाहेब दचकले. ते तिच्या मुद्रेकडे पाहूं लागले. पण तिनें त्यास फार वेळ पाहूं दिलें नाहीं. तिनें त्यांचा निरोप घेतला व तेथून मुकाट्यानें प्रयाण केलें.

जयश्रीनें घरीं आल्यावर पतीस विचारिलें, " आपल्यास आपल्या कृत्यांचा खरा खरा पश्चात्ताप झाला आहे का ? "

" मी होय ह्मटल्यानें त्याच्यावर तुझा विश्वास बसेल का ? "

" मी सांगलें त्या प्रमाणें वागण्याचें कबूल केल्यास मी आपल्यावर विश्वास ठेवीन."

" तुझी काय आज्ञा आहे ?--सांग ! तुला प्रसन्न करण्याकरितां मी वाटेल तें करीन."

" माझें मन प्रसन्न होईलच, असें नाहीं. आपल्या संसारांत आतां पहिला रंग जमण्याची आशा या जन्मीं नाहीं; पण हातून घडलेल्या पातकांची निष्कृति होण्याकरितां आपण कांहीं केलें पाहिजे."

" तें काय ? "

" ठाकुर ईश्वरसिंगजींचे आपण अपराधी आहां. त्यांच्यापुढें आपला अपराध कबूल करा."

जयचंद घाबरून ह्मणाला, " त्या कर्दनकाळ ह्मातान्यापुढें ? "

" कां ? आपल्यास भीति कां वाटते ?— "

" भीति का वाटते ?–तो माझी गर्दन उडवील ना ? "

" मग काय वाईट झालें ?–" जयश्री शांतपणें ह्मणाली " ज्याचे आपण महद्पराधी आहांत, त्यानें शासन करण्याचें ठरविल्यास मर्दानें कां भ्यावें ? "

" पण--पण ! "

" हा पण आपला घात करील ! " जयश्रीनें ह्मटलें, " आपल्या हातून आपल्या कुळाला, वीरत्वाला, पणुरुषाला कलंक लागेल, असें

पातक घडलें आहे, हें तर आपणास कबूल आहे ना? मग तें कबूल करून त्याचें प्रायश्चित भोगण्यास आनंदानें तयार झालें पाहिजे! प्रायश्चित्ताला भिऊन पापाची वृद्धि करण्यापेक्षां तें मोकळ्या मनानें कबूल करून नाहींसें करणें इष्ट नाहीं का?

"प्रायश्चित्त प्राणदंडाचें असलें तरी?"

"काय हरकत आहे?—मरण हें केव्हां तरी येणारच आहे. त्यांतून ठाकुरसाहेब आपल्यास मारतीलच असें थोडेंच आहे. कदाचित ते क्षमाही करतील. पण क्षमेची यत्किंचितही आशा अगर याचना न करितां आपण आपलें पाप कबूल केलें पाहिजे."

जयचंद विचारांत पडला, तो कांहीं वेळानें ह्मणाला, "जयश्री, याबद्दल मला विचार करण्यास थोडीशी सवड दे.

"नाहीं. या घटकेला आपण हो किंवा नाहीं ह्मटलें पाहिजे."

"नाहीं तर?"

"नाहीं तर?—मी स्वतः तुह्माला देशद्रोही ह्मणून पकडून देईन."

जयश्रीच्या निश्चय तिच्या मुद्रेवर स्पष्ट दिसत होता.

जयचंदानें विचार केला; उगीच ओढाताण करण्यांत अर्थ नाहीं. आपल्या पत्नीचें ह्मणणें ऐकून तिला तेवढें तरी सुख देणें इष्ट आहे.

तो ह्मणाला, "श्री, माझ्या प्रेमांतून तूं मुक्त झाली असलीस तरी तुझ्या प्रेमांतून मी मुक्त झालों नाहीं व माझी होण्याची इच्छाही पण नाहीं. पतिव्रते! तूं माझें आतां वाटेल तें कर. मी तुझ्या सांगण्याप्रमाणें वागण्यास तयार आहें. सांग-ठाकुरसाहेब कुठें राहतात तें सांग—मी त्यांच्यापुढें जाऊन उभा राहतों व आपली निमकहरामी कबूल करितों."

'तुम्हांला इतकी तसदी घेण्याचें कारण नाहीं. उद्यां सायंकाळीं तेच इथें येतील. त्यावेळीं मी त्यांच्यापुढें तुम्हांला उभें करीन. पुढें जें व्हायचें असेल तें होईल.'

दुसऱ्यावेळी ठाकुरसाहेब जयचंदाच्या घरीं आले.

जयचंदानें स्वतः पुढें होऊन त्यांचें स्वागत केलें. जयश्रीही तेथें येउन हजर झाली. एकवार तिघांनीही एकमेकाकडे पाहिलें.

ठाकुरसाहेब अस्वस्थ चित्तानें एका चौकीवर बसले. जयचंद किंचित् बाजूला खाली मान घालून उभा राहिला. जयश्री पुढें कसें करावे या विचारांत पडलेली दिसली.

बराच वेळ कोणीच बोललें नाहीं. प्रत्येकासच तें मौन मोठे चमत्कारिक वाटूं लागलें.

कांहीं वेळानें जयश्री भानावर आली. तिनें कांही निश्चय केला आणि नंतर ती ठाकुरसाहेबांना उद्देशून ह्मणाली, " ठाकुरसाहेब ! मेवाडशीं द्रोह करण्याचा घाट घालून तुह्माला मोगलांच्या हातांत गिरफदार करुन देणाऱ्याचें नांव सांगण्यांत मी पाप करीत आहे कीं पुण्य, मला कांही उमज पडेनासा झाला नाहीं. तरी पण मी आपल्याला तो अपराधी दाखवितें—" असें ह्मणून तिनें आपलें तोंड आपल्या पतीकडे वळविलें. जयचंद खालीं मान घालून उभा होता तरी त्याचे कान जयश्रीच्या बोलण्याकडे होते. ती बोलतांना थांबतांच त्यानें वर पाहिलें. दोघांही पतिपत्नीची दृष्ट भेट झाली. जयश्रीची मुद्रा भारी कष्टी दिसत होती. प्रत्यक्ष पतीच्या विरुद्ध बोलण्याचे तिच्या अगदीं जिवावर आलें होतें. जयचंदानें तिची ती स्थिती ताडली. तो एकदम पुढे आला व ह्मणाला, " थांब जयश्री ! मीच सर्व कबूल करतों.

असें ह्मणून तो ठाकुरसाहेबांकडे वळला, व ह्मणाला " ठाकुरसाहेब तुह्मी तारा अगर मारा पण तुमच्या विरुद्ध कारस्थान रचून तुह्माला मोगलांच्या हातांत देणारा मी—"

ठाकुरसाहेब दचकले! त्यांना तशी शंका वरचेवर येत असे, काल जयश्रीने त्यास तुमचा अपराधी मला माहीत आहे ह्मणतांच त्यांना तीच शंका पुनः येऊं लागली. अतांही त्यांना तसेंच कांही वाटत होतें! तरी पण जयचंदानें स्वतः ती गोष्ट कबूल करतांच ते दचकले. त्यांना अत्यंत नवल वाटलें.

ते एकदम म्हणाले, " काय–जयचंद ? तूंच ही निमकहरामी केलीस ?–जयचंद ! तूं असें केलेंस ?–प्रतापसिंगाचा पुतण्या तूं ! तूंच—!"

त्यांच्या कानावर रडण्याचा हुंदका आला ! त्यांनीं तिकडे पाहिलें. जयश्री रडत होती.

त्यांना अत्यंत संताप आला असतांही पुढें काय केलें पाहिजे, याचा त्यांना उलगडा पडला ! ती कां रडत आहे, हेंही त्यांनीं ओळखलें. ते तिच्या जवळ गेले व तिच्या पाठीवर हात ठेऊन खेदानें पण शांतपणें म्हणाले, " श्री, उगी रहा ! जयचंदास क्षमा केली आहे ! "

" नाहीं–नाहीं—" जयश्री एकदम म्हणाली, " क्षमेच्या याचने-करितां मी रडत नाहीं. माझें सौभाग्य मला मिळावं म्हणून मी रडत नाहीं. मला मामंजीच्या मरणाचा प्रसंग आठवला. त्यांनी त्याचवेळीं आमच्याविषयीं शंका घेऊन आम्हांला सावध राहण्याविषयीं बजावलं होतं. मरतां मरतां त्यांनीं आम्हांला परोपरीनीं सांगितलं असतां—"

" म्यां नीचानें दुष्कृत्य करायचे तें केलेंच–" जयचंदानें उद्वेगानें म्हटलं.

ठाकुरसाहेबांचें हृदय कठोर होतें तरी त्यांना हा प्रसंग फार वेळ पाहवला नाहीं. ते म्हणाले, " जयश्री उगी रहा. जयचंद स्वस्थ हो. तुझा अपराध अक्षम्य असला तरी मी त्याची तुला मनापासून क्षमा करतों. जाऊं दे. जयचंद ! आपण मागचें विसरून जाऊं आणि पुनः कार्याला लागूं. तूं आपला अपराध कबूल केलास—"

" या पतिव्रतेकरितां—"

" कां होईना !–आणि जयश्रीनें माझ्या सुटकेचा प्रयत्न केला आणि मी सुटून आलों. अर्थात् शेवट गोड झाला म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांतच आतां आपण कार्याला लागून मेवाडचा उद्धार करूं आणि आपलें ब्रीद राखूं. "

" आपल्या या विलक्षण औदार्याबद्दल मी आपला कसा उतराई होऊं—"

" पूर्वीचा खुळेपण सोडून मेवाडच्या सेवेला लाग. यापेक्षां कांही नको. महाराणा चैनींत बुडाला आहे, त्यास सावधकर सर्व सरदारांना एकत्र होण्यास सांग आणि मी प्रगट होऊन लढाईचें शिंग पुकारतां त्याला उल्हासानें उत्तर दे. "

ठाकुरसाहेब मग तेथें राहीले नाहींत. ते मुकाट्यानें तेथून निघून गेले.



# परिच्छेद ९२ वा.

## उद्बोधन !




छान्यावर पडेपर्यंत ठाकुरसाहेबांचें मन बरेंच उल्हासांत असल्यामुळें, आज आपल्यास शांत झोंप येईल, अशी त्यांची कल्पना होती. परंतु तसें घडून आलें. नाहीं. थोडासा उपहार करून ते बिछान्यावर पडले. आणि जयश्रीकडे कळलेल्या चमत्कारिक गोष्टीबद्दल ते विचार करूं लागले. त्याचा परिणाम असा झाला कीं, त्यांच्या मनाचा उत्साह मावळला. त्यांची आशा नष्ट झाली आणि मन मात्र अनेक कुशंकांनीं अत्यंत अस्वस्थ झालें.

आशे—निराशेच्या द्वंद्वांत हेलकावे खाण्याचा मनाचा धर्मच आहे. ठाकुरसाहेब आतांपर्यंतच्या कार्यवाईत अनुभवानीं पुष्कळच शांत विचारी झाले होते. त्यांचा तापट स्वभावही बराच वरमला होता. तरी त्यांना जयचंदाविषयीं अत्यंत संताप आलाच. केवळ जयश्रीच्या चरित्राकडे पाहूनच त्यांनीं तिच्या समक्ष जयचंदास क्षमा केली; पण ज्यावेळीं ते बिछान्यावर पडून पुनरपी त्याचा विचार करूं लागले; त्यावेळीं मात्र त्यांचें मन त्यांच्या आवाक्याबाहेर गेलें ! त्या झटाक्यांत ते एकदम उठले. व इकडे तिकडे फिरूं लागले !

आपल्या अंतःश्चक्षुपुढें आलेल्या महाराणा अमरसिंग व जयचंद यांच्या मूर्ति अत्यंत तिरस्कारानें बाजूला सारीत ते म्हणाले, ' शेवटीं जी कल्पना मला वरचेवर टोंचत होती तीच खरी ठरली !—काय नराधमपणा हा ! ज्याच्या बापाची इतकी एकनिष्ठ सेवा केली, त्याचाच पुत्र गुलामगिरी स्वीकारण्याकरितां मला मोंगलाच्या स्वाधीन करण्याचें नीच कर्म करतो ! अस्सल रजपुतांना हें कळलें तर त्यांना काय वाटेल ? प्रतापाच्या आत्म्यास हें कळलें

तर तो स्वर्गांत असतांनाही दुःखानें कसा तडफडेल ?—एकलिंगजी ! ही
कसली प्रजा आपण निर्माण केलीत ? उमरावा ! कोणत्या ऐहिक सुखाला
भाळून तूं या मार्गाला लागलास बाबा ! जयचंदा ! तूं ही इतका हलकट
निघालास?—प्रत्यक्ष राजा प्रधानांनीच स्वधर्म- -स्वदेशाशीं अशी निमकह-
रामी करण्याचा चंग बांधावा अं ? मग पुढें होणार तरी काय ?—ज्या
अभिमानानें आह्मीं मेवाडकर वागलों तो शेवटीं माती मोल होणार काय ?
प्रतापाची खडतर तपस्या निष्फळ ठरणार काय ? इतर जसे मोंगलाच्या
टाचेखालीं जाऊन नामोरम झाले, तेंच आमच्या कपाळी आहे काय ? ”

ठाकुरसाहेबांसारख्या मानी रजपुताला हे विचार किती असह्य झाले
असतील याची वाचकांनीच कल्पना करावी. त्यांनीं आपल्या विचारांनीं
आपलें मन ताब्याबाहेर चाललें आहे, हें पाहून तें न येण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न
केला; परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. वरचेवर त्यांना आपल्या
मनाशीं ह्मटलें, “ बाबा इसर ! कां व्यर्थ तळमळतो आहेस ! श्री एकलिं-
गाच्या मनांत जें असेल तेंच घडून येणार ! चालूं दे ! ज्याला जशी बुद्धि
सुचेल, तसाच तो वागणार ! ”

असें त्यांनीं आपल्या मनाचें समाधान करून दुसरीकडे तें वळविण्याचा
प्रयत्न केला तरी त्याचा व्हावा तसा उपयोग होत नसे पुनः तें वळणावळ-
णानें आपल्या मुख्य विचारावर येऊन थांबे. मन तरी हट्टवादी मुलाप्रमाणें
आहे. ज्याचा हट्ट धरूं नये, अशी आपली इच्छा असते, त्याच गोष्टी-
कडे तें पुनः पुनः वळलेलें असतें. असो.

ठाकुरसाहेबांना राहून राहून आश्चर्य वाटूं लागलें कीं, हें असें व्हावें का ?

कांहींसें चिडचिडल्याप्रमाणें करून ते स्वगत ह्मणाले “ या चांडाळांना
जेरीस आलों होतों तर त्यांनीं स्वतःच्या हिंमतीवर मेवाडांतच कुठेंतरी
मला कैद कां करून ठेवलं नाहीं ह्मणतों ? माझ्या पश्चात् त्यांनीं माझी
निंदा करून मजवर जे नाना प्रकारचे आरोप ठेवले, ते मोंगलांचें सहाय्य
न घेतां ठेवतां नसते का आले ?—तेव्हां तो सरळ मार्ग सोडून त्यांनीं हा
आत्मघातकी मार्ग कां स्वीकारला ? ”

याविषयीं त्यांनीं पुष्कळ विचार केला परंतु महाराणा व जयचंद असे मोंगलांच्या आहारीं का गेले याचा कांहीं त्यांस उलगडा पडला नाहीं.

या अशा विचारांत मध्यानरात्र उलटून गेली. आतां तरी निद्रा येईल या आशेनें ते पुनः बिछान्यावर पडले. तरी मनाचें विचाराचें कार्य सुरूच होतें.

ते आपल्या कपाळीं हात लाऊन म्हणाले, "देवाची काय काय लीला घडणार आहे कांहीं कळत नाहीं. मोंगलांच्या पुण्याईचा एवढा जोर असावा का, कीं प्रतापाच्या पुत्रानें आपण होऊन त्यांच्याकडे जावें ! शत्रूला साहाय्य करून आपल्या भावाचा गळा कापण्याची दुर्बुद्धि आमच्या मध्यें कोठून शिरली असेल देव जाणे ! अशा या द्रोही व चुगलखोर लोकांचे तरी शेवटीं कल्याण होतें का ? शत्रु तरी त्यांना आपलेपणाच्या दृष्टीनें पाहतात का ?—मुळींच नाहीं. हो, जो स्वबंधूचा विश्वासघात करणार त्याचा विश्वास कोण धरणार ?—शत्रूच्या सांवलींत जाऊन जो आपल्या भावाचा गळा कापतो; त्याचाही गळा पण केव्हां ना केव्हां शत्रु निर्दयपणानें चिरतो. असें असतां पुनः पुनः आमच्यांपैकींच कांहीं लोकांना शत्रूला जाऊन मिळण्याची अनिवार इच्छा कां व्हावी बरें ?"

अंथरुणावर पडल्या पडल्या शरीरानें व मनानें तळमळत ठाकुरसाहेबांनी याही गोष्टीचा विचार केला पण याचेंही उत्तर त्यास सुचलें नाहीं. शेवटीं अशाच अस्वस्थ स्थितींत पहाटे पहाटे त्यांचा किंचित डोळा लागला.

प्रातःकाळीं उठल्यावर व सर्व विधि उरकल्यावर त्यांनीं पुनः एकवार घडून गेलेल्या गोष्टींचा विचार केला. त्यावर आपली कांहीं तोड काढली व तावडतोब ते घोड्यावर स्वार होऊन नंबेलवाडीकडे वळले. आपले शत्रु कोण हें त्यांना आतां कळलें असल्यामुळें, त्यांनीं आतां आपला अज्ञातवास एकदम कमी केला.

ते नंबेलवाडीला येऊन पोंचले त्यावेळीं प्रहर दिवस होऊन गेला. जयश्री गृहकृत्यांत होती व जयचंदही म्लान वदनानें आपल्या झोंपडी बाहेर इकडे तिकडे फिरत होता. ठाकुरसाहेबांना पाहतांच त्याची छाती धडधडूं लागली. हा खवीस पुनः का परतला असें त्यास वाटलें.

ठाकुर साहेबांनीं जयचंदास आपल्या मागोमाग येण्याविषयीं खूण करून झोंपडींत प्रवेश केला. आंत जातांच जयश्रीस त्यांनीं पुकारलें.

दोघेही पतिपत्नी समोरासमोर आल्यावर अत्यंत गंभीरपणानें ठाकुर साहेब ह्मणाले, " जयचंद, तुला केलेली क्षमा केवळ या तुझ्या पत्नीकरितां मी परत घेत नाहीं. नाहीतर आपले शब्द परत घेऊन तुला देहांत शासन करण्यास मी मुळींच अनमान केला नसता इतका मला तुझ्याविषयीं तिटकारा आला आहे. परंतु ती गोष्ट आतां मी मनातच आणीत नाहीं. तुझें कर्म तूं केलेंस असें मनून मी गप्प बसणार आहे."

एवढें बोलून ते थांबले. त्या दोघांपैकीं कोणी बोललें नाहीं.

थोड्या वेळानें ठाकुरसाहेब ह्मणाले, ' तुमच्या दोघां राजाप्रधानांच्या नीचपणानें तुह्मा ला शक्य तितका कमीपणा आलेलाच आहे. शिवाय एखा॰ द्याला कांहीं कार्य करायचें झालें तर त्याच्याही मार्गांत तुह्मीं कांटे पेरून ठेवण्याचे श्रेय घेतलें आहेत."

जयचंदानें मध्येंच प्रश्न केला " मोंगलाच्या छावेंत आह्मी पूर्णत्वानें गेलों आहात, अशी का आपली समजूत आहे ? असेल, तर ती साफ चुकीची आहे."

" कशावरून ? " ठाकुरसाहेबांनीं प्रश्न केला, " तूं आग्र्याला जाऊन मजा उडवीत राहिलास ! मोंगलांचा वकील या नात्यानें मानसिंग सुप्रावत तुमच्या दारीं येऊन राहिला—"

" या गोष्टी घडल्या असल्या तरी आह्मी स्वतंत्र आहों. आह्मी कोणा॰ चेही बांधले नाहीं आहों. आह्मीं वाटेल तसें वागण्यास पूर्ण मुखत्यार आहों."

तुमचे व जहांगिराचें कांहीं गुप्त करारमदार झाले नाहींत, हें तूं शप॰ थेवर सांगशील ? तोंडी ह्मणा—लेखी ह्मणा— '

" लेखी तर खास नाहीं झालेले." जयचंद आपली दृष्टी फिरवून ह्मणाला.

" ह्मणजे तोंडी झाले आहेत—"

" पण ते पाळण्यासंबंधी मी बांधला थोडाच गेलों आहे. माझें काय ? मनांत आलें तर मी तें सर्व तोडूं शकेन. "

" माझा तुझ्यावर विश्वास बसणें शक्य नाहीं. जयचंद ! असा माझ्याकडे पाहूं नकोस पण तूं जें कांहीं कर्म केलें आहेस तें इतकें कुटिल आहे कीं, आतां तूं कसाही वागलास तरी तुझा तो कलंक धुतला जाणार नाहीं व तुझ्यावर निदान मी तरी विश्वासणार नाहीं. मी आतां आलों आहे तो याच गोष्टीचा शहानिशा करण्यास आलों आहे. मोंगलाचें प्रेम स्वीकारण्याकरितां तुम्ही मेवाडच्या स्वाभिमानाला पायातळीं कितीं तुडविलें आहे तें मला कळलें पाहिजे. "

जयचंद नरम पडला. तो म्हणाला, " ठाकुरसाहेब मी तुम्हाला शपथेवर सांगतों मोंगलांशीं तशा धर्तीचा एकही करारमदार तोंडीं अगर लेखी घडून आलेला नाहीं. "

" असें ?—" ठाकुरसाहेब म्हणाले, " मग मेवाडचा मंत्री या नात्यानें मी सांगतों त्याप्रमाणें एक खलिता तयार करून मोंगलाकडे रवाना कर. आजच्या आज मोंगल बादशहा जहांगीर यांस कळलें पाहिजे, कीं, मेवाड दिल्लीशीं पूर्वी इतकाच वांकडा आहे—"

जयचंदाची विपरीत बुद्धि एकदम जागी झाली. त्याला मोंगलांशीं मैत्री नको तर शत्रुत्वही नको होतें. तो म्हणाला, " कलहाला कांहीं कारण नसतां—"

ठाकुरसाहेब तिरस्कारानें म्हणाले, " हो, कलहाचें कांहीं कारण नसतांही मोंगलाकडे असा खलिता आजच्या आज रवाना झाला पाहिजे ! आम्ही मोंगलाचे केव्हांही मित्र नव्हतों पुढेंही राहण्याची आमची इच्छा नाहीं. त्यांतून कलहाला कारण पाहिजेच असेल तर तें उकरून काढतां येईल. पाहतोस काय तोंडाकडे. चितोडगड ताब्यांत घेण्याचें पवित्र कार्य आपणास करावयाचें आहे. तेव्हां त्यालाच हात घालून आपणास एका धोंड्यानें दोन पक्षी मारतां येतील. "

जयचंद गोंधळून गेला. आपण आपलें नाक कसें हाकारूं पाहात

होतों आणि आतां हें भलतेंच वळण लागणार असें त्यास वाटलें. तो विचारांत पडला.

तेव्हां ठाकुरसाहेब पुसते झाले, " कां ? तूं विचारांत कां पडलास ? अरे गृहस्था ! तूं वाटेल तसा वागण्यास मोकळा आहेस ना ?—मग इतका गांगरलास कां तूं ?—या गांगरण्याचा अर्थ मी दुसरा कांहीं का घेऊं नये?—"

जयश्री आतां बोलली ती आपल्या पतीला ह्मणाली, " झालें एवढें अधःपतन पुरें नाहीं कां झालें ?—आपण विचारांत कां पडलां ? ह्यांच्या प्रमाणें वागण्यास कांहीं हरकत आहे का ?—त्यांनीं आपल्याविषयीं जें औदार्य स्वीकारलें आहे, त्याचेकडे लक्ष्य देऊन आपण त्यांचें ह्मणणें ऐकलें पाहिजे. याच बाबतींत नव्हे. यापुढें ते सांगतील त्या कोणत्याहि बाबतींत "

जयचंदानें ठाकुरसाहेबांस उद्देशून ह्मटलें, " तुमचें ह्मणणें मान्य करण्यास मी तयार आहे. मात्र मोंगलांशीं कुरापत काढून युद्धाला उभें राहण्याची आपली सोय नाहीं—निदान आज तरी आपली तितकी तयारी नाहीं. असें मला वाटतें. त्यांतून तुमची मर्जीच असेल तर मी तुह्मी सांगतां त्या प्रमाणें खलिता पाठविण्यास तयार आहें मात्र या घाईचा जर कांहीं दुष्परिणाम झाला—"

" तर त्याच्या अपयशाचें खापर खुशाल माझ्या डोक्यावर फुटूं दे !—मी त्या निंदेस तयार आहे. तूं अगदीं खुशाल लोकांना सांगत फीर कीं, मोंगलांची कुरापत काढण्याचें कार्य ठाकुर ईसरसिंगानें केलें."

मग जयचंदानें विशेष आडकाठी न घेतां ठाकुरसाहेबांनीं सांगितल्याप्रमाणें एक खलिता आपल्या सहीशिक्क्यानिशीं तयार केला.

ठाकुरसाहेबांनीं तो नीट वाचून पाहिला. नंतर तो आपल्या खिशांत ठेवीत ह्मटलें, " आतां मी माझ्या इसमाहातीं आगऱ्यास रवाना करीन. असा आश्चर्यानें पाहूं नकोस तुझ्यावर विश्वास ठेवण्यास माझें मन धजत नाहीं. नाइलाज आहे."

" जशी तुमची मर्जी. " जयचंद मनांतून नाखुश होत ह्मणाला.

" हं—आतां सर्व सरदार ठाकरांकरितां एक फर्मान काढ. आठ दिवसांत चितोरगडावर स्वारी करण्याचा आमचा मानस आहे सर्वांना कळीव."

"इतक्या घाईनें?—जयचंदानें आश्चर्यानें म्हटलें, " मला तरी याचा अर्थ नाहीं समजत!"

"नाहीं समजायचा तितकी तुझी बुद्धी ठिकाणावर नाहीं त्याला मी काय करूं? मी सांगतों त्याप्रमाणें मुकाट्यानें वाग तूं!—महाराणा प्रतापजीला वारून तप होऊन गेलं. एवढ्या दीर्घ काळांत तुम्ही विचार करून काय दिग्विजय लावलांत, तो दिसतोच आहे. आतां माझ्या इच्छेप्रमाण सर्व झालेंच पाहिजे. तसें करण्याची तुझी इच्छा नसेल तर मात्र स्पष्ट सांग. मग मला स्वतंत्रपणें काय करतां येईल तें पाहीन " ठाकुरसाहेब थोडावेळ थांबून पुढें म्हणाले. " जयचंद, तुला थोडासा विचार असता तर मोगलावर चढाई करण्यास ही किती नामी संधि आहे. हे तुला केव्हाच कळलें असतें; पण तूं बुद्धिभ्रष्ट—विवकभ्रष्ट—आहेस. तुला माझ्या घाईचा अर्थ समजणार नाहीं."

जयचंद काय बोलणार? त्याला बोलायला तोंड कुठें होतें! निदान जयश्रीसमोर तरी त्यास पळवाट नव्हतीच. ठाकुरसाहेबांनी गेल्या रात्रीच्या बैठकीतच त्याचें हें वर्म तोडलें होतें, आणि म्हणूनच त्यांनीं त्या दोघांना आपल्या समोर बोलावून आपला कार्यभाग उरकण्याचें ठरविलें.

ठाकुरसाहेबांच्या इच्छेप्रमाणें फर्मानही तयार झालें. तें त्यांनीं पाहून पसंत केलें आणि म्हटलें, " मुख्य मुख्य ठाकरांकडे हें आजच्या आज रवाना झालें पाहिजे. आता आणखी एक काम महाराणा उमराजीला या स्वारीकरिता तयार करण्याचें, त्याची ही जबाबदारी मी तुझ्यावरच टाकणार. त्याला आपल्या नादीं लावून असा नादान केलास—

" हा मात्र मजवर व्यर्थ आरोप आहे." जयचंद मध्येच म्हणाला, ' कारण महाराणाजी कांहीं अल्पवयी किंवा अप्रबुद्ध नाहींत. शिवाय हें काम ठाकुरसाहेब, तुमच्या सारख्या वृद्धांच्या कडून जास्त चांगलें होईल."

जयश्रीनें पतीच्या या भाषणास अनुमति दिली. तेंनही ठाकुरसाहेबास हें कार्य तुमच्या हातून सरळपणें पार पडे अस म्हटलें.

ठाकुरसाहेब थोडावेळ विचारांत पडले. नंतर त्यांनीं ह्मटलें, कांहीं हर-कत नाहीं. मला आतां प्रगट होणेंच इष्ट आहे. ”

नंतर जयश्रीनें ठाकुरसाहेबांस जेऊन जाण्याविषयीं आग्रह केला. जय-चंद्रानें त्यांस विनंति केली. ती त्यांनीं मान्य केली. असो.

दुपारीं उन्ह उतरल्यावर ठाकुरसाहेब जाण्यास निघाले. त्यावेळीं त्यांनीं जयचंदास ह्मटलें, “ जयचंद, माझ्या ह्मणण्यास अनुमति देऊन तूं या नव्या कार्याला प्रारंभ केला असलास तरी तुझ्याविषयीं मला विश्वास वाटत नाहीं या करितां बजावतों ध्यानांत ठेव; जहांगिर विवाहाच्या गडबडींत आहे तोंपर्यंत आह्मीं त्याच मुहूर्तावर चितोडगड काबीज करण्याचा अट्टाहास करणार. यांतील एक अक्षर—आमच्या हालचालीची यत्किंचित् वार्ताही मोंगलांकडे कळतां उपयोगी नाहीं. जर कळली तर ?—जयश्रीचें नशीब ! ” एवढें बोलून ते निघून गेले.

ते गेल्यावर जयश्रीनें आपल्या पतीस ह्मटलें. “ ठाकुरसाहेबांविषयीं मनांत कांहीं दुजाभाव नाहीं ना ?—नाहीं ह्मणायचं. ”

“ मला कांहीं नक्की नाहीं सांगतां येणार. मला कांहींच सुचेनासें झालें आहे. ”

“ पण त्यांच्या मार्गांत पुनः कांटे पसरण्याचा प्रयत्न नाहीं ना होणार ! ”

नाहीं ती शक्ति आतां या जयचंदांत राहिलेली नाहीं. माझ्यापेक्षां त्यांचें आत्मबळ श्रेष्ठ आहे. आतां मेवाड माझें न ऐकतां त्यांचें ऐकेल. मी जिवंत असून मेलों आहे. ”

“ आपल्याला कांहींच करतां येणार, असें आपल्याला कां वाटतें ?”

“ माझ्यावर कोणाचा विश्वास बसणार नाहीं. खुद्द तूं सुद्धां माझ्या-विषयीं साशंक आहेस. मी कोणतेंही काम केलें तरी त्यांत चांगल्याचा व सत्याचा भाग फार थोडा दिसेल. ”

“ ह्मणून चांगलें काम करण्यास कोणती हरकत आहे. पापाचें प्राय-श्चित्त भोगत असतां पुण्यकर्म करूं नये, असें थोडेंच आहे. आतांही आपण मेवाडकरितां मेलों तरी बरें होणार आहे. ”

# परिच्छेद ५३ वा.

## चितोडचा उद्धार.




नल देवीच्या मरणानंतर चितोडगडावर सगळीकडेच उदासीनता पसरली होती. मृत्यू नंतर वाईट म्हणविल्या जाणाऱ्या मनुष्यालाही चांगुलपणा प्राप्त होत असतो. शिवाय त्याचा अभावही पुष्कळांना जाणवतो. मैनल देवीच्या मरणानेंही तसेंच झालें. तिच्या अभावाचा मनापासून कोणाला आनंद झाला असेल तर तो सुप्राजीला होय. त्यानें तो उघड उघड जरी दर्शविला नाहीं. तरी मनांतून त्यास त्या गोष्टीचें फार समाधान वाटलें.

मानसिंगालाही आपली आई मेली, ही गोष्ट एकपरी बरीच झाली, असें वाटलें. तरीपण आईचा अभाव त्याच्या मनाला जाणवल्यावांचून राहिला नाहीं. आपली आई कांहीं बाबतींत गैर असली तरी तिच्यामध्यें कित्येक चांगले गुणही होते, असें त्यास वाटून तिच्या मृत्यूचा त्यास पुष्कळच खेद झाला. आपल्या पित्यानेंही तिचे ते चांगले गुण आठवावे आणि थोडेंतरी कष्टी व्हावें, अशी त्याची इच्छा होती; परंतु सुप्राजीनें त्यास एकदम म्हटलें, "नाहीं मान. तिच्या मृत्यूचा खेद होणें शक्य नाहीं. दुखणारा दांत पडला म्हणजे जसें हायसें वाटतें, त्याचप्रमाणें हिच्या मृत्युमुळें माझ्या मनाला हायसें वाटत आहे मान, तुला माहीत नाहींरे, ती असतांना माझ्या मनाला काय वाटत होती. तिच्यापुढें मी किती शेळपट होतों, हें मी तुला आपल्याच तोंडानें काय सांगूं? सहज असा या खिडकींत उभा राहिलों आणि बाहेर नजर टाकून दूरपर्यंत पसरलेलीं आपल्या पूर्वजांचीं पराक्रमचिन्हें पाहिलीं तरीसुद्धां मला लाजल्यासारखें वाटत होतें मान! तो पहा कुंभोचा विजयस्तंभ! यावेळीं त्याच्याकडे मला पाहावेसें वाटतें, त्याबद्दल तुझ्याशीं गोष्टी बोलाव्याशा वाटतात. परंतु

ती असतांचा काळ कसा होता ? मी या स्तंभाकडे पाहतांच तो माझा उपहास करतो आहे. असा मला भास होई आणि त्याच्याकडे पाहण्याची मला मोठी लाज वाटे. खरोखर मान, चितोडला येईपर्यंत मला आपलेपणाची मुळीं म्हणतां मुळींसुद्धां जाणीव आली नव्हती. या पुण्यक्षेत्रांत येईपर्यंत मी पशुवत् वागतो आहे, हें मला कळत नव्हतें. येथें आल्यावर माझे डोळे उघडले. माझ्या आयुष्याची मला खंत वाटूं लागली; पण तुझ्या आईच्या मनावर तसा कांहीं परिणाम झाला नाहीं. उलट मी अशा कांहीं गोष्टी काढल्या तर ती माझाच उपहास करूं लागली. मग मान, माझ्या दुःखी व श्रमित मनाला हें कसें सहन होईल ? पण तिचा प्रतिकार करून तिला नष्ट करण्याचें मनोधैर्य माझ्यांत नव्हतें. त्यामुळें एखाद्या कळसूत्री बाहुल्याप्रमाणें मला ती नाचवीत होती आणि मी मनांतून नसतांही तसा नाचत होतों. अर्थात् तुझी आई म्हणजे माझें एक डोईजड संकट होतें. तेव्हां तें नाहींसें झाल्याबद्दल मला दुःख कसें होईल याचा तूंच विचार कर म्हणजे झालें."

मानसिंग यावर काय बोलणार ? तो स्तब्ध बसलेला पाहून सुग्राजीच पुढें म्हणाला, "आतां मला इतकं स्वतंत्र झाल्याप्रमाणं वाटतंय् कीं, तू परवां म्हणत होतास त्याप्रमाणं चितोडगडची व्यवस्था लावण्यास मी आतां एका पायावर तयार आहे. आमच्या बंधुद्रोहामुळेंच प्रतापाला फार त्रास पडला व मेवाडला पूर्ण स्वतंत्र करण्यास तो असमर्थ झाला अर्थात् त्या आमच्या पापाची निष्कृति करायची म्हटली, तर चितोड त्याच्या मुलाच्या स्वाधीन करण्यानेंच होणार आहे. तेव्हां तुला पुनः काय बेत ठरवायचा आहे तो ठरव आणि आपल्या कामाला लाग. एकंदर काळ परमेश्वरानें जुळवून आणिल्या प्रमाणें आला आहे. तेव्हां आतां विलंब नको"

या नंतर त्या पितापुत्रांचें चांगलें दोन चार दिवस खलबत झालें आणि त्यांत ठरल्याप्रमाणें सुग्राजीनें महाराणा उमरावसिंगांच्या नांवानें पुढील पत्र लिहून मानसिंगाजवळ दिलें.

सुग्राजीच्या पत्राचा इत्यर्थ असा:—

" ......मला तुमच्याकडे प्रत्यक्ष येतां येणार नाहीं. त्याला तशीच कांहीं कारणें आहेत. पण अप्रत्यक्षपणें मी सर्वस्वी तुमच्याकडचा आहे. तुमच्या सत्कार्यांत यश यावें अशी माझी मनापासून इच्छा आहे. तुह्मी येऊन चितोडगडावर हल्ला करा. मी लढण्याचें सोंग करीत तो आठचार दिवसांत तुमच्या स्वाधीन करीन. हें मी अगदीं एकलिंगजीला स्मरून लिहित आहे. यांत अन्यथा होणार नाहीं. मात्र तुह्मीं येण्याची त्वरा केली पाहिजे. तर तुह्माला त्रास पडणार नाहीं. तुमच्या दिरंगाईनें मोगलांना तुमच्या स्वारीचा सुगावा लागून जर कांहीं घोटाळा झाला तर मात्र मला जबाबदार धरूं नका. कळावें. "

हें पत्र हातांत पडतांच मनसिंगानें चितोडगडाहून कूच केलें आणि यथावकाश तो उदेपुरास येऊन पोंचावा.

× × ×

त्या दिवशीं उदेपुरांत अशी दौंडी पिटली.

सालुंब्र्याचे ठाकुर ईसरसिंगजी हे पुनः मेवाडांत आले आहेत. त्यांच्याविषयीं लोकांमध्यें नानाप्रकारचे लोकापवाद सुरू आहेत. काहीं नीच प्रकारचे आरोपही आहेत. ते सिद्ध करण्याचा पुरावा कोणाजवळ असल्यास त्यानें तो धीटपणानें व स्पष्टपणानें पुढें आणावा तसें न करितां केवळ निंदा करण्याचे हेतूनें अगर मत्सरानें जो कोणी वाष्कळ बाता मारील. त्याला ठाकुरसाहेबांच्या तरवारीला जाब द्यावा लागल."

ही दौंडी ऐकतांच जिकडे तिकडे चर्चा सुरू झाली आणि जो तो आश्चर्यानें व प्रश्नार्थी एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागला. ठाकुरसाहेबही कोणाच्या रागलोभाची पर्वा न करितां उजळ माथ्यानें हिंडूं लागले.

लौकरच ही बातमी साऱ्या मेवाडभर पसरली.

नंतर ठाकुरसाहेबांनीं उदेपुरास राहणाऱ्या मोठमोठ्या लोकांची उघरपणें भेट घेण्यास प्रारंभ केला. त्यावेळीं ते खालीलप्रमाणें मोठा चमत्कारिक संवाद करीत.

" मी साळुंब्याचा ठाकुर मोंगलाना फितूर झालों असा मजवर आरोप आहे. ही गोष्ट तुह्माला माहीत आहे का ?—आहे. तुह्मी ही खात्री मानतां ?—अळंटळं करूं नका. स्पष्ट काय तें सांगा. कांहीं पुरावा असला तरी पुढें आण ! मी कुठं होतों हे मी कांहीं दिवस कांही कारणाकरितां बाहेर फोडणार नाहीं. तुह्माला सबळ पुराव्याचे मजवर कांहीं आरोप ठेवायचा असल्यास मोकळीक आहे. "

या बोलण्यानें कोणीही निरुत्तरच होई. तेव्हां ते पुढें ह्मणत, " मग आतां मी जें कांहीं सांगतों, तें तुह्मी शांतपणें ऐकण्यास कांहीं हरकत नाहीं. होय. का नाही ? मग आतां सांगा पाहूं—तुह्मी मनुष्य आहांत कीं पशु ? "

या प्रश्नानें कोणी चिडल्यास ते विचारीत, " एकूण तुह्माला पशु ह्मटल्याचा राग आहे तर ? मग सांगा पाहूं, कर्तव्यापासून ढळणाऱ्या मनुष्याला काय ह्मणायचें ? प्रतापजी मरून बारा वर्षें झालीं. त्या महात्म्याचें व्रत तुह्माला माहीत आहे. त्यानें तुह्माला मरते वेळीं शपथही घातलेली आहे. त्याचा तुह्मी काय विचार केलांत ?—तुह्मी पूर्वजांच्या नांवाला काळीमा लावणार कीं कांहीं पराक्रम करणार ? "

" आम्ही काय हुकमाचे बंदे. महाराणाजी ( उमराव ) स्तब्ध बसले आहेत. म्हणून आम्ही उगे आहांत. त्यांनीं युद्धाची तयारी केल्यास आम्ही नाहीं म्हणूं तर मग बोला—"

" राजा ऐकत नाहीं तर त्याला ऐकण्यास लावणें तुमच्या हातांत नाहीं कां ? महाराण्याचा कान पकडून त्याला त्याच्या बापाचें व्रत कळवायला नको काय ? त्याला शुद्धीवर आणून मेवाडचा उद्धार करणें हें प्रत्येक मेवाडकराचें कर्तव्य नव्हे काय ?—तुम्ही असें काय केलेंत तें सांगा !—नुसते मूग गिळून काम नाही भागणार !—तुम्ही पुढें होण्यास भितां ? ठीक आहे. मी पुढें झालों तर मला सहाय्य कराल कीं नाहीं ?—तलवारीची शपथ वहा पाहूं ! ठीक. आतां मी बोलवीन त्यावेळीं व त्या

ठिकाणीं तुम्हाला आलें पाहिजे. आतां शक्य तितक्या लौकर चितोडवर चढाई करून तो हस्तगत करण्याचा निकराचा प्रयत्न करावयाचा आहे. झाला एवढा आळस पुरे झाला !"

ठाकुरसाहेब वृद्ध होते तरी त्यांचा उत्साह तरुणांनाही लाजविणारा होता. त्यांचीं गात्रें शिथील होत चालली होती. तरी त्यांच्या मनात जळणारी देशाभिमानाची ज्योत पूर्वीच्याच तेजानं तेवत होती ! अवघ्या आठपंधरादिवसांच्या आंत त्यांनी मेवाडचे स्वरूप बदलून टाकलें यांच आवशीनं जयचंदाची फर्मान सगळीकडे जाऊन पोंचली ! आतां फक्त उमरावराणा सावध होऊन पुढे होण्याचाच काय तो अवकाश होता.

ठाकुरसाहेबांनीं तो ही दिवस मुकर केला आणि त्यांनीं एके दिवशीं अनुकूल असलेल्या सर्व सरदार लोकांना आपल्याकड भोजनास बोलविलें. भोजनाचा बेत अगदीं साधा होता. त्याकडे पाहतांच प्रतापाच्या वेळचे व तपस्येचे स्मरण व्हावें अशी त्याची रचना होती.

सर्व मंडळी जमली. भोजनास बसण्याचें वेळीं ठाकुर इसरसिंग पक्तीच्या मध्यभागीं जाऊन उभा राहिला व ह्मणाला, " मित्रहो ! थोरला महाराणा प्रताप जसें अन्न खात होता तशा धर्तीचें अन्न आज तुमच्यापुढें आहे. ते तुमच्या आजच्या चळचाळ जिभेला रुचलें नाहीं तरी ते खाऊन प्रतापाची आठवण करा आणि तो असें अन्न कां खात होता. याचा विचार करा. मंडळी, बोलल्या न बोलल्याची माफी असूद्या. पण तुमच्यापैकी कोणीही पशू नाहीं. असें तुह्मी सिद्ध करून दाखवा. आपल्या मूर्खपणामुळेंच तिकडे दिल्लीला मोंगल मिष्टान्न खाताहेत आणि आपल्या कपाळीं हें काय कदान्न आलेलें आहे; याची कांहीं चाड बाळगा ! अस्सल रजपूत बिजाचा असेल तोच हें अन्न खाल्ल्यानंतर घरीं परतणार नाहीं तर चितोडकडे आपला मोर्चा वळवील. भोजन होतांच आपण उमराव राण्याकडे जाऊं. त्याला बाहेर काढण्याचें काम मी करितों पुढे तुह्मला काय करितां येईल ते तुह्मी

पहा—बोला, एकलिंगजी की जय !”

हा जयजयकार विलयमान् होतो न होतो तोंच मानसिंग तेथें येऊन पोंचला. त्याचें यश पाहून ठाकुरसाहेबांचा आनंद गगनांत मावेना! त्यांनीं सर्व मडळींना शांत करून खड्या सुरांत सुग्राजीनें पत्र वाचून दाखविलें आणि ह्मटलें, “ मित्रहो ! आतां तुह्माला तुमच्या उद्धाराची कांहीं शंका आहे कां ?—नाहीं ना ? मग आतां जास्त उत्साहानें तयार व्हा ! पुनः एकवार एकलिंगजीचा जयजयकार करा ! आपणास यश देण्याची त्याची इच्छा आहे ! तो आपणावर पूर्ण प्रसन्न आहे ! त्याच्या कृपाछत्राखालीं आपण काळाचेही दांत पाडूं ! बोला—एकलिंगजीकी जय !”

\+ + + +

उन्नतीस किती अवकाश ! अवनतीस किती थोडा अवधी !! महाराणा उमराव स्वभावत: कांहीं वाईट नव्हता; परंतु एकदां त्यानें बेजा मार्ग पत्करल्यावर त्यास पशुपदीं पोंचायला फारसा वेळ लागला नाहीं. उमराव महालांत तो राहूं लागल्यापासून त्याच्या विलासोप भोगाला जी चढती कळा लागली ती हा वेळ पर्यंत अव्याहत चढतीच राहिली. त्यामुळें आपल्या कर्तव्याचें त्यास पुरतें विस्मरण पडत गेलें. बाहेरच्या जगांत उमराव महालाबाहेर—काय चाललें आहे याची त्यानें कधीं चौकशी केली नाहीं. किंवा आपल्या वर्तनाला जग काय ह्मणेल याचीही त्यानें परवा केली नाहीं. बस्स ! एकमात्र विलास ! विलास !! विलास !!!

आजही तो आपल्या एका प्रेयसीला—नाटकशाळेला—घेऊन शराब पीत बसला होता. समोर एक मोठा आयना लावला त्यांत दोघांचे प्रतिबिंब पडलेलें होतें. दोघेही परस्पराच्या विनोदांत पूर्ण रंगलेलीं होतीं. इतक्यांत महालासमोरच्या मैदानातून एकलिंगजीचा फार मोठा जयजयकार त्यांच्या कानीं आला. दोघेही दचकलीं. उमरावाच्या हातातून पेला गळून पडला ! ‘ एकलिंगजी की जय ! ’ पुनः आरोळी ऐकूं आली.

उमरावानें एका खिडकीजवळ येऊन बारिक छिद्रांतून बाहेर नजर टाकली! बाहेर काय चाललें आहे, हें समजण्याइतकी त्याला शुद्ध होती. त्यानें पाहिलें हजारों रजपूत अनेक सरदार ठाकरासह सशस्त्र होऊन जमले होते! उन्हांत भाले, ढाली, तलवारी चमकत होत्या! घोडे थै थै नाचत होते. रणभेरी करणारे आज्ञेची वाट पहात उभे होते! सर्वांच्या मुद्रेवर युद्धाची हौस दिसत होती! ही सर्व युद्धाची तयारी होती, हें कोणालाही चटकन् कळून आलें असतें! उमरावालाही तें कळून आलें! पण त्यास त्याचें फार आश्चर्य वाटलें. तो अगदी गोंधळून गेला! दारूची चढती नशा एकदम थांबली! तो कावऱ्या बावऱ्या दृष्टीनें इकडे तिकडे आणि छिद्रांतून बाहेर वरचेवर पाहूं लागला; पण त्यामुळें त्यास कशाचाही उलगडा पडला नाहीं! बाहेरचा जयजयकार मात्र वरचेवर उठत होता!

इतक्यांत महालाच्या दाराबाहेरच कर्कश हुकमी आवाज व शस्त्रांचा खणखणाट त्यास ऐकूं आला! उमरावाच्या डोक्यांत एक कल्पना आली. आपण विलासमग्न झालेलों पाहून सर्व सरदार ठाकुरानीं आपल्या विरुद्ध कट करून आपल्यास पदच्युत करण्याचें तर नाहीं ठरविल? अशीच एक कुशंका त्याचे मनात उभी राहिली व तो जास्तच गांगरला!

उमराव कांहीं भित्रा किंवा रणभिरू नव्हता! चांगला खंदा लढवय्या होता; पण विलासप्रियतेनें त्यास नादान केलें होते!

इतक्यांत दारावर लत्ताप्रहार झाला व ते खाडकन उघडलें. उग्रमूर्ति ठाकुर ईसरसिंग व आणखी दोन तीन सरदार नागव्या तरवारीनिशीं आंत आले.

उमराव अनिमिष नेत्रांनीं त्यांच्याकडे पाहातच राहिला! त्याची प्रेयसी मुकाट्यानें दुसऱ्या एका दारानें पळून गेली!

"प्रतापाचा पुत्र कुठें आहे?" ठाकुर ईसरजीनें उमरावासच प्रश्न केला

"याचा काय अर्थ?" उमराव भानावर येऊन कांहींसा तिरस्कारानें म्हणाला, "हा मी तुमच्यापुढें उभा आहे."

"नाहीं! तो नव्हे! माझ्यापुढें मी एका पशूला पाहतों आहे!" ईसरजीनें न हिचकतां एकदम म्हटलें.

"ईसरजी !" उमरावानें मगरूरीनें विचारिलें, तुम्ही भानावर आहांत का ?"

"मी शराब पित नाहीं. अर्थात माझी अक्कल ठिकाणावर आहे."

"पण तुमची नजर अगदीं फिरून गेलेली दिसते."

"अगदीं बरोबर ! तुमचें रूप पालटलेलें असल्यामुळें माझ्या नजरेसही तुम्ही प्रतापाचे पुत्र असाल असें वाटत नाहीं !—पहा दोस्त हो ! आपल्या पुण्यप्रतापी थोरल्या राणाजींच्या या दिवट्या पुत्राकडे पाहा !—पहा त्याची अवस्था पहा ! महालांत सगळीकडे नजर टाका. प्रतापाला हे विलास माहीत होते ? नाहीं. त्यानें झोंपडीचा महाल करूं नका म्हणून मरतेवेळीं बजावलें होतें ना ? पहा ! त्याच्या पुत्रानेंच हें काम दुराचाराचें घर उभारलें आहे तें पहा—सांग उमराव !—मी प्रतापाचा पुत्र आहे असें तुला म्हणता तरी येईल काय ?—नाहीं बाबा ! या अशा आचरणानें वागणारा प्रतापाचा पुत्र होऊं शकत नाहीं. कशाला त्याच्याशीं पुत्राचें नातें जोडून त्याच्या कुशीला कळंक लावतोस !"

"मग तुमचें म्हणणें तरी काय आहे ?"

"अमच्या बरोबर युद्धाला चल ! चितोडगड घेतल्याखेरीज आतां दुसरें कांहीं करायचें नाहीं असा आमचा सर्वांचा निश्चय झालेला आहे. तूं आमचा महाराणा आहेस. आमच्या पुढें हो ! आपण सगळेजण लढूं आणि प्रतापाची प्रतिज्ञा पार पाडूं !"

"पण दिल्लीचे बादशाहा आमचे स्नेही—"

"जबान बंद कर !—एकदम बंद कर ! प्रतापाशीं आजन्म हाडवैर करणारी दिल्लीची सल्तनत तुझी मैत्रीण ? शक्य नाहीं !—दोस्त हो पाहतां काय ? या नादानाला या दुराचाराच्या गृहांतून बाहेर ओढा !—उमराव ! त्या आरशाकडे—दारूच्या पेल्याकडे काय पहातोस ? मूर्खा ! त्यानें तुझें तोंड काळें होण्याची वेळ आली !—ऐक ! हा एकलिंगजीचा जयजयकार ऐक !—काय ? तुझ्या नजरेंत वीरश्री येत नाहीं—थांब—" असें म्हणून त्या

चेवलेल्या ठाकुर ईसरानें पुढें होऊन दारूनें भरलेला चांदीचा जड पेला त्या मोठ्या आयन्यावर मारिला ! खळकन् तो फुटला ! त्याच्या चिंधड्या झाल्या !

उमराव दांत ओंठ खात त्याच्या अंगावर धांवला आणि त्यास दूर ढकलीत ह्मणाला, "थेरड्या काय केलेंस हें !—चल दूर हो तूं माझ्या महालांतून एकदम चालता हो पाहूं."

ठाकुर ईसरजी त्याच्या खवाड्याला धरून त्यास पुढें ढकलीत ह्मणाला "तुला घेतल्या खेरीज मी जाणार नाहीं —तुला माझा राग आला आहे ना ? ठीक आहे. पोशाख चढीव हातांत तरवार घे आणि मैदानांत चल. तेथें अनेक सरदार ठाकुर एकच झाले आहेत तुझ्या प्रजेपैकींही पुष्कळ लोक जमले आहेत त्या सर्वांच्या समोर माझें तुला काय शासन करावयाचें असेल तें कर" एवढें बोलून तो आपल्याबरोबर आलेल्या सरदारास ह्मणाला "कसें दोस्तहो ! माझें ह्मणणें बरोबर आहे कीं नाहीं ?"

"अगदीं बरोबर ! महाराणाजींनीं या वेळीं खालीं आलेंच पाहिजे"

उमराव अगदीं खवळून गेला होता तरी आपल्या विरुद्ध कांहीं तरी फार मोठा कट झालेला आहे. तेव्हां त्याचा उलगडा पडेपर्यंत उगीच चड-फडण्यांत अर्थ नाहीं. असा त्यानें विचार केला व तो ठिस फिस करीत पोषाख करण्यास गेला.

थोड्याच वेळांत ठाकूर ईसरजीच्या इच्छेप्रमाणें तो पोषाक करून व सशस्त्र होऊन त्यांच्याबरोबर मैदानांत आला. आपल्या राण्याला पाहतांच सर्वांनीं त्याच्या नांवाचा जयजयकार केला.

नंतर ईसरजीनें आपल्या घोड्यावर चढून उच्च स्वरांत सर्वांस शांत केलें आणि ह्मटलें, "महाराणाजींला खालीं आणण्यांत मी त्यांची आग-ळीक केली आहे अशी त्यांची समजूत झाली आहे. असें मला कां करावें लागलें याचें मी कारण सांगतों आणि तें ऐकल्यानंतरही जर मी दोषी ठरलों तर सर्वांच्या मतें ठरेल ती शिक्षा भोगण्यास मी तयार आहे." एवढें बोलून त्यानें महाराण्याला उद्देशून आपला हेतु नीट विशद करून

सांगितलें. आणि नंतर म्हटलें, "याऊपरही मी राजद्रोही असेन तर महाराणाजी ही माझी गर्दन आपणापुढें वांकली आहे. तिच्यावरून ती करवाल फिरवा आणि खुशाल वर जाऊन विलास भोगीत बसा !"

पण आतां तो पूर्वीचा उमराव राहिला नव्हता. त्याचें मन ईसरजीच्या भाषणानें खडबडून जागें झालें होतें. त्यानें पश्चात्ताप करीत त्याच्याकडे आदरानें पाहात म्हटलें, "नाहीं ठाकुरसाहेब, तुम्हाला शासन देण्यास मी समर्थ नाहीं. चला लोक हो चला ! मी मूर्खपणानें इतका काळ व्यर्थ दवडून आपल्या पित्याच्या आत्म्याला व्यर्थ संताप मात्र दिला ! चला, त्याचें परिमार्जन चितोडगड घेऊनच करूं ! चितोडचा उद्धार ! हेंच आमचें ध्येय ! चला वीर हो चला !"

असें म्हणत त्यानें आपला घोडा सर्वांपुढें काढला.

ठाकुर ईसरजीच्या मनाप्रमाणें झालें. सर्वांना विलक्षण उत्साह आला ! सर्वत्र जयजयकाराचे ध्वनि प्रतिध्वनि उठूं लागले. रणवाद्यें वाजूं लागलीं. घोड्यांच्या अंगांत स्फुरण चढलेलें दिसूं लागलें !

त्याच क्षणीं उमरावाची स्वारी चितोगडाकडे निघाली.



# परिच्छेद ५४ वा.

## मंगलांत दंगल.



शेवटीं जहांगिराच्या मनाप्रमाणें झालें. मेहरुन्निसेनें त्याच्याशीं विवाह करण्याचें कबूल केलें. तिलाही जें पाहिजे होतें, तें मिळालें. बादशाहाच्या मनाचें संपूर्ण स्वामित्व तिला प्राप्त झालें.

विवाहाची तिथी निश्चित झाली ! आम राज्यांत या विवाहाची द्वाही फिरविण्यांत आली. वाढदिवसाच्या समारंभाप्रमाणेंच हा विवाहसमारंभही मोठ्या थाटानें पार पडला. मेहरु॰न्निसेचा नवीन नामविधि झाला. तिला नूरमहाल असें ह्मणण्याचें ठरलें. कालांतरानें ती नूरजहान ( जगत्प्रभा ) झाली !

वाढत्या वैभवांत निश्चितमनानें सर्व गोष्टी घडल्यामुळें जहांगिराच्या सौख्याला सीमा राहिली नाहीं. नूरजहानाचें दुर्दैवही एकाएकीं संपलें !

पण यांत एक अपशकुन झाला ! विवाहाच्या मंगल धांदलींतच मेवाडकरानीं दंगल करून उठाव केल्याचें वर्तमान आग्र्यास येऊन थडकलें ! राजस्थानाचें राजकारण अबदुलखानाकडे असल्यामुळें प्रथम ही बातमी त्याच्याकडे गेली. त्याला त्याचें आश्चर्य वाटलें; पण त्यानें त्याचा गाजावाजा केला नाहीं. बादशाहापर्यंत ही वार्ता न पोंचेल अशीच व्यवस्था करण्यांत आली.

या गोष्टीला दोन तीन दिवस जातात न जातात तोंच जयचंदाच्या सहीशिक्याचा खलिता जाऊन पोंचला ! ठाकुरसाहेबांनीं तो अशाच बेतानें पाठविला होता कीं, चितोडगड आपल्या हातीं येतां तोंच तो अबदुलखानाच्या हातांत जाऊन पडला.

रजपुतानीं पुनः उठावाचें धोरण स्वीकारल्याचें त्यास कळतांच त्याला

कांहीं आश्चर्य वाटलें असलें तरी त्याकडे त्यानें ह्मणावें तसें लक्ष दिलें नाहीं. मेवाडचा मुख्य प्रधान आपल्या मुठींत आल्याची त्यास खात्री असल्यामुळें त्यास ती वार्ता सत्यच वाटली नव्हती; परंतु ज्यावेळीं जयचंदाचा हातचा खलीता त्याच्या हातांत पडला, त्यावेळीं मात्र तो दचकला. त्यानें तो विचित्र वाटणारा खलिता दोनदां वाचला त्यांत अगदीं स्पष्ट शब्दांत लिहिलेलें होतें कीं, तुमचा आमचा सलोखा आहे असें समजूं नये. आह्मी लौकरच उठावाचें धोरण स्वीकारणार आहोंत.

या मजकुरानें मात्र अबदुलखानाचें मन बरेंच अस्वस्थ झालें नाहींतर त्यानें आपल्या मनोराज्यांत असे वाडे बांधले होते कीं, जयचंद आपल्या मुठींत आलाच आहे त्याचाच गळ करून उदेपुरच्या राण्याला फास लावावा आणि त्याच्या गळ्यांत एखाद्या मनसबदारीचें पेंडें अडकवून टाकून मोकळें व्हावें ! आणि ही गोष्ट लौकरच साध्य होईल, अशी त्याची खात्री होती. जहांगिराच्या वाढदिवसानंतर तो त्याच प्रयत्नास लागला होता परंतु मध्यंतरी हें विवाहाचें बंड उभें राहिल्यामुळें व आतां विशेष घाई नसल्यामुळें त्यानें आपल्या हातांतील या नव्या विकत घातलेल्या राजकारणाकडे थोडेसें दुर्लक्षच केलें होतें. तोंच या वार्ता येऊन थडकल्या !

जयचंदाच्या खलित्यानें त्याचें लक्ष पहिल्या वार्तेकडे वेधलें त्यानें त्याची चौकशी केली आणि तो त्याची कांहीं व्यवस्था लावणार तोंच चितोडगड पडल्याची वार्ता आली ! आणि ती मात्र वणव्याप्रमाणें पसरली ! समारंभाच्या मोजेंत मोठाच व्याघात झाला ! जो तो एकमेकांस आश्चर्यानें विचारूं लागला, " हूँ ! ऐसा कैसा हुआ ? "

अबदुलखानास तर कांहींच सुचेना. मेवाडच्या राजकारणाची सर्व जबाबदारी त्याच्या वरच असल्यामुळें यशापयशाची वाटणीही त्याच्याच नांवें होणार होती !

मागें एके ठिकाणीं आह्मी सांगितलेंच आहे कीं, अकबराच्या कारकीर्दींत जें—मेवाडला नमविण्याचें—शक्य झालें नाहीं, तें जहांगिराच्या

वेळीं सिद्ध करून दाखवून आपलें वजन दरबारांत वाढविण्याचा अबदुल-खानाचा विचार होता व त्याप्रमाणें त्यानें कारस्थान लढवून मेवाडच्या मुख्य मंत्र्याला बादशाहाच्या वाढदिवशीं नजराण्यासह आणून दरबारांत उभे केले त्यावेळीं बादशाहा त्याच्यावर फारच खुश झाला आतां त्याची चलती होऊन त्यास पुष्कळच महत्त्व येणार, असें त्याच्या प्रतिस्पर्धी सरदार लोकांनाही वाटलें, पण या गोष्टीला दोन महिने सुद्धां लोटले नाहींत तोंच सगळाच डाव उलटला! त्या बरोबर अबदुलखान गांगरला! त्याच्या प्रतिस्पर्ध्यांना निष्कारण हायसें वाटलें आणि त्यांनीं आपसांत ".अरे बाबा नव्हे तें! किती झालें तरी मेवाडकर आहेत ते. ते असे कुठें कपटानें वश होणार? त्या धुर्तांनीं या आमच्या खुळ्याला ( अबदुलखानाला ) आपल्या मतलबापुरते चार दिवस नाहीं लावलं अन् पुढें दिला उधळून डाव आहे काय न नाहीं काय? " इत्यादि तऱ्हेचें बोलून अबदुलखानाची कुचेष्टा केली आणि त्याच्या खालीं घसरण्याचा आनंद मानिला! कित्येकांचे तर एवढ्यानेंही समाधान झालें नाहीं. ते मोठी सखेपाश्चर्याची मुद्रा करून मुद्दाम त्याच्या भेटीला गेले आणि सहानुभूती दाखविण्याच्या मिषानें त्याच्या भांबावलेल्या स्थितीचें चित्र प्रत्यक्ष पाहून आपल्या नेत्रांचें पारणें फेडून घेतलें!

अबदुलखानास आपल्या मित्रांचें हें प्रेम समजलें नाहीं असें नाहीं आणि त्याचें त्यास दुःखही झालें परंतु करतो काय? मुकाट्यानें पराजय स्वीकारणें त्यास भागच होत.

जयचंदावर मात्र तो खूप जळफळला! मनांतले मनांत त्यानें त्यास हजारों शिव्या मोजल्या! हा मनुष्य इतक्या लौकर आणि अशा तऱ्हेनें एकाएकीं उलटेल, अशी त्यास कल्पनाही नव्हती सबंध एक दिवस तरी त्यास काय करावें, हें सुचेना. नंतर त्यास एक कल्पना सुचली व त्यानें मोहबतखानास आपल्याकडे बोलाविलें.

मोहबतखानही यावेळीं त्याचेंच स्मरण करीत होता हगीनेगारगी

तरुणी आपल्या हातांतून गेली, याचें त्यास राहून राहून वाईट वाटत होतें. आज आपला व तिचा विवाह ठरला असता तर काय बहार झाली असती. बादशाहाच्या या विवाह समारंभांत आपण दोघांही पतिपत्नींनीं केवढातरी भाग घेतला असतां बादशाहाची आपणावर जशी मेहरनजर आहे तशीच नूरजहानची आपल्या पत्नीवर जडली असती या दुहेरी कृपेनें आपला संसार सुखाचा झाला असता ! इत्यादि इत्यादि किती तरी गोड गोड विचार त्याच्या मनांत येत होते आणि, शेवटीं यांपैकीं कांहींच घडून आलें नाहीं आणि त्याला कारण कोण ? तर आपला भाऊ ! या विचारानें त्याचें डोकें निराशेनें दुःखानें व क्रोधानें भडकून जात होतें,

इतक्यांत त्यास अबदुल्लखानाचें बोलावणें जाऊन पोंचलें मेवाडकडील वार्ता त्यालाही काळजी असल्यामुळें त्याच बाबतीमध्यें खानसाहेब आपणास बोलावीत असले पाहिजेत अशी त्यानें सठकळ बांधली व त्या दोघांच्या भेटींत ती खरीही झाली.

खानानें त्यास म्हटलें, " तुम्ही दोघा भावांना कांहीं काम सांगून मानाला चढवावें म्हणून केली खटपट त्याचे काय चीज झालें ? चितोडगड जाईपर्यंत मानसिंगानें एका ओळीनें सुद्धां तिकडची खबरबात कळवू नये ? या गृहस्थाला तिकडची वकिली मी होऊन देवविली. त्याचा त्यानें असा उपयोग केला, मग हा काय त्यांना सामील झाला आहे कीं, त्या लोकांनीं याला कैदेंत घातला आहे, कुणाला माहीत ? तुमच्या वडिलांच्या वर्तनाचा सुद्धां मला मोठा चमत्कार वाटतो. मेवाडकरांनीं येऊन यांना हाकलून लावीपर्यंत यांना त्यांच्या हालचालीची कांहीं खबर कळली नसेल ?—काय घोंटाळा झाला आहे अल्लाला माहीत ! " असें उद्वेगानें बोलत त्यानें आपले हात मागें टाकले व तो इकडे तिकडे फिरूं आगला.

मोहबतखान कांहीं वेळ त्याच्या हालचालीकडे पाहात उभा राहिला आणि नंतर म्हणाला, " मानसिंगासंबंधानें तुम्ही जर खरें विचाराल तर माझे मत केव्हांही अनुकुल नव्हतें आपल्या जनानी रूपाखालीं तो बराच बेढंग मनुष्य आहे. असा मला अनुभव आल्यापासूनच मला वाटत होतें कीं

हा मनुष्य खराब रे खराब ! पण बोलणार काय आणि कुणाजवळ ?— पाठचा भाऊ पडला ना !—" इतकें बोलून तो थांबला. हसीनेचा व त्याचा असलेला संबंध बोलुन दाखवावा, अशी त्यास अत्यंत उत्कंठा झाली; परंतु ती त्यानें तशीच दाबली.

इतक्यांत अबदुलखान त्यास म्हणतो, " अहो तें सगळं खरें, पण आतां झालंय या कमाला काय तोंड काढायचें ? सुभाजींनीं आपल्या स्वार्थाला तरी जपायचे होतं ? "

" त्याचं सांगू खानसाहेब—" मोहबतखान मध्येच ह्मणाला, " एक तर आमच्या वडिलांचं डोकं अलीकडे ठिकाणावर नाहीं त्यांतून आमच्या मातोश्री नुकत्याच वारल्यानं थोडा बखेडाच झाला. आणि ही संधी साधून मेवाडकरांनीं उचल केली. मला गंमत वाटती तुमच्या त्या जयचंदाची गुलाम चार दिवस इथं राहिला काय न् शेवटीं असं फसवलं त्यानं ? "

" तो पाजी !—अगदीं हरामखोर—" अबदुलखान चिडून ह्मणाला " त्यानें मला चांगलेंच तोंडघशी पाडिलें. मेवाडचे लोक इतके बदमाश असतील, अशी मला कल्पना नव्हती "

आतां खरें सांगू खानसाहेब— " मोहबतखान डोळे मिचकावीत म्हणाला, " जयचंदापेक्षां त्याची बायको मोठी मिस्किल आहे. त्या लेकावर तिचें फार वजन. तिनेंच त्यास बिनसायला लावलें. अगदीं मी तुह्माला खास सांगतों. "

" कुणाला ठाऊक कोण पक्के बदमाश आहे ते. माझी अनु जाण्याची वेळ आली आहे खरी बादशाहांना हें सर्व कळलें तर केलेल्या नोकरीवर माती पडली ह्मणून समजा. "

" झालं तें वाईटच झालं " मोहबतखान गंभीरतेनें ह्मणाला. " आतां मला का बोलावलं होतंत तें सांगा. माझा कांहीं उपयोग होण्यासारखा असेल तर तसें सांगा— "

" मी तुह्माला बोलावलं ह्मणचे तुमच्या बापाभावाचा ह्या संबंध आहे तेव्हां तुह्माला यांतील अंतली कांहीं हकीगत माहीत असली तर विचारावी ह्मणून बोलावणें केलं—"

" मग मला तुमची मोठी निराशा करावी लागणार !—कारण मला त्याचे कांहींच माहीत नाहीं. मी मुसलमान झाल्यापासून त्यांचा आमचा कसलाच संबंध राहिलेला नाहीं. "

अर्थात या उत्तराने अबदुलखानाची आणखी निराशा झाली

बराच वेळ कोणीच बोललें नाहीं.

इतक्यांत मोहबतखानास एका गोष्टीचें स्मरण झालें व तो एकदम ह्मणाला, " खानसाहेब, फिकीर नका करूं. मवाडकरांची नांगी आपल्या हातांत आहे."

अबदुलखानानें आपली गति थांबवून मुरडून विचारिलें, " ते कसं काय ? "

" ठाकूर ईसरसिंग तुमच्या ताब्यांत आहे. त्याचा यावेळीं उपयोग करून घ्या."

" खरंच यार " अबदुलखान एकदम आनंदून म्हणाला, ' ही गोष्ट माझ्या लक्षांतच नव्हती. पाहिलंत तुमच्या येण्याचा हा असा उपयोग झाला. बरोबर. यावेळीं त्याच्या कैदेपणाचा उपयोग झाल्यास पाहिलें पाहिजे."

" पाहिलें पाहिजे कशाला ? —झालाच पाहिजे."

" नाहीं रे मोहबत, तूं समजतोस तितकें तें काम सोपें नाही. " अबदुलखान निराशेनें म्हणाला, " तो म्हातारा ठाकुर मोठा हेकड आहे लेकाचा. त्याला धरून आणिल्यापासून आपल्याकडे वळविण्याची मी काय कमी खटपट केली म्हणतोस ?—पण कांहीं उपयोग झाला नाहीं. "

' पाहूं. आतां कांहीं महिने त्यानें बंदिवास भोगला आहे. कदाचित् आतां तो नरमला असेल. त्यांतून त्यानें नाहींच ऐकलें तर आंणखी कांहीं

तोंड काढूं. " असें म्हणून त्यानें ठाकुरसाहेबांस सुटकेची आशा दाखवून कसें वळवितां येईल व नंतर मेवाडकरांची चळवळ जागचेजागीं कशी दाबतां येईल याचें सरस वर्णन केलें. अबदुलखानासही तें पटलें. दोघांचाही त्या गोष्टीवर बराच खल झाला.

नंतर अबदुलखान म्हणाला, " मग दोस्त, आतां असें कर. तूंच आतां ही कामगिरी पत्कर. माझ्याकरितां म्हणून एवढें करच. मला पाहिल्या बरोबर तो चिडल्याप्रमाणें करील. तेव्हां माझ्या ऐवजीं तूंच जाऊन हें काम कर. काम फत्ते झालें तर मी हे उपकार विसरणार नाहीं. "

मोहबतखानानें तें कबूल केलें व तो तेथून उठला

नंतर त्याचदिवशीं तो ठाकुरसाहेबांस भेटण्यास म्हणून गेला !

पण तेथें त्यास काय आढळलें ? ठाकुरसाहेबांऐवजीं फर्जंदबेग त्याच्या पुढें येऊन उभा राहिला ! हा चमत्कार पाहून मोहबतखान डोळे वासून व तोंड फाडून पाहातच राहिला. तो दाढी पकडून आश्चर्यानें म्हणाला, " या अल्ला !—ठाकुरसाहेब कुठें आहेत ? "

फर्जंदबेग गालांतल्या गालांत हंसून म्हणाला, " ठाकुरसाहेब ? कोण ठाकुरसाहेब ? "

" साळुंब्र्याचे ठाकुर—"

" ते ?—मेवाडांत आहेत ! त्यांना इथून निघून गेल्यास जवळ जवळ दोन महिने होत आले. " फर्जंदबेगानें शांतपणें उत्तर दिलें.

मोहबतखानास सर्व उलगडा पडला ! ठाकुरसाहेब कारस्थान लढवून पलायन केल्याचें त्याच्या लक्षांत आलें ! पण त्यांस मदत कोणी केली ? फर्जंदबेगानें ?—काय म्हणून ? आणि ती केव्हां कशी ?—तो अगदीं खुळा झाला.

तेथून तो निघाला तो धापा टाकीतच अबदुलखानाकडे आला. त्याला ती वार्ता कळतांच तो आश्चर्यानें बेशुद्ध होण्याची वेळ आली.

दोघेही चवताळलेल्या जनावरांप्रमाणें इकडे तिकडे फिरूं लागल मध्येंच मोहबतखानाच्या अंतश्चक्षूपुढें हसीना व मानसिंगाची जोडी चमकली त्याबरोबर तो चेकाळून म्हणाला, "खानसाहेब !—खानसाहेब ! ! ही स मानसिंगाची बदनामी आहे. हा कारटा आपल्या बादशहाशीं बेइमान झाला !"

त्याच्या आंतरिक विचाराशीं अबदुलखान अगदीच अपरिचि असल्यामुळें त्यास त्याच्या चेकाळण्याचें थोडेसें नवलच वाटलें. त्यानें चपा पून विचारलें, "तें कसें काय ?"

तसेंच एक मोठें रहस्य त्यांत आहे. पण थांबा अं—आतां मल मागची एकेक गोष्ट आठवते आहे—अगदीं मानसिंगाचा यांत हात आ यांत शंकाच नको— " एवढें बोलून तो कांहीं विचारांत पडला. अबदुलखा त्याच्या मुद्रेकडे उत्सुकतेनें पाहात राहिला.

पण अनेक विचारामुळें मोहबतखानाच्या मनाचा असा कांहीं गोंधळ झाला कीं, त्याला पुढें काय बोलावें हेंच सुचेना, म्हणून तो खानास म्हणाल "छे ! मला यावेळीं कांहींच सुचेनासें झालें आहे. खानसाहेब आतां मं जातों उद्यां मी पुनः फर्जंदबेगजी कडे जाऊन सर्व गोष्टींचा उलगडा करून घेतों. मेवाडकरांना आपण फारवेळ वाचूं देत नाहीं, हें खास समजा. जातोच आतां " असें म्हणून त्यानें त्याची रजा घेतली. अबदुलखानाला त्य जाण्याचा कांहींच अर्थ कळला नाहीं. असो.

मोहबतखान घरीं आला. आणि स्वस्थ एकांतांत बसून त्यानें पुन एकवार सर्व गोष्टीचें पर्यालोचन केलें. ठाकुरसाहेबांची सुटका होण्यांत मान सिंगाचा हात खास आहे हें तर त्यास नक्की वाटलें जयश्रीशीं त्याच्या जो प्रसंग घडला होता त्यावरून तिनेंही या कार्यी कांहीं हातभार लावला असावा अशी त्यास शंका आली; परंतु या कारस्थानांत फर्जंदबेग कसा गुंतला गेला ? हें कोडें कांहीं त्यास सुटेना हसीनेचें मानसिंगावर प्रेम त्यास ठाकुरसाहेबांची सुटका करण्याचें अभिष्ट तेव्हां आपल्या लाडक्य

जल्वयाचें कोड पुरविण्याकरितां तर फर्जंदबेगानें आपला गळा असा अडक-वून घेतला नसेल ? पण ही कल्पना मनाला पटेना. अगोदर मानसिंगानें आपल्या जावईपदाचा हक्क उपटला आहे, हें फर्जंदबेगास माहीत असेल कीं नसेल याचीच शंका ! बरें, माहीत असेल तर त्यास ही संबंध रुचणें शक्य कसें आहे ?

असे अनेक विचार करून त्यानें हें रहस्य सोडविण्याचा प्रयत्न केला; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. दोन गोष्टी त्याच्या कल्पनेच्या आटोक्याबाहेर राहिला. पहिली—मानसिंगानें ठाकुरसाहेबांच्या सुटकेकरितां इतकें कारस्थान कां लढवावें आणि फर्जंदबेगानें त्यांत इतकी मदत का करावी !

शेवटीं तो या विचारास कंटाळला व त्यानें याच गोष्टीकडे स्वार्थाच्या दृष्टीने पाहण्यास सुरवात केली. हसीनेचे पुढें काय झालें, हे त्यास नक्की कळलें नव्हतें. फर्जंदबेग तिला घेऊन गेला अशी एक बातमी त्याच्या कानीं आली होती; पण तो फटिंग तिला घेऊन कुठं जाणार ? अशी त्यास शंका आली होती. तेव्हा आतां त्याचे डोक्यांत असा विचार आला: फर्जंद-बेगाला प्राणदंडाचे भय घालून व मला हसीनेला देत असल्यास तर सुटका करितो असे सुचवून आपली इच्छा पूर्ण होते कीं काय पाहावे ? यावेळीं फर्जंदबेग आपल्या तडाक्यांत चांगला सांपडला आहे. त्यास आपली इच्छा नाकबूल केली तर त्याने केलेल्या अपराधाची आग भडकावून देऊन त्यांत त्यास भाजून काढतां येईल आणि आपल्या अपमानाचा सूड सव्याज भरून काढतां येईल.

रात्रभर त्याने याच गोष्टीचा विचार केला. नंतर दुसरे दिवशीं सकाळींच प्रातर्विधि आटोपतांच तो फर्जंदबेगाकडे गेला. या वेळ पर्यंत त्याने ठाकुरसाहेब निघून गेल्याची बातमी बाहेर मुळींच फोडली नव्हती. त्यामुळे अजबखान अद्यापिही आपल्याच तंद्रीत होता.

मोहबतखाला पुनः आपल्याकडे आलेला पाहतांच फर्जंदबेगानें आज हा आपल्याकडे कांहीं हेतूनें आला आहे, असें ताडलें. पण त्यास त्याचें

मुळीसुद्धां धास्ती वाटली नाहीं. मेहरुन्निसा उर्फ नूरजहान हिच्या वचनावर त्याचा पूर्ण विश्वास असल्यामुळें, ठाकुरसाहेबांची सुटका करण्यांत आपला केवढाही घोर अपराध असला तरी आपल्यास माफी मिळेल, अशी त्याची खात्री होती. मग तो मोहबतखानाच्या आगमनाला काय ह्मणून भीक घालेल!

मोहबतखानानें बोलण्यास प्रारंभ केला. त्यानें वळणावळणानें बोलणें काढून त्याचा घोर अपराध व त्याचा भयंकर परिणाम समजून सांगण्यास प्रारंभ केला. फर्जंदबेगानें कांहींवेळ त्याचें बोलणें सस्मित मुद्रेनें ऐकून घेतलें आणि नंतर एकदम प्रश्न केला, " मग तुमचें ह्मणणें काय आहे यावर ? "

त्याचा तो प्रश्न विचारण्याचा ढंगच असा कांहीं तिरस्कार व्यंजक होता कीं, मोहबतखानाची अक्कल चक्रावली ! फर्जंदबेग आतां तरी वळणावर येईल, अशी त्याची किंना तरी आशा होती; परंतु फर्जंदबेगच्या वरील प्रश्नानें ती जागचेजागीं वितळून गेली ! तेव्हां मोहबतखानानें कांहींसें चिडून ह्मटलें, " तुमची ही घमेंड फारवेळ टिकायची नाहीं अं !

" पण तुला का त्याची एवढी काळजी ? फर्जंदबेगानें एकदम एकेरीवर येऊन ह्मटलें, " मी तुला निरोप का पाठविला होता कीं, माझ्या मृत्यूचा विचार कर ह्मणून ! "

मोहबतखान मिशीवर पीळ देत ह्मणाला, " ठीक आहे पुनः तूं माझा अपमान केलास पाहतों आतां तूं या संकटांतून कसा सुटतोस ? "

" पहाच तूं. जा—तुला काय करावयाचें असेल तें कर जा—हें बघ तुझ्या नाकावर टिचून मी तुझ्या समोर निघून जाईन पाहाच पाहिजे तर. "

कांहींतरी अपमान करावा या हेतूनें मोहबतखानानें ह्मटलें, " तुझी हमेशा कुणाच्या गळ्यांत पडली आहे, माहीत आहे का तुला ? "

" तेंही मी तुला विचारायला आलों नाहीं. कुत्र्याला ठोकर मारली कीं, तें केकावत जातें त्याचप्रमाणें तूं कांहीं तरी वेडेंवाकडें वरळून माझ्या

मनाला खेद होईल, असं बोलणार असशील; पण तें ऐकण्याची माझी इच्छा नाहीं, समजलास जाव—

\+ + + +

फर्जदबेगला कांहीं तरी जबर शासन व्हावें म्हणून मोहबतखानानें अगदीं शिकस्त केली. बादशाहाजवळ त्यानें खूप खटपट केली; पण त्या फकीराचाच वशीला मोठा राहिला. नूरजहाननें स्पष्ट सांगितलें माझा शब्द अडकला आहे आणि तो पार पडलाच पाहिजे. फर्जदबेगचीची सुटका झाली पाहिजे ते कोणी असोत आणि त्यांनीं कसलाही कसूर केला असो.

जहांगीरास हे शब्द मोडणं शक्य नव्हतं त्यानें दिलगीर दाखवीत मोहबतखानास म्हटलें, " दोस्त, नाइलाज आहे नूरजहानचा मी बंदा गुलाम आहे. "

मोहबतखानानें अत्यंत तिरस्कारानें नूरजहानकडे पाहिलं व तिनेंही पण तशाच दृष्टीनें त्याच्याकडे पाहून आपला ओठ चावला !

नूरजहान व मोहबतखान याच्या अदावतीचा हाच प्रारंभ होय या त्याच्या द्वेशामुळें पुढें केवढी कारस्थानें घडलीं, याची साक्ष इतिहास देईल. आमच्या कादंबरीचा तो विषय नसल्यामुळें आम्ही फर्जदबेगाची मात्र शेवटीं सुटका झाली एवढें सांगतों.



# परिच्छेद ५५ वा.

## जागा झालेला मेवाड.



फ. जंदबेगाचा वशीला दांडगा पडल्यामुळें तो मुकाट्यानें सुटला न शिवाय ठाकूर साहेबांची सुटका व नाजुमीचें प्रकरण या सर्व भानगडी फजिती होण्या सारख्या असल्यामुळें त्याही आंतल्याआंत दडपून टाकण्यांत आल्या! आग्र्यांतील बहुतेक लोकांना नाजुमीच रहस्य शेवटपर्यंत उलगडलें नाहीं. कित्येक लोक तरी नाजुमी एकाएकीं कुठें नाहींशी झ ली या बद्दल खेद करीत होते.

हे सर्व ठीक झालें; पण जाग्या झालेल्या मेवाडला जागच्या जागीं कसा ठेंचायचा हा प्रश्न कांहीं सहज सुटण्यासारखा नव्हता. बादशहापासून शेवटच्या सल्लागार मंत्र्यापर्यंत सर्वांनीं डोकीं खाजवलीं. शेवटीं अबदुलखान व मोहबतखान यांच्या हातीच मोठी फौज देऊन त्यांस तिकड रवाना करण्यांत आलें. त्यावेळीं त्या दोन्ही सरदारांनीं एकमेकांस उत्साह दिला.

मोहबतखान ह्मणाले, 'खानसाहेब, तुह्मी कांही काळजी करूं नका. जयचंद आज बेइमान झाला असला तरी त्याच्या मूर्खपणानें आपणास मेवाडचीं पुष्कळ बिंगे कळलीं आहेत' त्या त्या ठिकाणीं आपण घाव घालू ह्मणजे झालें."

"ते तर यार, करायचेंच. जयचंदाचा बाप आणखी कोणीही भेटेल. पैसा, मानमरातब आणि औरत यांचा मोह सगळ्यांना आहे. या फासावर आपण वाटेल तो मासा पकडूं. आमचा जयचंद तरी काय? बायकोच्या मुठींत असल्यामुळेंच आमच्या मुठींतून निसटला,"

" त्याची बायको मोठी बदमाष आहे. तिनेंच हा सर्व डाव उलथून पाडला आहे. त्यांत हा ठाकुर सुद्दन गेला. मोठा घोटाळाच झाला तो !"

" मला सर्वांत आश्चर्य वाटतें मानसिंगाचें. हा लेकाचा नेभळट. याला हें वेड कोठून आलें ? त्याला अनेक गोष्टी सहजीं माहीत असल्यामुळें शत्रूला त्याचें मोठें सहाय्य होणार आहे."

" तें एक मोठें कोडेंच आहे.—पण कायहो खानसाहेब--" मोहबतखान अगदीं जणूं काय सहजीं प्रश्न आठवल्याप्रमाणें करून ह्मणाला, " मी एक प्रश्न विचारतों, त्याचा राग मानूं नका; पण तुमची भाची गुलेहसीन कुठें आहे ?"

अबदुलखानाची मुद्रा एकदम बदलली. ह्मणजे त्यास त्या प्रश्नाचा मोठा राग आला असें नाहीं त्याला तो विषय नको होता. ह्मणून तो ह्मणाला, " मला सुद्धां नक्की माहीत नाहीं मला कळली ती बातमी अशी आहे. ती जयचंद्राचे घरीं त्याच्या बायकोजवळ असावी."

" नाहीं खानसाहेब,—" मोहबतखान एकदम ह्मणाला, " ती जयचंद्राचेकडे नाहीं. ती आहे आमच्या मानसिंगाजवळ ! पाहतां काय तोंडाकडं ?—या आमच्या नेभळटानें तुमच्या जनानाच्या टाळा तोडून आपला इष्क तिथं जोडला होता. मानसिंगाचें व हसीनेचें प्रेम जमलें होतें!"

जोशांत येऊन मोहबतखान ही गोष्ट सहज बोलून गेला. परंतु त्यामुळें अबदुलखान चांगलाच सरदला ! त्यानें विचारिलें, " ही गोष्ट फर्जंदबेगजी जाणतात ?"

" तें मला नक्की माहीत नाहीं बोवा."

खान गप्प बसला. त्याला ती गोष्ट असह्य वाटली. कोणत्याहि मुसलमानास आपल्या जातीची स्त्री हिंदुच्या गळ्यांत पडल्यास असेंच वाटेल.

मोहबतखानानें तरी ही बातमी नक्की माहीत असल्यामुळें कशी सांगि

तरी. त्याला तसें कांहीं कळलें होतें का ?—नाहीं. त्याचा तो अदमास होता. पण मानसिंग इत्यादिविषयीं गोष्टी निघतांच त्याच्या मनांत सतत घोळत असलेली ती गोष्ट सहजीं बाहेर पडली !

कसेंही असो अबदुल्लखानानें पुन: हा विषय मजजवळ काढूं नका. असें त्यास बजावलें व त्यानेंही तें मुकाट्यानें मान्य केलें. पण त्यानें मात्र आपल्या मनांतून ती अजिबात काढून टाकली नाहीं. त्यास अद्यापिही असें वाटत होतें कीं, " तें जोडपें या लढाईच्या भानगडींत जर आपल्या हातीं पडेल तर काय बहार होईल ? "

* ❀ ❀ *

हा वेळ पर्यंत मेवाडनें काय केलें ? त्यानें त्यास मिळालेल्या संधीचा फायदा घेतला कीं नाहीं ?

होय. अलबत् घेतला आणि तो चांगलाच घेतला. चितोडगड हातीं पडतांच त्यांनीं चारी दिशेस मोंगलांच्या हद्दीपुढें ढकलण्यास जोराचा प्रारंभ केला ! अल्पावधींतच सुमारें चाळीस किल्ले आणि त्याच्या भोंवतालचा मुलूख त्यांनीं व्यापिला आणि तेथील सरदारांना सन्मानानें वागवून त्यांचें मित्रत्व जोडलें ! प्रतापानंतर मेवाडनें जी एक तप झोंप घेतली; तिचा कडता तिनें अशा प्रकारें काढिला. सर्वांनाच त्याचें मोठें कौतुक वाटलें आणि मोठा आनंद झाला !

इतक्यांत मोंगलांच्या फौजा येऊन धडकल्या ! मेवाडकरांना जास्तच चेव आला ! आतांपर्यंत त्यांचा विजय झाला तरी तो एकतर्फी होता. त्यामुळें मोंगलांना तोंड देऊन त्यांचा पुरता मोड करण्यांतच खरा विजय आहे हें त्यांनीं जाणिलें.

इकडे मोंगलांनाही मेवाडकरांनीं हस्तगत केलेल्या प्रदेशाकडे पाहून

आश्चर्य वाटलें व रागही आला ! शेवटीं त्याच त्वेषांत दोन्ही पक्षाकडील फौजा परस्परांच्या हद्दींत घुसल्या व चौफेर युद्धाची आग पेटली !

यावेळीं सर्वात मोठी लढाई दिवेर मुक्कामीं झाली ! या रणांगणीं मेवाडच्या रजपुतांनीं केवळ आपल्या शौर्यावर मोंगलांचा पुरता पराभव केला ! अबदुलखानाच्या सैन्याची अगदीं दाणादाण उडाली !

विजयानें मेवाडकर अगदीं बेफाम झाले ! त्यांनीं याचा मुळींच विचार केला नाहीं कीं, हा विजय आपणास कितपत महाग पडला ! त्याचा त्यांनीं वेळींच विचार केला असता तर ? परंतु तसें झालें नाहीं. रजपूत शूर होते राजकारणपटू नव्हते ! धैर्यशील होते— विचारी नव्हते ! त्यामुळें दिवेरच्या लढाईत त्यांना विजय मिळाला असला तरी त्यांचें मनुष्यबळ फार कमी झालें ! मोठमोठे सरदार कामीं आले ! अनेक शूर तरुण केवळ अविचारी पराक्रम करण्याच्या भरांत मृत्युमुखीं पडले ! रजपुतांचा शेवटीं पाडाव झाला, त्याची मुख्य गोम या अविचारी शौर्यांत होती !

मोहबतखान मात्र अद्यापिही दुसरीकडे गमिनीकाव्यानें लढत होता व म्हणूनच तग धरून होता. त्याचें खरें लक्ष्य लढण्यापेक्षां मानसिंगाचा पत्ता काढण्याकडे व विजयापेक्षां हसीनेला हस्तगत करण्याकडे होतें.

दिवेर मुक्कामीं अबदुलखानाचा पराभव झाल्याचें त्यास समजलें. तेव्हां तो त्याच्या मदतीस आला दोघांची मसलत ठरली त्यांनीं एकीकडे आग्रास मदतीकरितां निरोप पाठविला आणि इकडे उन्मत्त रजपुतांना तहाच्या नादावर झुलत ठेवलें ! शत्रु शरण आला कीं मिशीला पीळ देत स्वस्थ बसायचें आणि पिढीजाद औदार्य पुढें चालवायाचें हें या खुळ्या शूर जातीचें ब्रीदच होतें. परंतु शत्रूच्या वर्तनांत सत्यता किती आहे, याचा विचार कधींच करावयाचा नाहीं हा वेडेपणा या वेळींही झाला.

या नंतर आठदिवसाच्या आंतच अबदुलखानास पुन: मदत येऊन

पोंचली. तहाचें फिसकटलें आणि पुनः राणपूर नामक मुक्कामीं तुंबळ युद्ध झालें ! या युद्धांतही रजपुतांनीं अपल्या शौर्याची अगदीं कमाल केली ! अबदुलखानास अगदीं देमाय धरणीं ठाय झालें !

पुनः अबदुलखानाचा पुरता मोड झाला.

पण या वेळीही भयंकर नुकसान रजपुतांचेंच झालें या युद्धांत कोण कोण लोक पडले याची एक त्रोटक यादी इतिहासांत दिली आहे ती येथें देतों.

... ..., देवगढचा ठाकुर दुधो संगावत, नारायणदास, सुरजमल, यशकर्ण, सिसोदिया पैकीं सर्व मुख्य सरदार, भाणाचा मुलगा, सूक्तावतांचा मुख्य सरदार पूर्णमक, हरिदास राठोड व सादीचा भोपट झाला, कहिरदास कच्छवाह, वेडला येथील केवावदास चव्हाण, मुकुंददास राठोड, आणि जयमल, ( जयचंदाचे ) याचे वंशांतील पुरुष हे वीर मुख्य होते या लढाईत इतके मोठमोठे शूर मरून शेवटीं जय मिळाल्यामुळें मेवाडकरांना शोकांतही आनंद झाला. या जयाची किर्ती फार पसरून मेवाडचा पतनकाळ सर्व नष्ट होत चालला असें मानण्यास लोकांना दम आला व सर्व गोंदवाड प्रांतांत महाराणा उमरावसिंग याचें निशाण फडकूं लागलें !"

वरील यादीवरून असें स्पष्ट दिसतें की, मेवाडनें अपल्या काळजाचें रक्त मांस देऊन हा विजय मिळविला होता वास्तविक यावेळीं त्यांनीं आपले हातपाय आंखडते घेउन मिळालेला जय पचनीं कसा पडेल या गोष्टीकडे लक्ष्य द्यावयास पाहिजे होतें. परंतु त्याबद्दल ते बेफिकीरच राहिले. आपले हजारों शूर मेले म्हणून काय झालें ? शेवटीं विजयश्रीनें आपणासच माळ घातली कीं नाहीं ? याच घमेंडींत ते राहिले आणि त्याचाच परिणाम पुढें—पण तो विषय '**संधिकालांत**' येत नाहीं.

बिचाऱ्या मेवाडकरांना काय माहीत कीं आपले आतांचे विजय म्हणजे पुढें पडणाऱ्या काळरात्रीच्या संधिकालाची मनोहर छटा आहे म्हणून !

विजयाच्या धुंदींत रजपुतांना आपलें पुढचें मरण दिसलें नाहीं; परंतु अबदुलखानानें ते पळतां पळतां हेरलों व जरी त्यावेळीं त्याच मन दुःखी राहिलें तरी पुढच्या लढाईंत आपण खास फत्ते पावूं अशी त्यानें हिंमत धरली.

यावेळीं मोहोबतखान दुसरीकडेच होता. त्याचें मुख्य लक्ष्य कोणा-कडे होते, हे वाचकांना माहीत आहेच शेवटीं त्याच्या तपस्येचें फळ त्याला मिळालें. तो ज्या चौकशींत होता ती त्यास अचुक मिळाली त्या बरोबर त्यानें परिस्थितीकडे लक्ष्य न देतां तिकडे धावा केला.

इतर ठिकाणीं किरकोळ लढाया चालू होत्याच कुठं कुठं मेवाडकरांचा पराभव होत होता; परंतु दोन्ही पक्षाच्या फौजा सगळीकडे पांगल्यामुळें कोणाची कोणाला दाद नव्हती. थोड्याच निकराची अशी झटापट बहि-राम गडावर सुरू होती.



# परिच्छेद ५६ वा.

## विधिलिखित असें होतें !



पण या गडबडींत जयश्री जयचंद हें जोडपें कोठें होतें ? त्याचें असें झालें होतें. ठाकुर ईसरसिंगजीची इच्छा जयचंदानें उदेपुरीं राहून राज्यकारभार पाहावा आणि जयश्रीनें त्याचे जवळ राहून त्याच्यावर पाळत ठेवावी, अशी होती. अर्थात् ही गोष्ट त्या जोडप्यास रुचणार हे ते जाणून होते; परंतु त्यांनीं जयचंदाची कींव न करितां जयश्रीस बजावलें होतें. " जयचंदाविषयीं मला काडी इतकाही विश्वास वाटत नाहीं. तो केव्हां काय घोटाळा घालील याचा काय नेम सांगावा ? व्यक्तीच्या सुखा करितां समाजाचें सुख पायांतळीं तुडविणाऱ्या मनुष्यास समाजकार्यांत कां घ्यावें ?—तेव्हां त्यानें इथें उदेपुरीं रहावें आणि तूं त्यास शत्रूशीं संगनमत करूं देऊं नयेस. हेंच उक्त आहे. हें माझें म्हणणें जयचंद न ऐकेल तर त्याचा घोर अपराध सर्व जगापुढें मला मांडणें भाग पडेल. नीट विचार करून काय तें ठरवा. माझा निश्चय मात्र बदलणार नाहीं."

यावर जयश्रीनें ह्मटलें, " ह्मणजे ही आमच्या कर्माची आह्माला शिक्षाच आहे ह्मणायची. पण ही किती दिवसाकरितां आहे ? मेवाडकरितां झुंजण्याची आम्हांला यापुढें केव्हांच परवानगी मिळणार नाहीं कां ?"

" निदान चितोडगड हस्तगत होईपर्यंत तरी नाहीं. आमची मुख्य अपेक्षा पूर्ण झाली. प्रतापाच्या अंतिम इच्छेप्रमाणें बाप्पा रावळ वंशाचें मुख्य पीठ आमच्या ताब्यांत आल्यावर पाहूं."

जयश्रीनें हें मान्य केलें. जयचंद निष्प्रय झाला असल्यामुळें तो कांहींच बोलला नाहीं. त्याच्या एकंदर कारस्थानाचें जें चमत्कारिक पर्या-

दसान झालें; त्यामुळें त्याचें मन इतकें खंत पावलें होतें कीं, त्यास आतांचें हें उदास जीवनही नको होतें. असो.

हें जोडपें या कारणामुळें उदेपुरीं येऊन राहिलें तर मानसिंग हसीनेचें जोडपें केवळ आपखुषीनेंच तेथेंच येऊन राहिलें.

सुम्राजीचें पत्र ठाकुर ईसरसिंगजीच्या हातांत आणून दिल्यानंतर आपण आपल्या मायदेशाच्या ऋणांतून मुक्त झालों असें मानसिंगास वाटलें तो तेवढ्यानेंच समाधान पावून हसीनेकडे चालता झाला आणि नंतर त्यानें कोणाची वास्तपुस्त केली नाहीं आणि त्यालाही पण कोणी आतां तूं अमूक कर असें ह्मटलें नाहीं.

नंतर युद्धाचा वणवा पेटला. त्या वेळीं आत्मरक्षणार्थ तो उदेपुरीं येऊन राहिला. मात्र अशी ही दोन्हीं जोडपीं एका गांवीं ह्मणून त्यांचें संघट्टन चालू राहिलें, असें झालें नाहीं. हसीना जयश्रीकडे जाण्यायेण्यास उत्सुक होती; परंतु आतां त्या साध्वीचें पूर्ण स्वरूप राहिलें नसल्यामुळें तिला अलीकडे कांहींच रुचेनासें झालें होतें. तात्पर्य, उदेपुरीं येऊनही मानसिंग हसीनचें जोडपें एकलकोंडें राहिलें. पण या आयुष्याचा त्या उभयतांनाही लौकरच कंटाळा आला आणि पुढें काय हा प्रश्न त्यांच्यापुढें उभा राहिला.

युद्धाची धामधूम वाढत चालली. रजपुतांचा जय आणि जयाबरोबर प्रदेश मिळत गेल्यामुळें मेवाडांत जिकडे तिकडे आनंद व उत्साह पसरत चालला. जयश्री जयचंदांसही ही परिस्थिति थोडी बहुत सुखाचीच झाली पण मानसिंग हसीनेला मात्र त्या वार्तांचा आनंद उपभोगितां येई ना. हसीनेला त्या विजयांचें महत्व कळणें शक्य नव्हतें आणि मानसिंगास त्यांत स्वतःचा भाग नसल्यामुळें आनंद वाटेना यामुळें दोघेही दुःखांत राहिलीं.

मानसिंगास सारखें वाटूं लागलें आपल्या वयाचे अनेकानेक तरुण मेवाडच्या मुक्ततेकरितां रणांगणी गेले, हौसेनें गेले, आपलीं माणसें मागें टाकून गेले, पण आपण मात्र केवळ या यवनीच्या प्रेमांत फसून नामर्द

होऊन बसलों आहों. जे यु[illegible] विजय मिळवितील त्यांची किर्ति होईल समाजांत. त्यांचा मानमरातब वाढेल आणि फत्तेची लूट मिळवून ते मिरवीत घरीं येतील त्यावेळीं त्यांच्या मातापित्यांना, पत्नीला, आप्तेष्टांना किती आनंद वाटेल किती प्रेमानें ती सर्व माणसें त्यांचे स्वागत करतील!— तसें सौख्य तो मात्र आपल्या कपाळीं आहे का ? अरेरे मी काय करूं बरें या वेळीं ?

अशा प्रतींच्या विचारांनीं तो अगदीं पिसाळून गेल्यावर तो स्वतःचेंच समाधान करण्याकरितां निराशेनें म्हणे. अरे पण वेड्या मानसिंगा ! तूं करणार तरी काय ? हसनेच्या रक्षणाची जबाबदारी तुझ्यावर नाहीं काय ? दुसरे अनेक तरुण आपआपलीं प्रिय माणसें मागें टाकून गेले खरे ; पण त्यांच्या मागें त्यांच्या माणसांना कोणी न कोणी आधार म्हणून आहेच. तसें हसीनेला कोणी आहे का ? तिच्या गोत्रापैकीं तर राहोच पण जातीचें माणूसही मेवाडांत मिळणें शक्य नाहीं. मग तिला मी कुणाच्या भरंशावर सोडून जाऊं ?—जयचंद नाहीं का घरींच बसून. कांहीं तरुणांना रणांगणीं काम आहे; पण कांहींना घरचींही महत्वाचीं कामें सांभाळावयाचीं आहेतच कीं ! तुला दुःख मानण्याचें काहीं कारणच नाहीं. हसीनेचा बाप मेवाडच्या कामीं आला आहे आणि त्या अनाथ तरुणीचा सांभाळ करण्याचें कार्य तुझ्यावर येऊन पडलें आहे, अर्थात तें पार पाडण्याकरितां झटण्यांतच तुझ्या जन्माचें आहे ! ”

या विचार सरणीनें त्याला तद्दपुरतें बरें वाटे; पण पुढें त्याच विचारांचें असमाधान होई. त्याचा आत्माराम त्यास म्हणे; आपल्यावर येऊन पडलेल्या कर्तव्याला तूं निष्कारण इतकें महत्व देतो आहेस. हसीनेचा सांभाळ करण्यांत परमार्थापेक्षां स्वार्थाचीच छटा जास्त आहे. तिचा व तुझा कांहीं लागावांधा नसतां निर्लोभ वृत्तीनें हें कार्य करण्याचें जर तुझ्या माथीं हें येऊन पडलें असतें तर तुझें कार्य खात्रीनें महत्वाचें होतें. समज—हसीना ही फर्जंदबेगाची मुलगी नसतां वृद्ध मातोश्री असती आणि मग तूं तिच्या संगोपनार्थ झटला असतास तर ते तुझं कार्य रणांगणावर शौर्य गाजविण्या इतकेंच मानाचें झालें असतें;

परंतु वस्तु स्थितींत तसें काय आहे ?–हसीना ही तुम्हां एक काम्य वस्तु आहे. अर्थात् तिला सोडण्याचें मनोधैर्य नाहीं. ही खरी गोष्ट, यांत स्वार्थत्याग मुळींसुद्धां नाहीं.

× × × × × ×

" मला माझ्या जीवनाचा आतां अगदीं कंटाळा आला आहे !" जयचंदानें निराशेनें म्हटलें.

हे त्याचे उद्गार अलीकडे वरचेवर निघत आणि ते ऐकून जयश्रीला अत्यंत खेद होई आणि आपल्या पतीविषयीं कींवही वाटे.

शेवटीं चितोडच्या लढाईचा विजय कानीं पडतांच तिनें ठाकुरसाहेबास पुढील निरोप एका विश्वासू नोकराबरोबर पाठविला. " आम्हाला झाली एवढी शिक्षा बस्स झाली. आतां आम्हाला मेवाडची कांहींतरी सेवा करूं द्या. आतां आमचा अंत पाहूं नका. त्यांच्याविषयीं मी आतां खात्री देतें. आतां आम्हाला असें निष्कार्य राहण्यापेक्षां मरणें बरें वाटूं लागलें आहे. "

कांहीं दिवसानंतर या निरोपाचें ठाकुरसाहेबाकडून उत्तर आलें तें अनुकूल होतेंच; पण त्यांत त्यांच्या नकळत एक खोंच येऊन गेली.

ठाकुरसाहेबांनीं सांगून धाडिलें होतें; बहिरामगडीं मोंगलांनीं आपला ताबा जमविला आहे तो गड व त्याच्या खालचा प्रदेश हस्तगत करण्याची कामगिरी तुम्हां दोघांवर सोंपविली आहे. सदर कार्य यशस्वी करून दाखविलें तर जयचंदावरील सर्व राग सोडून मी त्यास पुत्रवत लेखीन. "

जयश्रीनें ती वार्ता जयचंदास सांगतांच तो दचकला ! जो बहिरामगड त्यानें निमकहरामीनें हस्तगत केला होता; त्याचीच कामगिरी त्याजकडे; ठाकुरसाहेबांनीं येथेंही आपला सूड साधून घेतला अं !–पण खरें म्हणजे ठाकुरसाहेबांना तो संबंध कांहीं एक माहीत नव्हता. त्यांनीं सहज तें काम कळविलें होतें.

ज्या स्थानीं कष्टानें आपण आपल्या पत्नीला नेऊन पावबून विलासोपभोग घेतले त्याच स्थानीं युद्धार्थ जाण्याची ( पत्नीसह—कारण जयश्री बरोबर यावयाचीच ) जयचंदास पाळी यावी, याचें त्यास फार वाईट वाटलें. तिकडे जाण्याची त्याची अगदीं अनिच्छा दिसली; परंतु जयश्रीनें त्याची समजूत केली. ती म्हणाली, " मागचें आतां आपण सर्व विसरून जाऊं या. या स्वारींतून आपण परत येऊं असें मला वाटत नाहीं. मग झाल्या गेल्या गोष्टीची उगीच खंत का ? सर्व चिंता सोडा अन् कार्याला लागा.

शेवटीं जयचंदानें तिचें म्हणणें मान्य केलें. नंतर जयश्री आपल्या आजोळीं जाऊन आपल्या दोन्ही मुलांना भेटून व चंबेलीला तिथेंच ठेऊन परत आली आणि एके दिवशीं तें जोडपें आपल्या निवडक लोकांसह बहिरामगडीं निघालें !

* * * * *

आपल्या आयुष्याचें पुढें काय होणार हा प्रश्न हसीनेस आतां उद्भवला ! हा काळपर्यंत तिला एकंदर परिस्थितीचें कांहीं विशेष चिंतनीय स्वरूप वाटलें नाहीं. परंतु ज्यावेळीं मेवाडांत येऊन तिला कांहीं दिवस लोटले त्यावेळीं आपण अगदीं परक्या स्थानांत येऊन पडलों आहोंत. आपल्या जाती गोताचें येथें कोणी नाहीं. एका मानसिंगाखेरीज आपलें प्रेमाचें असें कोणी मनुष्य नाहीं, याची जाणीव तिला झाली; आणि त्याचा तिला केव्हां केव्हां थोडा थोडा खेदही होऊं लागला.

पुढें त्या जोडप्यास उदेपुरीं यावें लागलें. जिकडे तिकडे युद्धाची धामधूम सुरू झाली. त्यामुळें तिचें आंतरिक दुःख वाढलें. आतां तिला आपल्या प्रियाचें स्मरण होऊन त्याच्या सुरक्षिततेबद्दल काळजी वाटूं लागली.

कालांतरानें जयश्री जयचंदहो उदेपुरांतून निघून गेलीं. वास्तविक त्यांच्या संगतीचा त्यांना विशेष उपयोग होत होता असें नाहीं; तरी पण त्यांना तो एक आधार वाटत होता. तोही नाहींसा झाल्यावर त्या दोघांना फारच वाईट वाटलें.

युद्धास जातांना जयश्री हसीनेस भेटण्यास आली होती. त्यावेळीं तिनें हसीनेस मोठ्या खेदानें म्हटलें, " हसीन ! आमच्यामुळें तुम्ही अनाथ झाला. तुमची सुखसोय करण्याचें मला कांहींच साधलें नाहीं, याचें मला फारच वाईट वाटतें, परंतु काय करूं ? हो—माझं सगळंच नशीब फिरलं ! आज आतां मी शेवटचा निरोप घेण्यास आलें आहे. पुन: आपली भेट होईल, अशी मला मुळींच खात्री वाटत नाहीं, हसीन ! तुम्हाला दु:खांत आपून ठेवल्याबद्दल मला क्षमा करा. " असें अत्यंत दु:खानें म्हणून तिनें तिच्या गळ्यास मिठी मारली ! दोघीही खूपच रडल्या ! !

या दु:ख भेटीनंतर हसीना सदा उदासच राहूं लागली. तिला कशांत च गोडी वाटेना. बरं, मानसिंग तिला कांहीं धीर देऊन तिचें मन दुसरीकडे खेचून रमवील म्हणावें तर तेंही शक्य नव्हतें कारण त्याचें मन मुळांतच जनानी असल्यामुळें व त्यांत चमत्कारिक परिस्थितीची भर पडल्यामुळें तो स्वत:च रडका बनला होता ! हसीनेच्या स्थितीविषयीं त्यास खरोखरच वाईट वाटे केव्हां केव्हां तर तिच्या बरोबर तोही अश्रु ढाळे. त्यावेळीं हसीनाच आत्मसंयमन करून त्याचें शांतवन करी.

या स्थितींत असतां दोघेंही पुढें काय करावयाचें याचा विचार करीत तासचेतास एकमेकांपुढें बसून दु:खाचे सुस्कारे टाकीत घालवीत.

आपण एका परक्या ठिकाणीं असल्यामुळें आपणास चैन पडत नाहीं; पण आपल्या प्रियकराचें मन इतकें अस्वस्थ व चंचळ कां व्हावें याचें हसीनेला प्रथम कांहीं दिवस मोठें कोडें होतें. परंतु कांहीं दिवसाच्या सूक्ष्मावलोकनानें त्याचाही तिला उलगडा पडला. आजूबाजूचे तरुण लढाईवर गेले आपल्याला जातां येत नाहीं. कारण काय तर हसीना आपल्या गळ्यांत आहे या विचारानें मानसिंगास चैन पडत नाहीं. हें तिनें ओळखलें, अर्थात तीं स्थिती मग तिला बरी वाटेना. तिचें मानसिंगावर खरोखरीच प्रेम होतें. आपल्यामुळें आपल्या प्रियकराला त्रास व्हावा; हें कोणत्या तरुणीला रुचेल ?

एके दिवशीं तिनें आपल्या मनाचें हें दु:ख बोलून दाखविलें आणि

म्हटलें, बिगर माझ्यामुळें तुमचे हातपाय बांधल्या सारखे झाले आहेत नाहीं माझी धोंड गळ्यात नसती तर आपल्या पराक्रमानें भाग्याला चढण्याचा तुम्हाला केवढा तरी वाव होता परंतु मी आहे ना तुमच्या मार्गात " तिचा गळा भरून आला व ती हुंदके देऊं लागली.

मानसिंगानें तिला पोटाशीं धरून म्हटले, " छे छे हसीन ! या वेळीं तूं माझ्याजवळ असल्यानें मी कितीतरी सुखांत आहे. हसीन ! तुला माहीत नाहीं तुझी भेट जर झाली नसती तर मी आज जिवंतही राहिलों नसतों. "

" हें तुम्ही माझ्या समाधानाकरितां कांहीं तरी सांगतां आहां."

मानसिंगानें तिची पुष्कळ समजूत केली पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं हसीना आपल्या प्रियकराच्या मार्गांतून दूर व्हावें याचा विचार करूं लागली जीव देण्याचा, कोठेंतरी निघून जाण्याचा, इत्यादि विचार तिच्या मनांत आले व गेले.

शेवटीं रात्रीं बिछान्यावर पडल्या पडल्या तिला एका नवीन ऐकलेल्या गोष्टीची आठवण झाली रजपुतलोक लढाईवर जातांना आपल्या बायकांचा मोह मिटविण्याकरितां त्यांना मारून टाकून आपला मार्ग सुधारतात, तसें आपल्या प्रियकरानें कां बरें करूं नये ?

हा विचार मनांत येतांच ती उठून बसली तिनें मानसिंगास जागें केलें त्यालाहि म्हणजे गाढ झोप लागली होती अशातला भाग नाहीं तो तिच्या पहिल्याच हाकेला जागा झाला.

हसीनेची मुद्रा आनंदीत दिसत होती तिनें आपला उद्देश त्यास शांत मनानें कथन केला ! आणि तिनें त्याचीच तलवार नागवी करून त्याच्या कांपणाऱ्या हातांत दिली.

मानसिंगाच्या डोक्यांत ही कल्पना चुकूनही आली नसल्यामुळें हसीनेची ती धाडसी तयारी पाहून तो हक्काबक्का होऊन गेला. तो स्तंभित

होऊन चाचरत ह्मणाला, " मी तुझा प्राण घेऊं ? छट् ! भलतंच कांही तरी !--हसीन--"

" नका हो तुह्मी आतां माझा लोभ धरूं. त्यामध्यें कुणाचंच कल्याण नाहीं. "

" पण तुझा प्राण मी कां घेऊं न् कसा घेऊं ?

" कां बरं ? आतांपर्यंत पुष्कळ रजपुतांनीं असंच नाहीं कां केलं ?"

मानसिंगाच्या अंतःचक्षूपुढें पन्ना व त्याची तरुण पत्नी ही जोडी उभी राहिली !

हसीनेला मारून टाकणें आपलें कर्तव्य आहे का ? त्यास विचार पडला ! पण त्याचें हृदय त्या कृत्यास मुळीं सुद्धां मान्यता देईना !

त्यानें आपल्या समोर मरणाकरितां उभ्या असलेल्या सुंदर स्त्रीकडे पाहिलें !

हसीना ह्मणाली, " का ? तुह्माला इतका विचार का पडला ?-जिगर ! खरंच सांगा बरं माझा या जगांत काय उपयोग आहे ? "

मानसिंगानें आपल्या हातांतील तलवार टाकून दिली आणि तिला आलिंगन देत ह्मटलें " हसीने ! तूं माझी आहेस ! माझ्याकरितां तुला जगलें पाहिजे ! परमेश्वरानें तुझी माझी जी भेट घालून दिली आहे, ती काय, मी तुझा प्राण घेण्याकरितां ?--नाहीं हसीन ! आपण सुखानें राहूं ! तुला या स्थानीं चैन पडत नसेल, तर चल आपण हा देशच सोडून कोठें तरी दूर निघून जाऊं ! हसीन ! तूं जशी अनाथ आहेत, तसाच मीही अनाथ आहे ! तुला जसें दुःख सहन करवत नाहीं, तसेंच माझेंही आहे. हसीन ! मी पुरुष असलों तरी तुझ्या हृदया इतकंच माझं हृदय दुबळं आहे ! मला तुझ्या सारख्या तरुणीचीच जोड पाहिजे होती व आहे ! तूं मला सोडूं नकोस. मी तुला सोडीत नाहीं. चल ! आनंद विश्वाना ! आपण कोठं तरी दूर दूर जाऊं ! "

हसीनेचा मृत्युचा विचार डळमळला! तिला मानसिंगाचें म्हणणें पटलें-

त्याच प्रभातीं त्यांनीं प्रवासाची तयारी केली. आणि मागचा पुढचा काहीं विचार न करितां त्यांनीं उदेपूर सोडलें!

\+ + + + + × ·

बहिरामगडच्या हद्दींत जाऊन पोहचेपर्यंत जयचंदाचें मन कांहींसें उदासच राहिलें, परंतु तेथें गेल्यानंतर ज्यावेळीं लढाईला तोंड लागलें त्यावेळीं त्याचा पराक्रम आपोआपच जाग्रत झाला! तो आपल्या थोड्या लोकांनिशीं होता तरी धैर्यानें आणि चातुर्यानें लढल्यामुळें पहिल्याच दिवशीं बाजी त्याच्या कडची आली! जयश्री त्याच्या बरोबर सतत होती. तिला या गोष्टीचा फारच आनंद झाला. आणि तिची कळी खुललेली पाहून जयचंदासही समाधान वाटलें!

दुसरे दिवशी युद्धास निघतेवेळीं जयश्रीनें त्यास प्रेमालिंगन देऊन म्हटलें, "आपण जयश्रीचे जयचंद आहां यांत कांहीं मात्र शंका नाहीं. दुर्दैवानें मध्यंतरी आपणास अविचाराच्या केतूनें ग्रासलें होतें, परंतु तो काळ आतां राहिला नाहीं! नाथ! असाच पराक्रम करून मघला डाग पुसून टाका!"

जयचंदाचें हृदय भरून आलें. तो म्हणाला, "श्री! असें तुझें प्रेमालिंगन पुन: मला मिळेल, अशी माझी अपेक्षा नव्हती, परंतु तें भाग्य मला पुन: लाभलें! श्रीच्या एका आलिंगनाकरितां मी वाटेल तें साहस करीन! चल लाडके! प्राण देईन पण बहिरामगडावर सिसोदिया वंशाचें निशाण फडकावीन!"

दोघेही पतिपत्नी आनंदानें बाहेर पडलीं लोकांनीं त्यांच्या नांवाचा जयजयकार केला! लढाईस प्रारंभ झाला!

त्या दिवशींचें युद्ध खूपच शर्तीचें झालें, जयचंद अगदीं बेभान होऊन लढला आपल्या पतीचा पराक्रम पाहून जयश्रीस विलक्षण समाधान झालें. त्या दिवशींही मोगलांनाच हटावें लागलें.

आम्हाला या वेळीं थोडी जास्त मदत मिळेल तर काय बहार होईल जयचंदानें त्या रात्रीं पत्नीच्या मांडीवर डोकें ठेऊन विश्रांती घेत असता म्हटलें.

" मग ठाकुरसाहेबांना निरोप धाडूं का ?—धाडतें. चंबेळबाईंकडी एक मनुष्य पाठवितें. आपल्या चालू विजयाचा शेवट विजयांतच झाला पाहिजे. "

त्या प्रमाणें माणसें धाडली गेली !

राणपूरची लढाई ज्या दिवशीं झाली, त्याच दिवशीं जयचंदानें बहिरामगडाला वेढा दिला होता. पण यावेळीं त्याचेजवळ माणसें फार थोडी होतीं. त्यामुळें जयाचें पारडें फिरते की काय अशी त्यास मोठी धास्ती लागून राहिली होती. त्याच्या कर्तव्यतत्परतेनें सर्वस्वी प्रसन्न झालेली जयश्री त्यास सारखें उत्तेजन देत होती.

शेवटीं किल्ल्याच्या मुख्य दरवाज्यापर्यंत जाऊन तो भिडला !—खरोखर आतांपर्यंत सर्व कांहीं ठीक जुळलें होतें. परंतु आतां मनुष्यबळ फारच कमी झालें होतें ! गडांत शत्रू पक्षाकडे म्हणजे फार सैन्य होतें अशांतला भाग नाहीं; परंतु दरवाजा फोडण्याची व्यवस्था वेळींच झाली नाहीं तर मात्र जयचंदास निराश होऊन परत फिरणें भाग होतें आणि अशा स्थितींत परत फिरणें म्हणजे मिळविलेल्या विजयाचें उदक शत्रूच्या हातावर सोडण्यासारखेंच होतें !

मोठा चमत्कारिक प्रसंग ! अगदीं थोडक्याकरितां मोठ्या कार्याचा विचका होण्यांत होता.

दरवाजा फोडण्याकरितां हत्ती मागविण्यांत आले; परंतु दरवाज्यावर बसविलेले लोखंडी शूल त्या अजस्र प्राण्यांना कांहीं करूं देईनात. हत्तीनें एक दोन टक्करा घेतल्या; पण त्यामुळें त्यांचीं डोकीं चांगली चोंचून निघालीं ! मग मात्र ते चीं चीं करूं लागले !

फर्जंदबेगाची सुटका होतांच तो आपल्या कन्येच्या भेटीकरितां धावतच मेवाडांत आला ! पण आतां पूर्वीचा मेवाड राहिला नव्हता ! तरी त्यानें आपला कसा बसा आंत प्रवेश करून घेतला. पुढें तो चौकशी करीत करीत उदेपुरीं आला. हसीना मानसिंगाकडे राहात असे हें त्यास कळलें. ती गोष्ट त्यास रुचली नाहीं; परंतु तिची भेट होणें त्यास इष्टच होतें !

ज्या दिवशीं तो उदेपुरीं आला. त्याच्या आदलेच दिवशीं मानसिंग हसीना तेथून निघून गेलीं होतीं. तीं कोठें गेलीं असावी याची त्यानें कसून चौकशी केली; परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. त्यानें जयश्री जयचंदाकडे जाण्याचें योजिलें; दुःखी अंतःकरणानें त्यानें बहिरामगडाकडे आपला मोर्चा वळवला !

* * * * *

वैतागाच्या भरांत सौख्य शोधण्याकरितां मानसिंग हसीनेनें उदेपूर सोडलें; परंतु दुसऱ्या दिवशींच त्यांस त्या गोष्टीचा भयंकर पश्चात्ताप करण्याची वेळ आली. मोहबतखानाचीं माणसें त्यांच्याच शोधांत होतीं. त्यांना हें भक्ष्य अचूक सांपडलें !

लौकरच त्यांना नेऊन मोहबतखानापुढें उभें करण्यांत आलें. त्याच्या पुढें जाईपर्यंत मानसिंगास ही आपल्या भावाची कृपा आहे. हें कळलें नव्हतें. परंतु हें सत्य त्यास कळतांच त्यास सखेदाश्चर्य वाटलें व क्रोधही आला त्यानें त्या अत्याचाराचें कारण विचारतांच मोहबखान गंभीरपणें ह्मणाला, " तूं माझा भाऊ असलास तरी राजद्रोही आहेस. ह्मणून तुला पकडण्यांत आलें आहे. "

पण हें कारण खरें नव्हे. निदान मुख्य तरी नव्हे अशी मानसिंगाची खात्री होती.

त्याच दिवशीं त्या दोघांही प्रेमी जीवांची ताडातोड करण्यांत आली.

रात्रीं मोहबतखानानें मानसिंगाची मुकाट्यानें भेट घेतली. त्यानें आपल्या भावास ह्मटलें, " मान ! तुझें माझें वांकडें नाहीं. तं मला दखवलं

'नाहींस, हें खरें आहे, तरी पण माझ्या मार्गांत तूं कांटा आहेस. आणि तो कसा ना कसा दूर करण्याचा माझा विचार आहे."

" पुढें बोला. आणखी काय आपली इच्छा आहे."

" अरे वा! तुझ्यांतही बराच उर्मटपणा आहे तर?–असूं दे! तर नाहींसा करण्याचें माझ्या हातांत आहे!–मान, मेवाडला सहाय्य करण्यांत, तूं आमच्या बादशहांचा अपराधी आहेस आणि त्याची शिक्षा प्राण दंडाची आहे!–भ्यालास तूं—"

" ही तुमची कल्पना अगदीं खोटी आहे, तुह्मी ह्मणतां त्याप्रमाणें मी मेवाडला सहाय्य केलें आहे. हें मी नाकारीत नाहीं आणि मला त्याचा पश्चात्तापही पण होत नाहीं. अर्थात् मला त्याच्या प्रायश्चित्ताचें ही भय वाटत नाहीं.--"

" हेः! मारेकऱ्याची लपलपती तलवार पाहिली नाहींस तोंपर्यंत तुझ्या या वल्गना आहेत! मान, माझ्या कृपे खेरीज तुझा मृत्यु टळत नाहीं, ही खरी गोष्ट आहे."

" मग पुढें तुमचें काय ह्मणणें?" मानसिंगानें त्रासून विचारलें.

" माझ्या कृपेची याचना कर?" मोहबतखान गोंधळून ह्मणाला " माझ्या कृपेची याचना कर ह्मणजे तूं सुटशील."

मानसिंग घाबरला व त्यानें आपण होऊन ' मला वांचवा ' अशी करुणा भाकावी अशी फारच इच्छा होती; परंतु यावेळीं निदान जनानी मनाचा मानसिंग घाबरला नाहीं. तो तिरस्कानें हंसून ह्मणाला, " भावानें भावाच्या कृपेची याचना करण्याचें कारणच काय मुळीं? एक भाऊ संकटांत असतां दुसऱ्या भावानें त्याला सहाय्य करणें त्याचें कर्तव्य नाहीं का? त्यांतून मी तर तुमचा लहान भाऊ आहे. मी तुमचा कांहीं अपराध केला नाहीं, असें तुह्मीच आपल्या तोंडानें बोलतां आहां! मग मी तुमच्या कृपेची

आणखी याचना करूं ? तुमचें कृपाछत्र माझ्यावर असणें हा माझा हक्कच आहे आणि तो मला देणें हें तुमचें कर्तव्य आहे. "

यावर मोहबतखानास काय बोलावें हेंच सुचना.

थोड्या वेळानें तो चिडून म्हणाला, ' तें कांहीं असलें तरी हसीना मला पाहिजे. आणि ती मला प्राप्त होण्याचें तूं करीत असशील तर मी तुला सोडून देईन. "

" बरोबर !-" मानसिंग कुचेष्टेनें म्हणाला, " हां-हें मात्र तुम्ही खरें सांगितलेंत. "

" म्हणजे काय ?

" म्हणजे काय ? " मानसिंग ओष्ठदंश करून म्हणाला, " नीचा ! माझ्या राजद्रोहापेक्षांही तुझ्या डोळ्यांत माझें सुख खुपतें आहे; पण ध्यानांत ठेव धर्मभ्रष्टा ! मला दुःख देऊनही तूं सुखी होणार नाहींस. वाटेल तें केलेंस तरी हसीना तुला मिळणार नाहीं. "

" पाहतो-मान तुझ्या समोर—" मोहबतखान त्याच्या पुढें बोट नाचवीत म्हणाला, " ध्यानांत ठेव, नेभळटा ! तुझ्या समोर मी तिच्याशीं निका लावीन. "

" बरोबर ! एवढ्याच शौर्यावर तूं सिंगाचा खान झालास. जा ! तुझी इच्छा मुळींच शेवटास जाणार नाहीं. ध्यानांत ठेव !"

प्रकरण जास्तच चिरडीला गेले.मोहबतखान चडफडतच हसीनेकडे गेला. तिच्या पुढें त्यानें मानसिंगाच्या प्राण संकटाचें भेसूर वर्णन केलें आणि शेवटीं म्हटलें, " मानसिंगावर तुझें खरें प्रेम असेल, तर त्यास वांचविण्याकरितां तूं मला वश हो ! "

हसीना कांहींच न बोलतां पाठ फिरवून बसली! ?, जेव्हां मोहबतखानानें तिला फारच भंडावून सोडलें, तेव्हां ती चवताळून म्हणाली, " चांडाळा ! त्यांचें न माझें तुला काय करायचें आहे तें कर. पण इथून आपलें काळें कर.

" हसीने ! याचा परिणाम चांगला नाहीं होणार ! "

तें मला माहीत आहे. स्वतःचा धर्म सोडणाऱ्या तुझ्यासारख्या पिशाच्यानें प्रत्यक्ष आपल्या भावाची उष्टी पत्रावळ चाटण्यास तयार व्हावें, हें योग्यच आहे. आणि ती आपली इच्छा पूर्ण झाली नाहीं तर वाटेल तें करण्याची दुसऱ्यास भीति घालावी, हेंही गैर नाहीं. जा-माझ्या बाबा ! तुला वाटेल तें कर जा बरं ! "

" ठीक आहे. तुला चोवीस तासाची मुदत. त्यानंतर तुझ्या याराःसमोर मी तुझ्याशीं शादी करीन कधीं नाहीं सोडणार. आतां तूं माझ्या ताब्यांत आहेस. ध्यानात ठेव. ",

हसीनेनें त्यास वेडावल्याप्रमाणें करून धुतकारलें !

    

" दरवाजाच्या सुळांवर हत्ती टकरा घेत नाहीं ! काय बरं करावं ?- यावेळीं दरवाजा जर तोडला नाहीं तर मिळालेलें सर्व यश मातीमोल होणार !" जयचंद निराशेनें म्हणाला. त्याला काय करावें हें सुचेना.

जयश्री त्याची हालचाल पाहात होती. ती म्हणाली, " त्या सुळांच्या आड कांहीं जिन्नस ठेवला तर हत्ती टकरा घेईल कीं नाहीं !"

" घेईल. अंताळचा किल्ला घेताना सूक्तांवतांनीं जसें केलें तसें केलें पाहिजे. "

" तें काय ? "

" कोणी माणसांनीं सुळांना पाठ देऊन उभें राहिलें पाहिजे.

" मी त्यास तयार आहे. " जयश्री एकदम म्हणाली.

" तूं ?—जयश्री तूं ? " जयचंद्रानें घाबरून म्हटलें.

" होय. अल्पशा सोईनें पतीचें यश मळीन होत नसेल तर मला तें करायला नको कां ? चलावं. मी उभी राहाते. माझ्या अंगावर हत्ती टक्कर घेऊं दे ! "

जयचंदानें कांहीं विचार केला. त्यानें म्हटलें. " मग आपण दोघंही उभें राहूं ! चल. परमेश्वरी इच्छा अशीच दिसते. "

दोघेही आपल्या लोकांत आलीं आणि त्यांनीं आपला विचार जाहीर केला, सर्वांच्या तोंडचे पाणी पळालें. शेवटीं अनेक लोक या धाडसी कृत्यास तयार झाले !

त्यांत पहिली जोडी जयश्री जयचंदाची होती !

अगदीं शांत मनानें जयचंदानें दरवाज्याच्या सुळांना पाठ दिली ! जयश्रीनें त्यास आलिंगन दिलें ! सर्व लोक हा देखावा विस्मयानें व दुःखानें पाहात होते ! इतक्यांत माहुतानें हत्तीस अंकुश मारून त्याच्या अंगावर घातलें !

त्यावेळचा देखावा कसा होता, हें पहाणारांना माहीत ! कल्पनेनें तो ताडतांच येणार नाहीं ! तिसऱ्या जोडीच्या चिंधड्या उडाल्यावर दरवाजा कडाडला ! विजयाच्या विमानांत बसून जाणाऱ्या जयश्री–जयचंदाच्या आत्म्यांनीं सुखानें मागें पहात स्वर्गीं गमन केलें !

नंतर ठाकुर ईश्वरसिंग येऊन पोंचला ! पण काय उपयोग !

*  ×  ×  ×  *

हसीनेनें शांतपणानें म्हटलें, " एकवार त्यांची व माझी जर भेट करवत असशील तर मी तुझें म्हणणें मान्य करतें !"

मोहबतखानानें तिची ही विनंति मान्य केली !

हसीना व मानसिंग यांची भेट झाली !

" हसीने ! मी काय करूं ? "

" जिगर ! तुमच्या हातानें मला मारून टाका ! "

" आणि मी ! "

" मरून जा ! "

शेवटीं तेच झाले ! मोहबतखान येऊन पहातो तों दोघेंही मरून पडलीं होतीं. मरतांनाही दोघांनाही एकमेकांस आलिंगन दिलें होतें. तो देखावा पाहून मोहबतखानही क्षणभर तटस्थ झाला ! तो स्वगत पुटपुटला, " अहा ! याला ह्मणतात मोहबत ! "

* + + + *

संध्याकाळ झाली होती ! पश्चिम क्षितीजाजवळील मेघखंड रक्तानें माखल्याप्रमाणें लालेलाल दिसत होतें ! आतां रात्र सुरू होणार या भीतीनें पक्षी आपआपल्या घरट्याकडे धावत होते ! घुबडांचा घुत्कार सुरू झाला होता.

अशावेळीं ठाकुर ईसरसिंग व फर्जंदबेग बहिरामगडावर एका बुरुजावर बसून मागच्या गोष्टी बोलत होते. दोघेही वृद्ध होते, खंबीर मनाचे होते तरी यावेळीं रडले. जयश्रीची व हसीनेची आठवण काढून रडले ! " आह्मी अद्याप का जीवंत आहोंत ? " दोघानीं एकमेकास खेदानें विचारिलें ! खरेंच असें कां होतें बरें ? कृष्णावताराच्या समाप्तीच्या वेळीं सुद्धां उग्रसेन व वसुदेव शोक करण्यास मागें जिवंत राहिले होत ! विधिलिखित नेहमींच असें चमत्कारिक असतें !

इतक्यांत वार्ता आली ! शहाजादा खुर्रम ( भावी शहाजहान ) मोठी फौज घेऊन मेवाडवर चालून येत आहे, ही ती वार्ता होय !

" मग आमचा संधिकाल आहे ! " ठाकुरसाहेब दुःखानें ह्मणाले.
" ह्मणजे काय ? " फर्जंदबेगानें विचारिलें.

" आमचें मनुष्यबळ अगदीं कमी झालें आहे ! आतां आह्मी तग धरूं कीं नाहीं याची आह्मांला मोठी शंका आहे !—" ठाकुरसाहेब कपाळाला हात मारून म्हणाले, " हायरे ! दुर्दैवा ! मेवाड विरुद्ध दिल्ली या सामन्यांत शेवटीं मेवाडच हरणार का ?—त्याचा प्रताप सूर्य मावळल्या नंतरचा हा प्रकाश—हे आमचे विजय—म्हणजे संधिकाळचा रमणीय देखावाच का ?—ही पहा रात्र पडत चालली ! बेगजी ! तुमचा स्वार्थत्याग फळाला नाहीं आला ! बेगजी ! बेगजी ! ! मेवाडवर परवशतेची रात्र पसरणार हो ! अरेरे ! ! ! " म्हातारा ढळढळा रडूं लागला ! फर्जंदबेग त्यास धीर देत होता !

यावेळीं एक घुबडही तिकडे ओरडत होतें !

## रात्र पडल्यानंतर !

ठाकुर साहेबांनी शोक केल्याप्रमाणेंच झालें ! शहाजादा खुर्रम यानें महाराणा उमराव याचा पुरता मोड केला आणि त्यानंतर त्याचा पुत्र कर्ण यास तहांतील अटीप्रमाणें बादशाही नोकरी करावी लागली ! मेवाडचें स्वातंत्र्य तेव्हांपासून नष्ट झालें तें झालें !

* * * * *

सुप्राजीचें काय झालें ? इतिहास सांगतो. " पुढें सुप्राजी हा एक वेळ बादशहास भेटण्याकरितां ह्मणून दिलीस गेला तेव्हां जहांगीर यानें त्याच्या अशा विश्वास घातकी कृत्याबद्दल भर दरबारांत त्याची फार फजिती केली ती सुप्राजीस सहन झाली नाहीं आणि त्या वैतागाच्या भरांत त्यानें आपलें कट्यार आपल्या पोटांत भोसकून घेऊन बादशहासमोर आत्महत्या केली ! "

—राजस्थानाचा इतिहास पृष्ठ १८७

ठाकुर साहेब हिमालयांत निघून गेले. आपल्या मुलीचा शेवट कसा झाला हें फर्जंदबेगास शेवटपर्यंत कळलें नाहीं. मेवाडच्या स्वातंत्र्य नाशानंतर तो पुन: मक्केकडे चालता झाला !

मोहबतखानाची व नूरजहानची चुरस असली तरी जहांगिराची दोघांवरही सारखी मर्जी होती; त्यामुळें मोहबतखान चांगला यशाला चढला ! मात्र सबंध जन्मांत त्यास पत्नी सौख्य मिळालें नाहीं ! हसीनेच्या शेवटच्या कृत्याचें त्यास राहून राहून कौतुक वाटत होतें व तो मनांत ह्मणत होता. "वाहरे मोहबत !"

चंबेलवाडीचे लोक पुढें कित्येक वर्षें तरी आपल्या ठाकुरठाकुराणीचें चरित्र मोठ्या आवडीनें गात होते. आह्मी त्यापैकीं एखादें कडवें उदेपूर प्रांतांत ऐकायला मिळेल !

वाचकांनो ! आह्मी ही आतां अत्यंत उद्विग्नमनानें आपली रजा घेतों !

